वाङ्मयमंडळ-ग्रंथमाला-पुस्तक २ रें.

महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे प्रणेते

गुरुवर्य

# प्रो॰ विष्णु गोविंद विजापूरकर

(चरित्र, कार्य व आठवणी)

लेखक

रामचंद्र गोविंद कानडे, वाङ्मयविशारद, माजी शिक्षक,
नवीन समर्थ विद्यालय (तळेगांव दाभाडे),
'रवींद्रनाथ टागोर' चरित्रलेखक.

प्रकाशक

चिटणीस-वाङ्मय-मंडळ, पुणें शहर.



प्रकाशक
रा. गो. कानडे,
चिटणीस, वाङ्मयमंडळ, पुणें.

## वाचकांना नम्र जाहीर विनंति

---

**वाङ्मय-मंडळ** ही संस्था १९२६ अखेर कै. वा. गु० विष्णु-अण्णा विजापूरकर यांच्याच प्रोत्साहनानें स्थापन झाली; मराठी भाषेंत टीकाऊ व उद्बोधक असे ग्रंथ तयार करावयाचे व ते अल्प किमतींत वाचकांना द्यावयाचे असा हेतू चालकांनीं आपल्यापुढें ठेविला आहे. मंडळास आपल्या कार्याचा व्याप वाढवावयाचा असल्यामुळें मंडळ एक स्वतंत्र सरकारी पतपेढ्यांच्या कायद्याप्रमाणें रजिस्टर केलेली '**सहकारी-ग्रंथकार-मंडळ**' नांवाची संस्था काढीत आहे. लवकरच यासंबंधीं विस्तृत माहिती प्रसिद्ध करण्यांत येईल. जी जी मंडळी गु० विजापुरकरांच्या चरित्रास उदार आश्रय देतील त्यांनीं पत्रव्यवहार करावा.

पत्ता:—**चिटणीस, वाङ्मय-मंडळ,**
शुक्रवार पेठ, पुणें शहर.

मुद्रक
वा. वा. आतितकर, बी. ए.
नवीन समर्थ विद्यालयाचा 'समर्थभारत' छापखाना,
३२५ सदाशिव पेठ, पुणें.

समर्थ विद्यालयाचे संस्थापक

# प. वा. प्रो. अण्णासाहेब विजापूरकर



जन्मः– ता. २६।८।१८६३. मृत्युः– ता. १।८।१९२६.



गुरुवर्य

वैकुंठवासी विष्णु अण्णा

ऊर्फ

अण्णासाहेब विजापूरकर

यांस

सविनय समर्पण

# आत्मनिवेदन

वैकुण्ठवासी गुरुवर्य विष्णु अण्णा विजापूरकर यांचें नांव माहीत नाहीं असा एकहि सुशिक्षित मनुष्य महाराष्ट्रांत तरी सापडणार नाहीं. प्रो. विजापूरकर हें नांव उच्चारल्याबरोबर अण्णासाहेबांची ती साधीसुधी मूर्ति एकदम मनःचक्षूंपुढें उभी राहते. त्यांच्या आयुष्याचीं उणींपुरीं ४० वर्षें शिक्षणाच्या कार्यांत खर्चीं पडलीं. शेवटचीं २० वर्षें तर त्यांची अविश्रान्त खटपट आणि एकमेव कार्यनिष्ठा राष्ट्रीय शिक्षणाच्या पवित्र हेतुसिद्ध्यर्थ अगदीं कसोटीस लागली आणि मोठ्या घडाडीनें पहिली राष्ट्रीय शाळा म्हणून जी स्थापन झाली ती सर्वस्वीं महाराष्ट्रांत त्यांच्या प्रयत्नामुळें आणि स्वार्थत्यागामुळेंच होय ही गोष्ट सत्य आहे.

कॉलेजांत असल्यापासून गु. विजापूरकरांच्या चरित्रांत एक गोष्ट प्रामुख्यानें आढळून येते ती म्हणजे विद्वत्तेच्या तेजापेक्षां अगर पांडित्यापेक्षां शीलाचा प्रभाव जास्त प्रखर दिसतो; एक वेळ विद्वत्ता कमी पडली तरी चालेल, परंतु मनुष्यानें आपलें शील आणि चारित्र्य अत्यंत पवित्र ठेवून मग जगांतील इतर लौकिक व्यवहार पार पाडावेत असा प्राचीन आर्यमहर्षींचा 'आचारधर्म' अण्णासाहेबांनीं स्वतःच्या आचरणांत पूर्णपणें आणला होता. स्वतः निरभिमानी आणि स्वार्थत्यागपूर्ण वृत्तीनें राहून केवळ लोककल्याणाची इच्छा मनांत बाळगून राष्ट्रांतील सर्व विचारवान् आणि आचारवान् लोकांनीं आपल्या राष्ट्राची औद्योगिक, राजकीय, शैक्षणिक आणि वाङ्मयिक उन्नति घडवून आणावी अशी थोर आकांक्षा गु. अण्णासाहेबांनीं आपल्या पुढें ठेविली होती आणि त्यांच्या दृष्टीनें पाहतां ती सफलहि झाली.

अण्णांचा अमर आत्मा इहलोक सोडून गेल्यास आज २ वर्षांहून जास्त अवधि लोटून गेला तरी त्यांची स्मृति महाराष्ट्रीयांच्या अंत:करणांत अखंड राहील. नियमित वेळीं सकाळीं उगवावें, जगास प्रकाश द्यावा आणि

पुनः सायंकाळीं अस्ताचलावर जावें असा क्रम आज हजारों वर्षें चंद्रसूर्यादि आकाशस्थ तारकामंडळानें चालविला आहे. जगापासून एक रतीचाहि फायदा घेण्याची इच्छा न दाखवितां आपलें कार्य नेमलेल्या वेळीं पार पाडण्यांतच त्यांना आनंद वाटतो. हीच निःस्वार्थी वृत्ति अण्णांच्यासारख्या लोककार्यार्थ झटणाऱ्या व देह आणि वित्त वेंचणाऱ्या महात्म्यांच्या आचरणांत दिसून येते. अशा प्रकारचीं थोर पुरुषांचीं चरित्रें महाराष्ट्रांतील तरुणांच्या पुढें आदर्श म्हणून जितकीं येतील तितकीं पाहिजेत. तशी दृष्टी ठेवूनच हें चरित्र लिहिलें आहे हें सांगणें नकोच.

आतां प्रस्तुत चरित्राच्या रचनेबद्दल थोडासा उल्लेख येथें केला पाहिजे. गुरुवर्यांचा आणि प्रस्तुत चरित्रलेखकाचा परिचय अगदीं अलिकडचा असा होता. टिळक महाविद्यालयांत अभ्यास करीत असतां त्यांचें पवित्र नांव मात्र ऐकून ठाऊक होतें. पुढें १९२४ सालीं नवीन समर्थ विद्यालयांत काम करण्यास गेल्यावर त्यांच्या प्रेमळ स्वभावाचा व अति निर्मळ मनोभूमिकेचा दृढ परिचय झाल्यावर अण्णांच्या थोर चारित्र्याचा चरित्रलेखकावरहि थोडासा परिणाम झाल्यावाचून राहिला नाहीं. गुरुवर्यांच्या सान्निध्यानें पवित्र झालेल्या अशा संस्थेंत राहण्याचा सुयोग पुढें आल्यामुळेंच गुरुवर्यांचें चरित्र आपण लिहावें ही एक अंधुक कल्पना मनांत आली; पण हें काम पार कसें पडणार याची प्रथम शंकाच वाटत होती. पण पुढें सुदैवानें गुरुवर्यांच्या चरित्राचीं साधनें मला उपलब्ध होतांच मी चरित्रलेखनाचें कार्य एकदम सुरू केलें आणि आज हा चरित्रग्रंथ वाचकांच्या हातीं देण्यास तयार झाला आहे, ही अत्यंत आनंदाची व अभिमानाची गोष्ट आहे.

अण्णांच्या आयुष्याचे अखेरचे कांहीं दिवस अत्यंत त्रासाचे, मानसिक अस्वास्थ्याचे आणि खिन्नतेचे असे गेले. आपल्या आयुष्यांत सुमारें ४० वर्षें अविश्रांत कार्य करीत असतां, अण्णांच्या आयुष्याच्या अगदीं शेवटचा थोडा भाग अशा रीतीनें काळजींत, खिन्नतेंत आणि अशांततेंत जावा ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. परंतु योगायोगच तसा होता इतकेंच मानून आपण त्यांच्या चरित्राचा स्फूर्तिदायक भाग नीट रीतीनें अवलोकन करावा हेंच बरें.

तळेगावीं असतां अण्णांचा माझ्यावर बराच लोभ होता. हिंदुस्थानांतील वंद्य विभूतींच्या चरित्राबद्दल एखादे वेळीं बोलणें निघे त्यांत मीहि भाग घेत असें. पुढें मी आपले रवींद्रनाथ टागोर यांचें चरित्र अण्णांना दिलें व म्हटलें " अण्णा ! तुम्ही या पुस्तकाबद्दल आपला योग्य अभिप्राय द्या व तुमचें काय मत आहे तें मला सांगा." त्यावर ते म्हणाले, "ठीक आहे. पण तुम्ही या परप्रांतीय गृहस्थाचें चरित्रच कां लिहिलें ? महाराष्ट्रांतील एकहि थोर व्यक्ति तुम्हांस दिसली नाहीं ?" अण्णांचें म्हणणें मला पटलें; परंतु मीं त्यांना उलट सांगितलें ' महाराष्ट्रांतील थोर व्यक्तींचीं चरित्रें तयार होत आहेत, व तीं आपण येथें बसून तयार करूं शकूं. परंतु जो हिंदी मनुष्य आज सर्व जगती-तलावर प्रसिद्ध झाला आहे त्याचें चरित्र आम्हीं महाराष्ट्रीयांनीं इंग्रजींतून परकीय लोकांनीं अत्यंत विपरीत दृष्टीनें लिहिलेल्या अर्धवट माहितीच्या पुस्तकांवरून वाचावें आणि हिंदी मनुष्याची ओळख आम्ही युरोपियनां-कडून अद्यापिहि करून घ्यावी ही गोष्ट मला पसंत नाहीं. त्यासाठीं मी स्वत: बंगाली शिकलों आणि हें चरित्र बऱ्याच परिश्रमानंतर तयार केलें आहे."

इतका खुलासा करतांच अण्णांना बरें वाटलें व त्यांनीं माझें पुस्तक नीट वाचून अभिप्राय लिहिण्यासाठीं त्यावर खुणाहि केल्या. परंतु त्यांची प्रकृति मध्यंतरीं जरा बिघडल्यामुळें अभिप्राय लिहिण्याचें काम मागें पडलें. वर्त-मानपत्री अभिप्रायांपेक्षां नवीन लेखकास अण्णांच्यासारख्या थोर आणि गुणग्राही विद्वानांच्या अभिप्रायाचेंच जास्त महत्त्व आहे. असो.

आज त्रिपुरी-पौर्णिमेच्या दिवशीं हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे. १९१८ सालीं याच सुमुहूर्तावर अण्णांनीं अपत्यनिर्विशेष अशा आपल्या विद्याल-याचा उद्घाटनसमारंभ सर महादेव चौबळ यांच्या हस्तें केला. आणि त्याच सुमुहूर्तावर अण्णांचें चरित्रहि प्रसिद्ध होत आहे हा एक काकतालीय न्याय जरी असला तरी त्यांत एक प्रकारचें औचित्य आहे. वर उल्लेखिलेल्या अण्णांच्या संवादांत ' तुम्हाला **महाराष्ट्रांतील एकहि थोर व्यक्ती दिसली नाहीं !** ' या वाक्याची मला आज पुन:पुन: आठवण होते. अण्णांच्या सूचनेप्रमाणें एका थोर व्यक्तीचें–खुद्द त्यांचेंच–चरित्र लिहिलें गेलें याबद्दल आनंद होत आहे. बोटावर मोजण्याजोग्या कांहीं व्यक्ती सोडून

दिल्या तर अण्णासाहेब हेच एक अत्यंत थोर, वंद्य, आणि आदर्श असे महाराष्ट्रीय पुरुष होऊन गेले याबद्दल दुमत होणार नाहीं. अशा थोर पुरुषांच्या चरित्रलेखनाचें अत्यंत अवघड काम आपण आपल्या अल्प मतीप्रमाणें पार पाडलें आणि महाराष्ट्रीय वाचकांपुढें आज दोन वर्षांनीं कां असेना पुनः एक चरित्र ठेवण्याचा आनंददायक प्रसंग लाभला याबद्दल परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत.

आतां या चरित्राचे कामीं ज्यांनीं साहाय्य केलें अशा थोर व्यक्तींचे आभार मानावयास पाहिजेत. अण्णांच्या कार्यांत ज्यांनीं त्यांना सहकार्यानें मदत केली असे केसरीचे विद्वान् सहसंपादक रा. ज. स. ऊर्फ तात्यासाहेब करंदीकर यांचे प्रथम आभार मानिले पाहिजेत. त्यांनीं प्रस्तुत चरित्राची प्रत एकवार वाचून पाहिली आणि पुष्कळ ठिकाणीं सूचनाहि केल्या. त्यांच्या मदतीचा बराच उपयोग झाला याबद्दल लेखक त्यांचा फार आभारी आहे. त्याचप्रमाणें ज्ञानप्रकाशचे सध्याचे विद्वान् संपादक रा. कृ. ग. ऊर्फ काकासाहेब लिमये यांनीं माझ्या कार्याबद्दल सहानुभूति दाखवली व आपल्या सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटींतील कांहीं उपयुक्त माहिती दिली याबद्दल त्यांचे आभार मानावयास पाहिजेत.

याशिवाय आमच्या **वाङ्मय–मंडळाचे** अध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार यांचेहि आभार मानले पाहिजेत. कारण वाङ्मय–मंडळाच्या सर्व योजनांना त्यांचें पाठबळ असतें व त्यांचे उत्तेजनामुळें थोडें बहुत कार्य होतें असा अनुभव आहे. वाङ्मय–मंडळाच्या कामाची दिशा पुढें दिली आहे. जर मंडळाचें कार्य महाराष्ट्रीय जनतेस पटेल तर त्या कामाचाहि उठाव करावा असा हेतु आहे.

सर्व मंडळींचे आभार मानून लेखणी खालीं ठेवण्यापूर्वी या चरित्राच्या कामीं अस्सल कागदपत्र पुरवून लेखकांस ज्यांनीं अत्यंत बहुमोल साहाय्य केलें, असे अण्णासाहेबांचे कनिष्ठ बंधु रा. वा. गो. ऊर्फ वासुनाना विजापूरकर, M. A., LL. B., अॅड्व्होकेट, टॅव्हॉय (ब्रह्मदेश), यांचे आभार मानले पाहिजेत. वासुनानांनीं कागदपत्रें पुरविलीं नसतीं तर चरित्र-लेखनाचें काम पुरें झालें असतें कीं नाहीं, हें आतां सांगतां येत नाहीं. किंबहुना त्यांनीं चरित्र लवकर पुरें करा अशी टोंचणी जर मागें लावली नसती तर चरित्र-

## परिशिष्टें

( इंग्रजी व मराठी, पृष्ठें १ ते ४८ )

# आठवणींची सूचि

( एकंदर आठवणी १२९ )

[ स्वभावनिदर्शक ] आठवणींचा क्रम

———:———

# वाङ्मय मंडळाचा नवीन उपक्रम

वाङ्मय मंडळ ही संस्था १९२५ मध्यें परलोकवासी प्रो. अण्णासाहेब विजापूरकर यांच्या उत्तेजनानेंच पुणें येथें अस्तित्वांत आली. त्या वेळेपासून मी तिचा अध्यक्ष आहें. तिचे चिटणीस टिळक महाविद्यापीठाचे पदवीधर रा. रा. गो. कानडे हे आहेत. ' प्रसिद्धीच्या विशेष भरीं न पडतां व वाद-विवादाच्या लडथडींत न सापडतां संथपणानें व प्रामाणिकपणें श्रीमहाराष्ट्र-सरस्वतीची सेवा करण्याचें योजीत असाल तर यश मिळविण्याचें मजकडून शक्य तें साह्य मी मनोभावानें करीन," असें ता. २४।१२।२५ (पौष शु. १०) च्या पत्रांत मीं लिहिलें होतें, त्याप्रमाणें आजहि संस्था बिनबोभाट आपलें नियुक्त कार्य करीत आहे याबद्दल मला अभिमान वाटतो. संस्थेचें पहिलें पुस्तक " रवींद्रनाथ टागोर " यांचें चरित्र प्रथम २ वर्षांपूर्वी बाहेर पडलें. रवींद्रनाथ ठाकूर यांच्या विस्तृत चरित्रांतील विवेचनांत माझा कित्येक स्थलीं मतभेद आहे आणि तो मीं प्रसंगीं दाखविलाहि आहे. जगभर प्रसिद्ध झालेल्या वंगीय कवीचें एवढें विस्तृत चरित्र कोणत्याहि देशी भाषेंत नव्हतें. तें प्रथम प्रसिद्ध करण्याचा महत्त्वाचा मान रा. कानडे यांनीं परिश्रमानें आपणांस मिळवून दिला आहे. आतां त्यांनीं पूर्वसंकेत केल्याप्रमाणें महाराष्ट्रावरील राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते प्रो० अण्णासाहेब विजापूरकर यांचें त्रिभागात्मक ४०० पर्यंत पृष्ठांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध करून याहि विशिष्ट कार्यांत अघाडी मारली आहे.

अण्णांचे शैक्षणिक व वाङ्मयिक लेख आणि इतर कांहीं मजकूर प्रसिद्ध करण्याचा रा. कानडे यांचा हेतू आहे. तसें झाल्यास अण्णांचें संपूर्ण चरित्र एका दृष्टीनें पुरें होईल असें म्हणावयास हरकत नाहीं यांत संशय नाहीं. या पुस्तकानेंहि अण्णांच्या अष्टपैलू चरित्रावर बराच प्रकाश पडेल आणि महाराष्ट्रीय वाचकांना त्यांच्या चरित्राची रूपरेखा व त्यांचें कार्य यांची चांगलीशी कल्पना होईल. मी पुढें कांहीं तरी या पुस्तकासंबंधीं लिहीन. तूर्त वाङ्मय-मंडळाचा अध्यक्ष या नात्यानें मंडळाचें पुढील कार्य वाचकांना निवेदन करण्याचें काम मजकडे ओघानें आलें आहे.

## नवीन उपक्रम

वाङ्मय–मंडळानें या पूर्वीच आंखून ठेविला आहे. त्या वेळीं मी आपल्या सहीनें एक हस्तपत्रक काढलें होतें, परंतु त्या बाबतींत कांहीं पुस्तकें तयार झाल्यावर तें प्रसिद्ध करावें असें ठरल्यामुळें बरोबर २ वर्षांनीं आज तें पुढें दिलें आहे.

आज महाराष्ट्रांत अनेक संस्था व मंडळें आपआपल्या परीनें थोडें बहुत कार्य करीत आहेत. त्याप्रमाणें वाङ्मयमंडळ हेंही त्याच हेतूनें अस्तित्वांत आलें आहे. उच्च वाङ्मयाचे ग्रंथ मराठी भाषेस शोभतील अशीं संदर्भ–पुस्तकें व वाङ्मयाच्या साम्राज्यांत टिकाव धरतील अशीं सामाजिक, ऐतिहासिक व चरित्रात्मक पुस्तकें प्रसिद्ध करणें हें मंडळाचें ध्येय आहे. सुमारें ५००० रुपये वरील पुस्तकप्रकाशनासाठीं पाहिजेत. तरी मंडळाचे विभाग घेऊन अगर मंडळाच्या पुस्तकांचे आश्रयदाते होऊन महाराष्ट्रांतील जनतेनें मंडळास सर्वतोपरी साह्य करावें. मंडळाचें ध्येय व कार्य सर्वांगीण आहे व मंडळाच्या सल्लागार मंडळांत निरनिराळ्या संस्थानांतील मंडळी आहेत त्यामुळें मंडळाच्या कार्याचा जास्त प्रसार होण्याचा अधिक संभव आहे.

मंडळाची मूळ कल्पना रा. कानडे, टिळक महाविद्यापीठाचे वाङ्मय–विशारद, यांनीं काढिली इतकेंच नव्हे तर मंडळाचें कार्य कसें होणार याचें थोडेंसें दिग्दर्शन म्हणून त्यांनीं स्वतःच्या जबाबदारीवर कविवर्य रवींद्रनाथ टागोर ह्यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध करून मंडळाच्या कार्याची थोडीशी ओळख करून दिली आहे. पूर्वी मुंबईच्या ‘ लोकमान्यां’त संपादक म्हणून काम करून पुढें ते तळेगांवच्या नवीन समर्थ विद्यालयांत शिक्षक म्हणून राहिले. त्यांचा व्यासंग व वाङ्मयांत टिकाऊ असा वरील चरित्र–ग्रंथ पाहतां त्यांच्या हातून मंडळाचें कार्य उत्तम होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. सदर मंडळ प्रो० विष्णु गोविंद ऊर्फ अण्णासाहेब विजापूरकर यांच्या प्रोत्साहनानें व आशीर्वादानें प्रथम निघालें असून आतां अण्णांचें एक वाङ्मय–स्मारक म्हणूनच चालवावें अशी रा. कानडे यांची इच्छा आहे. त्याचप्रमाणें अण्णांचें जें खरेंखुरें स्मारक नवीन समर्थ

विद्यालय त्यासही मंडळाकडून वार्षिक कांहीं मदत पुस्तकांचा प्रसार करून मिळवून द्यावयाची असाहि त्यांचा हेतु आहे. काम करण्याची हौस, संस्थेकरितां अविश्रांत परिश्रम करण्याची आवड, कार्याविषयीं व ध्येयाविषयीं आस्था हे गुण प्रस्तुत चिटणीसांच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांचें कार्य यशस्वी होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तरी अशा प्रकारच्या मंडळास वाङ्मयप्रेमी मंडळींनीं सर्वतोपरीं ग्राहक होऊन अगर विभाग घेऊन साह्य करावें अशी विनंती आहे.

वाङ्मय-मंडळ, पुणें.
ता. १६।१०।२६

आपला
**दत्तो वामन पोतदार,** अध्यक्ष.

जसजशी महाराष्ट्रीय वाचकांची मदत होईल तसतशीं मंडळातर्फे पुढील पुस्तकें प्रसिद्ध होणार आहेत.

(१) **पुणें मार्गदर्शक**-( पृष्ठसंख्या ३०० ) किं. १ रु.
(२) **वर्तमानपत्रांचा इतिहास**-तयार होत आहे. (पृ. सं. ३००) १॥
(३) **डॉ. जगदीशचंद्र बोस-चरित्र**( पृ. सं. ३०० ) किं. १॥
(४) **ग्रंथालयांचा इतिहास व विस्तार**-छापत आहे पृ.सं.२०० किं. १

याशिवाय १८७४ सालीं प्रसिद्ध झालेला कैलासवासी गोडबोले यांचा **नवीन मराठी कोष** छापविण्याची योजना मंडळानें तयार केली आहे व त्याप्रमाणें खटपट चालू आहे. हा कोष अगदीं अल्प किंमतींत देण्यासाठीं मुद्दाम मंडळानें छापविण्याचें ठरविलें आहे. सध्यां उपलब्ध असलेल्या मराठींतील सर्व जुन्या व अपरिचित अशा प्राचीन शब्दांचा समावेशहि यांत केला जावयाचा आहे. या बाबतींत लवकरच जास्त माहिती मंडळाकडून प्रसिद्ध होईल.

याशिवाय वाङ्मय-मंडळाचें अतिशय महत्त्वाचें कार्य म्हणजे नवीनच उपक्रम सुरू केलेली साप्ताहिक ज्ञानेश्वरीचर्चा हें होय. चर्चेस पुण्यांतील विद्वान्, बहुश्रुत येत असतात ही आनंदाची गोष्ट आहे. पुढें प्रसंगानें ही चर्चा एकत्र प्रसिद्ध करण्याचाहि मानस आहे. परंतु ती गोष्ट जनतेच्या साहाय्यावर आणि उत्तेजनावर अवलंबून असल्यानें जास्त येथेंच निश्चित असें आज कांहींच लिहितां येत नाहीं.

**दत्तो वामन पोतदार,**
अध्यक्ष, वाङ्मयमंडळ, पुणें.

# प्रो० अण्णासाहेब विजापूरकर

[ चरित्र आणि वाङ्मय-परिचय ]

## विषय-प्रवेश

*एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥

—मनुस्मृतिः २·२०

श्रीसमर्थ विद्यालयाचे संस्थापक, महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे प्रणेते, आणि सुप्रसिद्ध ग्रंथमाला मासिकाचे संपादक गु० प्रो० अण्णासाहेब ऊर्फ विष्णु गोविंद विजापूरकर यांची ओळख आम्ही महाराष्ट्रीयांस नव्यानें करून दिली पाहिजे असें नाहीं.

१९ व्या शतकाच्या शेवटीं हिंदुस्थानांतील लोकमतांत हळूहळू क्रांति होऊं लागली होती. या कालांत महाराष्ट्रांतहि अनेक पुरुष नवयुग-प्रवर्तक झाले. राजकारणांतील क्षेत्रांत लोकमान्य टिळक आणि नामदार गोखले यांनीं आपला प्रभाव दाखविला. सामाजिक चळवळीचा पुढाकार न्यायमूर्ति रानडे आणि नंतर प्रि. आगरकर यांनीं घेतला. कै० विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनींहि 'मी मराठी भाषेचा शिवाजी आहे' असें म्हणून मराठी वाङ्मय-सृष्टींत एक प्रकारची विलक्षण क्रांति घडवून आणली. त्याप्रमाणेंच 'राष्ट्रीय शिक्षण' आपल्या आयुष्याचें ध्येय असें ठरवून गु० अण्णासाहेब विजापूरकर यांनीं महाराष्ट्रांत श्रीसमर्थ विद्यालय स्थापून एक नवीन परंपरा निर्माण केली, म्हणूनच त्यांचें नांव आज सर्वतोमुखीं झालें आहे.

---

* 'या आर्यावर्तांत जन्मास आलेल्या पुरुषापासूनच जगांतील सर्व लोकांनीं आपापले धर्म शिकावेत.'

गु० अण्णासाहेब विजापूरकर यांचें चरित्र अनेक दृष्टींनीं मननीय आहे. प्रथम विद्यार्थी, नंतर शिक्षक, आणि नंतर संपादक, या नात्यानें त्यांनीं ऐन उमेदीचीं आपलीं वीस वर्षे कोल्हापुरांत आपल्या जन्मभूमीच्या सेवेंत खर्च केलीं; पुढें अखिल भारतीय राजकारणास हेलकावे बसतांच त्याचा प्रतिध्वनि कोल्हापूर संस्थानांतहि निघत असे. यामुळें त्यांनीं श्रीकरवीर क्षेत्र मोठ्या कष्टानें सोडलें आणि श्रीज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, जनार्दन, तुकाराम प्रभृति साधुसंतांनीं पावन केलेल्या पंचक्रोशींतील इंद्रायणीच्या पवित्र तीरीं, तळेगांवच्या सुप्रसिद्ध रणमैदानावर श्रीसमर्थ विद्यालयांत आपलें कायमचें निवासस्थान केलें. पण दैवगति विचित्र होती ! मुंबई सरकारनें १९१० सालीं समर्थ विद्यालय बंद केल्यामुळें अण्णासाहेबांचें शिक्षणकार्य मध्येंच थांबलें. पुढें अनेक खटपटी करून त्यांनीं पुनः कार्तिक शु० १५ शके १८४० ता. १७-११-१९१८ रोजीं सुमुहूर्तावर समर्थ विद्यालयाची ध्वजा पुनः रोविली ती आजतागायत त्यांच्या मागेंहि कायम आहे.

१९११ नंतरचीं सात वर्षे समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनासाठीं त्यांनीं भगीरथ प्रयत्न केले आणि अखेर यश मिळविलें ह्यांत त्यांचें खरें कर्तृत्व व आशावाद हीं निदर्शनास येतात. निराश झालेल्या लोकांना ते नेहमीं शिरोवतरणावर दिलेला मनुस्मृतींतील श्लोक म्हणून दाखवीत व योग्य उत्तेजन देत. त्यांची शरीरयष्टी जरी दिसावयास किरकोळ तरी सुदृढ अशी होती. त्यांचा दृढनिश्चय आणि कार्यनिष्ठा हींहि अलौलिक होतीं. त्यांच्या निरलस उद्योगाकडे पाहून अगदीं तरुण मनुष्यानें तोंडांत बोट घालावें आणि आश्चर्य करीतच राहावें. असो !

अशा प्रकारचें प्रो० विजापूरकरांचें चरित्र आबालवृद्धांना आदर्श असें आहे. थोर विभूतींचीं चरित्रें दगडांतहि चैतन्य उत्पन्न करतात असें म्हणतात. मग या थोर आणि वंद्य महाराष्ट्रीय विभूतीच्या चरित्राचें जर महाराष्ट्रीयांनीं परिशीलन केलें तर उज्वल स्वधर्म-स्वदेश-स्वभाषाभिमान चोहोंकडे दिसूं लागला तर त्यांत आश्चर्य काय ?

---

## प्रकरण पहिलें

# पूर्ववृत्त

**देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥**
**चरण न सोडी सर्वथा । आण तुझी पंढरीनाथा ॥**

—नामदेव.

महाराष्ट्राच्या गेल्या ५० वर्षांच्या इतिहासांत जे अनेक कर्तृत्ववान् व स्वकर्तव्यदक्ष पुरुष होऊन गेले त्यांमध्यें राष्ट्रीय शिक्षणाचे आद्यप्रवर्तक या नात्यानें प्रो० वि० गो० विजापूरकर यांचें नांव कायमचें राहील यांत संशय नाहीं. सर्वांना आदर्शभूत अशी त्यांची साधी परंतु निष्ठावंत मूर्ति, प्राचीन काळच्या एखाद्या ऋषीस शोभेल अशी त्यांची साधी रहाणी, आणि एखाद्या निष्काम कर्मयोग्यास शोभेल असा त्यांचा अविश्रांत उत्साह आणि दीर्घ विद्याव्यासंग वगैरे गोष्टी पाहून महाराष्ट्रांतील सर्व राष्ट्रीय, नेमस्त, श्रीमंत, गरीब, सरकारी अधिकारी व संस्थानिकहि गु० अण्णासाहेबांबद्दल नेहमीं आदरभाव व्यक्त करीत. राष्ट्रीय शिक्षणाचें एक ध्येय डोळ्यापुढें ठेऊन गुरुवर्य काम करीत. त्यामुळें त्यांना कोणत्याहि पक्षास मिळून उघडपणें भाग घेतां येत नसे. यामुळें सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांचें त्यांना साहाय्य मिळवितां आलें व अखेर त्या कार्यांतच त्यांनीं आपला देह महाराष्ट्र-संतांनीं पुनीत केलेल्या पंचक्रोशींत विसर्जन केला. अशा या महाराष्ट्रांतील थोर महात्म्याचें चरित्र येथें थोडक्यांत सांगावयाचें आहे.

गु० अण्णासाहेब अगर त्यांच्या प्रेमळ मित्रांच्या अत्यंत परिचित अशा भाषेंत बोलावयाचें ह्मणजे विष्णुअण्णा विजापूरकर यांचा जन्म श्रावण शु० १२ शके १७८५ ( म्हणजे २६ आगस्ट १८६३ ) रोजीं कोल्हापूर मुक्कामीं झाला. अण्णासाहेबांचें मूळ घराणें देशपांडे या आडनांवानें आदिलशाहीच्या वेळीं विजापुरांत बरेंच प्रसिद्ध होतें. त्यांचें ब्राह्मण घराणें एका उच्च देशस्थ वैष्णव मताचें असून कथाकीर्तन करून कालक्रमणा करावयाची अशी या घराण्याची परंपरा फार दिवसाची होती. कीर्तन आणि प्रवचन या द्वारें त्यांनीं लोकशिक्षणाचें कार्य चालविलें होतें. परंतु पुढें मुसल-

मानांच्या अमदानींत ब्राह्मणांच्या कर्मठ आचारांस अडथळा आला. या काळीं हिंदूस उघडपणें परमेश्वराचें कीर्तन करणें, अगर गांवांतील चार मंडळी जमवून हरिनामाचा गजर चालविणें या गोष्टी अशक्य होऊं लागल्या. हा काळ विजापूरकरांच्या निष्ठावंत आणि मानधन घराण्यास बराच जाचक झाला असावा असें दिसतें. कारण मुसलमानी अमदानीस सरतेशेवटीं कंटाळून या घराण्यांतील पुरुषांनीं स्वधर्माचरणासाठीं विजापुरास अखेरचा रामराम ठोकला व ते कोल्हापुरास आले. सदर देशपांडे पुढें कोल्हापुरासच कायमचे राहिले. या देशपांडे घराण्याच्या पूर्वीच्या विजापूर येथील वास्तव्यामुळें त्यांच्या पुढील वंशजांस विजापूरकर हें नामाभिधान प्राप्त झालें.

ज्या वेळीं विजापूरकर देशपांड्यांचें पूर्वज विजापुरास नांदत होते, त्या-वेळची हिंदू लोकांची स्थिति फारच वाईट होती. हरएक प्रकारचे जुलूम व जबरदस्तीचे प्रकार भर दिवसां घडून येत ! हिंदू देवतांची विटंबना करणें व देवालयें उध्वस्त करणें हे प्रकार राजरोस चालू होते. प्रत्यक्ष हिंदू देवालयां-मधून कोणत्याहि प्रकारचें वाद्य वाजविलें जाऊं नये अगर देवतांपुढें कीर्त-नहि करूं नये अशा प्रकारचे जुलमी हुकूम प्रत्यहीं दरबारांतून निघत. या अपमानकारक परिस्थितींत कोणाहि स्वाभिमानी मनुष्यास एक क्षणभर देखील विजापुरास रहावें असें वाटत नसे. आमच्या या चरित्रनायकांचे पूर्वज आद्यपुरुष देशपांडे यांनाहि वरील दुःसह प्रकारची चीड आली व केवळ आपला धार्मिक हक्क म्हणून त्यांनीं देवालयांत कीर्तनें करण्याची आपली पूर्वपरंपरा कायम ठेवली. यामुळें अधिकाऱ्यांची त्यांच्यावर गैरमर्जी झाली. धार्मिक स्वातंत्र्यावर गदा येत असतां आपण तो छळ निमुटपणें सोसावा अशी सहनशीलता देशपांड्यांच्या अंगीं नव्हती. ' देशत्याग अगर देहत्यागहि पुरवला परंतु धार्मिक हक्कांचें रक्षण करणारच ' अशी त्यांची प्रतिज्ञा होती. त्यामुळें देशपांडे यांचा खुद्द विजापुरांत पुष्कळ छळ झाला; परंतु त्यांनीं अंगीकृत कार्य सोडलें नाहीं. सरतें शेवटीं सर्व त्रासास कंटाळून त्यांनीं विजा-पूर कायमचें सोडलें; जेथें आपणांस श्रीहरिकीर्तन निर्वेधपणें करितां येईल तेथेंच रहावयाचें असा निश्चय करून नंतर ते कोल्हापूरास आले.

हा अठराव्या शतकांतील उत्तरार्धाचा काल कोल्हापूरच्या राजकारणांत फार महत्वाचा होता. छत्रपती राजाराम महाराजांच्या निधनानंतर त्यांच्या

पत्नी ताराबाईसाहेब यांनीं आपला पुत्र श्रीशिवाजी या बालराजाला गादी-वर बसविलें आणि पंत अमात्य, सेनापती आणि परशुराम त्र्यंबक यांच्या साहाय्यानें त्या राज्यकारभार करूं लागल्या. पण पुढें १७०७ मध्यें औरंग-जेब बादशहा मरण पावल्यावर शाहू राजे कैदेंतून सुटले आणि त्यांनीं राज्यावर आपला वारसा सांगितला. पुढें १७३० मध्यें दोन्ही घराण्यांत सलोखा झाला. परंतु १७६० मध्यें राजाराम महाराजांचे धाकटे चिरंजीव संभाजीमहाराज मरण पावल्यामुळें वंशवेल खुंटली. पुनः दत्तक घेण्यास पेशव्यांनीं आडकाठी केली तेव्हां मात्र बराच घोटाळा माजला. अखेर त्यांनीं दत्तकास परवानगी दिली! ह्या वेळीं अनेक संकटें राज्यावर आलीं. पेश-व्यांनीं कोल्हापूरच्या सरहद्दीवर पटवर्धन जहागीरदारांना, हाताखालीं स्वार देऊन सर्व बिमोड करण्यासाठीं ठेविलें होतें. तरी कोल्हापूरकरांचीं कार-स्थानें पेशव्यांविरुद्ध चालतच!

सदर पटवर्धन सरदारांच्या मार्फत पूर्वोक्त देशपांडे कोल्हापूरला आले. त्यामुळें त्यांना चांगला आश्रय मिळाला. पुढें १७८२ मध्यें रत्नाकर अप्पाजी राजाज्ञे हे कोल्हापूरचे कारभारी झाले. त्यांनीं देशपांड्यांची स्वधर्म-निष्ठा व कर्तबगारी पाहून आश्रय दिला, इतकेंच नव्हे तर श्रीजगदंबेच्या देवालयांत त्यांस नोकरी देऊन कायमचे ऋणी करून ठेविलें. पुढें त्यांनीं देशपांड्यांना—विजापूरकरांना—जवळच गोकुळ व गिरगांव येथें २० बिघे जमीन निर्वाहासाठीं सरकारकडून देवविली. कोल्हापुरची नोकरी सांभाळून आपल्या या थोड्याशा उत्पन्नावर ते कसातरी उदरनिर्वाह करीत. अशा रीतीनें अगदीं गरिबींतच विजापूरकर यांचे पूर्वज दिवस काढीत होते. पुढें कालांतरानें अण्णासाहेबांचे वडील कै० गोविंदराव अण्णा कोल्हापूर सरका-रच्या शिक्षणखात्यांत नोकरीस लागल्यामुळें देवालयांतील नोकरी संभाळणें त्यांस अशक्य झालें व त्यांनीं बरेंच दिवस आपले जागेवर बदली दिला होता. त्यापूर्वी ते स्वतः जातीनें नोकरी करीत असत.

गोविंदरावांची शरीरयष्टी मजबूत व विशेष कणखर होती. त्यांना चाल-ण्याचा कंटाळा कधींच नसे. कोल्हापूरपासून २० मैलांवर असलेल्या उद-गांव मुक्कामीं शिक्षक असतांना ते कोल्हापुरास अभ्यास करीत असलेल्या आपल्या मुलांस भेटावयास पायींच येत. शाळेंतील विद्यार्थ्यांनाहि ते

घरींहि शिकवीत. परंतु त्याबद्दल कधींहि 'फी' घेत नसत. त्याचप्रमाणें त्यांची शिकविण्याची हातोटी फारच वाखाणण्याजोगी होती. आपल्या विद्यार्थ्यांवर त्यांचें फार प्रेम असे !

गोविंदरावांचा स्वभाव बराच तापट होता. ते शिस्तीचे विशेष चहाते असल्यामुळें स्वतःचे मुलांसहि गृहशिक्षण देतांना प्रसंगीं कडक शासन करण्यास ते मागेंपुढें पहात नसत. स्वभावानें जरी ते अत्यंत रागीट दिसत तरी त्यांच्या अंतःकरणांत मात्र प्रेमाचा भरपूर सांठा होता. १८९० मध्यें पेन्शन घेतल्यावर कोल्हापुरांत घरीं राहून अगदीं शेवटपर्यंत म्हणजे १९०० पर्यंत ते सर्व प्रपंचाची दगदग सहन करीत; त्यामुळें आमचे चरित्रनायक गु० अण्णासाहेब ह्यांना घरची कोणतीच काळजी वाटत नव्हती. १८९० च्या सुमारास गुरुवर्य कोल्हापुरांत राजाराम कॉलेजमध्यें १२५ रुपयांवर घोरपडे लेक्चरर झाले. त्यानंतर अण्णांच्या घरीं पुष्कळ पाहुणे मंडळी नेहमीं येत. प० वा० न्यायमूर्ति माधवराव रानडे, नामदार गोखले आणि कित्येक प्रसंगीं लो० टिळक वगैरे मंडळी कोल्हापूरला आल्यावर प्रथम विजापूरकरांच्या घरींच उतरावयाचीं असें ठरलेलें असे. या सर्वांची व्यवस्था गोविंदराव अत्यंत टापटिपीनें व काळजीनें ठेवीत.

गोविंदरावअण्णा जुन्या बाळबोध वळणाचे होते आणि त्यांची ईश्वरनिष्ठा अलौकिक होती. ते पूर्ण माध्वमतानुयायी असल्यामुळें त्यांचें एकादशी व्रत कधींहि सुटलें नाहीं. 'एका परमेश्वरावरच अढळ श्रद्धा असली म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूचेंहि भय नाहीं' असें ते नेहमीं म्हणत. त्यांच्या बाणेदार स्वभावास योग्य अशा हितदक्ष व प्रेमळ पत्नीचा सहवासहि त्यांना सुदैवानें लाभला होता. त्यामुळें प्रपंचाची काळजी त्यांस केव्हांहि वाटली नाहीं.

गोविंदराव जरी कर्मनिष्ठ आणि सत्वशील होते तरी त्यांचे विचार प्रगमनशील असून ते ललितकलांचे भोक्ते होते. ना० गोखले कोल्हापूरला आले कीं दोघेहि मोठ्या रसिकतेनें काव्य, अलंकार, नाटक वगैरे विषयांवर वादविवाद करीत व पुष्कळ वेळां वेळांत वेळ काढून नाटक पाहण्यासहि जात ! गोविंदरावांच्या बरोबर नेहमीं त्यांचे कनिष्ठ चिरंजीव वासूनाना मात्र नाटक पाहण्यास अवश्य जात; अण्णासाहेब मात्र आपल्या अभ्यासाच्या खोलींत माराभर पुस्तकें सभोंवार घेऊन वाचनांत दंग असावयाचे !

अण्णासाहेबांच्या मातुःश्री श्री० सौ० रुक्मिणीबाई या कोल्हापूरच्या एका इनामदारांच्या घराण्यांतील होत्या. कोल्हापुरांतच विजापूरकरांच्या घराच्या पूर्वेस दिवाणांचा वाडा आहे. येथील तात्यासाहेब दिवाण ह्यांची कन्या ह्मणजेच उपरिनिर्दिष्ट सौ० रुक्मिणीबाई, या अत्यंत सुस्वरूप व सुदृढ होत्या. तात्यासाहेबांना पुत्रसंतान नव्हतें ह्मणून (अण्णासाहेबांच्या मातुःश्री ह्या त्यांची सर्वांत कनिष्ठ मुलगी असल्यामुळें ) मुलीचें गोविंदरावांचे बरोबर लग्न लावून त्यास घरजांवई करण्याचा त्यांचा बेत होता. पण लग्न झाल्यावर स्वाभिमानी गोविंदरावांना ती गोष्ट मुळींच पसंत पडली नाहीं. त्यांनीं आपल्या बाणेदार वृत्तीस अनुसरून आपला स्वतंत्र गरिबीचा संसार थाटला व त्यांच्या पत्नीनेंहि आपल्या नवीन संसारांतच अत्यंत प्रेमानें आणि आनंदानें राहाण्याचा निश्चय केला.

पुत्रसंतान नसल्यामुळें तात्यासाहेब दिवाणांचा आपल्या उपरिनिर्दिष्ट कनिष्ठ कन्येवर फार लोभ होता. तिनें आपल्या घरीं रहावें व घरच्या मंडळींतच पतीसमवेत आनंदानें कालक्रमणा करावी अशी त्यांची फार इच्छा होती ! परंतु मानधन रुक्मिणीबाईंना तसें करणें बरें वाटेना. त्यांनीं अखेरपर्यंत आपला गरिबीचा संसारच आनंदानें पुढें चालविला.

रुक्मिणीबाईंचा ( आतां आपण त्यांना अण्णांच्या मातुःश्री असें म्हणूं ) स्वभाव अगदीं मूळपासून प्रेमळ, सरळ, आर्जवी व आनंदी असा होता. गोविंदरावांच्या नोकरीच्या संबंधानें त्यांना पुष्कळ ठिकाणीं खेडेगांवांतूनहि राहावें लागलें व त्यामुळें तेथें कष्टहि करावे लागत. नेहमीं घरीं कोणीतरी पाहुणे येतच व त्या सर्वांची बरदास्त ठेवण्याची जबाबदारी त्यांच्या शिरावर पडली होती. त्या बाबतींत त्यांनीं कधींहि आळस केला नाहीं अगर तक्रार केली नाहीं. नेहमीं समाधानानें राहून स्वजनांचें कल्याण चिंतावें व लोकांच्या कल्याणासाठीं आपली काया झिजवावी असाच त्यांचा क्रम अखंड चालत असे. त्यांच्या अशा प्रकारच्या सौजन्याबद्दल ना० गोखले नेहमीं त्यांची स्तुति करीत. कोल्हापुरला आल्यावर ते नेहमीं विजापूरकरांचेकडेच उतरत व या घराण्याचें वर्णन "A jolly home" अशा शब्दांनीं करीत तें अगदीं यथार्थ असे.

दररोज नित्यनेमानें श्रीधराचे पांडवप्रताप, रामविजयादि ग्रंथ वाचावेत, शिवलीलामृत, संतलीलामृतासारखे ग्रंथ अहर्निश ऐकावेत आणि सायंकाळीं

गांवच्या श्रीमारुतिरायांच्या देवालयांत घटकाभर बसून दर्शन घेतल्यावर घरीं परतावे असा त्यांचा क्रम अगदीं ठरलेला असे. अद्यापिहि कागल, गोकुळ, शिरगांव वगैरे ठिकाणचीं वृद्ध माणसें या साध्वीबद्दल आजहि प्रशंसोद्गार काढीत असतात.

अशा बाणेदार आणि निष्ठावंत आईबापांच्या पोटीं विष्णुअण्णांचा जन्म झाला. आपलें कुलदैवत जें श्रीविष्णु त्या देवतेच्या कृपेमुळें आपणांस प्रथम पुत्ररत्न झालें याबद्दल रुक्मिणीबाईंनीं हौसेनें मुलाचें नांव श्रीविष्णु असें ठेविलें होतें. आपल्या मातेच्या अपेक्षेप्रमाणें विष्णुअण्णांनीं आपल्या घराण्याचा लौकिक वाढविला आणि महाराष्ट्राच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर केलें.

अण्णासाहेबांच्या वडिलांचें नांव रा. गोविंदरावअण्णा असें होतें, हें वर आलें आहेच. त्यांचें शिक्षण जुन्या पद्धतीनें मराठी सहा इयत्तेपर्यंत झालें होतें. पुढें त्यांनीं शिक्षकाची नोकरी पत्करली व सर्व कुटुंबाचा भार त्यांनीं आपल्या शिरावर घेतला. आपल्या पूर्वजास अनुसरून त्यांचीहि वागणूक करारी व बाणेदार अशी होती. त्यांची बुद्धिमत्ता उत्तम असून ते आपल्या कामांत अत्यंत वाकब असत. त्यांची रहाणी अत्यंत साधी व निगर्वी असल्यामुळें पुष्कळ मंडळी त्यांचा सल्ला घेण्यास नेहमीं येत असत. त्यांना अन्यायाची विशेष चीड असे आणि तो दूर करून घेण्यासाठीं नेहमीं ते अग्रेसर असत. त्यांच्या या वृत्तीमुळें अधिकाऱ्यांच्या रोषास अनेक वेळां ते पात्र झाले व त्यांना अनेक प्रसंगीं यामुळें अपमान सहन करावा लागला तरी अंगीकृत कार्यांत यश येवो अगर अपयश येवो, तें सोडावयाचें नाहीं, असा बाणा गोविंदरावांचा असल्यामुळें त्यांना त्याचें कांहींच वाटलें नाहीं. प्रथम कागलला ॲसिस्टंट–मास्तर असतांना त्यांचा करारी स्वभाव पुष्कळ वेळां अधिकाऱ्यांच्या नजरेस आला होता.

कोल्हापूर संस्थानच्या शिक्षणखात्यांत गोविंदराव अण्णांनीं ॲसिस्टंट शाळामास्तराची नोकरी धरली म्हणून मागें सांगितलेंच आहे. या वेळीं, शिक्षकाचें काम करीत असतांना हांजी हांजी करून वरिष्ठांची मर्जी संपादन करण्याचा त्यांनीं कधींहि प्रयत्न केला नाहीं. कोणाचीहि भीति न बाळगतां आपलें कर्तव्यकर्म करीत राहावें ह्यांतच त्यांना भूषण वाटत असे. शिक्षकाचें

कोल्हापुरास या वेळीं ज्ञानसागर नांवाचें वर्तमानपत्र शिळाप्रेसवर निघत होतें. यांत गोविंदराव आपल्या नोकरीच्या गांवाहून बातमीपत्रें लिहीत असत. सदर पत्रांची भाषा अत्यंत चटकदार व जोरदार असल्यामुळें बातमीपत्रांत उल्लेखिलेल्या अन्यायाकडे अधिकाऱ्यांचें लक्ष त्वरित जात असे. या पत्रांची पुष्कळ अधिकाऱ्यांना भितीहि वाटत असे. ज्ञानसागरचें टीकास्त्र आज कोणावर आलें हें पाहण्यासाठीं सरकारी अधिकारी ज्ञानसागर केव्हां प्रसिद्ध होतो याकडे लक्ष देऊन वाट पहात बसलेले असत!

१८७७ ते १८८४ पर्यंत सुप्रसिद्ध माधवराव बर्वे हे कोल्हापुरला दिवाण होते. त्यांच्या कारकीर्दीच्या सुरवातीसच चोहोंकडे मोठा दुष्काळ पडला. महर्घता फार वाढली. यामुळें धान्यांचे भावहि बेसुमार कडकले. तेव्हां आजरें, मुरगुड वगैरे भागांत जेथें उत्तम तांदुळाची पैदास होतें तेथून सवलतीच्या दरानें–अर्थात् लोकांना पडेल त्यापेक्षां कमी दरानें-तांदुळ खरेदी करावेत अशी चिठ्ठी ( नव्हे हुकूम ) कागलच्या कारभाऱ्यांनीं स्वतःच्या सहीनें स्थानिक अधिकाऱ्यांकडे पाठविली. कारभारीसाहेबांच्या हुकूमाप्रमाणें पाटील कुलकर्णी यांना वागणें जरूर होतें. रीतीप्रमाणें सर्व मंडळींनीं या वेळीं गोविंदरावजींचा सल्ला घेतला. कारभाऱ्यांची चिठ्ठी हातीं येतांच त्यांनीं ज्ञानसागराच्या अंकांत 'मुरगुडचा बाजार लुटला' अशा आशयाचें बातमी-पत्र पाठविलें. त्यामुळें कोल्हापुरामध्यें मोठी खळबळ उडाली. पुढें त्या वर्तमानपत्राच्या मजकुरासंबंधीं रितीप्रमाणें सरकारी चौकशी झाली. वरील चिठ्ठी पुन: आपलें हातीं परत घेण्यासाठीं सदर कारभारी महाशयांनीं बरीच खटपट केली, परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. पुढें ही बातमी खोटी असल्याचें सरकारतर्फे सांगण्यांत आलें व ज्ञानसागर वर्तमानपत्रावर खटला भरण्यांत आला. परंतु त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. असो; गोविंदरावजीस अन्यायाची चीड कशी असे, हें दर्शविण्यासाठींच या एका मासलेवाईक गोष्टीचा उल्लेख केला आहे.

उपरिनिर्दिष्ट कारभारीसाहेबांना गोविंदरावांची चांगली माहिती होती. त्यांनीं शिक्षणखात्याकडे लिहिलें कीं, " गोविंदरावांसारख्या मानी व निर्भीड मनुष्यास स्वतंत्र शाळामास्तर कां करीत नाहीं ? ही बाणेदार व्यक्ती कोणाहि हेड-मास्तरच्या हाताखालीं निमुटपणें काम करणार नाहीं. "

यावरून गोविंदरावांचा स्वभाव किती मानी असे व त्यांना अन्यायाची चीड कशी लागलीच येत असे हें वरील गोष्टीवरून स्पष्ट दिसून येतें.

गोविंदरावांची सहाध्यायी मंडळी पुष्कळ होती. त्यांतील पुष्कळ पुढें चांगली नांवारूपास चढली व त्यापैकीं कांहींचीं नांवें महाराष्ट्रांत फार प्रसिद्ध आहेत. सुप्रसिद्ध माधव मोरेश्वर कुंटे, न्यायमूर्ति माधवराव रानडे, इंदूरचे दिवाण विनायकराव कीर्तने वगैरे मंडळी गोविंदरावांचे सहकारी या नात्यानें आजहि प्रसिद्ध आहेत. न्यायमूर्ति माधवराव रानडे ह्यांचें घर तर गोविंदरावांच्या घरासमोरच—म्हणजे हल्लीं जिला कोठीची शाळा ह्मणतात—तेथें होतें. त्यामुळें माधवरावांचा व गोविंदरावांचा फार लोभ जडला. आपल्या बरोबरची मंडळी केवळ अनुकूल परिस्थितीमुळें चांगली शिकली व मोठ्या हुद्यास चढली, परंतु आपण मात्र सहा रुपयांवरच मास्तरकी करीत राहिलों ह्याबद्दल गोविंदरावजीस फार वाईट वाटे. "मला जर अनुकूल परिस्थिति असती तर मीहि माधवराव कुंट्यांसारखा एम्. ए. होऊन एखाद्या इंग्रजी शाळेचा हेड-मास्तर झालों असतों, अगर विनायकराव कीर्तन्यांसारखा एखाद्या संस्थानच्या दिवाणगिरीवर असतों. तुह्मी तरी एम्. ए. होऊन आपलें घराणें मानमान्यतेस चढवा." असें ते नेहमीं आपल्या मुलांना म्हणत. सुदैवानें त्यांचा उपदेश सफल झाला. गोविंदरावांच्या हयातींतच त्यांचे श्रेष्ठ आणि कनिष्ठ चिरंजीव अनुक्रमें एम्. ए. व एम. ए., एल्.एल्. बी. झाले. आपल्या मुलांनीं गरिबींत दिवस काढून विद्याभ्यास पुरा केला, याबद्दल त्यांना फार आनंद वाटे. परिस्थिति कशीहि असो, स्वतःचा अविरत उद्योग आणि निरलस परिश्रम या दोन गोष्टींच्या साहाय्यानें मनुष्य कोणतीहि गोष्ट पार पाडूं शकतो, ही गोष्ट दोघांहि विजापुरकरबंधूंनीं सिद्ध केली.



## प्रकरण दुसरें

# बालपण

गु. अण्णासाहेबांचा जन्म ता. २६ आगष्ट १८६३ रोजीं कोल्हापूर येथें झाला हें मागें एका प्रकरणीं सांगितलें आहेच. या वेळची परिस्थिती मात्र थोडीशी क्षोभकारकच होती. अण्णांच्या जन्मापूर्वी सुमारें पांच वर्षें अगोदर १८५७ सालचें बंड होऊन गेलें होतें. *त्यापूर्वी ९ वर्षें म्हणजे १८४८ मध्यें साताऱ्च्या दुर्दैवी छत्रपतींवर विषप्रयोगाचा* आरोप येऊन त्यांची रवानगी काशीस झाली व लागलीच राज्यहि खालसा झालें. या कालांत अशा अनिष्ट गोष्टी घडून आल्यामुळें महाराष्ट्रांत एक प्रकारची खळबळ उडाली होती. या वेळीं सर्व संस्थानिक आपल्या राज्यांत शांतता राखण्यासाठीं खटपट करीत होते. अशा अत्यंत आणीबाणीच्या काळांतच गुरुवर्यांचे वडील गोविंदराव अण्णा कोल्हापूर संस्थानांतील विद्याखात्यांत नोकरीवर होते. याच वेळीं गुरुवर्य अण्णासाहेब यांचा जन्म झाला.

परमेश्वरकृपेनें विजापूरकर मंडळींना कोल्हापुरांत परशुरामपंत पटवर्धन यांचा आधार मिळून त्यांना जगदंबेची सेवा करावयास सांपडली व तसें करितांना त्यांनीं आपले अन्नदाते कोल्हापूरकर यांचेंहि अभीष्ट चिंतलें; पण योग्य प्रसंगीं कोल्हापूरच्या अधिकाऱ्यांचा जुलूम उघडकीस आणण्यास मात्र गोविंदरावांनीं कमी केलें नाहीं. परंतु त्यांची राजनिष्ठा मात्र अढळ राहिली. त्यांच्या मनांत राजकर्त्यांबद्दलचें नैसर्गिक प्रेम शेवटपर्यंत अढळ होतें. वडिलांची ही उज्ज्वळ परंपरा गु. अण्णासाहेबांच्याहि रोमरोमांत भिनली होती. त्यांनाहि राजनिष्ठेचें बाळकडू आपल्या वडिलांकडूनच मिळालें होतें, हें पुढील अनेक प्रकरणांवरून वाचकांच्या ध्यानांत येईलच.

गोविंदराव अण्णांची नोकरी बराच काल कागलास होती. त्याच ठिकाणीं विष्णुअण्णाचें बालपण गेलें. घरांत तेच वडील चिरंजीव असल्यामुळें त्यांनाच सर्व मंडळी अण्णा अगर विष्णुअण्णा असें संबोधित असत. साधारण मराठी चवथी इयत्ता पास होईपर्यंत अण्णा कागल येथें होते व पुढें वडिलांची बदली कोल्हापुरला झाल्यावर ते कोल्हापुरास आले.

प्रथमत: अण्णा कांहीं दिवस कोल्हापूर येथील वरुण तीर्थावरील बुर-जांच्या शाळेंत जात असत व नंतर सिटी हायस्कूलमध्यें ते इंग्रजी शिकण्यास गेले, व तेथूनच त्यांची मॅट्रिकची परीक्षा पास झाली. शाळेंत असतांना अण्णांचें अभ्यासाव्दतिरिक्त इतर पुस्तकांचें वाचन नेहमीं चालू असे. घरीं नेहमीं ते श्रीधरस्वामींचे पांडवप्रताप, रामविजय, वगैरे रसाळ ग्रंथ वाचीत व ऐकीतहि. मराठी कवींची प्रासादिक वाणी, वर्णन करण्याची विलक्षण हातोटी, आणि मनांस आनंद देणारीं सृष्टिवर्णनें वांचून अण्णांना अत्यंत आनंद वाटे, व कधीं कधीं त्यांचे तोंडून उद्गार निघत कीं, 'अरेरे! आमच्या या समर्थांसारख्या प्राचीन कवींची वाणी प्रासादिक व सुंदर असतां आम्हीं त्यांची उपेक्षा करावी ना?'

अशा प्रकारें अगदीं लहानपणीं सुद्धां प्राचीन मराठी संत कवींच्या बद्दल अण्णांच्या मनांत अत्यंत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. ती पुढें पुढें वाढत गेली व पुढें त्यांनीं मराठी भाषेच्या चिकित्सक अभ्यासासाठीं पुष्कळ होतकरू नवीन नवीन विद्वानांचे ठिकाणीं मराठी भाषेविषयीं प्रेम उत्पन्न केलें व मराठी लिहिण्यास त्यांना उत्तेजन दिलें.

कागलास असतांना ना. गोखले हे अण्णांचे सहाध्यायी होते. मॅट्रिक पर्यं-तही गोखले-विजापूरकरांची जोडी दर वर्षीं पास होत गेली. या वेळीं दोघांच्या मध्यें जो अकृत्रिम स्नेह जडला तो अगदीं कायम टिकला. अण्णांची शांत वृत्ति, धार्मिक प्रवृत्ति, सत्यनिष्ठा, संस्कृत अध्ययनाची अत्यंत आवड व मराठी भाषेबद्दल कळकळ वगैरे गुण ह्या वेळेपासून दिसूं लागले होते.

१८८० सालीं अण्णांची मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाली. त्यांचें संस्कृत अध्ययन चांगलें असल्यामुळें त्यांना सदर विषयांत ६६ गुण मिळाले. या वेळीं जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळविणाऱ्या विद्यार्थ्यास ६९ गुण पडले होते. राजाराम हायस्कूलमध्यें या वेळीं अण्णांचा पहिला नंबर आला. येथून हुषार विद्यार्थी म्हणून अण्णांची ख्याती झाली. पहिला नंबर आल्या-वर त्यांना १० रुपये शिष्यवृत्ति मिळाली व पुढें जास्त शिकण्याचा हुरूप आला. त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें मॅट्रिक होण्यापूर्वी दोन महिने अगो-दरच त्यांनीं पब्लिक सर्व्हिसची व इंग्रजी ५ वर्षांची परीक्षा दिली होती.

## प्रकरण तिसरें

# विद्याभ्यास

### विद्या वीर्यवती भूयात्।

अशा प्रकारें कोल्हापुरांत राहून अण्णा मॅट्रिकची परीक्षा पास झाले. संस्कृतमध्यें त्यांना गुण चांगले मिळाले व जगन्नाथ शंकर शेटची दुसरी शिष्यवृत्तीहि मिळाली. त्यामुळें पुढें शिकण्यास त्यांना उमेद आली. घरची गरिबी असतांहि गोविंदरावअण्णांनीं मुलानें पुढें शिकावें अशी योजना केली व त्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या हें पुढें योग्य ठिकाणीं वाचकांना कळून येईलच.

युनिव्हर्सिटीच्या महाद्वारांत प्रवेश करण्यापूर्वी अण्णांचा अभ्यास कसा होता, त्यांची प्रवृत्ति काय होती, त्यांची व्यायाम घेण्याची पद्धति कोणती होती वगैरे गोष्टींवर प्रकाश पाडणारी माहिती जरी या ठिकाणीं देतां येत नाहीं तरी इतकें मात्र खरें कीं, आपल्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करून अभ्यासानें हाडांचीं काडें करणारे ते विद्यार्थी नव्हते. अभ्यासाबरोबर शरीरहि सदृढ राखणें हेंहि एक कर्तव्य आहे, अशी त्यांची खरीखुरी समजूत होती. एक-वेळ अभ्यास व जेवण चुकलें तरी चालेल परंतु व्यायाम चुकतां कामा नये असें त्यांचें म्हणणें असे. बालपणीं अंगीं मुरलेली ही त्यांची व्यायामाची आवड अगदीं शेवटपर्यंत टिकली व त्यामुळें त्यांची तरतरी, निरलसत्व व उद्योगप्रियता हीं कधींहि कमी झालीं नाहींत. त्यांच्या व्यायामांत एक दिवस खंड पडला असें कधींहि झालें नाहीं.

विद्यार्थिदशेंत असतांना शाळेंतील ठराविक धडे घोकावेत, नोटा पाठ कराव्यात, मराठीकडे दुर्लक्ष करून इंग्रजीकडेच विशेष लक्ष पुरवावें अशी स्वाभाविक प्रवृत्ति आजकालच्या विद्यार्थ्यांची असावयाची, पण अण्णा मात्र हे या बाबतींत अपवाद होते. त्यांना खरें शिक्षण पाहिजे होतें. मराठी वाङ्मयाची अभिरुचि जबर वाचनानें वृद्धिंगत होत होती. शाळेंत लागणाऱ्या अभ्यासापेक्षां त्यांचें इतर वाचन पुष्कळ होत असे. त्यामुळें ठराविक अभ्यासाकडे त्यांचें लक्ष नसे. शाळेच्या अभ्यासाबरोबर इतर

# ना० गोपाळ कृष्ण गोखले



**जन्मः**— ता. १५।१८६६. **मृत्युः**— ता. १९।२।१९१५.

[ ना. गोखले हे गु. अण्णासाहेब विजापुरकरांचे लहानपणा-पासून सहाध्यायी होते. ते कोल्हापुरला गेले म्हणजे अण्णांच्या घरींच उतरत. दोघांचीं राजकीय, सामाजिक व शैक्षणिक मतें जरी भिन्न होतीं तरी त्यांचा स्नेह मात्र शेवटपर्यंत अभिन्न होता. ]

वाङ्मयाचा परिचयहि झाला पाहिजे अशी त्यांची समजूत होती. या खेपेस त्यांचे सहकारी ना. गोखले हे मात्र पास होऊन कॉलेजमध्यें गेले या वेळीं अण्णांचें व्यायामाकडे लक्ष होतें. त्यांना नेहमीं फिरण्याचा व्यायाम पसंत होता. तसेंच पोहण्याची त्यांना फार आवड होती. तासाचे तास ते पोहोंत असत. ही त्यांची पोंहण्याची संवय अगदीं कायम होती. पुढें समर्थ विद्यालयांत असतांनाहि ते रोज पहांटे उठून २ मैल दूरवर इंद्रायणीवर जात व तेथें स्नानसंध्यादि नित्यकर्मे उरकून परत येत. आयुष्याच्या उतार कालांत व्यायामाचा त्यांना फारच फायदा झाला हें सांगणें नकोच.

अण्णासाहेब प्रथम १८८६ सालीं बी. ए. च्या परीक्षेस बसले. सुप्रसिद्ध ना. गोखले हे पूर्वीपासूनच अण्णांचे जुने मित्र होते. गोखल्यांची बुद्धि अत्यंत तीव्र होती व परीक्षा पास झाल्याशिवाय कांहीं करावयाचें नाहीं असा त्यांचा निश्चय ठरलेला होता. त्यामुळें प्रतिवर्षी पास होऊन ते १८८४ सालीं बी. ए. झाले.

१८८६ सालीं अण्णा बी. ए. परीक्षा पास झाले. या वेळीं वामन शिवराम आपटे व प्रो. जिन्सीवाले परीक्षक होते. लेखी परीक्षेंत अण्णांना जास्त मार्क पडले. पण तोंडी परीक्षेंत मात्र ते जरा कमी मिळाले. परंतु या वेळीं सुद्धां अण्णांच्या संस्कृत व्यासंगाचा दाखला परीक्षकांना मिळाल्याशिवाय राहीला नाहीं. प्रो. आपट्यांनीं सौध ह्याचा अर्थ पुष्कळ विद्यार्थ्यांना विचारला, परंतु एकानेंहि समाधानकारक उत्तर दिलें नाहीं. परंतु सुधा ह्मणजे चुना असें चटकन् उत्तर देऊन अण्णांनीं प्रो. आपट्यांना चकित केलें. "आपण शिवराम बापूजी परांजपे ह्यांचे शिष्यच ना"? असें लागलीच आपट्यांनीं अण्णांना विचारलें व त्याच वेळीं सदर गुरुशिष्यांचा गौरव केला. पुढील वर्षी अण्णा १८८७ मध्यें डेक्कन कॉलेजांतून बी. ए. च्या दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाले. या वेळीं, अण्णांचे बरोबर प्रसिद्ध भास्कर विष्णु जोशी हे पहिल्या वर्गांत पास झाले. दुसरी बरीच मंडळी पास झाली. त्यांत ठळक अशीं नांवें म्हणजे कोल्हापूरचे माजी सर न्यायाधीश रा. ब. कृष्णाजी नारायण पंडित व मुंबईचे प्रो. हरी महादेव भडकमकर हीं होत. बी. ए. मध्येंच अण्णांना 'भाऊ दाजी बक्षीस' ( १७० रु. किंमतीचीं पुस्तकें ) मिळालें.

डेक्कन कॉलेजमध्यें असतांना प. लो. डॉ. भांडारकरांची अण्णांच्यावर बरीच भक्ति बसली होती. अण्णांचें वैदिक संस्कृत वाङ्मयावरील प्रेम पाहून डॉक्टर साहेबांना अत्यंत आनंद वाटे. पुष्कळ वेळां ऋग्वेदांतील अनेक ऋचांतील अर्थांवर दोघांचे चर्चात्मक वादविवाद होत व काव्यशास्त्र-विनोदांत अशा रीतीनें या गुरुशिष्यांचा काळ जात असे.

डॉ. भांडारकरांचा व्यासंग, वैदिक संस्कृतावर जास्त खोल अभ्यास करून नवीन नवीन कल्पना निश्चित करणें अशा स्वरूपाचा होता. साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, डॉ. भांडारकरांचें कोल्हापूरच्या सर्व विद्यार्थ्यांवर फार प्रेम असे; कारण विद्यार्थी एम्. ए. च्या परीक्षेस संस्कृत घेण्यास कचरत असत. बी. ए., एम् ए. ला ऐच्छिक संस्कृत शिकविणारा वर्ग बरेच दिवस डेक्कन कॉलेजांत नव्हता. यापूर्वी एम्. ए. च्या कांहीं कर्नाटकांतील विद्यार्थ्यांनीं 'सदर वर्ग चालू करा' अशी विनंति रामकृष्णपंतांना केली, परंतु 'कोल्हापूरचे विद्यार्थी जर येत असतील तर आपण वर्ग घेऊं' असा स्पष्ट जबाब त्यांनीं या वेळीं दिला. यानंतर एक वर्षानेंच गु. अण्णा व त्यांचे सहकारी कृष्णाजीपंत पंडितराव डेक्कन कॉलेजमध्यें आले व त्यांनीं पुन: वरील वर्ग सुरू करण्याविषयीं डॉक्टर साहेबांना विनंति केली व ती त्यांनीं तात्काल मान्य केली. कोल्हापूरच्या विद्यार्थ्यांचें संस्कृत चांगलें असतें, अशी या वेळीं चोहोंकडे प्रसिद्धी होती. पर्यायानें राजाराम कॉलेजचे तत्कालीन प्रोफेसर शिवराम बापूजी परांजपे ह्यांचा हा एक प्रकारचा विजयच होता !

या वेळीं गु० डॉ. रामकृष्णपंत भांडारकरावर जडलेली त्यांची गुरुभक्ति अखंड राहिली. कॉलेजमधून बाहेर पडल्यावर गुरुप्रेरणेनें हातीं धरलेली वैदिक वाङ्मयाची ध्वजा अण्णांनींहि पुढें जास्त उत्साहानें फडकावली, व आपलें "[1]ऋक्संग्रह" पुस्तक १८९५ मध्यें प्रसिद्ध केलें.

---

१ सदर संस्कृत ऋक्संग्रह निर्णयसागरनें १८९५ सालीं प्रसिद्ध केला. त्यावरील टीपा व प्रस्तावना उद्बोधक असून अद्यापिहि एम्. ए. च्या वर्गांतील संस्कृतचे विद्यार्थी त्या वाचतात. गेल्या ३२ वर्षांत वैदिक ऋचांवर एक अण्णांचें व दुसरें मि. पिटरसनचें अशीं दोनच पुस्तकें निघालीं. त्यांत अण्णासाहेबांचें पुस्तकच अत्यंत उपयुक्त समजलें जातें. अद्यापिहि मुंबई युनिव्हर्सिटी सदर पुस्तक एम्. ए. च्या परिक्षेस नेमत असतें.

## प्रकरण चवथें

# " राजाराम कॉलेजां "तील अध्यापन

यमेव विद्याः शुचिमप्रमत्तम् । मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम् ॥
यस्ते द्रुह्येत्कतमच्चनाह । तस्मै मा ब्रूयान्निधिपाय ब्रह्मन् ॥[1]

—उपनिषद्.

अण्णासाहेबांचा ' डेक्कन कॉलेज ' मधील अभ्यासक्रम पुरा झाल्यावर ते अहमदाबादेस एक वर्ष ' फेलो ' म्हणून होते. तेथूनच त्यांची ' राजाराम कॉलेजां'त 'घोरपडे लेक्चरर' म्हणून नेमणूक झाली आणि ते कोल्हापुरास आले.

कॉलेजमध्यें अभ्यास पुरा करीत असतांना अण्णा प्रथम शाळेंत कांहीं दिवस शिक्षक या नात्यानें काम करीत होते. या वेळीं त्यांना १० रुपये शिष्यवृत्ति मिळत होती. शिवाय कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. कँडी यांचा अण्णांच्यावर फार लोभ होता. अशा तीन गोष्टींमुळें घरची गरिबी असूनहि अण्णा बी. ए. पर्यंत गेले व पुढें प्रोफेसर झाले. कॉलेजांत विद्यार्थी व शाळेंत शिक्षक असें दुहेरी अध्ययन-अध्यापनाचें कार्य करीत असतां अण्णा-साहेबांना पुष्कळ फायदा झाला; आणि हा अनुभव त्यांना आपल्या पुढील आयुष्यांत पुष्कळ उपयोगी पडला. अण्णांच्या हाताखालीं शिक्षण घेतलेले आज पुष्कळ विद्यार्थी खुद्द कोल्हापुरांत व इतरत्र आहेत. त्यांच्या सारखा सहृदय आणि विद्यार्थिजनांच्या भावनांशीं समरस होऊन वागणारा आणि शिकविणारा शिक्षक विरळा ! विद्यार्थ्यांवर रागावणें अगर त्यांना रागाच्या भरांत वाटेल तसें तोडून बोलणें अगर सरते शेवटीं निरुपाय म्हणून चवदावें रत्न दाखविणें असा एकहि प्रसंग ह्या कालांत अण्णांच्यावर आला नाहीं. उलट सर्व विद्यार्थी त्यांना गुरुतुल्य मानून त्यांच्या प्रेमळ वृत्तीस कधींहि

---

१ ज्यां तूं जाणसि शुद्ध आणिक कसा देईल चित्ता सदा ।
धीमान् जो शुचिब्रह्मचर्यव्रत जो पाळी सदा सर्वदा ॥
द्रोहा जे न कधीं करील तुमच्या रक्षी तिला जो निधी ।
ऐसां शिष्यजनां पढीव विमला आटेल दोषांबुधी ॥

—गु. विजापूरकर.

## प्रकरण चवथें

# " राजाराम कॉलेजां "तील अध्यापन

यमेव विद्याः शुचिमप्रमत्तम् । मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम् ॥
यस्ते द्रुह्येत्कतमच्चनाह । तस्मै मा ब्रूयान्निधिपाय ब्रह्मन् ॥

—उपनिषद्.

अण्णासाहेबांचा 'डेक्कन कॉलेज 'मधील अभ्यासक्रम पुरा झाल्यावर ते अहमदाबादेंत एक वर्ष 'फेलो ' म्हणून होते. तेथूनच त्यांची 'राजाराम कॉलेजां'त 'घोरपडे लेक्चरर' म्हणून नेमणूक झाली आणि ते कोल्हापुरास आले.

कॉलेजमध्यें अभ्यास पुरा करीत असतांना अण्णा प्रथम शाळेंत कांहीं दिवस शिक्षक या नात्यानें काम करीत होते. या वेळीं त्यांना १० रुपये शिष्यवृत्ति मिळत होती. शिवाय कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. कँडी यांचा अण्णांच्यावर फार लोभ होता. अशा तीन गोष्टींमुळें घरची गरिबी असूनहि अण्णा बी. ए. पर्यंत गेले व पुढें प्रोफेसर झाले. कॉलेजांत विद्यार्थी व शाळेंत शिक्षक असें दुहेरी अध्ययन-अध्यापनाचें कार्य करीत असतां अण्णा-साहेबांना पुष्कळ फायदा झाला; आणि हा अनुभव त्यांना आपल्या पुढील आयुष्यांत पुष्कळ उपयोगी पडला. अण्णांच्या हाताखालीं शिक्षण घेतलेले आज पुष्कळ विद्यार्थी खुद्द कोल्हापुरांत व इतरत्र आहेत. त्यांच्या सारखा सहृदय आणि विद्यार्थिजनांच्या भावनांशीं समरस होऊन वागणारा आणि शिकविणारा शिक्षक विरळा ! विद्यार्थ्यांवर रागावणें अगर त्यांना रागाच्या भरांत वाटेल तसें तोडून बोलणें अगर सरते शेवटीं निरुपाय म्हणून चवदावें रत्न दाखविणें असा एकहि प्रसंग ह्या कालांत अण्णांच्यावर आला नाहीं. उलट सर्व विद्यार्थी त्यांना गुरुतुल्य मानून त्यांच्या प्रेमळ वृत्तीस कधींहि

---

१ ज्यां तूं जाणसि शुद्ध आणिक कसा देईल चित्ता सदा ।
धीमान् जो शुचिब्रह्मचर्यव्रत जो पाळी सदा सर्वदा ॥
द्रोहा जे न कधीं करील तुमच्या रक्षी तिला जो निधी ।
ऐसां शिष्यजनां पढीव विमला आटेल दोषांबुधी ॥

—गु. विजापूरकर.

दुखवीत नसत. जे विद्यार्थी अभ्यासांत कच्चे असत त्यांचा अभ्यास अण्णा स्वतः जातीनें करून घेत व त्यांना योग्य दिशा दाखवीत. चांगले विद्यार्थी कसेंहि पास होतील, परंतु अत्यंत उनाड व मठ्ठ विद्यार्थीहि योग्य दिशा दाखविल्यास चांगले होतात, असा अण्णांचा विश्वास होता. प्रयोगादाखल अतिशय उनाड मुलांचा वर्ग ( Dunces Class ) त्यांनीं हायस्कुलांत असतांनाच १८८६ सालीं काढला होता. ह्यांतूनहि उत्तम नागरिक निघतील असें अण्णा नेहमीं म्हणत. अण्णांना या वर्गातील अनुभवाचा फार फायदा झाला. आणि पुढें नवीन संस्था काढतांना प्रचलित शिक्षणपद्धतीचे दोष घालविण्यासाठीं त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला.

शाळेंत शिकवितांना अण्णा पुष्कळ मेहनत घेत व विद्यार्थ्यांना वाटेल तेव्हां अभ्यासांत मदत करीत. विद्याविक्रय करावयाचा नाहीं हा त्यांचा बाणा ठरलेला असे. ते खरेखुरे शिक्षक होते.

अण्णासाहेब १८९० सालीं राजाराम कॉलेजांत 'घोरपडे लेक्चरर' झाले, त्या वेळीं कँडी हे प्रिन्सिपॉल होते हें मागें सांगितलें आहेच. त्यांचा पूर्वीपासून अण्णांच्यावर फार लोभ होता. अण्णांच्याहि मनांत त्यांच्याबद्दल अत्यंत आदर असे हें सांगणें नकोच. आपली संस्थानची १८ वर्षांची नोकरी पुरी करून मध्यप्रांतांत ' डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन ' या मोठ्या जागेवर बढती मिळून कँडी साहेब मध्यप्रांतांत गेले त्या वेळीं राजाराम कॉलेजांत त्यांना मानपत्र देण्यांत अण्णांनीं स्वतः पुढाकार घेतला होता. ह्या प्रसंगीं मि. कँडी यांनींहि गु. अण्णासाहेबांचा उल्लेख मोठ्या गौरवपूर्ण शब्दांत केला व ' आपण प्रोफेसर विजापूरकरांना कधींहि विसरणार नाहीं ' असें सांगितलें. गुरुशिष्यांचा असा प्रेमाचा संबंध पुढें पुष्कळ वर्षें अबाधितपणें टिकला होता.

'घोरपडे लेक्चरर' असतांनाच कोल्हापूर दरबारच्या मांडलिक संस्थानिकांच्या मुलांना आणि इतर उच्च घराण्यांतील विद्यार्थ्यांसाठीं एक खास सरदार वर्ग राजाराम कॉलेजमध्यें चालू होता. या वर्गाचे 'सुपरिन्टेन्डेन्ट'

---

१ या क्लासमधील एक विद्यार्थी, रा. गंगाधरपंत पुणेंकर, हे पुढें उत्तम फोटोग्राफर म्हणून प्रसिद्धीस आले असें ह्मणतात.

म्हणून पुढें त्यांना नेमण्यांत आलें. या वेळीं त्यांच्या अंगीं असलेल्या शिक्षकाच्या नैसर्गिक उच्च गुणांचा. वर्गांत अध्ययन करणाऱ्या संस्थानिकांच्या पुत्रांवर चांगला परिणाम झाला होता. सुपरिन्टेन्डेन्ट या नात्यानें या वेळीं अण्णांचा व अनेक संस्थानिकांचा संबंध आला होता आणि त्यायोगें परस्परांना पुष्कळ फायदाहि झाला होता, इतकेंच नव्हे तर अण्णांच्या हाताखालीं असलेल्या कांहीं संस्थानिकांनीं अण्णांना गुरु या नात्यानें पुढेंहि आदरानेंच संबोधिलें ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. श्रीमंत पंतप्रतिनिधी नेहमीं अण्णांना योग्य मान देत व प्रसंगीं त्यांची गांठ घेण्यासाठीं ते स्वत: एकदां तळेगावीं समर्थ विद्यालयांतहि गेले होते.

या काळांत गुरुवर्यांच्या अंगीं दिसून आलेला अलौकिक गुण म्हटला म्हणजे पितृभक्ति हा होय. पूर्वी आपल्या विद्याभ्यासाकरितां वडिलांना किती आयास पडले याची जाणीव त्यांना चांगली होती. आपण प्रोफेसर झाल्यावर वडिलांनीं घरीं स्वस्थ बसावें आणि विश्रांति घ्यावी अशी अण्णासाहेबांची फार इच्छा होती. आपणांस इतका पगार मिळत असतां वडिलांनीं नोकरीचे कष्ट कां करावेत असें त्यांच्या मनांत पुष्कळ वेळां येई. परंतु आपली शरीरप्रकृति नीट व्यवस्थित असतां आपण स्वत: कां स्वस्थ बसावें असें गोविंदरावांना वाटत असे.

अखेर आपली नोकरी पुरी करून मग गोविंदरावजींनीं 'पेन्शन' घेतलें. परदेशांत जाऊन उच्च शिक्षण घ्यावें असेंहि अण्णांच्या मनांत येत असे. परंतु वडिलांना म्हातारपणीं दुःख देऊन आपण परदेशीं जाणें त्यांना बरें वाटेना. म्हणून विलायतेस जाण्याचा बेत त्यांनीं सोडून दिला.

अण्णासाहेब जरी प्रोफेसर झाले तरी त्यांचे वडील गोविंदरावअण्णा हे शेजारींच मुईत्रावड्यास मास्तर होते. त्यांचेसाठीं कोल्हापुराहून जाण्यास व परत येण्यास अण्णांची छोटी गाडी—घमनी—जात असे. आपल्या मुलाच्या गाडींत बसून हें 'शाळा-मास्तर' शाळेंत जातयेत त्या वेळीं त्यांच्या ओळखीच्या मंडळींना फारच कौतुक वाटत असे!

१८८७ व १८८८ सालीं अण्णा एम्. ए. च्या पहिल्या परीक्षेस बसले होते. परंतु कॉलेजमध्यें शिकविणें आणि पुन: घरीं अभ्यास करणें या गोष्टी

एकदम होऊं शकल्या नाहींत. सरतेशेवटीं १८९५ मध्यें ते एम्. ए. च्या परीक्षेंत 'पास' झाले. या वेळीं ते अभ्यासापेक्षांहि कोल्हापूरच्या इतर चळवळींत पुष्कळ पुढाकार घेत. चार पिढ्या ज्या करवीर क्षेत्रांत आपण काढिल्या तेथेंच अन्य प्रकारची जनसेवा करीत राहून कालक्रमणा करावी असा त्यांचा निश्चय होता; पण कोल्हापूरच्या तत्कालीन बदललेल्या वातावरणांत गुरुवर्यांच्या सारख्या स्वतंत्र आणि समतोल बुद्धीच्या माणसास राहणें बरेंच अवघड होतें.

राजाराम कॉलेजांतील नोकरीच्या मुदतींत अभ्यास करून गुरुवर्य १८९५ मध्यें अखेर एम्. ए. परीक्षा उत्तीर्ण झाले. आणि तेथेंच पुढें १९०४ पर्यंत प्रोफेसर म्हणून होते. पुढें कोल्हापूर दरबार त्यांना नोकरीवरून दूर करीपर्यंत ते राजाराम कॉलेजांतच संस्कृतचे प्रोफेसर होते. या मुदतींत त्यांच्या हाताखालीं तयार झालेला गुरुवर्यांचा मोठा शिष्यसमुदाय आज सर्वत्र पसरलेला आहे. आपलें राष्ट्रीय शिक्षणाचें नवें कार्य जेव्हां त्यांनीं अंगावर घेतलें तेव्हां सर्वांनीं अण्णासाहेबांना पुष्कळ मदत केली हें सर्वश्रुतच आहे. त्यांच्या क्षात्रवृंदांत त्यांचे विषयींचा आदर आजहि तितक्याच प्रमाणांत कायम आहे, याचीं कारणें ह्मणजे अण्णांचें शुद्ध चारित्र्य, निरलस उद्योगप्रियता आणि खरी लोकसेवा हीं होत! राजाराम कॉलेजमध्यें अण्णांच्या पूर्वीं व मागूनहि कित्येक प्रोफेसर आले व गेले. परंतु त्यांच्याइतकी लोकप्रियता एकाच्याहि वाट्यास अद्यापि आली नाहीं ही गोष्ट आजहि विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

या शिष्यवर्गांपैकीं कोणीहि अण्णांच्या शिक्षणपद्धतींत काय वैशिष्टय होतें, याबद्दल आजही साक्ष देईल. मॅट्रिकच्या वर्गामध्यें शिक्षकांनीं हात टेकून सोडून दिलेल्या मठ्ठ विद्यार्थ्यांना त्यांनीं स्वतः फार श्रम घेऊन शिकविले. सुलभ रीतीनें ते पास व्हावेत म्हणून त्यांच्याकडून अभ्यास करविणें, हा त्यांचा आवडता विषय असे. रोजच्या अभ्यासाच्या पुस्तकांवरून शिकवितांना अण्णासाहेब तरुण विद्यार्थ्यांना राष्ट्रीय तत्त्वांचें शिक्षण देत व स्वाभिमानाची ज्योत विद्यार्थ्यांमध्यें राहावी यासाठीं नेहमीं खटपट करीत. राष्ट्रीय गुणांचा विकास करणें, हें शिक्षकांचें कर्तव्य आहे असें ते नेहमीं म्हणत.

सध्यांच्या शिक्षणपद्धतींतील दोष अण्णासाहेबांना पुरे समजले होते; आणि हे दोष कसें घालवावेत ह्याचा त्यांना नेहमीं निदिध्यासच लागलेला असे. शिक्षणानें राष्ट्रीय गुणांचें संवर्धन झालें पाहिजे. व न झालें तर अन्य मार्गांनीं त्या गुणांची जोपासना झालीच पाहिजे अशी राष्ट्रीय दृष्टी पुढें ठेवून देशांतील सर्व चळवळी चालवाव्यात असें ते म्हणत.

अण्णासाहेब कोल्हापुरांत असतांना कोल्हापुरांत ज्या ज्या चळवळी झाल्या, त्यांत ते प्रामुख्यानें भाग घेत. कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं काढलेलें शुद्ध स्वदेशी मालाचें दुकान चालविण्यामध्यें श्री. सदाशिव खंडो आळतेकर ( कऱ्हाड ) व रा. गणेश बळवंत मोडक हे प्रमुख होते. सदर्न मराठा बँक स्थापन करण्यामध्यें अण्णांनीं स्वतः पुढाकार घेतला होता. परंतु भरपूर साहाय्य न मिळाल्यामुळें सदर बँक बंद पडली. राजाराम कॉलेजांतील मंडळींचा 'राजारामियन क्लब' राष्ट्रीय विषयांवर चर्चा करणारी वादविवादोत्तेजक सभा, मौजेची वनभोजनें वगैरे अनेक बाबतींत अण्णासाहेबांचें नेतृत्व असे. राजारामियन क्लबांमध्यें नेहमीं वादविवादसभा होत असत. या सभांना अण्णासाहेब नेहमीं हजर राहात. पुष्कळ वेळां उपवक्ते म्हणून भाषण करून ते कांहीं विधायक सूचनादि विद्यार्थ्यांना करीत. अशा रीतीनें धार्मिक, सामाजिक, आणि वाङ्मयिक या दृष्टीनीं विद्यार्थ्यांच्या मनांवर आपल्या कल्पना ठसविण्याचा त्यांचा उद्योग सतत चालू असे.

अशा वादविवादात्मक चर्चेंतूनच ग्रंथमालेची कल्पना जन्मास आली असें म्हणतात. आपल्या कार्याचें महत्त्व भविष्यकालांत तरी लोकांस एक वेळ पटेल असें अण्णासाहेब नेहमीं म्हणत. याहि बाबतींत अगदीं तोच अनुभव त्यांना आला. कै. विसुभाऊ राजवाडे, रा. ब. पंडितराव वगैरे स्नेह्यांच्या मदतीनें त्यांनीं श्रीशाहूछत्रपतींच्या राज्यारोहणाच्या समारंभाच्या वेळीं ग्रंथमालेचा पहिला अंक मोठ्या उत्साहानें प्रसिद्ध केला. येथूनच त्यांची वाङ्मयविषयक भरीव कामगिरी लोकांच्या निदर्शनास आली.

पुढें १८९४ पासून १९०६ पर्यंत बरोबर १२ वर्षें ग्रंथमाला निघत होती. मध्यंतरी ८७ व्या अंकापासून ग्रंथमालेचा राजाश्रय तुटला तरी ग्रंथमालेचे अंक पुढेंहि अबाधितपणें निघत होते.

ग्रंथमालेचा हेतु तिच्या नांवांतच अंतर्भूत झालेला होता. ग्रंथांची माला ग्रंथमालेंत गुंफून वाचकांना देणें हा संपादकांचा हेतु पुढें सिद्धीस गेला, असें म्हणावयास हरकत नाहीं. ग्रंथमालेनें अनेक ऐतिहासिक माहिती उजेडांत आणली आणि पुष्कळ अज्ञात लेखकांना उत्तेजन दिलें ही गोष्ट पुढें यथावकाश वाचकांना कळून येईलच. शेवटीं परिशिष्टांत दिलेल्या विषयसूचीवरून नजर फिरविल्यास ग्रंथमालेची दृष्टी किती दूरवर गेली होती हें सहज दिसून येणार आहे. ग्रंथमालेचें कार्य जरी कोल्हापूरच्या मर्यादित भागांत झालें तरी सर्व महाराष्ट्राच्या वाङ्मयिक इतिहासांत ' ग्रंथमालेच्या ' एका तपाच्या कामगिरीचा उल्लेख साहित्येतिहासकारास स्वतंत्रपणें करावा लागेल. ग्रंथमालेची जास्त माहिती पुढील एका विभागांत स्वतंत्रपणें केली असल्यामुळें या प्रकरणांत ग्रंथमालेचा इतकाच उल्लेख करणें बरें.



## प्रकरण पाचवें

# वाङ्मय-सेवेचीं पहिलीं बारा वर्षें

अहो ! संपलीं वत्सरें आज बारा । तरी आवरेना जराहि पसारा ॥
पुढें कर्म आहे विशेषें कराया । तुवां शक्ति द्यावी मला देवराया ॥

गु० विजापूरकर.

अशा तऱ्हेनें गु० अण्णासाहेब १८९० मध्यें 'राजाराम कॉलेज'मध्यें प्रोफेसर झाले तेव्हां गोविंदरावानांहि बरें वाटलें. आज आपल्या श्रमाचें सार्थक झालें, आपल्याला नाहीं तरी आपल्या मुलाला जगांत अत्यंत बहुमानाची अशी जागा मिळाली ह्याबद्दल गोविंदरावांना एक प्रकारचें समाधान वाटलें. पुढें १८९० मध्यें त्यांनीं पेनशन घेतलें. नंतर पुढें १० वर्षें गोविंदरावअण्णा कोल्हापुरांत अण्णासाहेबांचे जवळच राहत असत. त्यापूर्वी 'मुलाला १५० रु. मिळतात, आतां आपण वीस रुपडयांची नोकरी कां करावी,' असा विचार त्यांच्या मनास कधींहि शिवला नाहीं. आपलें कर्तव्यकर्म करावयाचें, व हांतून होईल तितकें काम करावयाचें, असा त्यांचा ठराविक बाणा कधींहि सुटला नाहीं.

ज्याप्रमाणें गोविंदरावअण्णा विश्वकुटुंबी होते त्याप्रमाणें अण्णाहि होते. शाळेंत असतांना वर्गांतील सर्व शिष्यमंडळीवर त्यांचें अत्यंत प्रेम असे. नेहमीं त्यांचे भोंवतीं कांहींना कांहींतरी अभ्यासांतील कठीण भाग समजून घेण्यासाठीं त्यांचे विद्यार्थी जमलेले असत. घरीं दारीं कोठेंहि पहा, गुरुवर्यांच्या जवळ दोन चार मंडळी अभ्यासाच्या निमित्तानें बसलेली असावयाचीच असा क्रम असे. त्यांचे घरीं कोणाहि विद्यार्थ्यांस येण्यास मुळींच प्रतिबंध नसे व प्रत्येकास अण्णांच्या विषयीं आपलेपणा वाटे. याशिवाय शाळेंतील काम करून 'राजारामियन क्लब,' बँक व सहकारीभांडार वगैरे इतर अनेक उपयुक्त चळवळींत अण्णा प्रामुख्यानें असत. त्यामुळेंहि त्यांचेकडे पुष्कळ मंडळी कामानिमित्त येत. त्या सर्वांची व्यवस्था गोविंदराव उत्तम प्रकारें ठेवीत.

अशा तऱ्हेनें घरच्या संसाराची घडी चांगली बसल्यावर अण्णांनीं आपलें लक्ष मराठी वाङ्मयाकडे लाविलें. कॉलेजमध्यें असतांना त्यांनीं मराठी वाङ्मयाचें चांगलें अध्ययन चालविलें होतें. संतकवींच्या काव्याचा त्यांनीं चांगला परामर्ष घेतला होता. तुकाराम महाराजांच्या अभंगांनीं त्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम केला होता. त्याचप्रमाणें पुढें पुढें श्रीसमर्थांच्या स्फूर्तिदायक मनाच्या श्लोकांनीं त्यांच्या अंत:करणांत चांगला प्रकाश पाडला होता. या वेळीं ज्ञानेश्वरादि[1] पांच मराठी संतकवींच्या काव्यवाचकानें त्यांच्या मनास मराठी भाषेंतील रसाळ काव्याची फारच गोडी लावली होती. असो! श्रीज्ञानेश्वर महाराजांबद्दल आदर त्यांच्या मनांतहि कायम ठसला. त्यामुळें उत्तरोत्तर मराठी भाषेवरचा त्यांच्या व्यासंग वाढूं लागला व त्याचें परिणत स्वरूप म्हणजे ग्रंथमाला आणि समर्थ वर्तमानपत्र ह्या दोन अंगांनीं लोकांपुढें दिसूं लागलें. ते दररोज प्रात:काळीं मराठी भाषेंतील कवि-पंचायतनाचें स्मरणपूर्वक ध्यान करीत आणि मग इतर कामास सुरवात करीत. मराठीबद्दल इतकें प्रेम बाणलेला मनुष्य खरोखरच धन्य होय.

घरखर्चापुरते ६०–७० रुपये वडिलांच्या जवळ देऊन बाकीच्या पगाराची सर्व रक्कम इतर चळवळींत अगर मराठी ग्रंथ विकत घेण्यांत खर्च करावयाची असा त्यांचा निश्चय ठरलेला असे. यामुळें इतर मंडळी म्हणत असत कीं, ' अण्णा, तुमचें घरच्या प्रपंचांत लक्ष नाहीं, तुम्ही निष्काळजी आहांत.' पण यासंबंधांत त्यांना वडील मात्र एक अक्षरहि बोलत नसत. आपण पूर्वी अगदीं गरिबीनें दिवस काढले, आतां आपल्या मुलानें मात्र नीटनेटका जरा सढळ हातानें प्रपंच करावा अशी गोविंदराव अण्णांची सदिच्छा होती. आपला घरचा प्रपंच पाहण्याऐवजीं आपल्या इतर देशबांधवांच्या प्रपंचाकडे लक्ष पुरवून त्यांची सुधारणा करण्यामध्यें आपला पैसा आणि बुद्धि खर्च झाली तर ती इष्टापत्तिच आहे असें ते समजत व त्याप्रमाणेंच वागत. आपले चिरंजीवहि तेंच धोरण पुढें चालवीत आहेत याबद्दल त्यांना उलट समाधान वाटे. ' अण्णांनीं पगाराचा नीट उपयोग

---

१ ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ जनार्दन। तुकाराम, निळोबा हे पांच साधु सदा स्मरा ॥

करून घेतला नाहीं, त्यांनीं केवळ शब्दांची एक टांकसाळच पाडली.' अशा आक्षेप नेहमीं कोल्हापूरचे कै. रा. गणपतराव मोडक पुढें आणीत. अण्णांचीं मतें अगदीं ठाम झालेलीं असत. ठराविक ध्येयापासून एक रति-भरही मागें पाऊल पडावयाचें नाहीं असा करारी बाणा त्यांचा ठरलेला असे. कॉलेजमध्यें असतांना मराठीचा व्यासंग त्यांनीं ठेविला तो अगदीं अखेर-पर्यंत कायम ठेविला. आत्मविश्वासाच्या जोरावर उणेंपुरें एक वाङ्मय तप त्यांनीं पुरें केलें ही गोष्ट सामान्य नव्हे.

१८९४ ते १९०५ हा काल गुरुवर्यांच्या आयुष्यांतील अत्यंत महत्वाचा असा होता. या कालांतच ग्रंथमाला आणि समर्थ वर्तमानपत्र अवतीर्ण झालें. कोल्हापुरांत या कालांत इतर ज्या चळवळी झाल्या त्यांतहि गुरुवर्यांचें नांव प्रामुख्यानें पुढें असे. त्यामुळें अण्णासाहेबांविषयीं लोकांत अत्यंत आदर वाढला होता. अशा प्रकारच्या विविध चळवळींमुळें, समाज अण्णासाहे-बांच्या बाजूला असे. शाळेंतील व कॉलेजांतील एक जुनें चांगलें शिक्षक या नात्यानें सर्व प्रबुद्ध विद्यार्थीहि गुरुवर्य अण्णासाहेबांना पूज्य मानीत. 'राजा-रामियन क्लब', 'दी सदर्न बँक', 'सहकारी–भांडार' वगैरे संस्था त्यांच्याच सल्ल्यानें निघाल्या व पुढें त्यांनीं ग्रंथमाला काढून मराठी वाङ्म-याची वृद्धि करण्यासाठीं त्यांनीच कंबर कसली.

जरी ग्रंथमालेंत इंग्रजींतील महत्वाच्या ग्रंथांचीं भाषांतरें आणि दुसरे महत्वाचे ग्रंथ खंडशः प्रसिद्ध होत असत तथापि ग्रंथमालेचें हें धोरण आणि तिची त्यायोगें दुसऱ्या साहित्यसेवकांच्या ठिकाणीं प्रेरणा उत्पन्न करणारी बुद्धि हीं पुढें बरीच सुफलदायी झाली. अण्णांच्या प्रेरणेनें ग्रंथमालेंत पुढें बरेच लेखक आपली प्रतिभा दाखवूं लागले. ग्रंथमालेच्या प्रस्तावनेंत कार्य करण्यासाठीं आपण कां प्रवृत्त झालों ह्याचें दिग्दर्शन गुरुवर्यांनीं पुढील शब्दांत केले आहे. ते म्हणतात––

"हिंदुस्थान देशास कधींतरी चांगलें दिवस येणार असतील तर ते तेथील लोक अज्ञानांत राहून खचीत येणार नाहींत. त्यांच्यांत सत्यज्ञानाचा प्रसार होऊन त्यांची वेडगळ समजुतींपासून सुटका झाली पाहिजे. आज त्यांच्यांत जे गुण दिसत नाहींत ते गुण आले पाहिजेत. दृढ इच्छा, अचल निश्चय, व्यावहारिक कार्यदक्षता, चिरस्थायी क्लेशसहत्व, अव्याहत उद्योग,

विचारपूर्वक साहस, ' न भंगें प्रसंगीं ' असें धैर्यबल, कर्तव्यपरायणता, स्वावलंबन, स्वहितत्याग, स्वत्वविस्मृति, परस्परविश्वास इत्यादि गुणांचा जिकडे तिकडे प्रादुर्भाव झाल्याशिवाय आमचें नष्टचर्य ढळणार नाहीं, व हे गुण उत्पन्न होण्यास ज्ञानप्रसाराशिवाय दुसरा गुण नाहीं. ”

( ग्रं० मा० व. १ लें. )

अशा रितीनें ज्ञानप्रसाराचा निश्चय केल्यावर गुरुवर्यांनीं अनेक सहकारी मिळविले आणि त्यांच्या लेखाचा लाभ लोकांना करून दिला. प्रत्येक मनुष्यानें कोणत्याहि चांगल्या ग्रंथाचें भाषांतर करण्याचें कामीं दिवसांतून १० मिनिटें तरी खर्च करावींत, असें त्यांचें सांगणें असे, आणि शेवटपर्यंत जन्मभर पत्करलेल्या शिक्षणाच्या पवित्र कार्यांतच त्यांनीं आपलें आयुष्य वेंचलें. शिक्षकाचा धंदा अत्यंत पवित्र असून शिक्षकानें पै-पैशाच्या भावानें आपलें कर्तव्य मोजूं नये, असें ते ह्मणत. अशा उच्च हेतूनें प्रेरित होऊनच त्यांनीं ग्रंथमालेची स्थापना केली. आणि नतर श्रीसमर्थ वर्तमानपत्र काढलें. ग्रंथमाला व श्रीसमर्थ या दोन साधनांनीं त्यांनीं बारा वर्षांची वाङ्मयतपस्या केली. शेवटीं या तपस्येचें फल म्हणून कीं काय त्रैवार्षिक तुरुंगवासहि पत्करला. 'विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः । प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ।' या न्यायानें अनेक संकटें आलीं तरी त्यांनीं प्राप्तकर्तव्य म्हणून सर्व संकटांना तोंड दिलें. संकटांतून मार्ग काढणें ह्यांतच खरें कौशल्य आहे असें ते नेहमीं म्हणत. मराठी साहित्यसेवा करीत असतां अण्णांनीं आपलें बुद्धिसर्वस्व व वित्तसर्वस्वहि खर्चण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. ग्रंथमालेनें मराठी साहित्यसेवा कशी केली आणि तिची योग्यता किती होती याबद्दल परिशिष्टांत ग्रंथमालेची विषयसूचि दिली आहे त्यावरून थोडीशी कल्पना करितां येईल. मराठीचे एक अखंड व्यासंगी आणि अभिमानी प. वा. विसुभाऊ राजवाडे ह्यांनीं ग्रंथमालेची मुक्तकंठानें स्तुति केली. इतकेंच नव्हे तर आपलें बहुमोल लेखनसाहित्य प्रसिद्ध करण्यास त्यांनीं ग्रंथमालेचाच आश्रय घेतला. अशा प्रकारानें ग्रंथमालेनें भाषासंवर्धनाच्या कामीं अलौकिक मदत केली आहे. त्यामुळें तिची योग्यता जास्त आहे. या साहित्यसेवेच्या पायीं त्यांना पुष्कळ कष्ट सहन करावे लागले. परंतु आपल्या चित्ताची शांति त्यांनीं केव्हांहि ढळूं दिली नाहीं.

स्वतः मिळविलेल्या शिक्षणाचा उपयोग कृतज्ञपणें समाजोन्नतीकरितां करावा ही गुरुवर्यांची अगदीं मूळापासून आवडती कल्पना होती. त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत आपलें शिक्षणाचें पवित्र कर्तव्यच यथायोग्य, यथाशक्ति आणि यथामति बजाविलें.

ज्याप्रमाणें गुरुवर्यांनीं प्रथम ग्रंथमाला काढून मराठी भाषेंतील ग्रंथसंपत्ति वाढविण्याची खटपट केली, त्याप्रमाणें संपादक या नात्यानें त्यांनीं समर्थ वर्तमानपत्रद्वारें केलेली कामगिरीहि अत्यंत श्रेष्ठ दर्जाची आहे. ब्रिटिश मुलुखांत ज्या ज्या चळवळी होत त्यांचें प्रतिबिंब कोल्हापुरांतील वातावरणांतहि पडत असे; आणि त्यांचें बरें वाईट परिणामहि त्या ठिकाणीं दृग्गोचर होत. पण अशा परिस्थितींतहि लोकशिक्षणाचें कर्तव्य संपादकीय खुर्चीवरून अण्णांनीं निर्भीडपणें केलें. त्यावेळीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलखांतहि राजकीय चळवळ चालू ठेविणें कठीण होतें. मग संस्थानांतील अशुद्ध वातावरणांत राहून त्या वेळीं ४-५ वर्षें गुरुवर्यांनीं संपादक या नात्यानें कार्य केलें, ही गोष्ट अत्यंत अभिमानास्पद होय. संस्थानांतील तत्कालीन अधिकाऱ्यावर त्यांनीं विधायक टीका केली होती; आणि त्यायोगें कोल्हापूरच्या राजकारणांतहि बरीच सुधारणा होत गेली. एकंदरीनें या वेळीं 'समर्थानें' कोल्हापूरच्या इतिहासांत बरीच भर टाकली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

'समर्थाचा' पहिला अंक ता. ६ जुलै सन १८९८ रोजीं प्रसिद्ध झाला. समर्थांत इंग्रजी लेखाहि दर आठवडयास स्वतः गुरुवर्यच लिहीत असत. कांहीं वेळपर्यंत केवळ सुशिक्षित लोकांमध्यें वाङ्मयाची अभिरुचि उत्पन्न करण्याचें धोरण समर्थानें स्वीकारलें होतें. त्या वेळीं समर्थांत अनेक विद्वानांचे लेख येत. संस्थानी राजकारण, संस्थानांची औद्योगिक प्रगति, राष्ट्रीय शिक्षण वगैरे अनेक विषयांचा समावेश 'समर्था'त झालेला होता.

अशा प्रचलित राजकारणाचा विचार करीत असतां इतर विषयांचीहि चर्चा होत होती. मधून मधून इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे ह्यांचे ऐतिहासिक व वाङ्मयात्मक लेख नेहमीं येत असत. सदरहू वर्तमानपत्राच्या नांवाप्रमाणें यथार्थ असें समर्थ वाङ्मयहि समर्थांतून प्रसिद्ध होत असे. एकंदरींत 'समर्था'नें थोड्या काळांत चांगली प्रसिद्धी मिळविली होती हें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

त्या वेळची परिस्थिती म्हणजे ‘ वर्तमानपत्रें म्हणजे एक तारेवरचा खेळच होता. ’ अशा वेळीं योग्य तऱ्हेच्या लोकांच्या विचारांना वळण देणें हें लोकशिक्षणाचें प्रमुख अंग म्हणूनच गुरुवर्यांनीं संपादकीय कार्य आपल्या अंगावर घेतलें होतें. चार वर्षांच्या मुदतींत ग्रंथमालेच्या वाढत्या लोकप्रियतेमुळें उत्पन्न झालेला आत्मविश्वास समर्थांत पूर्णपणें दिसून आला.

ग्रंथमालेचा अवतार एका विशेष हेतूनें झाला होता. आणि त्यामुळें औचित्याचा भंग केल्याशिवाय आणि मूळ हेतूला थोडासुद्धां धक्का पोहोंचल्याशिवाय सार्वजनिक विषयांवर मोकळ्या मनानें चर्चा करतां येण्यासारखीं वृत्तपत्रें नव्हतीं. तें कार्य ‘समर्थ’ वर्तमानपत्राच्या द्वारें सुकर झालें.

ग्रंथमाला प्रथम ‘ विद्याविलास ’ छापखान्यांत छापीत असत. पुढें दोन वर्षांच्या आंतच गुरुवर्यांनीं स्वतःचा **समर्थप्रसाद** छापखाना १८९६ मध्यें सुरू केल्यावर ग्रंथमाला आणि समर्थ वर्तमानपत्र तेथें छापण्यास सुरवात झाली. ग्रंथमाला मासिक कोल्हापूर दरबारच्या आश्रयाखालीं चालू झाल्यामुळें त्या वेळीं प्रोफेसर विजापूरकर संपादक या नात्यानें उघड संबंध ठेवीत असत. परंतु समर्थाची तशी गोष्ट नव्हती. त्यांचें संपादक रा. प्राणी या नांवाचे निराळे गृहस्थ होते. तथापि समर्थांतील स्फूर्ति प्रो. विजापुरकरांची आहे हें लोकांना माहित होतें. समर्थ वर्तमानपत्र ९ वर्षें चाललें. १९०८ मध्यें ब्रिटिश मुलखांप्रमाणें कोल्हापूर दरबारनेंहि जामीनकीचा

---

१ समर्थप्रसाद छापखाना १८९६ मध्यें कोल्हापुरांत गुरुवर्यांनीं सुरू केला. पुढें १९१० नंतर तो बंद झाला. नंतर १९१९ मध्यें तळेगांवीं नवीन श्री-समर्थ विद्यालय सुरू झाल्यावर १९२३–२४ मध्यें विद्यालयांतच पुन्हां समर्थ प्रसाद छापखान्याची स्थापना झाली. पुढें तेथें छापखान्याचें काम चालणें कठीण झाल्यामुळें गुरुवर्यांच्या प्रेरणेवरून ‘ समर्थ-प्रसाद ’ छापखाना पुण्यास नेण्यांत आला व आतां तो ‘**समर्थ-भारत**’ छापखाना या नांवानें प्रसिद्ध आहे. पुण्यांत जे चार पांच नामांकित छापखाने आहेत त्यांत या नवीन समर्थ विद्यालयाच्या ‘ समर्थ-भारत ’ छापखान्याची आज गणना होते. ‘ लोकमान्य टिळक चरित्राचा द्वितीय खंड’, ‘प्रतागडचें युद्ध’हीं पुस्तकें येथेंच छापलीं गेलीं आहेत.

ायदा सुरू केल्यामुळें, ' समर्थ ' बंद करणें भाग पडलें. वर म्हटल्या- ाणें गुरुवर्यांच्या लोकशिक्षणाच्या कल्पना अधिक व्यापक उदार आणि ङ्मयिक शिक्षणाच्या पलीकडे हळु हळूं जाऊं लागल्या होत्या हें स्पष्ट सून येतें. नंतर ग्रंथमालेहून थोडें वेगळें कार्य करण्यासाठीं गुरुवर्यांचें त्न सुरू झाले. ग्रंथमालेची १२ वर्षांची तपस्या संपल्यावर राजकारणाशीं ञ्च असें एक मासिक काढून तद्वारां प्रचलित विषयांचें ज्ञान लोकांना द्यावें सें त्यांना वाटूं लागलें. इंग्रजींतील ' नाइन्टीन्थ सेंचरी ', 'क्वार्टर्ली रेव्ह्यू ', ्स्ट ॲण्ड वेस्ट ' मासिकांच्या वगैरे धर्तीवर आपणहि एक मासिक काढावें कल्पनी त्यांच्या मनांत घोळूं लागली.

सरतें शेवटीं ग्रंथमालेनंतर ' विश्ववृत्त ' मासिक काढण्याचें ठरलें. साठीं लोकमान्य टिळक, ना. गोखले, पं. सातवळेकर, कै. रा. सा. ंगाशे, रा. ब. काळे, रा. सा. ना. गो. चाफेकर, रा. सा. विंद वासुदेव कानिटकर, रा. ब. लेले, रा. टिल्लू, कै. ल. प. परांजपे रे अनेक महाराष्ट्रीय लेखकांचें साहाय्य त्यांनीं मिळविलें. पहिल्याच ंकरितां त्यांनीं वरील लेखकांचें साहाय्य मिळविलें. चित्रशाळेचे ुकाका जोशी यांच्यातर्फे खटपट करून त्यांनीं लोकमान्यांचा लेख आशेची निराशा व निराशेची आशा ' हा आणविला. नंतर पुढें तो ञ ' विश्ववृत्ता'च्या पहिल्या अंकांतच प्रसिद्ध झाला.

' विश्ववृत्ताचा ' पहिला अंक एप्रिल १९०६ मध्यें प्रसिद्ध झाला. त्या ठच्या जाहिरातीवरून पाहतां ग्रंथमालेचें कार्य बंद न करितां त्या रूपांतच स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध करीत रहावें आणि विश्ववृत्तहि दरमहा प्रसिद्ध ावें, असें त्यांनीं ठरविलें होतें. तसेंच प्रचलित महत्त्वाच्या विषयांवरील ची जास्त उपयुक्त व्हाव्यात, अशा उद्देशानें ' आक्रोश ' या नांवाचें ८ पृष्ठांचें एक मासिक काढावें असें गुरुवर्यांच्या मनांत असल्याचें दिसून . परंतु पुढें कार्यबाहुल्यानें स्वतंत्र ग्रंथमाला आणि आक्रोश या ासिकांचा नादहि त्यांनीं सोडून दिला. स्वतंत्र ग्रंथमालेचा प्रयत्न कांहीं वसपर्यंत त्यांनीं चालविला आणि नंतर ' विश्ववृत्त ' काढलें. ग्रंथमालेतर्फे ंप्रमाणें स्वतंत्र पुस्तकें प्रसिद्ध करण्याची गुरुवर्यांची योजना होती. परंतु ग्रंथमाला बंद पडली.

अशा रीतीनें अण्णांनीं १२ वर्षांच्या एका तपानंतर पुढीलप्रमाणें ग्रंथ-मालेची समाप्ति करून शिरोवतरणांत दर्शविल्याप्रमाणें पुढें विशेष वाङ्मयकार्य करण्यास परमेश्वराजवळ ' देवराया मला शक्ति द्यावी ' अशी विनवणी केली आहे.

स्वधर्म–स्वदेश–स्वभाषादिकांचा । जगीं मान व्हावा असा हेतु साचा ।।
मनीं योजिला अल्प हा यत्न केला । जनाला सदा तोषवो ग्रंथमाला ।। १ ।।
बरें वाटलें नाम तें विश्ववृत्त । कशाही निमित्तें निमालें श्ववृत्त ।।
दिला प्रार्थिल्यावीण हा थोर ठेवा । अहाहा ! मला पावली राजसेवा ।। २ ।।
समर्थप्रसादा जय श्रीसमर्था । जया पाव, हो ग्रंथमाले ! कृतार्था ।।
यशा लाध साक्रोश हे विश्ववृत्ता । करो ही कृपा सर्वदा ईशसत्ता ।। ३ ।।

[ ग्रंथमाला १९०६ ]

आपल्या वाङ्मययज्ञाची समाप्ति करतांना अण्णांना आपले प्रभु करवीराधिपति श्रीमंत छत्रपति महाराज ह्यांची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. ग्रंथमालेला प्रथम छत्रपति महाराजांनीं आश्रय दिला व पुढें १२ वर्षें ग्रंथमाला सतत कोल्हापुरांतच निघत होती, त्याची जाणीव त्यांनीं शेवटपर्यंत ठेविली होती. कारण या यज्ञाचे शेवटीं ' आमच्या करवीरप्रभूंना दीर्घ आयुष्य दे ' अशी त्यांनीं पुढीलप्रमाणें परमेश्वराजवळ प्रार्थना केली आहे.

सदा राजबा दीर्घ आयू सुबुद्धि । सदा देव देवो भली शीलशुद्धि ।।
प्रजा तुष्ट राहो नको दुष्ट–संग । शिवाजीपदाचा न हो मानभंग ।।

असो; पुढें आक्रोशाचा जन्मच झाला नाहीं. कारण त्या वेळेला समर्थ विद्यालयाची कल्पना गुरुवर्यांच्या मनांत घोळत असल्यामुळें दुसरें कांहींहि करतां येत नाहीं अशाबद्दलची सूचना विश्ववृत्ताच्या पहिल्याच म्हणजे एप्रिलच्या अंकामध्यें त्यांनीं वाचकांना दिली आहे. विश्ववृत्ताचे दरमहा एक या प्रमाणें २१ अंक प्रसिद्ध झाले. विश्ववृत्ताचें संपादकत्व प्रो० वामन मल्हार जोशी एम्. ए. ह्यांच्याकडे पुढें सोपविण्यांत आलें होतें.

अण्णांची वाङ्मयसेवा अशा रीतीनें अव्याहत चालली होती. शेवटच्या अंकामध्यें पं. सातवळेकर यांचा ' वैदिक प्रार्थनांची तेजस्विता ' हा लेख प्रसिद्ध होऊन त्यामध्यें केलेल्या कांहीं विधानांबद्दल कोल्हापूर दर-

बारकडून विश्ववृत्ताच्या संपादकावर व प्रकाशकांवर खटला भरण्यांत आला. अखेर विश्ववृत्तांतील या लेखाबद्दल गु. अण्णासाहेब, प्रो. वामनराव जोशी आणि मुद्रक विनायकराव जोशीराव ह्यांना देहदंड सोसावा लागला.

कोल्हापुरांत गुरुवर्यांच्या ऋत्विजत्वाखालीं चालू असलेला हा मोठा ज्ञानयज्ञ सुमारें १४ वर्षें अव्याहत चालला होता. नंतर त्यांच्या वाङ्मय-सेवेंत मध्यंतरीं खंड पडला होता. परंतु कै. नानासाहेब[1] ओक ह्यांनीं लोक-शिक्षण मासिक सुरू केल्यावर अण्णांनींहि आपली लेखणी उचलली व कांहीं लेख लिहिले.

लोकशिक्षण बंद झाल्यावर मात्र इतरत्र त्यांनीं विशेष लिहिलें नाहीं. तरी प्रसंग मिळतांच आपल्या आवडत्या शिक्षणविषयावर मात्र त्यांनीं कांहीं लेख लिहिले आहेत. गुरुवर्यांच्या वाङ्मयसेवेची रूपरेषा येथें थोडक्यांत दिली आहे. त्यांच्या वाङ्मयाबद्दल जास्त माहिती पुढील विभागांत स्वतंत्रपणें दिली असल्यामुळें हें प्रकरण येथेंच आटोपतें घेणें बरें.



१ कै. नाना ओकांची माहिती परिशिष्टांत विस्तृत दिली आहे.

# प्रकरण सहावें

## वेदोक्त प्रकरण

" हल्लींच्या मनूंत वाटेल त्याला वाटेल तें करण्यास सामान्यत: मुभा पाहिजे. कसें वागूं म्हणून विचारणाराच्या पाठीं ग्रामण्यें लागतात. नाहीं तर ज्याचा तो जगद्गुरु ! "

( ग्रं. मा. १९०५ व. १२ अं. ८ पान ६ )

राजाराम कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर व ग्रंथमालेचे संपादक या नात्यानें आमचे चरित्रनायक अण्णासाहेब विजापूरकर ह्यांची कीर्ति शुक्लेंदुवत् जास्त जास्त वाढत होती. कोल्हापूरच्या अनेक चळवळींत गुरुवर्य प्रामुख्यानें पुढें असत. त्यामुळें त्यांच्या मित्रांचें आणि सहाय्यकर्त्यांचें मंडळहि वाढत होतें. अशा तऱ्हेनें शिक्षकाचें आणि संपादकाचें पवित्र कार्य करीत असतां मध्येंच वेदोक्ताच्या चळवळीनें त्या वेळीं कोल्हापूर ढवळून सोडलें व महाराष्ट्रांत एका शंकराचार्यांच्या पीठांतून दोन शाखा उत्पन्न होऊन पुन: तिसरें क्षात्र जगद्गुरुंचें पीठ केवळ कोल्हापुरसाठीं कसें निर्माण झालें याची हकीकत बरीच मनोरंजक आहे. ग्रंथमालेचे संपादक या नात्यानें इतर विषयांसंबंधीं गुरुवर्य विजापूरकर मासिक चर्चा म्हणून कांहीं तरी प्रचलित विषयांवर लिहीत असत. गुरुवर्यांचा वेदोक्त प्रकरणाशीं असाच ग्रंथमालेतील मासिक स्फूट लेखनावरून संबंध आला. ग्रंथमालेप्रमाणें समर्थ वर्तमानपत्राचा व्यापहि गुरुवर्यांनीं वाढविला होता. कॉलेजमध्यें शिकवून जो फुरसतीचा वेळ असे त्यांत गुरुवर्यांचे असे अनेक व्यवसाय चालू होते.

अखिल भारतवर्षांत या वेळीं नवमतवादाचीं जीं चिन्हें दिसत होतीं तीं सर्व कोल्हापुरांतहि दृग्गोचर होत होतीं. ह्या वेळीं ब्रिटिश मुलखांत ज्याप्रमाणें लोकांच्या आचारविचारांत क्रांती घडून येत होती तशीच क्रांती संस्थानांतील जनतेंतहि घडून येत होती. परंतु उघड क्रांतिकारक मतें प्रतिपादन करण्याचें धाडस मात्र फारच थोड्यांनीं केलें. या क्रांतियुगांतच वेदोक्ताची चळवळ जन्मास आली !

श्रीकरवीर हें क्षेत्र 'दक्षिण काशी' या नांवानें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. येथें श्रीशंकराचार्यांचा मठ सोळाव्या शतकांपासून प्रस्थापित झाला असून श्रीजगद्गुरूंना महाराष्ट्रांतील धर्मगुरु या नात्यानें पुष्कळ मान आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांचा जन्म सातव्या शतकांत झाला. भरतखंडांत चोहोंकडे संचार करून त्यांनीं शृंगेरी, द्वारका, बदरिकाश्रम व पुरी ह्या ठिकाणीं चार प्रमुख मठ स्थापले व तेथें आपल्या शिष्यांची स्थापना केली. श्रीशंकराचार्यांच्या पासून ४४ वे स्वामी श्रीविद्याशंकर भारती हे शृंगेरी मठांत गादीवर असतांना करवीर मठाची स्थापना झाली असें म्हणतात. शृंगेरीच्या शिष्यपरंपरेपासूनच करवीर मठाची स्थापना झाल्यापासून महाराष्ट्रास या पीठाचा अत्यंत अभिमान वाटूं लागला. वस्तुत: दक्षिणेंत म्हैसूर संस्थानांत शृंगेरी मठ स्वतंत्र असतांना पुन: निराळ्या करवीर पीठाची आवश्यकता कां उत्पन्न झाली हें पाहणें आवश्यक आहे.

शृंगेरी मठाचे ४४ वे अधिपति श्रीविद्याशंकर भारती १६ व्या शतकाच्या द्वितीयार्धाच्या आरंभीं उत्तर हिंदुस्थानांत बदरिकेदाराच्या यात्रेस निघाले असतां पुढें फिरत फिरत ते काशी येथ गेले. तेथें आपल्या शिष्यांना थांबण्यास सांगून पुढें बदरिकाश्रमाकडे श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या शोधार्थ त्यांनीं सहा सात महिने प्रवास केला. 'सहा महिने काशीस आपली वाट पाहून नंतर शिष्यांनीं शृंगेरी मठांत दुसऱ्या विद्वान् शिष्याची योजना करावी' असें बदरिकाश्रमाकडे जातांना त्यांनीं आपल्या शिष्यांना अगोदरच सांगितलें होतें. त्याप्रमाणें तेथें सहा महिने वाट पाहून सर्व शिष्य मंडळी शृंगेरीस आली आणि तेथें त्यांनीं दुसऱ्या एका शिष्याची गादीवर स्थापना केली. पुढें पूर्वींचे स्वामी श्रीविद्याशंकर भारती दक्षिणेकडे कांहीं कालानें परत आले तेव्हां शृंगेरी पीठावर नवीन आचार्यांची स्थापना केली आहे असें शृंगेरी जवळच्या कुडली गांवीं आल्यावर त्यांना समजलें. नंतर ते तसेंच पुन: उत्तरेकडे प्रवासासाठीं फिरले. कोल्हापूर प्रांतांत आल्यावर श्रीकरवीर येथें त्यांची व तेथील हिंदु राजा श्रीकृष्णराय यांची गांठ पडली. 'स्वामींनीं या करवीर क्षेत्रींच राहवें, त्यामुळें या दक्षिण काशीचें महत्व वाटेल, अशी स्वामींना कृष्णरायांनीं आग्रहानें विनंति केली, तेव्हां विद्याशंकर भारतीस्वामी येथेंच राहिले आणि करवीर क्षेत्रांत आपला नवीन मठ स्थापते झाले अशी हकिकत परंपरागत चालत आली आहे.

अशा रीतीनें कोल्हापूर प्रांतांतील श्रीकरवीरक्षेत्रीं श्रीजगद्गुरु विद्याशंकर भारती यांचा स्वतंत्र मठ महाराष्ट्रांत प्रसिद्ध झाला. पुढें अनेक लोकांनीं आणि संस्थानिकांनीं सदर पीठास इनामी जमिनी दिल्या त्या अद्यापि सातारा, बेळगांव कोल्हापूर, हैद्राबाद आणि सांगली या भागांत आहेत. बेळगांव जिल्ह्यांत हरिद्रा नदीचे कांठीं संकेश्वर येथेंहि करवीरकर जगद्गुरु कांहीं दिवस राहात असत, त्यामुळें त्यांचा तेथेंहि एक मठ कायम झाला. विशेषतः करवीरक्षेत्र कोल्हापूर संस्थानांत असल्यामुळें ब्रिटिश मुलुखांत संकेश्वर येथेंच आपलें मुख्य ठाणें असावें असें मठाधिपतींना वाटत होते. त्याप्रमाणें शिक्का मोर्तब, पालखी वगैरे मुख्य जगद्गुरूंचा परिवार संकेश्वर मठांतच असे. अठराव्या शतकांत श्रीताराबाईसाहेब[1] यांच्या कारकीर्दीत कोल्हापूरकर व पेशवे ह्यांच्यामध्यें सुमारें ७५ वर्षे तेढ माजून राहिली होती. अस्वस्थतेच्या कालांत मठास बराच उपसर्ग पोहोंचला. विजापूरच्या सुलतानानें एक वेळ पूर्वी युद्धांत संकेश्वराला वेढा दिला होता इतकेंच नव्हे तर मठास आगहि लावली होती. पण ह्याच इतिहासाची पुनरावृत्ति पेशवाईत झाली! कांहीं राजकीय वैमनस्यें काढून ब्राम्हणवीरांनींहि १७७६ मध्यें श्रीजगद्गुरूंचा मठ अग्निनारायणाच्या मुखांत लोटला ही गोष्ट उद्वेगजनकच म्हटली पाहिजे! पुढें १८८५ पर्यंत सर्व गोष्टी सुरळीत चालल्या होत्या. या[2] वेळीं गुरुस्वामी वासुदेवशास्त्री भिलवडीकर

---

१ " कोल्हापुरास रामराम " हें प्रकरण पान पहा.

२ गुरुस्वामी वासुदेवशास्त्री भिलवडीकर ( करवीर पीठ )



हे करवीर पीठावर अधिष्ठित होते. उतारवय झाल्यावर त्यांनीं वे. शा. सं. काशिनाथबुवा ब्रह्मनाळकर यांना शिष्य केलें. त्यांचे दुसरे शिष्य रा. अथणीकर शास्त्री श्रीसंकेश्वरपीठाची व्यवस्था पाहात. पहिले शिष्य ब्रह्मनाळकर होते आणि पुढें आत्मारामशास्त्री जोशी व चित्रे अशी शिष्यपरंपरा झाली. इकडे अथणीकर यांनींहि वाईचे वृद्ध आणि सत्पात्र असे शेंडेशास्त्री यांना शिष्य केलें. या सुमारास १९०० सालीं कोल्हापुरांत करवीर क्षेत्रीं वेदोक्त प्रकरण सुरू झालें.

वेदोक्त प्रकरणाचा साग्र इतिहास देण्याचें जरी प्रस्तुत ठिकाणीं प्रयोजन नाहीं तरी गुरुवर्यांच्या चरित्रांतील हा एक महत्त्वाचा दुवा वाचकांपुढें उलगडून दाखविणें जरूर आहे. वेदोक्ताला जरी सुरवात बडोदेकरांनीं केली; परंतु पुढील वाढ मात्र कोल्हापुरासच झाली हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. मुख्य वादास सुरवात जरी केवळ धार्मिक बाबींपासून झाली तरी ह्या वादाचा रोख ब्राह्मणांवरच होता ही गोष्ट आतां जगजाहीर झाली आहे. चिरोल केसच्या वेळीं सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष ना. भास्करराव जाधव ह्यांनीं आपल्या साक्षींत स्पष्टपणें सांगितलें कीं, " वेदोक्तामध्यें मला कांहींच अर्थ दिसत नाहीं. केवळ ब्राह्मण विरुद्ध जातात ह्मणून हा हक्क आम्हीं मागतों." ( टि. च. भा. २ प्र. ७ वें. ) यावरून वेदोक्तांत ब्राह्मणांनीं वेदोक्त पद्धतीनें धर्मकृत्यें करण्याचें नाकारलें म्हणून ब्राह्मणांवर छत्रपतींचा रोष झाला.

पण वर्णाश्रमधर्मव्यवस्थेप्रमाणें ब्राह्मणक्षत्रियांचे धार्मिक अधिकार प्राचीन काळीं जरी समान समजेल जात होते, तरी मध्यंतरी बराच काल उलटून गेल्यामुळें प्राचीन व्यवस्था समजण्यास कांहींहि साधन उरलें नव्हतें.

" अशा स्थितींत शास्त्राधाराचा सारासार विचार पाहून प्रचलित गोष्टीचा निकाल लावणें यांतच खरें राष्ट्रहित आहे. खोल पाण्यांत शिरून बुडण्याची वाट सोडावी, अनिश्चित प्राचीन स्थितीसंबंधानें बेजबाबदारपणें वागून राष्ट्रास अवनततर करण्याचें म्हणजे अधिक हीनतेप्रत पोंचविण्याचें घोर पातक करून राष्ट्रांगार बनण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं या आचार प्रकरणाचा अनंत कालापर्यंत खुशाल खल सुरू ठेवावा. आपसांतील वैमनस्यें नाहींशीं होतील तर चांगलेंच, पण तशीं नाहीं झालीं तर तीं बाजूस सारण्याचा हा काल आहे. अशा समयीं क्षत्रिय व

वैश्य अस्तित्वांत आहेत कीं नाहींत हा वाद करण्याची जरूरच नाहीं." असें अण्णासाहेबांचें स्पष्ट मत होतें. ( ग्रं. मा. १९०५ व. १२ अं. ८ पा. ६ )

कोल्हापूरचे महाराज जरी श्रीछत्रपती शिवाजीमहाराजांचे वंशज असले तरी त्यांच्या घराण्यांत ज्या ज्या इतर घराण्यांतील मुली व दत्तक मुलगे आले तीं सर्व घराणीं संस्कारयुक्त क्षत्रिय परंपरेचीं होतीं, त्या सर्व घराण्यांत क्षत्रियोचित वेदोक्त संस्कारादि क्रिया होत होत्या हें प्रमाणतः सिद्ध होईपर्यंत वेदोक्ताला करवीरस्थ श्रीशंकराचार्यांनीं संमति देऊं नये असें महाराष्ट्रांतील ब्राह्मण शास्त्रज्ञांचें मत होतें. त्याप्रमाणें ब्रह्मवृन्दांच्या मताप्रमाणें वागणें कोल्हापूरकराच्या राजोपाध्यांचें प्राप्त कर्तव्यकर्मच होतें. पण ' वेदोक्त कर्में करीत नसाल तर तुमचें उत्पन्न बंद करूं ' असा धाक माजी छत्रपती शाहूमहाराजांनीं आपल्या उपाध्यायांना घातला. कोल्हापूरकरांनीं अशा प्रकारें अगदीं जालीम मात्रेचा उपयोग करतांच चोहोंकडे एकदम खळबळ उडाली. इतकें झालें तरी राजोपाध्यांनीं ' उत्पन्न जप्त झालें तरी बेहेत्तर, पण वेदोक्त कर्में करणार नाहीं असाच शेवटचा जाब दिला. ' इतका बाणेदारपणा त्यांनींहि या वेळीं दाखविला !

वेदोक्त प्रकरणानें अशा रीतीनें महाराष्ट्रांत बरेंच काहूर उडविलें. कोल्हापूरकर राजोपाध्ये यांचें वतन यामुळें बुडालें आणि तेथूनच महाराष्ट्राच्या राजकारणांत धर्मकारण घुसडल्यामुळें ब्राम्हण–ब्राह्मणेतर वाद पुढें येण्यास वेदोक्ताच्या चळवळीची चांगली मदत झाली. या कामीं छत्रपतींनीं आपल्या राजकीय सत्तेच्या जोरावर इष्टकार्य सिद्धीस नेलें इतकेंच नव्हे तर नवीन क्षात्र जगद्गुरूंचें धर्मपीठ उत्पन्न करून आपली कर्तुमकर्तुंशक्ति महाराष्ट्रास दाखविली.

परिस्थितीस अनुसरून अशीं धर्मपीठें व आचार्यपरंपरा पाहिजे अशी आकांक्षा कार्यकर्त्या विद्वानांमध्यें या वेदोक्ताच्या चळवळीमुळें पुढें उत्पन्न झाली आणि ती अल्प कालानें फलद्रूपहि झाली.

अशी जोराची वेदोक्ताची चळवळ कोल्हापुरांत उगम पावल्यावर महाराष्ट्रांत धर्मपीठांच्या अस्तित्वाविषयीं बराच उहापोह माजला. तरी पण पूर्ण परंपरागत चालत आलेलीं हीं धर्मपीठें महाराष्ट्रास उपकारकच वाटत होतीं

व आहेत. इतकेंच नव्हे तरी सदर पीठांचे अधिपती 'निःशस्त्र दंडधारी' न बनतां कांहीं कार्यकर्ते होऊन धार्मिक चळवळीचें लोण महाराष्ट्रांतील खेडेगांवच्या कोनाकोपऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचेल अशी इच्छा अनेक थोर धर्मनिष्ठ गृहस्थांनीं जाहीर केली होती. सदर मठ संस्थांचें पुनरुज्जीवन होऊन धर्मविचाराचा ओघ पुनः पहिल्याप्रमाणें खेडेगांवामध्येंहि जावा त्या कामीं पीठाला द्रव्याची अडचणहि पडूं नये अशी व्यवस्था करण्यासाठीं महाराष्ट्रांतील कांहीं धर्मजिज्ञासु मंडळींनीं महाराष्ट्रांत एक योजना जाहीर केली होती. पण ती तशीच अर्धवट पडली. आजहि पुन ह्या प्रश्नांकडे आतां आत्मियतेनें बघण्यास महाराष्ट्रीयांनीं सुरवात करावी ह्मणजे ही एक इष्ट सुधारणा घडून येईल ह्यांत संशय नाहीं.

थोडक्यांत कै. वि. का. राजवाडे यांचा सूत्रमय भाषेंत सांगावयाचें ह्मणजे:—

१ "क्षत्रिय कुलावतंस श्रीमत् थोरल्या शिवाजी महाराजांचे प्रस्तुत वंशज क्षत्रिय नाहींत असें प्रतिपादन गुरुस्वामी करितात.

२ प्रस्तुत वंशज क्षत्रिय आहेत, असें शिष्यस्वामी म्हणतात.

३ द्रव्यलाभ होण्याची लालुच असतां, कोणीहि प्रतिष्ठित ब्राम्हण क्षत्रियांच्या येथें वेदोक्त कर्म करीत नाहीं.

४ गुरुस्वामीकडून शिष्यस्वामी पदच्युत झाल्यामुळें, वस्तुतः करवीरस्थ क्षत्रियांना कोणी अधिकारी धर्माचार्य राहिला नाहीं.

५ जर करवीरस्थ शिष्यस्वामींना धर्माचार्य समजतील, तर केवळ क्षत्रियांच्या करितां नवीन धर्ममठ स्थापल्यासारखें होईल.

६ करवीरांतील ब्रम्हवृंद व इतर प्रजा यांना गुरुस्वामी मान्य आहेत, ह्मणजे कोल्हापुरांत सध्यां दोन धर्मसत्ता आहेत." (विश्ववृत्त व. १ अं. २)

श्रीमंत छत्रपतींनीं या धार्मिक लढ्यांत एका बाजूचा कैवार घेऊन लोकांच्या पिढिजाद हक्कांची पायमल्ली केली, त्यामुळें वेदोक्ताचें नाटक कोल्हापुरांत चांगलें रंगलें असें ह्मणावयास हरकत नाहीं. ह्यासाठीं वितंडवाद माजविणें हें दूरदर्शित्वाचें लक्षण नाहीं. असें अण्णांनीं स्पष्टपणें लिहिलेलें आहे. इतकेंच नव्हे तर 'उत्पन्न जप्त अगर खालसा करण्याचा

बदसल्ला मिळून समाजांत दुही माजविण्यांत आली हें शोकास्पद किंबहुना निंदास्पद झालें, या जालीम व अघोरी मार्गानें जाण्याऐवजीं श्री. अण्णासाहेब राजोपाध्ये ह्यांनीं सुचविलेल्या राजमार्गांनीं जाण्यांत हित होतें, ' असें ते म्हणत. ( ग्रं. मा. व. १२ अं. ८ पा. ३, ४, ५. )

नंतर संकेश्वर—करवीर या संयुक्त धर्मपीठाचे करवीर पीठ व संकेश्वर पीठ असें दोन विभक्त मठ झाले. करवीर मठ कोल्हापूर सरकारच्या ताब्यांत असल्यामुळें महाराष्ट्राची श्रद्धा पुढें श्रीसंकेश्वर मठावरच जास्त बसली आणि ता. ३१ मे १९१७ रोजीं अहमदनगर येथें वे. शा. सं. शंकरशास्त्री शिरोळकर हे परंपराभिमानी व विद्वान् वृद्ध स्वामीकडून शिष्य केले गेले. दोन्ही मठांच्या एकीकरणासाठीं पुढें महाभागवत डॉ. कुर्तकोटी ( आतांचे श्री शंकराचार्य करवीर पीठ ) यांनीं प्रयत्न केला. दोन्ही पीठांचें शिष्यत्व स्वीकारून आपण ही दुही मोडावी असें डॉ. कुर्तकोटी त्यांना वाटत होतें, पण करवीर पीठ महाराष्ट्रास अप्रिय वाटत असल्यामुळें त्या वेळीं हा प्रयत्न सफल झाला नाहीं. ह्यास कारण ह्मणजे ही वेदोक्ताचीच चळवळ होय. पुढें कोल्हापूर येथें करवीर पीठस्थ पित्रे स्वामी यांनीं ता. ३ जून १९१७ रोजीं महाभागत डॉ. कुर्तकोटी यांना शिष्य केले. परंतु संकेश्वर मठ आणि करवीर मठ यांची आपआपसांत ठरलेली तडजोड पुढें दोघांनाहि अमान्य झाली व सदर प्रकरण हायकोर्टांतून प्रिव्ही कौन्सिलपर्यंत जाऊन भिडलें. नुकताच गेल्या वर्षी अखेर निकाल लागून हा धर्मपीठाचा वाद पूर्वीच्या तडजोडी प्रमाणेंच मिटला. पण ह्या दोन जगद्गुरुंच्या भांडणांतून व लो. श्रीमंत शाहू छत्रपतींनीं केवळ ब्राह्मणेतरासाठीं तिसरे क्षात्र जगद्गुरु निर्माण केले ही गोष्ट मात्र अलौकिक परंतु कालानुरूप अशीच झाली!

वेदोक्त प्रकरणांत गुरुवर्यांचा संबंध वर सांगितल्याप्रमाणें 'ग्रंथमाला' या मासिकामुळें आला. ग्रंथमालेचे संपादक या नात्यानें देशांतील इतर घडामोडीप्रमाणें चालू प्रकरणावर लिहितांना त्यांना वेदोक्तावर लिहावें लागलें. परंतु आपले खुद्द अन्नदाते कोल्हापूरकर त्यांच्या संबंधीं लिहितांना ' मना सत्य तें सत्य वाचें वदावें ' ही समर्थोक्ति त्यांनीं आपल्यापुढें ठेविली होती. त्यामुळें त्यांचें सत्य बोलणें व लिहिणें कोल्हापूरच्या अधिकाऱ्यांना आवडलें

नाहीं. गुरुवर्यांनीं आपले वेदोक्तावरील विचार ग्रंथमालेच्या शेवटच्या वर्षांतच लोकांपुढें मांडले. पुढें अवघे ४ अंक काढून ग्रंथमालेची त्यांनीं समाप्ति केली आणि आपलें वास्तव्य थोडयाच दिवसांनीं तळेगांवास हलविलें. वेदोक्त प्रकरणाच्या मिषानें श्रीशाहूछत्रपतींनीं महाराष्ट्रांतील या धार्मिक चळवळींत भाग घेतल्यामुळें राजकीय चळवळ करणाऱ्या पुढाऱ्यांवर अनपेक्षित अशी संकटपरंपरा कोसळली आणि त्यांत इतरांबरोबर अण्णासाहेबांनाहि राजकर्त्यांची अवकृपा सहन करावी लागली. परंतु सर्वभक्षक कालाच्या उदरांत यांहूनहि अधिक गोष्टी होत्या !



## प्रकरण सातवें

# कोल्हापुरास रामराम !

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके ।
जनपदाहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ।।
इति महति विरोधे वर्तमाने समाने ।
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ।।

—सुभाषित

१९०७ सालीं गुरुवर्य विजापुरकरांनीं आपलें समर्थ विद्यालय कोल्हापुराहून तळेगांवीं आणलें तरी कोल्हापुराविषयीं त्यांच्या मनांत अत्यंत अभिमान वसत होता. पुढें पुढें त्यांचें कोल्हापुरला जाणें येणें जरीः कमी झालें होतें तरी कोल्हापूर आणि श्रीछत्रपति यांच्यासंबंधीं बोलणें निघालें कीं त्या स्थानाविषयीं त्याचें नैसर्गिक प्रेम दिसल्याशिवाय राहत नसे. मरणापूर्वी एक दिवसच आधीं त्यांनीं सांगितलें कीं ' आपलें अखेरचें और्ध्वदेहिक आपल्या जन्मभूमींतील श्रीपंचगंगेच्या कांठावरच करावें. ' कोल्हापुरविषयीं त्यांना इतकें प्रेम वाटत होतें.

कोल्हापूरची ऐतिहासिक आणि धार्मिक परंपरा फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. बुद्धकालांतील शीलालेख व नाणीं अद्यापि या प्रांतांत सापडतात. आंध्र, राष्ट्रकूट, शिलाहार, चौल, पांडय, व पुढें देवगिरीचे यादव वगैरे राजांनीं या प्रांतांत स्वामित्व प्रस्थापित केलें होतें. आणि १३४७ नंतर बहामनी साम्राज्यांत हा प्रदेश मोडूं लागला. कालांतरानें विजापूरच्या सुलतानानें कोल्हापूर प्रांत आपल्या ताब्यांत घेतला व पुढें आपली सत्ता दृढमूल करण्यासाठीं पुढील मुसलमानी बादशहांनीं या डोंगराळ प्रांतांत ठिकठिकाणीं दुर्भेद्य किल्ले बांधिले, ते अद्यापि आपल्या गतवैभवाची साक्ष आजहि देत आहेत. मुसलमानांचा जम चोहोंकडे बसून त्यांची सत्ता प्रस्थापित होते न होते तोंच मराठ्यांची रणगर्जना सुरू झाली. श्रीशिवाजीमहाराजांनीं पुणें सातारा प्रांतांत आपलें मराठी साम्राज्य स्थापन करण्याचा निश्चय केला, तेव्हां त्यांना कोल्हापूरच्या डोंगरी भागाचें हत्वम एकदम समजून

आलें. लागलींच त्या भागांतील पन्हाळगड, पावनगड, विशाळगड, वगैरे एक एक डोंगरी किल्ले आपल्या ताब्यांत घेण्याचा क्रम त्यांनीं सुरू केला. पुढें युक्तिप्रयुक्तीनें सर्व कोल्हापूर प्रांत त्यांच्या ताब्यांत आला. संभाजीमहाराजांच्या वधानंतर श्रीछत्रपतींच्या घराण्यांच्या दोन शाखा सातारा व कोल्हापूर या ठिकाणीं झाल्या. कालांतरानें १८४८ मध्यें सातारकरांचें राज्य खालसा झालें. आजतागायत सातान्यापेक्षां छत्रपतींच्या गादीचें खरें वैभव कोल्हापुरास•मात्र द्विगुणित झालेलें दिसतें.

कोल्हापूर प्रांतावर एकंदरीनें निसर्गश्रीची भरपूर कृपा आहे. सह्याद्रीचीं लहान लहान पर्वतशृंगें आपला प्रचंड देह नानाविध वृक्षराजींमध्यें लपवून आपलीं मुखें बाहेर काढून आकाशाकडे टक लावून बघत आहेत कीं काय असा भास झाल्यावांचून राहात नाहीं. सह्य पर्वताच्या एका बाजूस कोंकणची खडगळ, साधी, वनश्री, अरुंद ओबडधोबड कृष्णवस्त्र परिधान करून महाराष्ट्र स्वामिनीच्या अंकावर लोळत आहे आणि दुसऱ्या बाजूस कोल्हापूर वगैरे भागांतील सहज सौंदर्यानें प्रफुल्लित झालेलीं गिरिकंदरें आपल्या रणरुचिर, मर्दानी, प्रौढ वेशानें जास्तच सुशोभित दिसून महाराष्ट्रास शोभा आणित आहेत. कोल्हापूरची ही १०० मैलाची पट्टी अत्यंत सुपीक असल्यामुळें तेथें सहसा दुष्काळ पडत नाहीं. सह्याद्रीच्या सह्य रांगा या भागांत कांहीं ठिकाणीं पन्नास मैल आंत शिरल्यामुळें सह्य मोठमोठीं खोरीं झालीं आहेत. यांमध्यें अनेक टेकड्या आपलीं कित्येक गगनचुंबित शिखरें वर करून आपल्या प्रसारित भुजांनीं श्रीशिवाजीमहाराजांच्या पावन महाराष्ट्रास आपला आशिर्वाद देत आहेत कीं काय असा क्षणभर भास झाल्यावाचून राहात नाहीं. श्रीकृष्णेचा पवित्र प्रवाह येथूनच पुढें गेला आहे. श्रीपंचगंगेचे पंच निर्झर येथूनच उगम पावतात. श्रीजगदंबा अंबाबाईचें देवालय या पावनभूमीस आज अनेक शतकें पवित्र करीत आहे. येथूनच कोंकणांत जाण्याचे अनेक पथ दृष्टिपथांत येतात. पोर्तुगीज लोकांचा पराभव करण्यास याच घाटांतून मराठ्यांचें सैन्य कोंकणच्या खाडींत उतरलें. अद्यापि हे अभेद्य घाट पाहून सह्याद्रीचें अभेद्य कवच अद्यापि महाराष्ट्रास बळकटी आणीत आहे याची खात्री पटते. श्रीजोतिबा, शिदोबा, रामलिंग वगैरे डोंगरांतील जागृत देवस्थानें अद्यापि महाराष्ट्रास जागृत करीत आहेत.

अद्यापि कोल्हापूर प्रांतांतील निसर्गसुंदर प्रदेशांत अनेक जागतीं देवस्थानें, कोल्हापुरची योग्यता फार आहे, हें स्थल ' दक्षिण काशी ' आहे, असें सांगत आहेत. कोल्हापूरचें वैभव आजहि महाराष्ट्रांत अलौकिक आहे. पूर्वीचा आणि आतां ' गांवाबाहेर नवीन झालेला प्रशस्त राजवाडा, श्रीराजाराम छत्रपतीमहाराजांची निरंतर आठवण करून देणारें सुंदर कॉलेज व शाळा, रंकाळयाचा प्रसिद्ध तलाव, शेजारचा पन्हाळा किल्ला, राजद्वारीं सतत डोलत राहणारी गजेंद्रलक्ष्मी, राजघराण्यांतील पुरुषांचे बागेंतील पुतळे इतर सुंदर इमारती आणि अभिनवोद्यानें कोल्हापुरास आजहि जास्तच शोभिवंत करीत आहेत.

अशा ऐतिहासिक आणि पवित्र करवीर क्षेत्रांत आपला जन्म झाला, तेथेंच आपलें निरंतरचें कार्यक्षेत्र असावें अशी गुरुवर्यांची फार फार इच्छा होती. परंतु तसा योगायोग नव्हता. पंचगंगेच्या जुन्या धार्मिक तीर्थस्थानापेक्षां श्रीतुकाराममहाराजांच्या सान्निध्यानें पवित्र झालेल्या इंद्रायिणीच्या तटाकीं तुम्ही वास्तव्य करा असाच ईश्वरी आदेश त्यांना मिळाला व पुढें ते तळेगांवीं येण्यास नाइलाजानें सिद्ध झाले.

गुरुवर्य अण्णासाहेब कोल्हापुरच्या चळवळींत पडल्यापासून जनतेंत चांगली जागृति होऊं लागली. स्वदेशीकडे लोकांचें लक्ष गेलें आणि आपल्या संस्थानांतील व्यापार कसा वाढेल याकडे उद्योगी मंडळी लक्ष पुरवूं लागली. लवकरच स्वदेशी माल तयार करणारी मंडळी आपले संघ बनवून सहकार्य करूं लागले. थोडक्याच कालांत कोल्हापुरच्या वातावरणांत एक प्रकारचें नवचैतन्य चमकूं लागलें असें म्हणावयास हरकत नाहीं. पण खुद्द संस्थानांत नोकरी करणाऱ्या मनुष्यानें सार्वजनिक कार्यांत पडावें कीं नाहीं हा प्रश्न पुष्कळ लोकांच्या पुढें होता. सरकारी नोकरी करणाऱ्यांच्या पायांत रुपेरी बेडी असल्यामुळें जनतेंत सुक्षमतेनें वावरण्यास त्यास फार कठीण पडतें, आणि प्रसंगीं नरपतिहित पाहावें कीं जनपदहित पाहावें, हा पेंच पुष्कळ लोकांना पडतो. परंतु राजाराम कॉलेजांत अध्यापकांचें आपलें काम करून गुरुवर्यांनीं आपला बहुमोल फुरसतीचा काल व वित्त हीं जनताजनार्दनाच्या सेवेस वाहिलीं यामुळें त्यांच्या सेवेचें महत्त्व विशेष आहे.

ग्रंथमाला आणि श्रीसमर्थ वर्तमानपत्र काढून गुरुवर्यांनीं जनसेवेचें असिधाराव्रत स्वीकारलें; त्यांनीं समर्थाचें संपादकत्व मात्र उघडपणें आपल्याकडे घेतलें नाहीं. रा. प्राणी या गृहस्थांचें नांव समर्थाचे संपादक म्हणून घातलें होतें. तरी पत्राची सर्व जबाबदारी गुरुवर्यांनीं आपल्या अंगावरच घेतली होती. तेव्हां जनतेची सेवा निरपेक्ष आपल्या हातून अशीच घडो अशी त्यांची इच्छा होती. तसेंच श्रीशाहूछत्रपतींच्या ठिकाणींहि त्यांची पूर्ण निष्ठा होती.

छत्रपतींच्या राज्यारोहणाच्या सुमुहूर्तावर त्यांनीं ग्रंथमालेचा पहिला अंक छत्रपतींना अर्पण केला. आणि विलायतेस त्यांना जेव्हां 'डॉक्टर ऑफ लिट-रेचर' ही पदवी मिळाली तेव्हां त्यांनीं त्यांचेबद्दलची आपली कृतज्ञताबुद्धि दाखविली. चारपांच पिढ्या ज्या ठिकाणीं वाडवडिलांनीं वास्तव्य केलें तेथें राहून कार्य करावें अशी इच्छा त्यांनीं एकदां ग्रंथमालेंत व्यक्त केली होती; परतु ईश्वरी सूत्र मात्र वेगळेंच होतें. आपणास कोल्हापूर सोडावें लागेल अशी अमंगल कल्पना त्यांच्या मनास कधींहि शिवली नाहीं. पण पुढें प्रसं-गानुरोधानें महाराजांच्या धोरणाविरुद्ध त्यांनीं थोडी टीका करण्यास सुरवात केली तेव्हां मात्र सरकारी अधिकाऱ्यांचा त्यांच्यावर रोष होऊं लागला आणि त्याचें पर्यवसान पुढें अगदीं अनपेक्षित रीतीनें होऊन अण्णांना आपल्या जन्मभूमीचा त्याग करावा लागला. इतकें झालें तरी त्यांची कार्य-निष्ठा जशीच्या तशी होती. परमेश्वरावर हवाला ठेवून आपलें कर्तव्यकर्म करीत राहावें असें त्यांचें मत कायम ठरल्याप्रमाणेंच झालें होतें. असो.

१८९४ मध्यें गुरुवर्यांच्या ग्रंथमालेचा जन्म झाला. स्वत: सरकारी नोकर असल्यामुळें ग्रंथमाला हें मासिक चालू चळवळीपासून त्यांनीं अगदीं अलिप्त ठेविलें होतें. त्यांत बरेंच दिवस कोणताहि बरा वाईट लेख आला नव्हता. परंतु चुकून एका अंकांत गागाभट्टासंबंधानें एक आख्या-यिका आली, व तिचा विपरीतार्थ होऊन ग्रंथमालेला कोल्हापूर दरबारांतून असलेली 'ग्रँट' बंद झाली. तथापि खुद्द छत्रपति शाहू महाराजांच्या संबंधानें पुष्कळ दिवस गुरुवर्यांचें चांगलें मत होतें. राज्यारोहण समारंभास विलायतेस गेल्या वेळीं छत्रपती महाराजांना एल्. एल्. डी. ची पदवी मिळाली असतां गुरुवर्यांनीं त्यांची अतिशयित स्तुति केली आणि ते या अपूर्व मानाच्या पदवीला सर्वतोपरी लायक आहेत असें प्रतिपादन केलें. कोल्हापूर-

करांची गुरुवर्यांनीं केलेली अवास्तव स्तुति पुष्कळ मंडळींना आवडली नाहीं. त्यामुळें तत्कालीन वक्रोक्तिकुशल वृत्तपत्रकारांच्या जहरी टीकेंत ते एकदम सांपडले.

कोल्हापूर दरबारांतून मिळणारी मदत बंद झाली तरी ग्रंथमालेचें प्रकाशन नियमितपणें व जोमानें चाललें होतें. राजारामियन क्लबचाहि दिवसेंदिवस उत्कर्ष होत जाऊन राजारामियनांच्या वार्षिक संमेलनाला परिषदेइतकें महत्त्व प्राप्त झालें होतें. स्वदेशी व्यापाराला उत्तेजन देणारी अशी एक बँक गुरुवर्यांच्या प्रोत्साहनानेंच स्थापन करण्यांत आली; परंतु सदर बँकेचे एक प्रमुख चालक रा. कीर्तने हे एकाएकीं मृत्यु पावले नसते तर त्या बँकेबरोबरच विमा कंपनीची स्थापना कोल्हापुरास करावी असा पुष्कळ मंडळींचा हेतु होता तो सिद्धीस गेला नाहीं. अशा रितीनें स्वदेशीच्या व स्वभाषेच्या उत्कर्षाचे त्यांचे विविध प्रयत्न चालू असतां १९०५ च्या आगस्ट महिन्यांत बंगाल्यांत वंगभंगाच्या प्रतिकारार्थ स्वदेशीची व बहिष्काराची लाट उसळली. वंगभंग चळवळीनें सर्व हिंदुस्थान हदरलें. महाराष्ट्रांत तशीच जोराची चळवळ सुरू झाली! बहिष्काराची चतुःसूत्री इकडेहि कशी आली आणि त्या अवधींत महाराष्ट्रांतहि राष्ट्रीय चळवळीचें बीज कसें रुजलें वगैरे हकीकत सर्वांना माहित आहेच.

गुरुवर्य स्वतः आपल्या वयाच्या बाराव्या वर्षापासून स्वदेशी व्रत आचरीत असत. स्वदेशी चळवळीची लाट महाराष्ट्रांत पसरूं लागली हें पाहून त्यांना आनंद झाला. त्यांनीं विद्यार्थ्यांना स्वदेशी व्रताची दीक्षा घेण्यास प्रोत्साहन दिलें; परंतु गुरुवर्यांचा उत्साह आणि स्वदेशीवरचें त्यांचें अलौकिक प्रेम पाहून अधिकाऱ्यांनाहि संशय–पिशाचिकेनें घेरलें. अण्णांचे हेतु शुद्ध नाहींत, त्यांचीं मतें राजद्रोहकारक आहेत, ते राजनिष्ठ नाहींत, असे अनेक तर्ककुतर्क कोल्हापूरच्या वातावरणांत चाललेले होते. सरतेशेवटीं या सर्व अनिष्ट वातावरणाचा परिणाम अगदीं निराळ्या रीतीनें झाला हें सांगणें नको. हा कालच चोहोंकडे असा होता.

१९०५ च्या सप्टेंबर महिन्यांत राजाराम कॉलेजांतील ' प्रिलिमिनरी ' परीक्षा चालू झाली त्या वेळीं कॉलेजांतून ज्या उत्तरपत्रिका विद्यार्थ्यांना लिहिण्याकरतां देण्यांत आल्या त्या परदेशी कागदाच्या होत्या त्या बदलून स्वदेशी

कागदाच्या द्याव्यात, अशी विद्यार्थ्यांनीं मागणी केली. या वह्या लिहि-ण्यास आपणांस नकोत, असें सर्व विद्यार्थ्यांनीं सांगितलें. त्या वेळीं व्हाइस प्रिन्सिपॉल मि. दस्तुर यांनीं प्रो. विजापूरकरांना बोलाविलें आणि तुम्ही विद्यार्थ्यांची समजूत घाला असें सांगितलें. गु. अण्णासाहेब यांनीं मध्यस्ती केली. परंतु उपयोग झाला नाहीं. पण व्हॉइस प्रिन्सिपॉलनीं उलट यासंबंधीं वरिष्ठाकडे रिपोर्ट केला कीं, प्रो. विजापूरकर यांच्या चिथावणीनें विद्यार्थी बंडखोर बनले आहेत. झालें ! वरिष्ठांचा हुकूम. आपणाला पाहिजे तसा हातीं पडला. मग काय ? कोल्हापूर दरबारला हें शल्य केव्हांतरी काढून टाकण्याची संधी हवींच असल्यानें दिवाणसाहेबांनीं प्रो. विजापूरकर यांना बडतर्फ केल्याचा हुकूम पुढीलप्रमाणें पाठविला.

KOLHAPUR DURBAR
*23rd September 1905.*

His Highness the Maharaja being convinced that Prof. Bijapurkar has not been using his influence over the boys in the right direction, his services are dispensed with.

(Sd.) R. V. SUBNIS,
Diwan.

'प्रो. विजापूरकर विद्यार्थ्यांवरील आपल्या वजनाचा उपयोग योग्य दिशेनें करीत नाहींत, अशी श्रीमंत छत्रपती महाराज ह्यांची खात्री झाल्यामुळें त्यांना नोकरीवरून कमी करण्यांत येत आहे.' असा हुकूम रा. ब. (आतां दि. ब.) रघुनाथराव सबनीस K. C. I. E. ह्यांच्या सहीनें २३ सप्टेंबर १९०५ रोजीं गुरुवर्यांच्या हातांत पडतांच त्यांना आश्चर्य वाटलें ! वास्तविक आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें. कारण ह्यापूर्वींच नोक-रीचा राजीनामा देऊन स्वतंत्रपणें आपलें राष्ट्रीय विद्यालय काढावें अशी कल्पना त्यांच्या मनांत बरेंच दिवस घोळत होती. परंतु एकाएकी आपण संस्थानच्या रुपेरी बेडींतून मोकळे झाल्याबद्दल त्यांना उलट आनंदच वाटला ! 'ईश्वरेच्छा बलीयसी' असें म्हणून गुरुवर्य आपले पुढील कार्यास लागले.

सप्टेंबरमध्यें अण्णा कोल्हापूर दरबारच्या नोकरीवरून कमी झाले. आपलें उदिष्ट कार्य करण्यासाठीं अशा रीतीनें संस्थानच्या नोकरींतून अण्णा मोकळे झाले. पुष्कळ लोकांना त्याबद्दल बरें वाटलें. खुद्द टिळकांनींहि, कै० [1]नानासाहेब देशमुखांच्या तर्फे तार पाठवून कोल्हापूर दरबारांतून मोकळे झाल्याबद्दल अण्णांचें अभिनंदन केलें. अण्णांचे प्रिय मित्र ना. गोखले या वेळीं विलायतेंतच होते. त्यांना मँचेस्टरमध्यें, अण्णा नोकरीवरून सुटल्याचें कळलें. अण्णांच्या कर्तृत्वावर त्यांचा विश्वास असल्यामुळें त्यांनीं अण्णांना लिहिलें. ' कोणतेंही नवें काम अंगावर घेण्यापूर्वीं मला विचारावें. मी लवकरच येतों. मग काय तें निश्चित करतां येईल. कोल्हापूर दरबारांतून आपली मुक्तता झाली; त्यांतूनहि राष्ट्रकल्याणाचा मार्ग एखादा निघू शकेल. ' पुढें लवकरच ना. गोखले विलायतेंतून आले. त्यांचा व अण्णांचा विचारविनिमय झाला. सरकारच्या डोळ्यावर न येतां काम करावें असें त्यांचें मत पडलें. परंतु स्पष्ट व सत्यभाषण करणाऱ्या विजापूरकरांना त्यांचें शब्द कसें रुचणार ! अण्णांचीं व ना. गोखल्यांचीं मतें राजकीय अगर इतर बाबतींत जरी जमलीं नाहींत तरी त्यांच्या स्नेहांत मात्र कधींहि अंतर पडलें नाहीं. आपलीं मतें जुळत नाहींत म्हणून अण्णांनीं गोखल्यांचें गृह मात्र कधींहि वर्ज्य केलें नाहीं. नेहमीं पुण्यास आल्यावर अण्णा गोखल्यांच्या 'सर्व्हंट् ऑफ् इंडिया' ऑफिसांत उतरत असत इतका दोघांचा लोभ दाट होता.

---

[1] डॉ. नानासाहेब देशमुख हे-पेशवाई अखेरचे सुप्रसिद्ध रा. ब. गोपाळराव हरी देशमूख यांचे चिरंजीव होत. हे मूळचे पुण्याचे. यांचा जन्म १८५५ मध्यें झाला. पुढें डॉक्टरीची एम्. डी. परीक्षा देऊन ते सरकारी केमिकल ॲनलायझरच्या ऑफिसांत नोकरीस राहिले. तेथें त्यांना योग्य बढती न मिळाल्यामुळें त्यांनीं नोकरी सोडून दिली १८९७ पासून पुढें लो. टिळक प्रभृति सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांना योग्य ती मदत करीत. महाराष्ट्रीयांच्या उन्नतीसाठीं त्यांनीं मुंबईस अनेक ' फंड ' उभारले ते अद्यपि चालू आहेत. समर्थ विद्यालय स्थापन करण्यासाठीं ' महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळ ' स्थापन करण्यांत आलें त्यांतहि डॉ. नानासाहेबांचें अंग होतें. ता. १६ जुलै १९२८ रोजीं ते मुंबईस मरण पावले.

# प्रकरण आठवें

## श्रीसमर्थ विद्यालयाची स्थापना

प्रबोधसूक्तांत एके ठिकाणीं गुरुवर्य अण्णासाहेब म्हणतात :—

**कधीं गंगादींचे सुभगतट आनंदि भरती ।**
**गुरू विद्या देती; प्रमुदित मनें शिष्य पढती ॥**

श्रीगंगादि नद्या आनंदानें भरून वाहात आहेत, गुरुजी शिष्यांना विद्यादान करण्यांत गढून गेले आहेत आणि शिष्यवृन्द प्रमुदित मनानें विद्याग्रहण करीत आहेत असा आनंददायक देखावा किती तरी आल्हाददजनक आहे ! अशा प्रकारचें दृश्य या पृथ्वीतलावर दिसलें कीं, प्राचीन कुलपति अशा मुनिजनांच्या आश्रमाची आठवण झाल्यावाचून राहात नाहीं.

श्रीसमर्थविद्यालयाचें स्थानमहात्म्य फारच अलौकिक आहे. सुप्रसिद्ध तळेगांवची ऐतिहासिक लढाई याच ठिकाणीं झाली. मराठ्यांच्या सैन्याचा विजय याच रणांगणांवर झाला. अशा ऐतिहासिक प्रसिद्ध स्थलीं बसून इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीं मराठ्यांचा इतिहास जगाला जाहीर केला आणि त्यांचे सहकारी गु० विजापूरकर यांनीं या जागीं समर्थ विद्यालय स्थापून महाराष्ट्रास पुन: 'समर्थ' व 'यशोबलान्वित' करण्यासाठीं अत्यंत भगीरथ प्रयत्न केले. विद्यालयाच्या याच पवित्र परिसरांत लोकमान्य प्रभृति मंडळींनीं पैसाफंड कांचकारखान्याची उभारणी केली. मग अशा ऐतिहासिक स्थलाचें महत्त्व महाराष्ट्र कसा विसरेल ?

पुण्यापासून सुमारें २० मैलावर मुंबईरस्त्यावरच तळेगांव ( दाभाडें ) या गांवापलिकडे १॥ मैल अंतरावर समर्थविद्यालय वसलें आहे. पुण्याहून मुंबईकडे येणाऱ्या व जाणाऱ्या सर्व गाड्या या ठिकाणीं थांबतात. तसेंच तळेगांव, खेड, मंचर, घोडनदी वगैरे भागांत जाण्यासाठीं तळेगांव हेंच मध्यवर्ती स्टेशन असल्यामुळें येथून चोहोकडे जाण्यास मोटारी मिळतात. स्टेशनपासून विद्यालय नैर्ऋत्येस १ मैलावर असून तेथपर्यंत चांगला रस्ता आहे. रेल्वे ओलांडून एकदम टेकडीच्या जवळून गेल्यास १०

मिनिटांत विद्यार्थी सहज विद्यालयापर्यंत पळत जाऊं शकतो. स्टेशनावरून खालीं उतरून चढ उतार असलेल्या टेकडीच्या पायथ्यानें वर चढून वृक्षराजींनीं विभूषित झालेल्या मार्गानें पुढें गेल्यावर विद्यालयाभोंवतींच्या सह्याद्रीच्या लहानग्या टेकड्या प्रेक्षकांस आपलें दर्शन देतात. अगदीं जवळ गेलें तरी विद्यालय दिसत नाहीं. नंतर बरेंच पुढें आल्यावर श्रीसमर्थविद्यालयाच्या इमारती व श्रीबलभीमाच्या देवालयावरची भगवी पताका महाराष्ट्रीयाचें अंतःकरण आपल्याकडे ओढून घेते. इतकें पुढें आल्यावर विद्यालयाची परिसरभूमि दिसूं लागते आणि शेजारची पैसाफंड कांचशाळा आणि गिरणीचें तें उंच धुराडें नजरेस पडल्यावर त्याचे नजिक असणारें 'हेंच विद्यालय' असे उद्गार विद्यालय पहाण्यास येणाऱ्यांच्या तोंडून बाहेर पडतात ! !

जनसंमर्दापासून दूर अशा एका एकांत जागीं समर्थ विद्यालय असल्यामुळें शहरांतील अनिष्ट प्रकार येथें कधींहि दिसावयाचे नाहींत. वाचको ! या समोरच्या टेकडीच्या वर चढून चोहोंकडे एकवार दृष्टि फेका म्हणजे निसर्गाचें खरें सौंदर्य तुम्हांस दिसेल. येथून सभोंवतीं २०।२५ मैलांपर्यंत तुमची दृष्टि दूरवर पोहोंचेल. अलिकडे विद्यालयाशेजारीं असणारें तें प्रशस्त क्रीडांगण, आणि त्याजवळ असणारा तो तळेगांवचा पाणी-पुरवठा, आपल्या चित्रविचित्र रंगाच्या फुलझाडांनीं शोभिवंत दिसणारे ते विद्यालयाजवळचे मुंबईच्या व्यापाऱ्यांचे दोन बंगले आणि दृष्टी जरा पलीकडे वळवून दाट झाडींत लपलेले ते चिंचवडचे मोरया गोसावी यांचें घाटावरील देवालय वगैरे वगैरे भाग चांगला स्पष्ट दिसेल. तो पहा ! सरदार दाभाड्यांचा वाडा, रेल्वेच्या रस्त्यापलीकडे एका बाजूस दिसत आहे. या पायाखालच्या टेकडीच्या दुसऱ्या बाजूस वळून पहा. म्हणजे जवळून जाणारा हा आगगाडीचा वक्रगति मार्ग, पुढें खंडाळ्याच्या दाट झाडींत विलीन होत आहे. या रस्त्यापलीकडे जर नजर फेकली आणि पाहिलें कीं 'श्रीतुकोबाराय देहूकरां'च्या इंद्रायिणीचें पवित्र पात्र डोळ्यापुढें येतें. तेथें एका बाजूस झाडींत देहू आणि तो शेजारीं दिसणारा तुकोबांचा भामगिरी ! अशा या पवित्र स्थानाबद्दल कोणाच्या चित्तांत पूज्यबुद्धी उत्पन्न होणार नाहीं ? अहाहा ! काय ही शोभा ! ! गुरुवर्य विजापूरकरांनीं असें हें रम्य स्थान आपल्या

विद्यालयाकरितां पसंत केलें यावरून त्यांची मार्मिक दृष्टी मात्र चांगली दिग्दर्शनास येते.

अशा निसर्गत: सर्वथैव रमणीय असलेल्या या पावनभूमीवर गु. अण्णांच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेला मूर्त स्वरूप मिळून त्याचाच नवीन श्रीसमर्थ विद्यालय हा सुंदर वृक्ष बनला; तथापि राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेचा विकास तळेगांव येथील सांप्रतच्या नवीन श्रीसमर्थ विद्यालय या संस्थेच्या रूपानें प्रख्यात होण्यापूर्वी या संस्थेचें कोल्हापूर व मिरज या ठिकाणीं कसकसें अवस्थांतर होत गेलें हें पाहणें जरूरीचें आहे. यासाठीं गु. अण्णासाहेबांच्या कोल्हापूर संस्थानांतील शैक्षणिक कार्याकडे आपणांस नजर पोहोंचविली पाहिजे.

केवळ राष्ट्रीय शिक्षणाचा सांगोपांग विचार करून आपलें सर्व आयुष्य त्यांतच खर्च करीत असतां ' माझा देहहि राष्ट्रीय शिक्षणाच्या माझ्या संस्थेंतच—समर्थ विद्यालयांतच—पडावा ' अशी इच्छा करणारे गु. अण्णासाहेब विजापूरकर धन्य होत ! राष्ट्रीय शिक्षणासंबंधींच्या अण्णांच्या कल्पना कोल्हापूर येथें राजाराम कॉलेजमध्यें अध्यापक असतांना निश्चित बनत होत्या व प्रत्येकाला ते आपल्या कल्पना पटवून देण्याचा प्रयत्न करीत. समर्थ विद्यालय काढण्यापूर्वी, सुमारें २० वर्षें शिक्षणाचा पूर्ण अभ्यास करून सरकारी शिक्षणपद्धति किती सदोष आहे हें त्यांनीं पाहिलें होतें. प्रचलित शिक्षणानें विद्यार्थ्यांचा स्वाभिमान नष्ट होतो व त्यामुळें पूर्वजांच्या पराक्रमांचा आणि त्यांच्या उदात्त चरित्रांचा विसर पडून आपला देश कर्तृत्वहीन आहे अशी विद्यार्थ्यांची समजूत कसकशी होत आहे, याचें स्पष्ट चित्र अण्णांच्या हृत्पटलावर पूर्णपणें उमटलेलें होतें. १९०० सालीं पी. ई. व इंटरच्या परीक्षेस गु. अण्णासाहेब परीक्षक होते. परीक्षेंत पास होण्यासाठीं विद्यार्थी ठराविक पुस्तकांचा कसा अभ्यास करीत हें त्यांस कळून चुकलें होतें. या वेळेपासून शिक्षणक्रमांत फरक झाला पाहिजे, अशी त्यांची ठाम समजूत होत गेली व पुढें १९०५ सालीं कोल्हापूर दरबारच्या नोकरींतून मुक्त झाल्यावर नवीन संस्था काढण्याची त्यांची कल्पना चांगलीच बळावली. इतकें झालें तरी अण्णांनीं आपलें शिक्षकाचें पवित्र कर्तव्य मात्र अनिर्वेधपणें पुढें चालविलें. या वेळच्या ग्रंथमालेच्या एका अंकांत ( वर्ष १२ अंक १० ) तें म्हणतात !

" खरें मनापासून आवडणारें शिक्षकाचें काम करण्याचें बनारस हिंदू युनिव्हर्सिटी निघेल तेव्हां तीन वर्षें कबूल केलें आहे. तें पूर्वीच्या आश्रमांत दररोज दोन तास काम करीत होतों तसें करून या सर्व व्यवसायांस फावतें. तो शिक्षकाचा व्यवसाय तूर्त अंतरला आहे. त्याजबद्दल कोणी पाहिजे त्यास घरीं दोन तास शिकविण्याचा क्रम ठेविला आहेच. अशा शिकविण्याबद्दल द्रव्यरूपानें मोबदला मात्र घ्यावयाचा नाहीं. कारण विद्याविक्रय हें पाप, निदान व्यक्तीव्यक्तींच्या संबंधांत तरी पाळावें. समाज संस्था व सरकार यांच्या संबंधानें बंधन करून घेऊन नोकरी पत्करणाराची गोष्ट निराळी! घरीं शिकविण्याचा संबंध आपल्या खुषीचा व तबीयतीचा आहे म्हणून तसा निश्चय आहे. व तो आज २०।२५ वर्षें चालला आहे व पुढेंहि आमरण चालेल. दुसरे कोणतेहि व्यवसास सुटतील पण शिक्षकाचा व्यवसाय यावज्जीव सुटेलसें वाटत नाहीं." [ ग्रं. मा. वर्ष १२ अंक १० ]

शिक्षकाच्या पवित्र कर्तव्याविषयीं अण्णांची इतकी आस्था होती!

१९०५ मध्यें बनारस येथें अण्णांचे बालमित्र ना. गोखले यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरणार होतें. म्हणून राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग करण्यास त्यांना योग्य पुढारी अनायासें लाभला. तेथेंच त्याच वेळीं राष्ट्रीय शिक्षणाचा विचार करण्याकरतां प्रमुख पुढारी एकत्र जमण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें राष्ट्रीय शिक्षणाचे आपले विचार पं. मालवीय यांनीं सभेपुढें मांडले आणि काशीस हिंदु युनिव्हर्सिटी स्थापण्याचा विचारहि मुक्रर झाला आहे असें जाहीर केलें आणि सर्व प्रांतांनीं या युनिव्हर्सिटींत काम करण्याला तज्ज्ञ विद्वानांची योजना करावी असें सुचविलें. तेव्हां ३ वर्षें काम करण्याला प्रो. वि. गो. विजापूरकर व प्रो. भानू यांचीं नांवें महाराष्ट्रातर्फे सुचविण्यांत आलीं. या वेळीं साताराचे सुप्रसिद्ध पुढारी दादासाहेब करंदीकर यांनीं प्रो. विजापूरकरांचा ३ वर्षांचा खर्च देण्याचें कबूल केलें होतें. परंतु पुढें पं० मालवीयजींच्या विश्वविद्यालयाला सरकारी मदतीचा संपर्क पोहोंचणार असें कळून आल्यावरून महाराष्ट्रांत स्वतंत्र प्रयत्न करावा असें ठरलें त्यामुळें प्रो. विजापूरकर यांनीं पं. मालवीयांच्या बनारस हिंदु विश्वविद्यालयांत काम करण्याचा पूर्वी ठरविलेला बेत बदलला.

नंतर इ. स. १९०६ मध्यें अण्णांची स्वतंत्र शिक्षणसंस्था काढण्याची कल्पना खरी ठरली. लागलीच नवीन शाळा काढण्याचा विचार मुक्रर केल्यावर तारीख २५ एप्रिल १९०६ च्या 'समर्थांत' पुढील प्रमाणें जाहिरांत देण्यांत आली.

श्री.

"नवीन निघणाऱ्या भारतीय विश्वविद्यालयाच्या (Hindu University) धोरणावर शिक्षणक्रम ठेऊन येथें शुक्रवार तारीख १ जून १९०६ पासून **समर्थ विद्यालय** या नांवाची शाळा स्थापन करणार आहोंत. त्यासंबंधीं विशेष हकीगत चिटणिसाकडे मिळेल.

कोल्हापूर } विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.
९–५–१९०६ }

या जाहिरातीवर डॉ. आत्माराम गोपाळ परांडेकर L. M. & S. रा. सखाराम रामचंद्र भागवत B. Sc. व रा. राजाराम दामोदर देसाई बी. ए. चिटणीस, अशा तीन सह्या होत्या. 'समर्थाच्या' याच अंकांत "**आतां पुढची पायरी**" म्हणून यासंबंधीं अण्णांनीं अग्रलेखहि लिहिला होता. मध्यंतरी सदर लेखावर लोकांमध्यें बरीच चर्चा झाली व नवीन होऊं घातलेल्या शाळेवर लोकांनीं आक्षेप घेण्यास सुरवात केली. तेव्हां पुनः आक्षेपकांचीं तोंडें बंद करण्यासाठीं ता. ३ मे ला दुसरा अग्रलेख अण्णांनीं स्वतः लिहिला. पुढें इंडियन रेव्हियू (जून १९०६) मध्यें यासंबंधीं इंग्रजी लेख प्रसिद्ध झाल्यावर ग्रंथमालेंतहि याच महिन्यांत अण्णांचा "समर्थ विद्यालय" या नांवाचा विस्तृत निबंध प्रसिद्ध झाला. सदर निबंधांत राष्ट्रीय शिक्षणाच्या परिस्थितीचें मार्मिक वर्णन व समर्थ विद्यालयाची यथार्थ रूपरेषा जी एकदा अण्णांनीं रेखाटली ती अगदीं निश्चित स्वरूपाची होती. त्यांच्या मतांत पुढें २० वर्षांत कधींहि फरक पडला नाहीं. अशा रितीनें समर्थ विद्यालयाची स्थापना कोल्हापूर संस्था-

---

१ "समर्थ विद्यालय" हा निबंध प्रथम ग्रंथमालेंत प्रसिद्ध झाला. नंतर पुनः हा निबंध स्वतंत्र प्रसिद्ध करण्यांत आला. नवीन श्रीसमर्थ विद्यालय, (तळेगांव दाभाडे पुणें), येथें सदर पुस्तक दोन आण्यास मिळतें.

नांत झाल्यानें लो० टिळकप्रभृति मंडळींना त्या संस्थेस प्रत्यक्ष साहाय्य करणें कठीण पडूं लागलें. यामुळें ही संस्था संस्थानाबाहेर ब्रिटिश हद्दींत आणावी असा अनेक मंडळींचा आग्रह होता. तथापि प्रो. विजापूरकर यांचा कोल्हापूर संस्थानाविषयीं अभिमान कायम असल्यानें त्यानीं स्थलांतर करण्याचें नाकारलें. परंतु पुढें लोक-प्रतिनिधि-सभेच्या[1] बैठकीमुळें प्रो. विजापुरकरांना दरबाराकडून बराच त्रास पोहोंचूं लागला. त्यामुळें विजापुरकरांना पुढें कोल्हापूर सोडणें भाग पडलें.

---

१ संस्थानी राज्यकारभारांतला एकतंत्री, जुलुमी प्रकार बंद होऊन संस्थानांत नियंत्रित राज्यपद्धति सुरू व्हावी, असा हेतु लोक-प्रतिनिधि-सभेचा होता. लोक-प्रतिनिधि सभेची पाहिली बैठक यशस्वी करण्यांत प्रो. विजापूरकर यांचेच प्रयत्न विशेष कारणीभूत झाले होते असें समजतें. या वेळीं प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल केलें होतें. पण त्यांच्या घरीं जाऊन स्वतः श्रीछत्रपती महाराजांनीं भीड खर्चिल्यामुळें, प्रो. मोडक यांना सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें धाडस करवेना. तेव्हां प्रो. विजापूरकर यांच्या आग्रहावरून डॉ. वामन बाजी रुईकर ( स्वामी लवणानंद ) यांनीं अध्यक्षपद स्वीकारलें आणि परिषद सुव्यवस्थितपणें पार पडली, परंतु ही लोक-प्रतिनिधि सभेची बैठक पुढें बऱ्यांच जणांस भोंवली. या सभेंत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या मंडळींत श्री. स. खं. आळतेकर, रा. रामभाऊ गोखले वगैरे वकील होते. त्यांनाहि पुढें कांहीं दिवस कोल्हापूर सोडावें लागलें. प्रो. विजापूरकर यांजविरुद्ध कांहीं तरी खुसपट काढून त्यांच्याविरुद्ध जामीन घेण्याचा डांव कोल्हापूर दरबारतर्फें सुरू झाला होता; व त्याप्रमाणें त्यांच्यावर समन्सही निघालें होतें. परंतु प्रो. विजापूरकर मॅजिस्ट्रेट कोर्टांत स्वतःच हजर राहिले. या वेळीं विजापूरकर लोकांच्या चांगल्या परिचयाचे झाले होते. त्यांच्यासारखा सरळ, उत्साही आणि बुद्धिवान गृहस्थ कोल्हापुरांत विरळा होता. त्यांच्यावर समन्स निघालें, एवढ्यानेंच कोल्हापुरांत एकदम खळबळ उडाली. सरते शेवटीं परिस्थिति नाजूक आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन डिस्ट्रिक्ट मॅजिस्टेट रा. ( माजी शिक्षणमंत्री ) भास्करराव जाधव यांनीं सदर प्रकरण विशेष जास्त चिघळूं न देतां मिटतें घेतलें. असो.

नंतर जून १९०६ च्या पहिल्या तारखेस समर्थविद्यालयाची कोल्हापुरास स्थापना झाली. सुरवातीस विद्यालयांत प्रथम अवघे १८ विद्यार्थी होते. पुढें सहा महिन्यांतच विद्यार्थ्यांची संख्या ७५ पर्यंत वाढली. पुढें रा. ज. स. करंदीकर बी. ए. एल्एल्. बी., प्रो. वामन मल्हार जोशी एम्. ए. प्रभृति नवीन होतकरू शिक्षकांची भर पडून संस्थेस चिरस्थायी स्वरूप येऊं लागलें. त्यानंतर एक पेनशनर गृहस्थ नरहर बाळकृष्ण जोशी हेहि संस्थेला येऊन मिळाले. अशा रितीनें नवीन शिक्षकांची भरती झाल्यानें समर्थ विद्यालयाचा उत्कर्ष झपाट्यानें होऊं लागला. तात्यासाहेब करंदीकर, वामनराव जोशी आणि राजारामपंत देसाई यांच्यासारखी कार्यक्षम मंडळी सहकारी म्हणून लाभल्यानें गु. अण्णासाहेबांना आपल्या संस्थेला द्रव्य साहाय्य मिळविण्याकरितां, व्याख्यानाचे दौरे काढण्यास बरींच फुरसत मिळूं लागली. या वेळचा गुरुवर्यांचा उत्साह आणि धडाडी अगदीं तरुणांना लाजविणारी अशी होती.

संस्थेची भरभराट सुरळीतपणें चालू झाली. पुढें १९०७ च्या श्रावण महिन्यांत भर पावसाळ्यांत कोल्हापुरास प्लेग सुरू झाला त्यामुळें चालकांना समर्थ विद्यालय मिरजेस कृष्णाकांठीं एका प्रशस्त वाड्यांत न्यावें लागलें.

अशा रितीनें कोल्हापुरास समर्थ विद्यालयाची शुभ मुहूर्तमेढ रोवल्यावर लवकरच महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ करण्याकरितां समर्थ विद्यालयाच्या चालकांनीं 'महाराष्ट्र-विद्या-प्रसारक-मंडळ' स्थापन केलें. संस्था-

---

**रा. न. बा. जोशी,** बी. ए., एलएल. बी.:— हे मूळचे देवरूख (रत्नागिरी) येथील रहाणारे. महिला विद्यापीठाचे संस्थापक प्रो. अण्णासाहेब कर्वे यांचे हे सहाध्यायी होत. हे राजकोटला बरींच वर्षे नोकरींत होते. पुढें पेन्शन घेऊन ते १९०७ मध्यें गु. अण्णासाहेब विजापुरकरांच्या समर्थ विद्यालयास येऊन मिळाले. यांचा मराठीवरचा व्यासंग चांगला आहे. 'राल्फ व्हाल्डो ट्राइन' या ग्रंथकाराचें In Tune with the Infinite या पुस्तकाचें मराठी भाषांतर 'अनंताशीं साधर्म्य' या नांवानें त्यांनीं केलें तें ग्रंथमालेंत प्रसिध्द झालें आहे. प्रो. अण्णासाहेब कर्वे यांच्या पत्नी सौ. आनंदीबाई कर्वे व सुप्रसिध्द समाजसेविका श्रीमती पार्वतीबाई आठवले या त्यांच्या भगिनीच होत.

पक मंडळींत लोकमान्य टिळक डॉ. नानासाहेब देशमुख, दाजी आबाजी खरे, रा. ब. चिंतामणराव वैद्य आणि प्रो. विजापूरकर अशीं पांच नांवें होतीं. ही संस्था कोल्हापूर संस्थानच्या हद्दींत असल्यामुळें मंडळाच्या कार्यास विशेष जोर नव्हता. त्यांतूनहि दिवसेंदिवस कोल्हापुरचें वातावरण बिघडत चाललें होतें. त्यामुळें तेथें राहून मंडळाचें कार्य करणें सर्वांना जड जाऊं लागलें. तेव्हां सर्वानुमतें कोल्हापूर संस्थान सोडून ब्रिटिश मुलुखांत मंडळाचें कार्य करावें असें ठरलें.

या वेळीं कोल्हापुरचेच एक गृहस्थ रा. आपटे यांनीं तळेगांव स्टेशन-जवळची आपली ६४ एकर जमीन संस्थेस ६००० रुपयांस खरेदी देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें कागदपत्र होऊन १९०७ च्या नोव्हेंबरांत म्हणजे दिपवाळीच्या सुट्टीनंतर समर्थ विद्यालय आपल्या स्वतःच्या जागेंत आलें. येथें विद्यार्थ्यांची संस्थाहि वाढूं लागली व लवकरच ती १०० वर गेली. पुढें कांहीं पत्र्याच्या झोंपड्या उभारून विद्यार्थ्यांची राहण्याची सोय करण्यांत आली. आणि पुढें क्रमाक्रमानें पक्क्या इमारती तयार करण्यांत आल्या. तळेगांवास आल्यावर तेथेंच एका कोपऱ्यांतच सुप्रसिद्ध पैसाफंड कारखा-न्याची स्थापना करण्यांत आली. पैसाफंडाच्या निमित्तानें लो. टिळक यांचीहि विद्यालयास वरचेवर भेट होऊं लागली.

येथपर्यंत विद्यालयाचा थोडासा जम बसल्यावर संस्थेकरितां फंड जम-विणें व त्याकरितां महाराष्ट्रांत दौरा काढणें हीं कामें ओघाओघानें मंड-ळीच्या पुढें आलीं. नंतर सोलापूर, बार्शी, कल्याण वगैरे ठिकाणीं टिळक, विजापूरकर नानासाहेब वैद्य व डॉ. देशमुख या सर्वांनीं व्याख्यानांचा दौरा काढला. त्या वेळचीं स्फूर्तिदायक व्याख्यानें अद्यापि पुष्कळांच्या स्मृतींत असतीलच. सदर दौऱ्यास लोकमान्यांचें पाठबळ असल्यामुळें लोकांचा उत्साह द्विगुणित झाला होता; आणि राष्ट्रीय शिक्षणाविषयीं लोकांच्या आकांक्षा वाढूं लागल्या होत्या. जिकडे तिकडे टिळक-विजापुरकरांचीं भाषणें ऐकण्यासाठीं लोकांची गर्दी लोटत होती. या वेळीं राष्ट्रीय शिक्ष-णाच्या कार्यासाठीं पैसाहि भरपूर येऊं लागला. पण याच वेळीं बंगाल्यांत बॉंब गोळ्याचा स्फोट झाल्यामुळें त्याचा जोराचा धक्का महाराष्ट्रासहि बस-ल्यावाचून राहिला नाहीं.

एकदम कलकत्याचें बांबगोळा—प्रकरण चोहोंकडे पेटलें ! क्षणार्धात त्याच्या ज्वाला महाराष्ट्रांतहि भडकल्या. सरकारला या वेळीं कांहीं सुचेनासें झालें ! चोहोंकडे 'राजद्रोह राजद्रोह' अशी एकच हाकाटी माजून राहिली ! आणि सरकारच्या संशय-पिशाच्यांनीं सर्व हिंदुस्थानभर थैमान करून अगदीं निरुपद्रवी लोकांना केवळ संशयामुळें गांजिलें असें म्हणतात. त्यावेळीं ब्रिटिश सरकारनें प्रेस ॲक्ट, १८१८ चा कायदा वगैरे जुनीं नवीं सर्व गंजलेलीं हत्यारें बाहेर काढलीं व केसरी, मराठा, भाला, राष्ट्रमत वगैरे सारख्या राष्ट्रीय पक्षाच्या वर्तमानपत्रांची मुसकटदाबी केली. असो; केसरीवर खटला होऊन लोकमान्य तुरुंगांत गेले, तेव्हां राजकीय वातावरण थोडें शांत झालें व सरकारला थोडें बरें वाटलें. तरी राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ करण्यासाठीं हातीं कंकण बांधून निघालेले प्रो. विजापूरकर मोकळे राहतात ही गोष्ट त्या वेळच्या अधिकाऱ्यांना मात्र बरी वाटली नाहीं असें दिसलें. लागलींच "**विश्ववृत्तांत**" श्री. दा. सातवळेकर यांचा "वैदिक प्रार्थनांची तेजस्विता" हा लेख या सुमारास आला आणि त्याच अंकांत शेवटीं बॉंबगोळ्यासंबंधीं एक स्फुट गु. अण्णासाहेबांनीं लिहिलें होतें. याचा फायदा घेऊन कोल्हापुरकरांनीं प्रो. विजापूरकर व त्यांचे सहकारी प्रो. वामनराव जोशी यांच्यावर खटला भरला. यानंतर पुढें काय प्रकार झाले तें पुढच्या एका प्रकरणांवरून वाचकांना कळून येईल. गु. विजापूरकर यांचें शिक्षणकार्य पुढें अव्याहत चालू होतें ही गोष्ट मात्र केव्हांहि विसरतां यावयाची नाहीं.

अशा रीतीनें समर्थ विद्यालय स्थापन करून आपली संस्था महाराष्ट्रांत आदर्शभूत अशी करण्यासाठीं गुरुवर्य तळेगांवीं आले आणि प्राथमिक शिक्षणाचें कार्य त्यांनीं सुरू केलें. मात्र बालशिक्षण देतांना ग्रंथमालेच्या द्वारें लोकशिक्षण देण्याचें कार्यहि त्यांनीं आणखी एक मासिक विश्ववृत्त काढून चालू ठेविलें होतें. बालशिक्षण आणि लोकशिक्षण चालू असतां त्यांच्यावर जीं अनेक संकटें कोसळलीं तीं त्यांनीं अत्यंत धिम्मेपणानें सहन केलीं. शिक्षणकार्यीं सर्वस्व अर्पण करावयाचें असा त्यांचा निश्चय प्रथमपासून अगदीं ठरूनच गेला होता असें म्हटलें तरी चालेल. राष्ट्रीय शिक्षणासाठीं तनमनधन अर्पून कार्याशीं एकरूप व एकनिष्ठ होणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीस महाराष्ट्र मदत करण्यास तयार आहे हें गु. अण्णासाहेबांनीं स्वतः सिद्ध करून दाखविलें.

---

## प्रकरण नववें

# शिक्षण-संस्था कीं बेकायदेशीर जमाव

ज्याप्रमाणें महाराष्ट्रांतील इतर चळवळीशीं लोकमान्य टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांचा संबंध होता त्याप्रमाणें राष्ट्रीय शिक्षणास लोकमान्यांची सहानुभूति होती; इतकेंच नव्हे तर त्यांचें साह्यहि होतें. अशा रीतीची अनुकुल परिस्थिति प्राप्त होतांच अण्णांनीं राष्ट्रीय शिक्षणास स्वतःस वाहून घेतलें. व सर्वतोपरी आपल्या विद्यालयासाठीं आपलें–लेखन आणि ग्रंथ-प्रकाशनादि कार्येंहि बाजूला ठेविलीं, याबद्दलची माहिती मागील प्रकरणांत आली आहेच.

१९०८–९–१० हीं तीन वर्षें सर्व हिंदुस्थानच्या इतिहासांत अत्यंत खळबळीचीं अशीं समजलीं पाहिजेत. या वेळीं चोहींकडे स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य अशी चतुःसूत्री देशांतील प्रत्येक मनुष्याच्या तोंडीं होती. व यांतूनच राष्ट्रीय शिक्षणाची लाट वर उसळली.

सर्व देशांत राष्ट्रीय शिक्षणासाठीं जोराची चळवळ झाली. पुढें या चळवळींतूनच महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचें जें पहिलें पीठ " समर्थ विद्यालय " तें अण्णांच्या खटपटीनें अस्तित्वांत आलें.

पण पुढें लोकमान्यांवर खटला झाल्यावर एकंदर वातावरण अत्यंत प्रक्षुब्ध होऊन राष्ट्रीय चळवळीचा नायनाट करण्याचें सरकारनें ठरविलें आणि बंगालमध्यें झालेल्या बॉंबच्या खटल्यांचा व नाशिकच्या जॅकसनच्या खुनाचा दुरान्वित संबंध कोणत्यांना कोणत्या तरी उपायानें तात्कालिक चळवळीशीं लावून त्या चळवळी दडवून टाकण्याच्या प्रयत्न सरकारनें चालविला होता. समर्थ विद्यालय बुडविण्याचा सरकारचा डाव अशांपैकींच एक होता हें पुढें वाचकांच्या लक्षांत येईलच !

१९०७ मध्यें मिरजेहून समर्थ विद्यालयाचें ठाणें तळेगांवाजवळच्या माळावर आलें. या वेळीं विद्यालयांत मुलें बरींच जमलीं होतीं. परंतु त्यांना राहण्यासाठीं तट्ट्याच्या झोपड्या शेवटीं बांधलेल्या होत्या. कांहीं इमारती बांधणें अत्यंत जरूरीचें होतें; परंतु पैशाची फार अडचण होती. म्हणून अण्णांनीं प्रचार करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें महाराष्ट्र विद्याप्रसारक मंड-

ळाच्या प्रमुख सभासदांचा दौरा काढावा, म्हणजे पुष्कळ मदत मिळेल असें चित्रशाळेचे व्यवस्थापक वासुकाका[1] जोशी यांचेपाशीं त्यांनीं सुचविलें. त्याप्रमाणें सर्व कार्यक्रम ठरवून लोकमान्य प्रभृति मंडळी दासनवमीस सोलापुरास गेली. त्या वेळच्या लोकांचा उत्साह फारच अवर्णनीय होता. या वेळचा तो समारंभ, लोकांचा आदर आणि त्या वेळीं झालेलीं लोकमान्यांचीं एकापेक्षां एक अशीं मुद्देसूद व आवेशाचीं व्याख्यानें वगैरे गोष्टींनीं सर्वांना समाधान वाटलें. या वेळीं सोलापुरकरांनीं १५।१६ हजार रुपयांचीं आश्वासनें दिलीं. राष्ट्रीय शिक्षणाविषयींचा लोकांचा उत्साह सरकारला मात्र पसंत पडला नाहीं. त्या वेळीं सरकारास भिणाऱ्या एका माणसानें म्हटलें. " कां हो ! इतक्या स्वातंत्र्याच्या बाण्यानें काढलेली ही तुमची शाळा सरकारनें बुडविली तर ? तेव्हां असला प्रयत्नच न करावा, हें बरें ! " त्या प्रश्नाचें उत्तर सायंकाळीं लोकमान्यांनीं बरोबर दिलें. ते म्हणाले ' आपण हातपाय गाळून बसणारे नीच नाहीं एवढें तरी सिद्ध केलें आहे. पुढचे सर्व प्रकार परमेश्वराधीन आहेत. पण " आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः " हें वचन खरें करण्याच्या बुद्धीनें तुम्हां सर्वांवर भार टाकण्यासाठीं आम्ही ही भिक्षेची झोळी पुढें ठेवीत आहों " असें लोकमान्यांनीं दुसऱ्या दिवशीं जाहीर भाषणांत सांगितलें. पुढें सरकारनें करावयाचें तें केलें. परंतु गु. विजापुरकरांच्या आणि त्यांच्या मित्रांच्या पुण्याईनें व श्रीसमर्थांच्या कृपेनें त्यांचें त्या वेळचें भाषण खऱ्या आत्मविश्वासाचें आणि तत्त्वनिष्ठेचें होतें हें त्यांच्या कृतीवरून पुढें सिद्ध झालें.

अशा रीतीनें समर्थ विद्यालयासंबंधीं सरकारचें धोरण प्रथमपासूनच अत्यंत संशयी होतें. त्यांतच विद्यालयाचे चिटणीस रा. बापू देसाई यांच्या-

---

१ **वासुकाका जोशी:**—चित्रशाळेचे सध्याचे वयोवृध्द मालक आणि चालक श्री. वासुदेवराव जोशी यांचा व गुरुवर्यांचा फारच लोभ होता. गुरुवर्यांना त्यांनीं अनेक कामांत मदत केली. कोल्हापुरचे रा. आपटे यांची तळेगांव स्टेशनजवळची जागा समर्थ विद्यालयाला मिळवून देण्याच्या कामीं त्यांनीं पुढाकार घेतला होता. पुढें विश्ववृत्ताकरितां त्यांनींच फार गळ घालून लोकमान्य टिळकांकडून ' आशेची निराशा व निराशेची आशा ' हा लेख लिहवून घेऊन अण्णासाहेबांना दिला. त्यांची सल्लामसलत गुरुवर्य नेहमीं घेत.

वर झालेल्या खटल्यांत मॅजिस्ट्रेट साहेबांनीं समर्थ विद्यालयाच्या व कांच-शाळेच्या चालकांच्या सद्धेतूबद्दल पुढील प्रमाणें संशय व्यक्त केला, ते म्हणतातः—

" Strangely enough this activity takes the form of a glass factory and match factory.......... "

" यांच्या देशाभिमानाला व्यक्त स्वरूप आगकाड्या व कांचकारखाने काढण्यांत मिळतें हें आश्चर्य होय!" वरील उताऱ्यांत मॅ० साहेबांनीं ध्वनित केलें कीं, आगकाड्यांचे कारखाने आगी लावण्याकरितां, व कांच कारखाने बॉंब तयार करण्याकरितां असावेत. वास्तविक तळेगांवांत अगर जवळपास समर्थ विद्यालयांतील मंडळीचा संबंध होता असा एकहि आगकाड्यांचा कारखाना नव्हता. तसेंच तळेगांवचा लहानसा कांच कारखाना अगदीं सोंवळा असा होता. सर्व अधिकाऱ्यांनीं या कारखान्याबद्दल जें धोरण ठेविलें होतें, त्या-वरून हीच गोष्ट स्पष्ट होतें बापू देसाई यांचा वरील काल्पनिक व खऱ्या कार-खान्याशीं संबंध जो सरकारनें लावला तो वृथा संशयजन्य व पूर्वग्रहदूषित होता असें म्हणतात तेंच खरें असावें.

समर्थ विद्यालयांतील मुलें ड्रील शिकत, २०।२५ मैलांच्या दौडा मारीत, ' वंदेमातरम् ' 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ?' वगैरे सारखीं राष्ट्रभावना उद्दीपित करणारीं गीतें म्हणत, व नाना प्रकारचे इतर शारीरिक खेळ खेळत; तसेंच यात्रादिक प्रसंगीं देहूस स्वयंसेवकांचें कामही करीत. यावरून ही संस्था बेकायदेशीर कशी ठरली हें एक आश्चर्य आहे ! इतर कित्येक नियम सरकारी शाळांतील मुलांचा अत्याचाराशीं प्रत्यक्ष संबंध सिद्ध आलेला असतांना समर्थ विद्यालयावर या वेळीं इतकी करडी नजर सरकारनें कां ठेवावी हें एक गूढ आहे. मग हीं हायस्कुलें चालविणारीं मंडळें बेकाय-देशीर कां ठरविलीं गेलीं नाहींत ? " असा प्रश्न पुढ येतो. त्या वेळचें तें प्रक्षुब्ध वातावरण, 'नाशिक केस'मुळें चिडून गेलेलें सरकार, आणि त्यांत संशय—पिशाचिकेचा थैमान ! मग काय ? अशा ऐन गडबडीच्या काळांत समर्थ विद्यालयावर सरकारनें गदा घातली ! ! मग त्याबद्दल आतां सर-कारला अगर दुसऱ्या कोणालाही दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ती वेळच तशी होती !!

१९०८ मध्यें रा. बापू देसाई यांच्यावर ज्या वेळीं खटला झाला त्या वेळीं अण्णा कोल्हापूर दरबारच्या तुरुंगांत होते. कोल्हापूर सरकारचें वॉरंट

आल्यावर ते जेव्हां तिकडे निघाले तेव्हां महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळाचे चिटणीस या नात्यानें त्यांनीं सर्व व्यवस्था रा. ज. वि. उर्फ नाना ओक यांचेकडे सोपविली होती. समर्थ विद्यालयांत जप्ती आल्यावर अण्णांच्या 'अगदी खाजगी डायऱ्या' पोलीसांच्या हातास लागल्या. परंतु इतका गवगवा करण्यासारखें त्यांत कांहींच नव्हतें. पुढें शिक्षा झाल्यावर, सरकारच्या मनांतून किंतु काढून टाका, असें अण्णांनीं ओकांना लिहीलें तेव्हां मोठ्या प्रयत्नानें ओकांनीं गव्हर्नर साहेबांची मुलाखत घेतली. ती फारच मनोरंजक म्हणून मुद्दाम पुढें दिली आहे.

## लार्ड सिडेनहॅम यांची मुलाखत.

[ गुरुवर्यांच्या सांगण्यावरून कै० ज. वि. ऊर्फ नानासाहेब ओक ह्यांनीं समर्थ विद्यालयाच्या बाबतींत गव्हर्नरसाहेबांची मुलाखत घेतली ती थोडी फार बदल करून खालीं दिली आहे. ह्या मुलाखतीचा उपयोग पुढें झाला नाहीं; परंतु दोघांमध्यें झालेला संवाद बराच बोधप्रद आहे. ]

प्र०:—शाळेंत आक्षेपार्ह कांहीं शिकविलें जात नाहीं असें आश्वासन तुम्हीं सरकारला दिलें पण सरकारच्या विरुद्ध म्हणून जेव्हां हीं विद्यालयें निघतात तेव्हां सरकारला संशय घेण्यास जागा नाहीं कां? तसें आक्षेपार्ह कांहीं शिकविलें जात नाहीं असें तुमचें मत आहे कां?

उ०:—होय.

प्र०:—जन्मभर सरकारशीं वैरभाव ठेवणारे विद्यार्थी येथून बाहेर पडावेत असा आपला हेतु आहे असें म्हणतात तें खरें कां?

उ०:—नाहीं. तें खरें नाहीं. आमचे हेतु या मराठी हस्तपत्रकांत स्पष्ट लिहिले आहेत. इतर शाळांत दिसणाऱ्या दोषांपासून अलिप्त अशी ही नमुनेदार संस्था असावी असें आह्मांस वाटतें हेंच खरें आहे.

प्र०:—सरकारी आंखीव पद्धतीला चिकटून तुम्हांला कांहीं सुधारणा करतां येणार नाहींत कां?

उ०:—आमच्या मताप्रमाणें सुधारणा करितां येत नाहींत. विद्यार्थ्यांचें शीलहि आम्हांस बनवावयाचें आहे. त्यासाठीं वसतिगृहांत विद्यार्थ्यांनीं शिक्षकांच्या देखरेखीखालीं कायम राहिलें पाहिजे, असा आमचा नियम आहे.

प्र०:—वा ! फार चांगलें, सर्व शिक्षक वसतिगृहांतच राहतात कां ?

उ०:—सध्यां एकच शिक्षक वसतिगृहांत राहतात. अद्यापि आम्हांस शिक्षकांसाठीं निराळी इमारत बांधावयाची आहे.

प्र०:—शिक्षणक्रमासंबंधानें तुमचे हेतु काय आहेत ?

उ०:—मातृभाषेंतून सर्व शिक्षण देणें हा आमचा प्रधान हेतु आहे.

प्र०:—तुमचा हेतु चांगला आहे, मलाहि मान्य आहे. याबद्दल डे. ए. सोसायटीच्या चिटणीसांचे बरोबर माझें बोलणें झालें होतें. हा प्रयोग मी पहात आहें व तो बऱ्याच अंशीं सफल झाला आहे; परंतु एका शिक्षकानें मला सांगितलें कीं, पालक मात्र या पद्धतीच्या विरुद्ध आहेत. तुम्हीं इंग्रजी शिकवितां कीं नाहीं ?

उ०:—होय इंग्रजी आवश्यकच आहे. परंतु सर्व विषय आम्हीं मराठींतून शिकवितों.

प्र०:—तुम्ही संस्कृत शिकवितां ?

उ०:—होय. हितोपदेश, रामायण, भारत, वगैरे पुस्तकें आम्ही अभ्यासक्रमांत नेमिलीं आहेत. व्याकरण मात्र कामापुरतें शिकविलें जातें.

प्र०:—तुमच्या संस्थेंत धार्मिक शिक्षण दिलें जातें कां ?

उ०:—होय ! धार्मिक शिक्षण हा तर आमचा प्रधान हेतु आहे.

प्र०:—संस्थेचा मासिक खर्च तुह्मांस किती येतो ?

उ०:—प्रत्येक विद्यार्थ्यास वसतिगृहांत राहण्याचा सुमारें १० रुपये येतो.

प्र०:—पण फी मात्र फारच कमी दिसते. तुम्हांला वर्गणीवरच अवलंबून राहावें लागत असेल ?

उ०:—होय !

प्र०:—तुम्हीं टिळकांच्या नांवें पैसा गोळा करतां असें म्हणतात तें खरें आहे कां ?

उ०:—नाहीं ! आम्ही शाळेच्या नांवानें गोळा करतों.

प्र०:—पैसाफंडांतील पैसा तुमच्या शाळेवर खर्च होतो असें म्हणतात.

उ०:—नाहीं. त्याचा उपयोग सर्वस्वी कांचकारखान्याकरितां होतो.

प्र०:—पैसाफंडापैकीं थोडाहि पैसा तुमच्या शाळेस मिळत नाहीं ? सर्व पैसा त्यांचेकडे जमा होतो कां ?

उ०:—होय. तो फंड अगदीं स्वतंत्र आहे. त्याबद्दल वर्तमानपत्रांतून पोंचहि दिली जाते.

प्र०:—त्याची व्यवस्था कोण पाहतात ?

उ०:—त्यासाठीं एक स्वतंत्र निराळी कमिटी आहे.

प्र०:—ती अगदीं स्वतंत्र आहे कां ?

उ०:—होय. २।३ सभासद मात्र विद्यालयाच्या व कांचकारखान्याच्या कमेटींत काम करितात.

प्र०:—कोणत्या विशिष्ट वर्गाकडून तुम्हांला मदत मिळते ?

उ०:—सर्व वर्गाकडून मिळते.

प्र०:—सर्व महाराष्ट्रांतून तुह्मांस पैसे मिळतात ?

उ.:—होय.

प्र०:—कांचशाळेंतील विद्यार्थी तुमच्याकडे शिक्षणासाठीं येतात कां ?

उ०:—नाहीं. उलट आमचे विद्यार्थीच तिकडे शिकण्यास जातात.

प्र०:—ती अगदीं स्वतंत्र संस्था आहे ना ?

उ०:—होय. संस्थेला जागा मात्र आह्मी दिली आहे.............

प्र०:—तुमची शाळा केव्हां स्थापन झाली ?

उ०:—जून १९०६ मध्यें.

प्र०:—शिकविण्याची तुमची विशिष्ट पद्धति कोणती ?

उ०:—मातृभाषेंतून इंग्रजीशिवाय सर्व विषय आह्मीं शिकवितों. इंग्रजी मात्र इंग्रजींतूनच शिकवितों. नंतर २।३।४ इयत्तांकरितां “ रीडर्स ” वापरतों.

प्र०:—कोणतीं “ रीडर्स ”?

उ०:—अमेरिकेंतील “ ब्रूक सेरीज ”

प्र०:—तुम्ही स्वतः पुस्तकें लिहितां कां ?

उ०:—नाहीं. लवकरच आह्मी पुढें स्वतंत्र पुस्तकें तयार करविणार आहोंत.............

**प्र०:—वर्तमानपत्रांतील आक्षेपार्ह भाग विद्यार्थ्यांनीं वाचावेत व तसें शिक्षण मनांत बिंबवावें, असें शिक्षण तुमचें शिक्षक विद्यार्थ्यांना देतात ?**

उ०:—नाहीं. हें खरें नाहीं. सध्यां कांहीं वर्तमानपत्रें आह्मी वर्गणी भरून घेतों. परंतु कोणत्याहि प्रकारें वर्तमानपत्रांतील लेख कधींहि वर्गांत वाचले जात नाहींत.

प्र०:—कांहीं शिक्षकांनीं वर्तमानपत्रांतील लेख वर्गांत वाचले असें समजतें. हें खरें कां ?

उ०:—चिकित्सक व समतोल बुद्धीनें लिहिलेले असे लेख वरिष्ठ वर्गांतील विद्यार्थ्यांना वांचून दाखविले जातात. या वर्गांचें इतिहासचें ज्ञान चांगलें असल्यामुळें राजकारणांतील कांहीं प्रमेयें त्यांना चांगलीं समजतात.

प्र०:—तुमच्या संस्थेंत १६ वर्षांच्या आंतील विद्यार्थ्यांनांहि राजकारणाचें शिक्षण दिलें जातें असें म्हणतात. ज्यांनीं नेहमीं सरकारच्या प्रत्येक कृत्यावर टीका करावी, किंबहुना टीका करणें हाच त्यांचा धंदा, त्यांचे लेख मुलांनीं वाचावेत हें सयुक्तिक आहे असें तुह्मांस वाटतें कां ? सरकारच्या कोणत्याहि चुकीच्या धोरणावर टीका करूं नये, असें मी म्हणत नाहीं. परंतु कायमचें सरकारच्या विरुद्ध धोरण ठेवतील अशीं मनुष्यें तयार करणें बरें नाहीं. अशा प्रयत्न करणाऱ्या लोकांची वर्तणूक अयोग्य आहे. त्याचा कायमचा बंदोबस्त केला पाहिजे. अशीं माणसें निरपराधी लोकांची दिशाभूल करितात व सरते शेवटीं निरपराधी लोक हाकनाक मरण पावतात. अशी प्रवृत्ति बरी आहे कां ?

उ०:—होय ! ही गोष्ट मला कबूल आहे, पण अशा खोल राजकारणाच्या प्रश्नांत आह्मी पडूं इच्छित नाहीं. आम्हांला इतर कामें पुरेशीं आहेत. कोणत्याहि वर्तमानपत्राला आम्हीं उत्तेजन देत नाहीं. या बाबतींत आम्ही फारच खबरदार आहोंत.

प्र०:—तुम्हीं विद्यार्थ्यांच्या मनांत कांहीं विपरीत भावना आणण्याचा प्रयत्न करीत नाहीं ?

उ०:—नाहीं; आमचा तो उद्देशच नाहीं. वर्तमानपत्रेंहि वाचण्यास विद्यार्थ्यांना वेळ मिळत नाहीं.

प्र०:—खरें पाहिलें तर राज्यक्रांति वगैरे गोष्टी घडवून आणण्याचा ज्यांचा हेतु आहे, अशा राजकारणी लोकांच्या संपर्कापासून तुम्ही अगदीं अलिप्त राहिले पाहिजे.

उ०:––होय; आम्ही कोणत्याहि विशिष्ट पक्षाचे नाहींत. आम्ही सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांचा उपयोग करून घेतों.

प्र०:—तुमच्या कार्यकारी मंडळांत कोणकोण सभासद आहेत?

उ०:—रा. टिळक, डॉ. देशमूख, प्रो. विजापूरकर.

प्र०:—रा. टिळक, व डॉ. देशमूख ही मंडळी तर अगदीं सरकारविरुद्ध नेहमीं असतात असा रिपोर्ट आहे. आतां हें कितपत खरें आहे याबद्दल संशय मात्र आहे?

उ०:––हें आम्हांला आपणांपेक्षां जास्त माहीत आहे. नंतर ग्वाल्हेरचे माजी वरिष्ठ न्यायाधीश रा. ब. चिं. वि. वैद्य व ऑ. मि. खरे.

प्र०:––आपण यांच्याशीं विचारविनिमय करतां कां?

उ०:––नाहीं! अभ्यासक्रम वगैरे आम्हीं स्वतःच ठरवितों. कांहीं कायदेशीर प्रश्न, पैसे गोळा करणें वगैरे संबंधांत आम्हीं **सर्वांबरोबर एकत्र विचार करतों.**

प्र०:—आपली शाळा कोणाच्या ताब्यांत असते?

उ०––नेहमीं मंडळाचे चिटणीस प्रो. विजापूरकर यांच्या ताब्यांत शाळा असते. त्यांनीं सध्यां मजकडे सर्व अधिकार दिले आहेत.

प्र०:––अगदीं सर्व अधिकार तुह्मांला दिले आहेत?

उ०:—होय.

प्र०:––तुम्ही जोंपर्यंत कांहीं आक्षेपार्ह शिकवीत नाहीं व जोंपर्यंत केवळ शिक्षणाचें ध्येय डोळयापुढें ठेवितां तोंपर्यंत तुमच्या मार्गांत आडवें येण्याचें आह्मांस कारण नाहीं.......तुम्ही एकदम सर्व स्वयंशासित होणार नाहीं हें खरें आहे, राजक्रांतिकारक चळवळे लोक उत्पन्न करण्याचें तुमचें ध्येय नाहीं हें कबूल आहे; परंतु तुमचे खरेखुरे हेतु काय आहेत? याबद्दल मोकळेपणानें बोलण्यास कांहीं हरकत नाहीं, त्याबद्दल तुम्हांला मुळींच त्रास होणार नाहीं.

उ०:––Extremist जहाल हा शब्द जरा वाईट अर्थानें वापरतात. आम्हीं सर्व शिक्षक राष्ट्रीय ( Nationalist ) आहोंत. आमच्या राष्ट्रीय भावना उत्कट आहेत. मात्र देशाची कांहीं तरी सेवा करावी अशी आमची खरी अंतःकरणापासूनची इच्छा आहे.

प्र०:—तें खरें आहे ! त्याबद्दल कोणीहि आक्षेप घेणार नाहीं.

उ०:—आमची राष्ट्रीय भावना उत्कट आहे. त्यासाठीं वाटेल तो स्वार्थ-त्याग आम्ही करूं. अगदीं थोड्या पगारावरहि सध्यां आम्हीं राहतों.

प्र०:—बरें आहे ! परंतु स्वतःची जबाबदारी नीट ओळखून नेहमीं वागत जा. प्रो. विजापुरकरांचेंच उदाहरण पहा ! त्यांनीं तो ( आक्षेपार्ह ) लेख पाहिला नाहीं परंतु कायदेशीर जबाबदार मात्र ते होते. सदरहू लेख धार्मिक स्वरूपाचा होता हें ह्मणणें खोटें आहे. जातींजातींत द्वेष पसर-विण्यास तो निःसंशय कारणीभूत झाला असला पाहिजे.

उ०:—असो ! आतां मला एकाच गोष्टीचा फक्त खुलासा करावयाचा आहे. आह्मीं गुप्तपणें संस्थेचा कारभार चालवितों, अशी सरकारची सम-जूत आहे, असें विजापूरकरांनीं सांगितलें, व सर्व खुलासा करून ती सम-जूत काढून टाकावी असें त्यांनीं सुचविलें. आमची संस्था सर्वांना पाह-ण्यास मोकळीक आहे. आमचें कार्य गुप्त चाललें आहे, असें समजण्याचें कारण नाहीं. आमचे हेतु तर जगजाहीर आहेत.

प्र०:—वा फार चांगलें ! मग संस्थेस भेट देण्यास सरकारी अधिका-ऱ्यांना काय हरकत आहे ?

उ०:—लहानसहान अधिकाऱ्यांनीं आमच्या संस्थेस भेट द्यावी व असें नको तसें नको, असें करा तसें करा, असें म्हणून आम्हांस शिकवावें, हें आम्हांस पसंत नाहीं. इन्स्पेक्टर व डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं संस्थेस अवश्य भेट द्यावी, त्यांस आमची मुळींच हरकत नाहीं.

प्र०:—संस्थेच्या कार्यदर्शिकेची ( Prospectus ) एक प्रत आहे कां ?

उ०:—ही एक मराठी प्रत आहे. फारच थोडे फेरफार यांत केले जातात.

आपण मला मुलाखत दिलीत याबद्दल मी फार आभारी आहें. असें म्हणून नानासाहेब ओकांनीं गव्हर्नर साहेबांची रजा घेतली.

परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, वरील मुलाखतीचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. ता. ३० नोव्हेंबर १९०९ रोजीं सरकारी शाळाखात्याकडून समर्थ विद्या-लयाच्या चालकांकडे हुकूम ( परि. पृ. १३ पहा. ) आला कीं, तुमच्या शाळें-तलि कोणीहि विद्यार्थी सरकारी शाळेंत घेतले जाणार नाहींत. या हुकुमासहि चालकांनीं दाद दिली नाहीं. विद्यालयांतील विद्यार्थीहि बाणेदार होते.

सरकारी शाळेंत प्रवेश मिळाला नाहीं तरी चालेल, पण आम्ही राष्ट्रीय शिक्षणच घेणार असा सर्वांनीं निश्चयच केला होता. त्यामुळें सरकारी हुकुमाचा उपयोग झाला नाहीं. पण एवढ्यावर सरकार थांबलें नाहीं. याकरतां मुद्दाम सिमल्याच्या सरकारी शस्त्रागारांतून समिति ॲक्टाचें ताजें शस्त्र (पा. १४) ता. १० जून १९१० रोजीं काढून त्याकरवीं समर्थ विद्यालय बेकायदेशीर संस्था ठरवून चालकांवर नोटिसा बजाविण्यांत आल्या. अशा रीतीनें ३।४ वर्षें चाललेलें समर्थ विद्यालय सिमल्याहून एका टाकाच्या फटकाऱ्यासरशी सरकारनें बंद पाडलें. उत्तम शिक्षण-संस्था म्हणून निघालेलें समर्थ विद्यालय पुढें बेकायदेशीर संस्था म्हणून ठरून बंद केलें जातें हा दैवाचा विचित्र खेळच समजला पाहिजे दुसरें काय ?



## प्रकरण दहावें

# अज्ञातवासांतील तीन वर्षें

" अगदीं काटकसरीनें व कमींत कमी गरजा ठेवून मनुष्यानें कसें वागावें हें पाहण्यासाठीं तुरुंगांतील कैद्यांची दिनचर्याच पहावी."

—गु० बिजापूरकर

"हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकाऽपि वा" सोनें शुद्ध आहे कीं अशुद्ध आहे हें तें अग्नींत घालून तावून सुलाखून निघाल्यानेंच समजणार आहे.' असें कविकुलगुरु कालिदास यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. अतिशय संकटें जरी अंगावर कोसळलीं तरी थोर पुरुषाचें चरित्र निर्मल आणि उज्वल असतें. उलट संकटांनीं आणि हाल—अपेष्टांनीं त्याचें लक्ष आपल्या कर्तव्याकडे जास्त लागतें असा त्यांचा अनुभव आहे. हीच गोष्ट गु० अण्णासाहेबांच्या बाबतींतहि लागूं होती.

१९०८।१९०९ हीं दोन वर्षें महाराष्ट्राच्या किंबहुना हिंदुस्तानच्या इतिहासांत अत्यंत क्रांतिकारक अशीं समजलीं जातात. या वेळीं लोकांच्या तोंडीं जिकडे तिकडे धरपकड, बॉंबप्रकरण, शिक्षा, खटले व जबान्या यांबद्दल चर्चा ऐकूं येत होती. लोकमान्य टिळक व प्रो. शिवरामपंत परांजपे यांच्यावरहि खटले होऊन ते तुरुंगाकडे रवानाहि झाले होते. पुढें अण्णांची पाळी आली. त्यांचेबरोबर विश्ववृत्ताचे सहसम्पादक प्रो. वामन मल्हार जोशी व मुद्रक विनायकराव जोशीराव यांच्यावरहि खटले झाले. तिघांवरील खटल्यांचा निकाल २१ जानेवारी १९०९ रोजीं होऊन अण्णांना तीन वर्षें साधी कैद, वामनरावांना ३ वर्षें सक्तमजुरी व विनायकराव जोशी यांस १।। वर्ष सक्तमजुरी, अशा जबर शिक्षा देण्यांत आल्या.

उपरिनिर्दिष्ट तीन व्यक्तींवर " खुनास मदत " करण्याचा आरोप ठेविला होता. ही बातमी तळेगांवीं प्रथम वर्तमानपत्रद्वारें कळली. प्रथम सर्वच मंडळी घाबरली. त्या वेळची ती गडबडीची वेळ, चोहोंकडे धरपकड

चाललेली, सर्व बाजूंनीं वातावरण अस्थिर व संशयी वृत्तीनें भरलेलें! अशा स्थितींत राईचा पर्वत करून कोण कशी घोरपड अंगावर आणील याचा अगदीं नियम नव्हता. प्रथम सर्वांना भीति वाटली. पण पुढें सर्वांनाच हसूं आलें. आम्ही शिक्षणव्यवसायी लोक, एका बाजूला लहान मुलांत बसून शिक्षणाचें पवित्र काम करणारे अगदीं निरुपद्रवी, त्यांना राजकारणांत पडून काय करायचें आहे? आम्हीं खुनास मदत कशी करणार? असे अनेक विचार प्रत्येकापुढें सारखे येत होते. कोणास कशाचाहि उलगडा पडेना. पण या वेळीं भासणारी स्वप्नसृष्टी खरी होण्याचीं चिन्हें दिसलीं. देवाची विचित्र लीला आहे. काय होईल तें पहावें आणि निमुटपणें सहन करावें असा विचार करून कोल्हापुरास जाण्याचें गुरुवर्यांनीं ठरविलें.

राजाराम कॉलेजांत पंधरा वर्षे घालविल्यामुळें गुरुवर्यांचे अनेक मित्र कोल्हापुरांत होते. त्यांच्यावरहि कोल्हापूर दरबारची अवकृपा झाली होती. प्रो. विजापुरकरादि मंडळींवर दरबारनें खटले कां भरावेत याचें पुष्कळांना गूढ होतें. पण ' अंदरकी बात ' अगदीं निराळी होती.

कोल्हापुरांत प्रो. विजापुरकरांच्या खटल्यामुळें लोकांत बरीच खळबळ उडाली. अण्णांच्या निरलस आणि एकनिष्ठ कार्यामुळें कोल्हापुरच्या सर्व लोकांचो विजापुरकरांच्या घराण्याबद्दल अत्यंत सहानुभूति होती. कोल्हापूर ही त्यांची जन्मभूमि असल्यामुळें कोल्हापुरच्या राजकीय, सामाजिक आणि औद्योगिक चळवळींत पडून लोकमतास इष्ट वळण लावावें आणि देशसेवा जी अल्पस्वल्प आपल्या हातानें होईल ती करावी असा गुरुवर्यांचा मानस होता. परंतु त्यांच्या आकांक्षा जागच्या जागीं तशाच राहिल्या. कोल्हापुरच्या राजकारणास खालसांतील पुढाऱ्यांची संमति मिळते आणि त्यांच्या तंत्रानें आपल्या संस्थानांतील आपला एक आश्रित राजकारणास वळण लावतो ही गोष्ट कै. छत्रपतिमहाराजांना सर्वथैव अनिष्ट अशी वाटली. खालसांतील चळवळया पुढाऱ्यांनाहि नामोहरम करण्यासाठीं ब्रिटिश अधिकाऱ्यांची खटपट चालू होती. अशा प्रसंगीं लोकमान्य टिळक प्रभृति लोकनायकांच्या हातांत हात घालून काम करणाऱ्या प्रो. विजापुरकरांच्या सर्व चळवळी तशाच चालू द्याव्यात कीं त्यांस नियंत्रण घालावें असा एक विचार कोल्हापुरकरांच्या पुढें होता. याच वेळीं राजकीय चळवळ हाणून पाडावयाची

असें इंग्रज सरकारनें ठरवितांच आमच्या संस्थानिकांनाहि वरिष्ठ सरकारच्या पाऊलावर पाऊल टाकावें लागलें. या कालांतील राजकीय चळवळीचा इतिहास देण्याचें प्रयोजन प्रस्तुत ठिकाणीं नाहीं. परंतु इतकें दिग्दर्शन करणें जरूर असल्यामुळें येथें थोडीशी माहिती दिली आहे.

अशा रीतीनें प्रो. विजापुरकरांची चळवळ कै. छत्रपतींना आवडेनाशी झाली. परंतु केवळ कर्तव्य म्हणून अण्णा नेहमींप्रमाणें सर्व कामें करीत होते. तरी हळूहळू दरबारच्या मर्जीतून ते उतरत होते. अखेर विजापुरकरांना मोकळे ठेवूं नये असें कोल्हापुरकरांनीं ठरविलें. यांत वास्तविक छत्रपतींचा कांहींच दोष नव्हता. या वेळीं चोहोंकडे परिस्थिति अशी बिकट निर्माण झाली कीं राजसत्तेला आपल्या स्थैर्यासाठीं हे जालीम उपाय अमलांत आणणें जरूरीचें झालें. " माझ्या ताब्यांत विजापुरकरांना द्या, मी त्यांना शिक्षा करवितों " अशी मागणी कोल्हापुरकरांनीं या वेळीं केली होती, हें मध्यंतरीं जीं " कोल्हापुरकरांचीं गुप्त पत्रें " केसरीनें प्रसिद्ध केलीं त्यांत स्पष्टपणें लिहिलें आहे. अशा रीतीनें कोल्हापुरकरांनीं म्हटल्याप्रमाणें खटला भरला.

या वेळीं रा. ब. कृष्णाजी नारायण पंडितराव हे गुरुवर्यांचे बालपणीचे मित्र वरिष्ठ न्यायाधीश होते. त्यांच्याकडून खटला नीट चालेल कीं नाहीं अशी शंका येऊन कोल्हापुरकरांनीं ब्रिटिश हद्दींतून सुप्रसिद्ध मि. सी. ए. किंकेड या तज्ज्ञ न्यायाधिशास राजद्रोहाचा हा महत्त्वाचा खटला चालविण्यास कोल्हापुरास आणविलें.

मंडळी कोल्हापुरास दाखल झाल्यानंतर खटल्यास सुरवात झाली. 'कमिटिंग' मॅजिस्ट्रेट श्री. ( आतां खासदार ) भास्करराव जाधव असून त्यांचेपुढें साक्षीपुरावा घेण्याचें काम सुरू झालें. प्रो. विजापूरकर, वामनराव जोशी, व रा. विनायकराम जोशी यांच्यातर्फे रा. आपटे वकील काम चालवीत होते. त्या वेळीं साक्षीपुरावा घेण्याचें काम चालू असतां मधून मधून बहारीचीं प्रश्नोत्तरें होत होतीं. यासंबंधींची मजेदार हकिकत प्रो. वा. म. जोशी यांनीं स्वतःच्या शब्दांत मनोरंजनच्या १९२६ च्या अंकांत रेखाटली आहे, ती फारच मजेदार आहे. असो! सरते शेवटीं प्रथम भासणारी स्वप्नसृष्टी खरी ठरली !!

शिक्षा झाल्यावर वरील तिघां कैद्यांना दोन महिने कोल्हापूर जेलमध्यें व नंतर दोन महिने पन्हाळ्यावर व पुन: कोल्हापुरांत कडेकोट बंदोबस्तानें फौजी पहाऱ्यांत ठेवण्यांत आलें. इतकें पुरें न वाटून कीं काय, या तिघां कैद्यांना पुढें संस्थानाबाहेर तीन दिशांना धाडण्यांत आलें. अण्णांची रवानगी साबरमतीच्या तुरुंगांत झाली. बाकीची सर्व शिक्षा त्यांनीं तेथेंच भोगिली. येथून १९१२ सालीं शिक्षा भोगून ते स्वगृहीं परत आले. परंतु त्यापूर्वीच १९१० सालीं अण्णांच्या समर्थ विद्यालयावर सरकारची करडी नजर फिरून अल्पावधींत सरकारनें समर्थ विद्यालय बेकायदेशीर संस्था ठरविण्यासाठीं सिमल्याहून हिंदुस्थान सरकारमार्फत स्वतंत्र हुकूम कसा आणविला आणि त्या अन्वयें चालकांची पांगापाग कशी केली ती हकीकत एका प्रकरणांत स्वतंत्रपणें मागें दिली आहे, त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. या वेळीं आपल्या अपत्याप्रमाणें प्रेमास्पद झालेल्या समर्थविद्यालयाचा नाश डोळ्यांदेखत झालेला पाहून अण्णांना किती दुःख झालें असेल, तें वर्णन करण्यास आमची लेखणी सर्वथैव असमर्थ आहे.

या वेळची परिस्थिति एकंदर लक्षांत आणली कीं, अद्यापि वाटूं लागतें, अरेरे ! अण्णासाहेबांसारख्या सच्छील मनुष्यास तुरुंगवास भोगावा लागला ना? विधिघटना विचित्र आहे. पण कायद्यापुढें कांहीं इलाज नाहीं. कोणीहि असो, कायद्याच्या कात्रींत सांपडला कीं तो कांतरला जाणारच असा नियम आहे; पण त्या वेळचें वातावरणच खवळलेलें होतें. वास्तविक ज्या लेखाबद्दल अण्णांना शिक्षा झाली तो लेख त्या विशिष्ट परिस्थितींत विश्ववृत्तांत प्रसिद्ध झाला इतकेंच; निकालांत न्यायमूर्ती मि. किंकेड म्हणाले,

> ...'The article is violently inflamatory and in the guise of scriptural sermon calls its readers to murder Englishmen as आतताई or felons.'...

[ प्रस्तुत लेख अत्यंत प्रक्षोभजनक असून त्यांत धार्मिक प्रार्थनांच्या मिषानें ' इंग्रज लोक आततायी असल्यामुळें त्यांचे खून पाडावे असें सुचविलें आहे. ' ]

वास्तविक हा लेख राजकारणांत कधींहि न पडणारे वेदव्यासंगी रा. सातवळेकर यांनीं लिहिला होता. या लेखांत वास्तविक राजकारणाचा कांहींच

संबंध नव्हता. सदर लेखांत प्रचलीत राजकारणाशीं कांहीं अंशीं लागू पडेल असें एकच वाक्य होतें, असें फिर्यादी पक्षाचें ह्मणणें होतें. हा लेख या वेळीं—अमुक विशिष्ट परिस्थितींतच म्हणजे राजकीय चळवळीच्या प्रक्षुब्ध वातावरणांतच—प्रसिद्ध झाला, एवढेंच. इतर वेळीं त्यांत आक्षेपार्ह असें कांहींच नव्हतें असें लोकमत होतें.

केवळ राजकीय वातावरण खवळलेलें असल्यामुळें आक्षेपार्ह नसलेला लेख अक्षेपार्ह ठरला ! दुसरें काय ? मात्र खुद्द संपादकांनीं सदर लेख प्रसिद्ध करून वातावरण खवळलेलें नाहीं. भलत्या वेळीं हा लेख प्रसिद्ध झाला हा एकच गुन्हा फार तर म्हणतां येईल. पण अशा परिस्थितींत उपरिनिर्दिष्ट लेख प्रसिद्ध करण्यांत संपादकांचा कोणताहि वाईट हेतु नव्हता. या बाबतींत विरुद्ध पक्षाचा कांहीं पुरावा नाहीं. आपल्या कबुलीजबाबांत रा. वामनराव जोशी यांनींहि सांगितलें होतें कीं, अण्णा विजापुरकरांनीं वरील लेख पाहिला नव्हता. मग अण्णांच्यावर लेख प्रसिद्ध केल्याचा आरोप कां करण्यांत यावा ? पण कायदा आडवा आला त्याला कोण काय करणार ?

---

१ आर्यांच्या राष्ट्रविषयक कल्पना वेदांतील सामुदायिक प्रार्थनांमध्यें कशा प्रतिबिंबित झाल्या आहेत, हें ह्या लेखांत प्रामुख्यानें दाखविण्यांत आलें आहे.

' यो नो द्वेषत् पृथिवि यः पृतन्याद् यो अभिदासान् यो वधेन । तं नो भूमे रन्धय पूर्वकृत्वरि ।। " ( अथर्व० १२।१४ )

अर्थः—" हे आमच्या मातृभूमि ! जो आमचा द्वेष करीत असेल, जो आमच्यावर सैन्य पाठवून आमचा नाश करूं इच्छील, जो आम्हांला गुलाम बनवीत असेल, जो मनानें व वधानें आम्हांला त्रास देण्याची खटपट करील त्याचा समूळ नाश कर. "

या अथर्व वेदांतील वैदिक प्रार्थनेंत आर्यांच्या राष्ट्रहितविषयक कल्पना कशा उदात्त आहेत हें रा. सातवळेकर यांनीं आपल्या सुबोध शब्दांनीं यथार्थ वर्णन केलें आहे. हे परमेश्वरा, आमच्या सर्व वैऱ्यांचा नाश करून आमचें राष्ट्र सुखी कर, असा सर्वसामान्य उपदेश लेखकानें वेदांतील प्रार्थनांच्या द्वारें स्पष्ट केला आहे. आजच्या घटकेसहि जगांतील कोणत्याहि उदयोन्मुख राष्ट्रास हा उपदेश निरंतर ग्राह्य होईल आणि अखिल राष्ट्रांची राष्ट्रीय प्रार्थना अशीच राहील हेंहि उघड आहे.

अण्णांचें नांव पुस्तकावर संपादक म्हणून होतें. मग कायदेशीरपणानें अधिकाऱ्यांनीं अण्णांना जबाबदार या नात्यानें शिक्षा दिली व अण्णांनींहि ती भोगली. कायद्याचा अर्थ करणारे मॅजिस्ट्रेट यांनीं तरी काय करावें ? ते बिचारे कायद्याचा अर्थ करणारे ! त्यांचा तरी काय दोष ?

प्रथम अण्णांचा तुरुंगांतील कांहीं काल कंटाळवाणा गेला. परंतु वामनराव जोशी व विनायकराव जोशी सन्निध असल्यामुळें त्यांतहि थोडीशी करमणूकच होती. प्रथम तिघेहि फौजी पहाऱ्यांत कोल्हापुरांत होते. तुरुंगाची कडक शिस्त पुढें पुढें अण्णांच्या परिचयाची झाली. " अगदीं काटकसरीनें व कमींत कमी गरजा ठेवून मनुष्यानें कसें वागावें हें पाहण्यासाठीं तुरुंगांतील कैद्यांची दिनचर्या बघावी, " असें ते सांगत. बंदिवासांतून सुटल्यावर ते नेहमीं आपले कपडे, धोतर, नेसावयाचा पंचा, स्वतः धूत व पाणी पिण्याची भांडींहि स्वच्छ करीत. दुसऱ्यानें कोणी जर त्यांचें काम केलें तर त्यांना तें मुळींच खपत नसे. कारागृहांतील त्यांची शिक्षा साधी असल्यामुळें त्यांना विशेष त्रास झाला नाहीं. त्याविषयीं बोलतांना ते म्हणत " मला तुरुंगांत मुळींच त्रास झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मला साधीच कैद होती ! कोल्हापुरांतील तुरुंगांत असतांना तेथील जेलर माझ्या विद्यार्थ्यांपैकीं एक होता. शाळेंत असतांना मी त्याला शिष्यवृत्ती दिली होती. " या वेळचा त्यांचा काल कसा गेला याचें वर्णन प्रो. वामनराव जोशी यांनीं पुढील उताऱ्यांत उत्तम रीतीनें दिलें आहे.

" कोल्हापुरास फौजी पहाऱ्याखालीं अण्णा, विनायकराव व वामनराव जोशी हे कैदी असतां विनायकराव अण्णांशीं वाद करून समर्थ विद्यालय काढण्यांत अण्णांनीं मोठी चूक केली व फसलेल्या मुलांचें, अण्णांनीं आपलें स्वतःचें, विनायकरावांचें व वामनरावांचें जन्माचें नुकसान केलें असें सिद्ध करूं पहात. अण्णा हरतऱ्हेचे युक्तिवाद करून आपलें समर्थन करीत, पण विनायकराव वादांत कांहीं कमी कुशल नव्हते आणि शिवाय थोडीबहुत कुचेष्टा करून व अण्णांना थोडेंसें चिडवून कसा तरी कैदेंतला वेळ कंठावा या हेतूनें ते हार न जातां अधिकच कुचेष्टा करीत. मास्तरांशीं उगाच वाद करणाऱ्या वितंडवादी शिष्यासारखाच हा प्रकार होता. ( विनायकराव हे अण्णांचे शिष्य होतेच ) पण अण्णांना उगाच

कांहीं तरी बोलून वंद्य वस्तु अवंद्य ठरविणें, पूज्य वस्तूंची टवाळी करणें, हें खपत नसे. असें सांगतात कीं, अण्णांनीं अखेर विनायकरावांशीं वाद करण्याचें सोडून दिलें. पण त्यांना कठोर शब्द उच्चारून दटावलें किंवा दाबलें नाहीं. विनायकराव काय ? मग ते वामनरावांबरोबर वाद करूं लागले. कसा तरी वेळ जावा व करमणूक व्हावी ही सर्वांची इच्छा. एकमेकांना पेंच घालून, कोंडींत पकडून विनोदी गोष्टींनीं एकमेकांचा युक्तिवाद हास्यास्पद ठरवून, ते कालक्रमणा करीत. विनायकरावांना तर समर्थ विद्यालयाची कुचेष्टा करण्याची संवयच लागली होती. ते वारंवार भलभलते आरोप अण्णांच्यावर व विद्यालयाच्या चालकांवर करीत.

अण्णांना तें कांहीं ऐकवेना, पण एकान्त खोलींत तिघांना कोंडलेलें; तेव्हां करतात काय ? ऐकिल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. तरी पण कुचेष्टेचा हा प्रकार त्यांना कानांनीं ऐकवेना. म्हणून त्यांनीं घोंगडी डोकीवरून घेऊन तोंड झांकून टाकावें व कानावर शब्द येऊंच नयेत अशी योजना करावी, असा प्रकार चालूच होता.

तथापि सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, विनायकरावांचा अण्णांच्या बद्दलचा आदर जास्त वाढला. प्रथम त्यांचे मनांत आदर कमी होता असें नाहीं, पण या प्रसंगानंतर तो अधिकच वाढला.

अशा प्रकारें हीं एक प्रकारच्या अज्ञातवासांतील तीन वर्षें कशीं तरी पार पडलीं आणि अण्णा साबरमतीच्या आश्रमांतून स्वस्थानीं तळेगांवास परत आले.



# प्रकरण अकरावें

## पुनरुज्जीवनासाठीं भगीरथ प्रयत्न

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्देवाः । न भेजिरे भीमविषेण भीतिम् ।।
सुधां विना न प्रययुर्विरामं । न निश्चितार्थाद् विरमंति धीराः ।।

—सुभाषितम्

सरतेशेवटीं ता. १८ डिसेंबर १९११ रोजीं साबरमतीच्या तुरुंगांतून गु. अण्णासाहेबांची मुक्तता झाली. तुरुंगांतून बाहेर पडल्यावर प्रथम अनेक संतविभूतींनीं पावन केलेल्या पंचक्रोशींत येऊन ते दाखल झाले. आपल्या विद्यालयाच्या कर्मभूमीचें दर्शन घेऊन नंतर काय तें ठरवावें असें नंतर त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें.

कैदेतून सुटल्यावर विद्यालयाकडे नजर टाकली तेव्हां त्यांना गहींवर आला. तुरुंगांतील कष्टामुळें त्यांना दुःख सहन करण्याची पूर्ण संवय झाली होती म्हणून त्यांनीं तें सर्व दुःख आवरलें आणि पुनः विद्यालय काढण्यासाठीं प्रयत्न करण्यास सुरवात केली. गुरुवर्यांना आपल्या सर्व आयुष्यांत एक शिक्षणाचेंच ध्येय पुढें दिसत होतें.

या सुमारास दिल्लीस बादशहांचा राज्यारोहण समारंभ होणार होता. त्यामुळें चोंहोकडे कडेकोट बंदोबस्त राखण्यांत आला होता. सुटून आलेल्या राजकीय गुन्हेगारांवर सरकारनें करडी नजर ठेविली होती. अशा लोकांच्या मागें पोलिसांचा ससेमिरा होताच. गुरुवर्यांनांहि हा त्रास पुष्कळ सोसावा लागला आणि त्याबद्दल त्यांनीं अनेकदां सरकारी अधिकाऱ्यांच्याकडे तक्रारीहि केली. या वेळीं तळेगांवीं स्वस्थ बसण्यापेक्षां मनःस्वास्थ्यासाठीं एकवार धर्मक्षेत्रें पहावींत असें त्यांच्या मनांत आलें, आणि त्याप्रमाणें त्यांनीं काशीयात्रा करण्याचा निश्चय कायम केला. या खळबळीच्या काळांत यात्रा करण्यानें चित्तशांति होईल, असा सल्ला गुरुवर्यांना त्यांच्या मित्रमंडळींनींहि दिला. पुढें लवकरच ते यात्रा करण्यास गेले.

१९१२ वें साल उजाडलें. फेब्रुवारी व मार्च हे दोन महिने गुरुवर्यांनीं त्रिस्थळची यात्रा करण्यांत घालविले. हरिद्वार, काशी, प्रयाग व अयोध्या

वगैरे ठिकाणीं फिरून त्यांनीं भरतखंडांतील प्राचीन क्षेत्रें पाहिलीं. यात्रे-मुळें त्यांच्या उद्विग्न मनास थोडेंसें समाधान वाटलें. पण हें समाधान फार वेळ टिकलें नाहीं. यात्रेहून परत आल्यावर दोन महिने पुरे होतात न होतात तोंच अण्णांच्यावर पुनः एक अत्यंत दुःखाचा प्रसंग कोसळला.

गुरुवर्यांची पत्नी १९०० मध्यें निवर्तली. त्यांना एकच अपत्य होतें. तोच चि. बंडु होय. आई लहानपणीं वारल्यामुळें तो आपल्या आत्याजवळ राहत असे. पुढें तो समर्थ विद्यालयांतच शिकूं लागला. गुरुवर्यांचें त्याच्यावर प्रेम असे. तरी चि. बंडूला शेजारीं घेऊन अण्णा त्यास कधीं अभ्यासाचा धडा सांगत बसले आहेत असें कधींहि दिसलें नाहीं. शाळेंतील सर्व मुलांत बंडूहि अगदीं मिसळून गेलेला असे. त्याबद्दल आठ आठ दिवस गुरुवर्य चौकशी सुद्धां करीत नसत. बंडूसंबंधीं अण्णांचें भावी मनोराज्य मोठें होतें. बंडूनें इकडचा शिक्षणक्रम पुरा करून अमेरिकेंत जावें व एकाद्या धंद्याचें शिक्षण घेऊन पुनः त्यानें समर्थ विद्यालयांत काम करावें अगर एकादी शिक्षण-संस्था काढावी असें त्यांचें मनांत होतें. त्यासाठीं त्यांनीं पैशाचीहि व्यवस्था केली होती. पण तें सर्व मनोराज्यच ठरलें ! गुरुवर्यांना अत्यंत दुःख देऊन बंडू एकाएकीं परलोकीं निघून गेला. त्यामुळें अण्णांच्या आकांक्षाहि तेथल्या तेथेंच राहिल्या. तरी पण समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनासाठीं चालविलेली अण्णांची खटपट तशीच अर्धवट राहिली असें नाहीं. लवकरच पुढें पुत्र-वियोगाचें दुःख विसरून ते पुनः अंगीकृत कार्यांत निमग्न झाले. दुसरा एकादा मनुष्य असता तर तो या दुःखभारानें चिरडून जाता; परंतु अण्णा हे भगवद्गीतेंत वर्णिलेल्या ' स्थितप्रज्ञा ' प्रमाणें होते. आपल्या कर्तव्या-पुढें इतर ऐहिक सुखें त्यांना तुच्छ होतीं; लवकरच त्यांचे नित्याचे व्यव-साय सुरू झाले. अशा स्थितींतहि त्यांनीं अकोला येथें आक्टोबरांत भरलेल्या साहित्य संमेलनाकरितां **"ग्रंथकारांवरील जबाबदारी व त्यांचें परस्प-रांशीं कर्तव्य"** हा निबंध लिहून पाठविला. मराठी भाषेची त्यांची सेवा अशा प्रकारें मधून मधून चालूच होती.

यात्रेस जाण्यापूर्वी समर्थ विद्यालयासंबंधीं खऱ्या हकीगतीचें पत्र अण्णांनीं गव्हर्नर साहेबांकडे पाठविलें व शाळेसंबंधीं गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला. सदर अर्जांत ते लिहितातः—

"आपल्या[1] स्वतःच्या शिक्षणविषयक कल्पना अगदीं ठाम बनल्या आहेत व हा प्रयोग करून पहाण्याचा आपण निश्चयच केला आहे."

दुसऱ्या अर्जांत ते म्हणतात:—

"राष्ट्रीय[2] शिक्षणासंबंधीं कार्य करण्यांत मला अत्यंत आशा आहे व भरपूर उत्साहहि आहे. सरकारनें स्वतः शिक्षक नेमून समर्थ विद्यालयाचें कार्य माझ्या कल्पनेप्रमाणें जर पुढें चालविलें, तर तेंहि मला पटेल. यासाठीं हें इष्ट काम करण्यास परमेश्वर मला जोंपर्यंत आयुष्य देईल तोंपर्यंत दरसाल ५००० रुपये जमवून सरकारच्या हवालीं करावेत व हा शिक्षण प्रयोग करून पहावा असें माझें मन मला सांगत आहे."

समर्थ विद्यालयासंबंधीं अशा रीतीनें अण्णांचा मुंबई सरकारशीं पत्रव्यवहार पुष्कळ दिवस चालू होता. पुढें या प्रकरणांचा आपण सोक्षमोक्ष करून घ्यावा, असें वाटून अण्णांचे तर्फें ज. वि. ओक यांनीं सरकारशीं पत्रव्यवहार सुरू केला. नानासाहेब ओकांनीं गव्हर्नरसाहेबांना ता. २१-६-१२ रोजीं पत्र लिहून कळविलें कीं,

"आपण आतां स्वदेशीं जाणार आहां, तरी समर्थ विद्यालयाच्या चालकांवर उगारलेलें शस्त्र आतां खालीं करावें. या कामीं मला आपली मुलाखत मिळाल्यास फार चांगलें." पण "समर्थ विद्यालयाच्या बाबतींत गव्हर्नरसाहेब कोणत्याहि प्रकारचा विचारविनिमय करूं इच्छित

---

1.........I have, no doubt, certain strong views on educational questions; and in my humble way, I tried and will ever try to give effect to them never forgetting that I owe the profoundest loyalty to the connection of Britain with India.........(11-1-12.)

2.........Should Government think it absolutely necessary, they will-any one or more—remain aloof from the School. Even for myself, if Government so desire it, I shall tear myself off. We shall gratefully acknowledge and try to carry out any suggestions made by Government with a view to make our institution successful....(20-1-12)

नाहींत. ” असा एकच रोकडा जबाब रा. ओकांना मिळाला. यानंतर निराश होऊन ओकांनीं समर्थ विद्यालयाचा नाद सोडून दिला.

मध्यंतरीं दोन वर्षें तशींच गेलीं तरी गुरुवर्यांचे व्यवसाय म्हणजे मराठी लेखन–वाचन निर्वेधपणें तळेगांवीं समर्थ विद्यालयाच्या पावनभूमींत चालू होते. नंतर १९१४ अखेर हिंदुस्थान सरकारमार्फत त्यांनीं पुन: विद्यालयासंबंधीं पत्रव्यवहार सुरू केला.

ता. १३–१२–१४ रोजीं गुरुवर्यांनीं व्हाइसरायांकडे पत्र पाठविलें आणि ज्या क्रिमिनल–लॉ–अमेंडमेंट ॲक्टाअन्वयें समर्थ विद्यालय बुड-विण्यांत आलें त्या कायद्याचा निर्बंध काढून टाकावा, असें सुचविलें. १३-१२-१४ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत अण्णा लिहितात:—

“डॉ. सेल्बी यांचे एके काळीं शिष्य असलेली मंडळी म्हणजे ज. वि. ओक आणि वा. म. जोशी असे समर्थ विद्यालयांत शिक्षक म्हणून काम करीत होते. परमेश्वरास स्मरून व आपल्या मनोदेवतेस साक्ष ठेऊन मी सांगतों कीं, या विद्यालयांत आक्षेपार्ह असें कांहींच शिकविलें गेलें नाहीं.’ पण थोडयाच दिवसांनीं दिल्लीहून नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें उत्तर आलें कीं, हा प्रश्न प्रांतिक सरकारचा आहे, तिकडेच आपण अर्ज करावा.

याच सुमारास पुण्यास मि. मॉंटफर्ड नांवाचे लोकप्रिय कलेक्टर होते. ना. गोखल्यांच्या वशिल्यानें अण्णांनीं सदर कलेक्टर साहेबांची ओळख करून घेतली आणि त्यांच्या सहानुभूतीनें समर्थ विद्यालय पुन: सुरू कर-ण्याच्या कामीं पुनः पुढें जोरानें प्रयत्न सुरू केले. सदर यूरोपियन कलेक्टर अण्णांच्या बाजूचा झाला आहे, असें समजतांच गोखले म्हणाले, “अण्णा, एक युरोपिअन तुम्ही आपलासा करून घेतलात, आतां निम्में काम फत्ते झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. ” नंतर त्यांनीं मॉटफर्डसाहेबांची एकदोन वेळां मुलाखत घेऊन आपलें म्हणणें त्यांच्यापुढें मांडलें. परंतु

त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. मात्र मॅांटफर्डसाहेबांनीं पुष्कळ मदत केली. इतकेंच नव्हे तर मुंबईसरकारकडे पाठविण्याचा अर्जाचा नमुना कलेक्टरसाहेबांनीं स्वतः तयार करून दिला. परंतु कांहींही झालें तरी मुंबई सरकार सदर अर्जाचा विचार करूं शकत नाहीं असें एकच उत्तर अण्णांच्या अर्जास मिळालें तरी त्यांची खटपट मात्र चालू होती. नंतर पुनः २६।१।१५ रोजीं गुरुवर्यांनीं मुंबईचे गव्हर्नरांना लिहिलें कीं:--

"आपण असे पाठमोरे होऊं नका. आमचा अपराध कांहीं नाहीं. सरकार थोर आणि बलिष्ठ आहे. त्याचप्रमाणें तें उदारहि असलें पाहिजे. उगीच खुनशी असूं नये. माझी खात्री आहे कीं सरकार तसें नाहीं. आम्हीं शाळेंत कधींहि क्रांतिकारक मतांचा फैलाव केलेला नाहीं. आमच्या हातून जर कांहीं चुका झाल्या असतील तर त्याबद्दल आम्हीं आतां पुरेशी शिक्षा भोगिली आहे. मी मुलाखतींत सर्व खुलासा करितों."

अण्णांनीं आपल्याकडून इतकी खटपट केली तरी गव्हर्नरसाहेबांची मुलाखत घेण्याची संधी मात्र त्यांना मुळींच मिळाली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

---

"...Pray don't be stiff-backed; Government is good and great. It ought to be noble. If we do mischief it may punish but it need not be vindictive and I have reason to believe it is not. We have never been seditious nor revolutionary in any way. We might have committed mistakes for which we have suffered and only hope that Government will think that we have suffered long enough—we have broken no law. We have been condemned, unheard and smarting under a sense of injustice and unfairness awaiting with loyal patience quieter times and calmer judgment and greater and liberal consideration to what we have to urge in our favour........."

अशा रीतीनें पत्रें लिहिण्यांत व समर्थ विद्यालयासंबंधीं खुलासा करण्यांत जानेवारी ( १९१५ ) उलटून जाऊन फेब्रुआरी महिनाहि आला. पुण्यास कलेक्टरची गांठ घेण्याच्या उद्देशानें गुरुवर्य पुढें पुण्यास आले. नेहमीं प्रमाणें त्यांचा मुक्काम 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी'त होता. या वेळीं ना. गोखले हे तेथेंच आजारी होते. गोखल्यांचा सल्ला पुष्कळ वेळां अण्णा घेत. दोघांचा ऋणानुबंध आणि स्नेह अगदीं लहानपणापासून अखंड टिकला होता[1]. पण पुढें ता. १९ रोजीं ना. गोखल्यांचें दुखणें विकोपास जाऊन ते वारले. या वेळीं अण्णा जवळच होते. लागलींच दुसरे दिवशीं त्यांनीं आपला मुक्काम तळेगांवला हलविला. पण पुढें गोखल्यांचे स्नेही या नात्यानें ना. चौबळ यांनीं अण्णांना वाटेल ती मदत केली व त्यांच्या प्रयत्नांत अखेर यश येऊन नांवांत एक शब्दाचा थोडा फरक करून कां होईना पण नवीन श्रीसमर्थ विद्यालय स्थापन झालें. या वेळीं अण्णांना किती तरी समाधान वाटलें असेल तें येथें लिहितां येत नाहीं.



१ गु० अण्णांना कधींहि—राजकारणांतहि—असत्य आचरण खपत नसे. मग अशा वेळीं आपलें खरें मत जसें असेल तसेंच ते निर्भयपणें जाहीर करीत. पुढें टिळक-गोखले-वादांत अण्णांनीं गोखल्यांची बाजू कशी उचलली हें पुष्कळांना माहीत आहे. द्वितीय भागांतील—अण्णांची राजकीय मतें—या प्रकरणाच्या पुरवणी भागांत दिलेलें अण्णांचें पत्र पहावें.

## प्रकरण बारावें (अ)

# असहकारितेचे हेलकावे

I pray you will take matters coolly. We have to be genuine Swadeshis and haters of none. Let us agree to differ in certain points and yet work harmoniously and leave the details to the workers on the spot.

**V. G. Bijapurkar.**

*(7-2-1921)*

१९२१।२२ या दोन वर्षांत हिंदुस्थानच्या राजकीय वातावरणांत एकाएकीं मोठी घडामोड झाली व तिचे परिणाम चोहोंकडे दिसून आले. सत्याग्रहाच्या चळवळीनें सरकारी अधिकाऱ्यांचें धाबें दणाणलें आणि नंतर राष्ट्रीय शिक्षणाची चळवळहि जोरानें सुरू झाली. १९०६ च्या बहिष्काराच्या चतु:-सूत्रीचा जयघोष या वेळींहि चोहोंकडे सुरू झाला. सर्व हिंदुस्थान महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीनें एकदम एकाएकीं हादरून गेलें. असहकारितेच्या चळवळीबरोबर स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या दोन चळवळी मागोमाग जन्मास आल्या. हिंदी राष्ट्रांत ह्या वेळीं एकदम नवजीवनाची लाट पसरली. राष्ट्रीय शिक्षणाची प्रत्येक संस्थाहि या आंदोलनानें हादरून गेली. मग समर्थ विद्यालयाच्या संस्थापकांनाहि या शैक्षणिक चळवळीनें एकदम चालना मिळाली यांत नवल तें कोणतें ?

१९०५।६।७ च्या राष्ट्रीय चळवळीनें ज्याप्रमाणें अखिल भरतखंडास हलवून जागें केलें आणि पुढें महाराष्ट्राचें समर्थ विद्यालय, बंगालचें 'नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन'सारख्या अनेक राष्ट्रीय संस्थांना जन्म दिला तीच चळवळ पुन: १९२०।२१ मध्यें उद्भवून सर्व भारतवर्षांत अल्पावधींत पसरली. आणि लवकरच शिक्षणसंस्थांवर बहिष्कार पडून नवीन राष्ट्रीय शिक्षणसंस्था निर्माण झाल्या. या आंदोलनाच्या कालापूर्वी महाराष्ट्रांत पूर्वीच्या समर्थ विद्यालयाच्या जनकानें पूर्वीच्या संस्थेंत एका शद्वाच्या फरकानें आपल्या पहिल्या विद्यालयाचा पुनरुद्धार केला होता.

असहकारितेच्या चळवळींतून पुनः राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना जन्म पावली हें ऐकून गुरुवर्यांना आनंद वाटला आणि अशा वेळीं ते राष्ट्रीय

शिक्षणास उचलून घरण्यास पुढें झाले, इतकेंच नव्हे तर या वेळीं निघालेल्या टिळक महाविद्यालयांत आपण कांहीं काल अध्यापनकार्यहि करूं असेंहि तेथील चालकांना त्यांनीं कळविलें. "राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना कोणत्याहि चळवळींतून निघो, त्यास मदत करणें हें मी आपलें कर्तव्यकर्म समजतों" असें या वेळीं त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें. इतकी सहानुभूति टिळक महाराष्ट्र विद्यापीठाविषयीं जरी त्यांनीं व्यक्त केली तरी विद्यापीठास आपलें नवीन समर्थविद्यालय मात्र जोडलें नाहीं. आपला शिक्षणप्रयोग अगदीं स्वतंत्र असाच राहावा असें त्यांना वाटत होतें. 'टिळक[१] महाराष्ट्र विद्यापीठांत मराठी प्रधान भाषा असावी व इंग्रजी भाषा आवश्यकच पाहिजे असा नियम नसावा आणि इंग्रजी येत नाहीं अतएव पदवी मिळत नाहीं असें होऊं नये ' अशी गुरुवर्यांची फार फार इच्छा होती.

असहकारितेच्या चळवळीचा परिणाम या कालांत शाळा व कॉलेजांतील विद्यार्थिवर्गावर कसा झाला हें सर्वश्रुतच आहे. पुष्कळ विद्यार्थी गांधीटोपी घालून शाळेंत जाऊं लागले व त्यामुळें सरकारी शाळेंतील शिक्षक, इतर अधिकारी व सरकारी पदवी धारण करणारे गृहस्थ यांच्या मनांत या गांधीटोपीवाल्या विद्यार्थ्यांबद्दल एक प्रकारचा तिरस्कार वाटूं लागला. या वेळीं गांधीटोपीनें प्रत्येक इंग्रज मनुष्याच्या पोटांतहि कालवाकालव उत्पन्न केली. सरकारी अधिकारी व कांहीं राजनिष्ठ गृहस्थहि साध्या पांढऱ्या टोपीनें बुजून गेले. ज्या शिक्षकांनीं गांधीटोपीचा अनादर केला नाहीं व त्याच वेळीं महात्माजींचीं मतें तींच आपलीं मतें असेंहि म्हटलें नाहीं, अशा शिक्षकांपैकींच नवीन श्रीसमर्थ विद्यालयांतील शिक्षकवर्ग होता. गुरुवर्यांना प्रथमपासून स्वदेशी चळवळ पसंत होती; विद्यालयांतील स्वदेशी चळवळीस पोषक असें हें वातावरणहि पाहून त्यांना फार आनंद वाटला. असहकारितेनें

---

१ "राष्ट्रीय शिक्षणवाद्यांची जबाबदारी व कर्तव्य" यासंबंधीं टिळक महाविद्यालयाच्या सहाव्या वाढदिवसांचे प्रसंगीं गुरुवर्यांनीं टिळक म. वि. चे आचार्य श्री. वि. प्र. लिमये यांना आश्वासनपर पत्र पाठविलें तें २ फेब्रुवारी १९२६ च्या केसरींमध्यें प्रसिद्ध झालें आहे, तें पुढील भागांत राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास या प्रकरणाच्या शेवटीं असलेल्या पुरवणी-प्रकरणांत समग्र दिलें आहे तें वाचकांनीं अवश्य वाचावें.

उत्पन्न केलेली स्वदेशीची चळवळहि त्यांना पसंत होती. परंतु प्रत्येक गोष्टींत महात्माजींचीं मतें म्हणजे वेदतुल्य असें समजणारे ते नव्हते इतकेंच येथें सांगितलें पाहिजे.

इतर ठिकाणांप्रमाणेंच नवीन समर्थ विद्यालयांतहि या वेळीं असहकारितेचा विद्यार्थ्यांच्यावर पुष्कळच परिणाम झाला होता. त्याप्रमाणें कांहीं विद्यार्थी व शिक्षक गांधी-टोप्या घालीत असत. या सुमारास एके वेळीं प्रशासक मंडळाचे अध्यक्ष सर महादेव चौबळ विद्यालयांत मंडळाच्या कामानिमित्त आले होते. तेव्हां गांधी-टोपी घातलेले विद्यार्थी महात्मा गांधींच्या उपदेशाप्रमाणें चरखा फिरवीत असलेले त्यांनीं पाहिले, तेव्हां त्यांना जरा आश्चर्य वाटलें. असहकारितेनें भारलेल्या या संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे आपण अध्यक्ष तरी कसें रहावें ? त्यायोगें असहकारितेस आपण आपली मूक सहानुभूति दाखविली असें होत नाहीं कां ? असहकारिता तत्त्वत: सरकारविरुद्ध असतां ज्या संस्थेंत असहकारितेचीं तत्त्वें पाळिलीं जातात त्या संस्थेशीं आपला संबंध राहणें ह्मणजे आपल्या राजनिष्ठेस विसंगत असें वर्तन आपल्या हातून होत नाहीं कां ? इत्यादि अनेक विचार या वेळीं त्यांच्या मनांत आले व नू. म. विद्याप्रसारक मंडळाचे अध्यक्ष होण्यांत आपण चूक केली असें त्यांना वाटूं लागलें. लागलींच त्यांनीं पुन: निवडणुकीस उभे न रहातां सरकारकडे पत्र पाठविलें कीं, " संस्थेचें धोरण पूर्वीच्या ठराविक धोरणाहून भिन्न झालें आहे, त्यामुळें आपण यापुढें संस्थेच्या सद्धेतूविषयींची खात्री देऊं शकत नाहीं. " अशा रीतीनें पुनः निवडणुकीस उभे न राहतां ना. चौबळांनीं मंडळाचा व पर्यायानें नवीन श्रीसमर्थ विद्यालयाचा आपला संबंध सोडला.

ना. चौबळांनीं मंडळाचा संबंध सोडला याबद्दल गुरुवर्यांना बरेंच वाईट वाटलें. पण आपल्या तत्त्वांना बाध आणणारी कोणतीहि गोष्ट त्यांना खपत नसे. तत्त्वपालनाच्या बाबतींत " जिवलगाच्या तुटी " पडल्या तरी हरकत नाहीं असें गुरुवर्य अण्णासाहेब म्हणत.

समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनासाठीं ज्यांनीं आपणांस ५० हजार रुपये मेळवून दिले अशा गृहस्थांचा विद्यालयाशीं असलेला संबंध कायमचा तुटला जावा याबद्दल त्यांना वाईट वाटलें; पण परमेश्वरी योगायोगच तसा ! त्याला

आपण काय करणार ! आपली मनोदेवता सांगेल तें करावयाचें, मनोदेवते-विरुद्ध कांहींहि करावयाचें नाहीं, असा निर्धार असल्यामुळें गुरुवर्यांनीं नव्या चालक मंडळाकडून सर्व कामें व्यवस्थितपणें पार पाडलीं.

असहकारितेच्या चळवळींतून जन्मास आलेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीस आपण जरी उचलून धरलें तरी असहकारितेचीं तत्त्वें आपणांस मान्य नाहींत असेंच गु. अण्णा नेहमीं म्हणत. असो ! महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळींतून जन्मास आलेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेस गुरुवर्यांनीं उचलून धरलें आणि मदत केली. स्वदेशीची (खादीची) चळवळ-हि त्यांना पसंत होती, परंतु त्यामुळें ना. चौबळांसारख्या मंडळींनीं सह-कार्य करण्याचें नाकारल्यामुळें मध्यंतरीं गुरुवर्यांची चित्तवृत्ति जरा अस्थिर झाली. पण सरतेशेवटीं विशेष गाजावाजा न होतां नवीन श्रीसमर्थ विद्या-लयाचें कार्य पूर्वीप्रमाणें चालू राहिलें.



## प्रकरण बारावें

# ना. चौबळांचें साहाय्य

प. लो. नामदार गोखले हे अण्णासाहेबांचे सहाध्यायी व मित्र होते हें मागें सांगितलेंच आहे. परंतु १९१५ च्या फेब्रुवारींत ते एकाएकीं वारल्यामुळें आपले मनोरथ जागच्या जागीं थंड होतात कीं काय याची गुरुवर्यांना भीति वाटत होती. परंतु एवढ्यानें त्यांनीं आपलें कर्तव्य मात्र मागें टाकलें असें झालें नाहीं.

सर्वांत ज्येष्ठ चिरंजीव मृत्युशय्येवर असतां कर्मयोगी लोकमान्य टिळक आपल्या राजकीय चळवळीसंबंधीं विचारविनिमय करीत बसले होते असें म्हणतात. अगदीं तीच निर्विकार वृत्ति—किंबहुना त्याहूनहि जास्त—गुरुवर्यांच्या ठिकाणीं दिसत असे. वृद्धापकाळीं एकुलता एक मुलगा चि. बंडू वारला; तेव्हां एक क्षणभर एका ऐहिक काळजींतून आपण मुक्त झालों, 'आतां हें विश्वचि माझें घर' आहे अशी उच्च भावना गुरुवर्यांच्या ठिकाणीं प्रादुर्भूत झाली. शिक्षणाचें पवित्र कार्यच आपण अखेरपर्यंत करीत राहणार हा त्यांचा आत्मविश्वास मात्र दृढबद्ध झाला होता. अखेर त्यांचे प्रयत्न सफल होऊन पूर्वीच्या जागींच नव्या नामाभिधानानें विद्यालय सुरू झालें.

पूर्वी लोकमान्यांनीं समर्थ विद्यालयाच्या स्थापनेंत अण्णासाहेबांना मदत केली होती, परंतु या वेळीं "टिळक–गोखले"वादांत अण्णांनीं गोखल्यांची बाजू उचलून धरल्यामुळें टिळकांची मदत मागणें अण्णांना रुचलें नाहीं. किंबहुना मदत न मागतांहि पुढें थोडासा त्रासच पोहोंचला. अण्णांच्या गैरहजेरींत मंडळाचे चिटणीस नानासाहेब ओक होते. समर्थ विद्यालय पुनः स्थापण्यासाठीं त्यांनींहि शक्य ते प्रयत्न केले, पण पुढें विद्यालय स्थापन होणें अशक्य आहे अशी त्यांची पुढें पुढें खात्री झाली. त्यांचा ओढा लो० टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाकडे असल्यामुळें त्यांनीं समर्थ विद्यालयाची जागा पैसाफंड कारखान्याला द्यावी असा बेत केला. परंतु आपण शाळा काढणार असल्यामुळें तसें करूं नये असें गुरुवर्यांचें म्हणणें पडलें. यासंबंधींची हकीगत रा. बाबा पोतदार यांनीं पुढीलप्रमाणें आपल्या आठवणींत दिली आहे.

" जुनें समर्थ विद्यालय मोडल्यावर सर्व सामान जागचे जागीं होतें. विद्यालय पुनः चालू करण्याचे कामीं विजापूरकरांना ही खटपट टिळकांचे तर्फे चालवितां येत नव्हती. ना. गोखले यांच्या तर्फे त्यांचे प्रयत्न सुरू झाले. या कामीं पुढें माधवराव चौबळांचें पाठबळहि त्यांना मिळालें. मध्यंतरीं एका अनिष्ट प्रकारानें टिळक-विजापुरकरांच्या स्नेहांत अंतर पडलें होतें. विद्यालयाची ती जागा पैसाफंड कांचशाळेस द्यावी असा कांहीं ट्रस्टींचा बेत चालला होता. यानंतर लवकरच नवीन समर्थ विद्यालय निघालें. पैसाफंड कारखान्यास ही जागा मिळावी असें ओक, चांदोरकर इत्यादि मंडळींस वाटत होतें. त्याप्रमाणें सर्व नाहीं तरी जागेचा बराचसा भाग कांचशाळेस मिळविण्याची खटपट चालू होती. या वेळीं नानासाहेब देशमुख कारखाना-मंडळाचे अध्यक्ष असल्यामुळें मंडळींनीं त्यांच्याशीं मध्यस्ती करून आपले प्रयत्न चालविले. अखेर निकाल करणारी मंडळी निवडली. तेव्हां लोकमान्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं तळेगांवची जागा मूळ राष्ट्रीय शिक्षणाचे कार्याकरितां घेतलेली आहे, ती दुसऱ्या कामास देण्यास मी तयार नाहीं. तिचा उपयोग शिक्षणाकडेच होत आहे. सबब मूळ हेतूच्या विरुद्ध त्यांतली वाटेल ती जागा इतरांस देणें योग्य नाहींच. याविषयीं कोर्टांत जबानी देण्याचा प्रसंग आला तरी मी असेंच सांगेन, अशा अर्थाचें त्यांनीं तासभर भाषण केलें. लोकमान्यांच्या या स्पष्टवक्तेपणाबद्दल इतर सभासदांनाहि आश्चर्य वाटलें. नंतर नानासाहेब कारखान्यांतील मंडळींस म्हणाले 'लोकमान्यांनीं जर असे निर्वाणीचे उद्गार काढले आहेत तर आतां मी तरफदारी करणार नाहीं व तुम्हींहि तो नाद सोडून द्यावा."

वगैरे हकीगत रा. वामन मेरेश्वर पोतदार यांनीं टिळकांच्या आठवणींत सविस्तर दिली आहे.

राजकीय चळवळींत राष्ट्रीय पक्ष सरकार-विरोधी व सरकारच्या गैरमर्जीतला असल्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत राष्ट्रीय पक्षाचेंच साहाय्य घ्यावें आणि इतर लोकांचें साहाय्य घेऊं नये अशी आकुंचित दृष्टि त्यांनीं पुढें ठेविली नाहीं. राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न पक्षभेदातीत आहे, या कामीं

१ ( लो. आ. व आ. भाग १ ला. पा. २८१ )

राष्ट्रीय, नेमस्त, तसेंच सरकारी आणि बिनसरकारी अशा सर्व गृहस्थांची मदत घ्यावयाची असें गुरुवर्यांनीं प्रथमपासूनच ठरविलें होतें. समर्थ-विद्यालयाच्या पहिल्या अवतारांत राष्ट्रीय पक्षाचीच मदत त्यांनीं घेतली. परंतु त्याचा परिणाम अनिष्ट होऊन सरकारचा संशय शाळेच्या ध्येयाविषयीं जास्त दृढ झाला. अशा संशयास पुनः जागा राहूं नये म्हणून या खेपेस लोकमान्यांची मदत त्यांनीं घेतली नाहीं. पुढें ना. गोखले वारल्यावरहि त्यांच्या वजनाचा उपयोग करून पुनः आपलें मध्येंच बंद पडलेलें ज्ञानसत्र सुरूं करावयाचें असें अण्णासाहेबांनीं ठरविलें. समर्थ विद्यालयाकरितां वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची त्यांची तयारी होती. परंतु कसेंहि करून आपल्या समर्थ विद्यालयाचें पुनरुज्जीवन केल्यावर आपण सर्व बालविद्यार्थ्यांच्या समवेत मोठ्या सुखानें कालक्रमण करूं अशीहि त्यांची इच्छा होती. "समर्थ विद्यालय पुनः सुरू करण्यास सरकार कधींहि परवानगी देणार नाहीं, उगीच कशाला त्रास घेतां?" असा उपदेश पुष्कळ लोक अण्णांना करीत. परंतु "यत्न तो देव जाणावा" ही समर्थोक्ति त्यांच्या जिव्हाग्रीं खेळत होती. शिवाय परमेश्वरावर त्यांची अनन्य निष्ठा होती. वरील निरुत्साही लोकांच्या शब्दांवर त्यांचा कधींहि विश्वास बसला नाहीं. कांहींहि झालें तरी हरकत नाहीं, आपली संस्था स्थापावयाची, प्रयत्नांत कसूर करावयाची नाहीं, हा अण्णांचा बाणा ठरलेला होता. त्यामुळें त्यांचे प्रयत्न जोरानें चालू होते. त्यांतच गोखल्यांचे स्नेही या नात्यानें सर महादेवराव चौबळ यांनीं गुरुवर्यांना फारच मदत केली. या गोष्टीचा प्रस्तुत ठिकाणीं प्रामुख्यानें उल्लेख करणें जरूर आहे.

ना. गोखले पुण्यांत असतांना अण्णासाहेब त्यांच्या 'सरव्हंट ऑफ इंडिया सोसायटीं'तच उतरत. यामुळें ना. गोखल्यांच्या सान्निध्यानें गोपाळराव देवधर व सर महादेवराव चौबळ यांचा अण्णांच्यावर चांगला लोभ जडला होता. सर महादेव यांच्याप्रमाणें या प्रसंगीं गोपाळराव देवधर यांनीं पुढाकार घेतला, व वाटेल ती मदत अण्णांना करण्याचें अभिवचन दिलें. शिक्षणसंस्था उघडण्यासाठीं स्थापन केलेल्या नूतन–महाराष्ट्र–विद्याप्रसारक मंडळाचे स्वत: अध्यक्ष होऊन एक वर्षभर प्राथमिक तयारीसाठीं संस्थेमध्यें रहाण्यासहि ते कबूल होते. परंतु कांहीं अडचणीमुळें पुढें ते अध्यक्ष झाले नाहींत. लागलींच चौबळांनीं व देवधरांनीं खटपट करून रा. ब. चितळे

(अहमदनगर), प. लो. रा. ब. ग. कृ. साठे (सोलापूर), रा. ब. ग. कृ. खोपकर (पुणें), व रा. ब. ग. ना. खेर, प्रो. ह. रा. दिवेकर (हिंगणें), प्रि. ज. र. घारपुरे (मुंबई) व स्वत: अण्णासाहेब अशा आठ जणांची कमेटी नेमण्यांत आली, आणि सर महादेवराव चौबळांनीं स्वत: अध्यक्षस्थान पत्करलें.

अशा रीतीनें अपेक्षेप्रमाणें सर्व गोष्टी जुळून आल्यावर चौबळांनीं नू. म. वि. प्र. मंडळाचे अध्यक्ष या नात्यानें सरकारकडे पत्र धाडलें. मंडळ रीतसर नोंदलें गेलें व हा शिक्षण-प्रयोग यशस्वी होवो असा शुभ आशीर्वादहि २५ आक्टोबर १९१८ रोजीं सरकारनें दिला. अशा प्रकारें ज्या वेळीं नवीन समर्थ विद्यालय उघडण्याची परवानगी आली, तेव्हां गु. अण्णासाहेबांना आपण आज कृतार्थ झालों याबद्दल धन्यता वाटली.

पूर्वीचें समर्थ विद्यालय बंद झाल्यावर कांचकारखान्यांतील मंडळींना सामान ठेवण्यास व राहण्यास जुन्या इमारती गुरुवर्यांनीं दिल्या होत्या. पण विद्यालय सुरू करण्याचें ठरल्यावर या इमारती त्यांनीं परत मागितल्या. या कामीं स्वजनांकडूनहि बराच त्रास झाला. विद्यालयाच्या वार्षिक वृत्तांतांत गुरुवर्य लिहितातः—

"परमेश्वरकृपेनें अनुकूल असलेली आमची जमीन व इमारती हीं साधनें दुर्दैवानें आमचीं आम्हांस हस्तगत करण्यास अत्यंत प्रयास पडले व मनासहि पीडा झाली. आम्हांपासून ज्यांना पुष्कळ उपयोग झाला अशा आमच्या शेजाऱ्यांनींच[1] आम्हांस अडीच वर्षांचा उपयोग व्हावा तसा नीट होऊं दिला नाहीं. आतां आम्ही जें लवकर करूं तें आम्हांस १९१९ च्या जानेवारींतच करितां आलें असतें. परंतु गेल्याचा शोक करून उपयोग काय? तसें म्हटलें तर सारासार विचार केल्याशिवाय सरकारनें १९१० सालींच आमचें विद्यालय बंद केलें तेव्हांपासूनच

---

१ नवीन समर्थ विद्यालय काढण्याच्या वेळीं कांच-कारखान्याच्या चालकांच्या ताब्यांत जुन्या विद्यालयाच्या इमारती होत्या. सदर इमारती न. स. विद्यालयास घेतांना गु. अण्णांना बराच त्रास झाला त्यास उद्देशून हे गुरुवर्यांनीं मोठ्या खेदानें उद्गार काढले आहेत.

आमचीं आठ वर्षे गेलीं. त्यांत आमच्याच लोकांनीं आणखी २ वर्षांची भर घातली हेंहि ईश्वरी सूत्रच समजून पुढच्या मार्गास लागावें हेंच बरें. ही कर्मकथा उकरून काढण्याचें वस्तुत: कांहीं कारण नाहीं......"

( न. स. विद्यालय–वृत्त, शके १८४३ पा. १४।१५ )

लागलीच सुमुहूर्तावर पहिल्याच जागीं सर महादेव चौबळ यांच्या हस्तें नवीन श्रीसमर्थ विद्यालयाची स्थापना झाली. या प्रसंगीं बाळासाहेबांनीं समर्पक शब्दांत गुरुवर्य अण्णासाहेबांची चिकाटी व करारीपणा यांचें वर्णन केलें. ते म्हणाले:–गेलीं दहा वर्षें प्रो. विजापुरकरांनीं या नवीन समर्थ विद्यालयासाठीं अविश्रांत श्रम केले व त्यांचेंच दृश्य फल आज त्यांना मिळालें आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. ही सध्यांची शिक्षणपद्धति एकांगी आहे असें प्रो. विजापुरकर म्हणतात तें सर्वस्वीं खरें आहे. औद्योगिक व शास्त्रीय अशा शिक्षणाची आज जरूरी आहे. सरकारी खात्यांतील स्वातंत्र्यविघातक नोकरीकडे या संस्थेतील विद्यार्थ्यांनीं अगदीं पाहूं नये. या संस्थेत शिक्षणाचें माध्यम मराठी असल्यामुळें विद्यार्थ्यांना इंग्रजीहि लौकर समजतें, असा अनुभव आहे. याबद्दल एकदां माझें ना. गोखल्यांबरोबर भाषण झालें होतें. तेव्हां ते म्हणाले, विद्यार्थ्यांना जर मराठींतून शिक्षण दिलें तर त्यांना इंग्रजीचा अभ्यास करणें फार सोपें जातें...येथें या शिवाय माझ्या स्वतःच्या सूचनेप्रमाणें इंग्रजीचा विशेष अभ्यास करण्यासाठीं एक वर्ष जास्त ठेविलें आहे. यामुळें विश्वविद्यालयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांची सोय झाली आहे. अशा प्रकारें शिक्षणक्रम जर यशस्वी झाला तर सध्यांच्या शिक्षण–क्रमांत मोठी क्रांति घडून येईल व मग सर्व सरकारी व निमसरकारी संस्था हाच शिक्षणक्रम स्वीकारतील अशा प्रकारचा सुदिन पहाण्यास मी अगर प्रो. विजापुरकर असणार नाहींत. तरी, जनतेनें हा नवीन शिक्षणप्रयोग यशस्वी करण्यास सढळ हातानें मदत करावी.

"सर्व शिक्षणक्रम औद्योगिक व वाङ्मयात्मक असून त्याचें माध्यम मराठी रहाणार आहे. दुय्यम भाषा म्हणून इंग्रजी शिकविलें जाणार आहे. शिवाय सरकारी शिक्षणखात्यानेंहि संस्थेस मान्यता दिली आहे. धार्मिक शिक्षणासंबंधीं मला कांहींहि म्हणावयाचें नाहीं. प्रो. विजापुरकरांची धर्मनिष्ठ सात्त्विकतेची प्रत्यक्ष मूर्ति डोळ्यांपुढें असल्यावर मी तरी जास्त काय सांगणार ? "साधी राहणी व उच्च विचार-

**सरणी** (Plain living and high thinking ) **असा जर नमुना पहावयाचा असेल तर तो प्रो. विजापुरकरांव्यतिरिक्त दुसरीकडे कोठेंहि दिसणार नाहीं.** अशा प्रकारच्या सर्वमान्य शिक्षण–प्रयोगास आपण सर्वजण मदत करावी."

नवीन समर्थ विद्यालय अशा प्रकारें ना० चौबळ त्यांचे हस्तें स्थापन करण्यांत आलें. या कामीं ना. चौबळांची आपणांस फार मदत झाली, आपण त्यांचें फार आभारी आहोंत असें अण्णासाहेब नेहमीं म्हणत. शेवटीं त्यांचा व चौबळांचा जरी मतभेद झाला तरी ते त्यांच्याविषयीं नेहमीं आपला आदरभाव व्यक्त करीत असत. गुरुवर्यांच्या साधुतुल्य आणि निरिच्छ राहणीचा व एकनिष्ठ वागणुकीचा सर महादेव यांच्या मनावर फारच चांगला परिणाम घडला. मंडळाचे ते पहिले अध्यक्ष झाले, इतकेंच नव्हे तर "विद्यालयाकरितां एक लाख रुपये एका वर्षांत आपण मिळवून देऊं" असें त्यांनीं अण्णासाहेबांना अश्वासन दिलें. दोघांनाहि तो विचार पसंत पडला, आणि विद्यालयासाठीं रक्कम गोळा करण्याची जोरानें सर्वांनीं खटपट केली. स्वतः ना. चौबळांनीं आपला १००० रुपयांचा आंकडा घातला तेव्हां अण्णांनींहि आपली ४००० ची विम्याची पॉलिसी संस्थेच्या नांवाची केली. एका वर्षाच्या आंतच चौबळांनीं सुमारें ५०००० रुपये संस्थेला मिळवून दिले. पण दुर्दैवानें पुढें चौबळांचा व अण्णासाहेबांचा वर दाखविल्याप्रमाणें कांहीं बाबतींत मतभेद होऊन चौबळांनीं संस्थेशीं असलेला आपला संबंध कायमचा सोडला. त्यामुळें संस्थेचें आर्थिक दृष्टीनें नुकसान झालें. अशा रीतीनें पुढें जरी दोघांमध्यें मतभेद झाले, तरी त्यांच्या खाजगी स्नेहसंबंधांत यत्किंचित्‌हि अंतर पडलें नाहीं. जेव्हां जेव्हां सर महादेवांच्या संबंधीं गुरुवर्य बोलत तेव्हां चौबळांविषयींचा त्यांचा आदर दृष्टीस पडत असे. अशा प्रकारची परमताविषयींची सहिष्णुता व त्याच वेळीं त्या व्यक्तीविषयींची पूज्यबुद्धि आजकाल फारच थोड्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडेल.



## प्रकरण तेरावें

# अखेरचे काळजीचे दिवस

**या कर्मभूमींत कार्य करीत असतां देह पडण्यांत सार्थक आहे.**

**—गु. अण्णासाहेब.**

आपला निधनकाल जवळ आला आहे असें पाहून श्रीसमर्थ आपल्या शिष्यांना म्हणाले, बाबांनो ! हा प्रसंग सर्वांवर येणार आहे; उगीच वाईट कां वाटून घेतां ? उलट मला निरोप द्या. दासबोध स्वरूपानें मी तुमच्या-जवळ नित्य आहे. अशीच स्थिति गु. अण्णांची झाली. वास्तविक त्यांची सर्व राहणी एकाद्या जुन्या काळच्या मुनीप्रमाणें होती. रोज सकाळीं नित्य नैमित्तिक कृत्यें झाल्यावर दासबोधाचें वाचन करावें. मग सकाळच्या डांकेनें आलेलीं वर्तमानपत्रें वाचून जगाची बातमी पहावी व दुपारीं अगदीं मोजकें अन्न खाऊन पुनः रोजचें लेखनवाचन करावें; नंतर पुनः आपल्या सभों-वतीं विद्यालयांतील बालगोपाल जमवून त्यांच्याशीं प्रेमानें इकडच्या तिक-डच्या गोष्टी बोलाव्यात आणि पुनः सूर्य अस्ताचलावर गेल्यावर आपल्या खोलीबाहेरच्या पडवींत एक दीड तास फिरावें, असा त्यांचा क्रम अगदीं ठरूनच गेला होता.

पावसाळ्यांत तळेगांवची हवा फारच कुंद असते. दरसाल श्रीसमर्थ विद्यालयाच्या आसपासच्या भागांत सुमारें ४०।४५ इंच पाऊस पडतो व सभोंवतीं एका बाजूला भाताचीं खाचरें असल्यामुळें पावसाळी हवा लागल्या-बरोबर एकदम वातावरण बदलतें. घाटावरून जोराचे वारे येतात. त्यामुळें उष्णता मुळींच नसते. उलट येथें राहणें आल्हादकारक असतें. नवीन विद्या-र्थ्यांना व शिक्षकांना पावसाळी हवा पचनीं पडल्यावर पुढें दोनतीन वर्षांनीं तिचाहि विशेष त्रास होईनासा होतो.

१९२१च्या मार्च महिन्यांत पावसाळ्यांतच अण्णा नागपूर—उमरावतीकडे आपल्या शाळेस मदत मिळविण्यासाठीं फिरत होते. तेथें थंडीनें नोव्हेंबरमध्यें त्यांची प्रकृति थोडी बिघडली व ते कसेबसे तळेगांवीं आले. कांहीं दिव-सांनीं प्रकृतींत फरक पडला तरी दमा व खोकला हा विकार या आजारांत

त्यांना जो एकदां जडला तो मात्र कमी झाला नाहीं. ' अण्णा, तुम्ही पावसाळ्यांत तळेगांवीं न राहतां यवत, पुणें वगैरे ठिकाणीं कोठें तरी कोरड्या हवेंत राहा, ' असा त्यांना डॉक्टरांनीं व वैद्यांनीं सल्ला दिला. त्याप्रमाणें ते एक वेळ यवतला जाऊन राहिले होते. परंतु तेथेंहि पुनः समर्थ विद्यालयांतील एक विद्यार्थी हवा पालट करण्यास आला होता, तो एकाएकीं मृत्युमुखीं पडला. यामुळें एकदां आपल्या कर्मभूमीकडे ते आले ते पुनः दुसरीकडे गेले नाहींत. यानंतर तीन पावसाळे अण्णांनीं तळेगांवीं काढले. ' आपण आतां दुसरीकडे कोठेंच जाऊं नये. सरतेशेवटीं आपल्याला या कर्मभूमींतच देह सोडून निघून जावें लागेल अशी आपली शेवटची इच्छा आहे' असें ते बोलून दाखवीत.

दिवसेंदिवस अण्णांची शक्ती थोडी थोडी कमी होत जात होती. तरी त्यांचें नेहमींचें औषध, ठराविक अन्न व दूध नियमित प्रमाणांत चालू असे. त्याचप्रमाणें सायंकाळीं तासभर खोलीबाहेर इकडून तिकडे फिरणें हेंहि कायम होतें. कांहीं दिवस विद्यालयाच्या आवारांतच ते सडकेवरून फिरत. परंतु पुढें पडवींत फिरण्याचीहि शक्ति राहिली नाहीं व बाहेर फिरतांना जोराचें वारें लागे म्हणून पडवींतून फिरण्याचें त्यांनीं टाकून दिलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्यांचा सर्व क्रम नियमित असे, यामुळेंच पावसाळी खराब हवाहि त्यांना तितकी जाणवली नाहीं.

पण १९२४ अखेर त्यांची प्रकृति जरा नादुरुस्त झाल्यामुळें, शिकविण्याचें दगदगीचें काम त्यांना होईना. तेव्हां त्यांनीं तें काम सोडून दिलें, तरी एखादे वेळीं ते प्रौढ विद्यार्थ्यांना गीतारहस्यांतील कांहीं भाग शिकवीत असत. पण कांहीं कालानें तेंहि त्यांनीं सोडून दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं विद्यालयांतील आजन्म सेवक व कायम नौकर यांच्यामध्यें मतभेद झाला. व सरतेशेवटीं त्याचें पर्यवसान असें झालें कीं, २।३ आजन्मसेवकांनीं राजीनामे दिले. त्यामुळें बरीच खळबळ उडाली. या वेळींच आपल्या जबाबदारीकडे व कर्तव्याकडे जरा दुर्लक्ष करून एका आजन्म सेवकांनीं अण्णांच्या चांगुलपणाचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला. व त्यामुळें पुढें ४।५ शिक्षकांना विद्यालय सोडून जावें लागलें. चार वर्षें काम करणाऱ्या एका शिक्षकासहि विद्यालय सोडून जावें लागलें. नंतर अण्णांचे प्रतिनिधि या नात्यानें त्यांचे बंधु वासूनाना हे कांहीं दिवस काम पहात असत. परंतु विद्यालयाच्या कार्यांत

सहकार्य व सलोखा राहिला नाहीं. या सर्व अडचणी पुढें आल्या तेव्हां अण्णांना वाईट वाटलें. त्यांतूनहि प्रकृति जरा बिघडल्यामुळें, त्यांच्या मनावर या सर्व बदललेल्या परिस्थितीचा चमत्कारिक परिणाम झाला. हा गवगवा वर्तमानपत्रांतूनहि पुन: सुरू झाला. तेव्हां मात्र परिस्थिति विशेष बिकट झाली. एकंदरींत या मधल्या एका विचित्र प्रकारानें संस्थेच्या कार्यांत बराच अडथळा उत्पन्न होऊन त्याचा परिणाम अण्णांच्या मनावर फार अनिष्ट झाला.

१९२५ चा पावसाळा सुरू झाला. नेहमींप्रमाणें या वेळींहि अण्णांची प्रकृति जरा बिघडली होती. मध्यंतरीं घडलेल्या कटु प्रसंगामुळें त्यांच्या चित्तास स्वास्थ नव्हतें. या वेळीं मात्र त्यांना वाटूं लागलें कीं, आपली प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत आहे व आपण यांतून बरे होणार नाहीं, यांतच आपणांस इहलोकची यात्रा संपवून स्वस्थानीं जावें लागेल. सरतेशेवटीं मृत्युकालापूर्वी एक दिवस अगोदर आपल्या शेजारच्या नोकरास सहज विनोदानें ते म्हणाले " आतां मला नोटीस ( परमेश्वराकडून ) मिळाली आहे. हळूहळू आम्हीं वाट चालूं लागलों आहोंत." हें बोलणें त्या अडाणी मनुष्यास कसें समजणार ?

मृत्युपूर्वी एक दिवस आधीं रात्रीं बराच वेळ बसून त्यांनीं संस्थेसंबंधीं व्यवस्थापत्रक केलें. आपल्या पॉलिसीचे रु. ५ हजार संस्थेसच मिळावेत असें एक कलम त्यांत त्यांनीं घातलें होतें. ग्रंथमाला वगैरेसंबंधींचे मालकी हक्क मात्र त्यांनीं आपल्या बंधूकडे दिले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नित्याच्या क्रमाप्रमाणें ते पहाटे उठले, परंतु त्यांची प्रकृति बरीच अस्वस्थ होती. इतकें होतें तरी नेहमींप्रमाणें स्वत:चीं सर्व कामें ते स्वतःच करीत होते. इतकी निरलसता व काटकवृत्ति त्यांच्या अंगीं पूर्णपणें बाणली होती !

दुपारीं १२ वाजतां प्रकृति जास्त बिघडली म्हणून पुण्यास डॉक्टरांना बोलावणें पाठविलें. परंतु पुढें एका तासाच्या आंतच सर्व कारभार आटोपला ! बरोबर १२॥ वाजतां अण्णा इहलोक सोडून गेले.

पुण्यास ही बातमी लागलीच चोहोंकडे पसरली. त्याबरोबर प्रो. वा. म. जोशी वगैरे मंडळी मोटारीनें तळेगांवीं गेली. सर्वांनीं इंद्रायणीच्या पवित्र

कांठावर उभे राहून अण्णांचें शेवटचें दर्शन घेतलें आणि अग्निस्वरूपानें परलोकीं गमन करणाऱ्या त्यांच्या आत्म्यास एकवार पुनः प्रदक्षिणा घालून सर्व मंडळी स्वस्थानीं परतली.

दुसऱ्या दिवशीं तारेनें अण्णांच्या निधनाची बातमी चोहोंकडे कळली. महाराष्ट्रांतील अनेक लोकांना त्यांच्या मृत्यूमुळें पुष्कळ वाईट वाटलें. स्वधर्म, स्वभाषा, स्वदेशाभिमान या त्रयींचा मूर्तिमंत पुतळा विष्णुअण्णा होत असें पुष्कळ लोक म्हणत.

अण्णांना शेवटीं शेवटीं तळेगांवच्या आपल्या कर्मभूमीचें अत्यंत महत्त्व वाटत होतें. श्रीज्ञानेश्वर, तुकाराममहाराज, श्रीमोरया गोसावी इत्यादि साधु-संतांच्या सान्निध्यामुळें पावन झालेली ही देहूजवळची पावनभूमि त्यांना फार प्रिय वाटत होती. साधुसंतांनीं पवित्र केलेल्या या कर्मभूमींत, श्रीशिवाजी महाराजांच्या मावळ्यांनीं व महाराष्ट्रांतील मराठे सैनिकांनीं जेथें रणधुमाळी माजवून विजयश्री मिळविली त्या ऐतिहासिक समरभूमींत, अगर महाराष्ट्राच्या राष्ट्रीय शिक्षणाची मुहूर्तमेढ जेथें रोविली गेली त्या श्रीसमर्थ विद्यालयाच्या कर्मभूमींत गु. अण्णासाहेब यांनीं आपल्या फार दिवसांच्या इच्छेप्रमाणें देह ठेविला. या कर्मभूमींत कार्य करीत असतां देह पडण्यांतच माझें सार्थक आहे असें ते पुष्कळ वेळां म्हणत, त्याचप्रमाणें घडलें. राष्ट्रीय शिक्षणाच्या पवित्र कार्यांत चंदनाप्रमाणें झिजलेला त्यांचा देह इंद्रायणीच्या पवित्र कांठावर श्रीविष्णुस्वरूपीं विलीन झाला.

आज पुण्याकडे येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस अण्णा विजापुरकरांची आठवण झाल्याबांचून रहात नाहीं. अण्णांच्या राष्ट्रीय कार्यामुळेंच पंचक्रोशींतलें हें समर्थ विद्यालय आज महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणाचें केंद्रस्थान म्हणून प्रसिद्ध झालें आहे.

अण्णांच्यासारखे महापुरुष, अण्णांच्यासारखीं कर्तीं निष्ठावंत माणसें आणि अण्णांच्या प्रमाणें अहोरात्र निरपेक्षतेनें वाङ्मयतप आचरणारे पवित्र महात्मे जेव्हां भारतवर्षांत उत्पन्न होतात तेव्हां राष्ट्र उन्नतीस चढण्यास उशीर लागत नाहीं. आणि म्हणूनच अण्णासाहेबांचें स्फूर्तिदायक चरित्र आम्हीं महाराष्ट्रीय जनतेपुढें ठेविलें आहे.

---

# प्रकरण चौदावें

## अण्णांच्या चरित्राचें रहस्य

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ।।**

—श्रीभगवद्गीता १७-१५

अण्णांचा अमर आत्मा इहलोक सोडून गेल्यास आज सुमारें २।। वर्षे होत आलीं, तरी महाराष्ट्रीयांच्या हृदयांत त्यांची स्मृति अगदीं ताजी आहे. आजच्या महाराष्ट्रीय तरुण पिढींतील प्रत्येक तरुणानें अण्णांचा कित्ता अह-र्निश डोळ्यापुढें ठेवावा, इतकें त्यांचें आयुष्य शुद्ध व पवित्र होतें. ज्यांनीं ज्यांनीं त्यांना समर्थ विद्यालयाच्या आवारांत फिरतांना पाहिलें त्यांच्या मनांत अद्यापि त्यांची ती खुजी, जाड्या भरड्या खादीच्या कपडयानें विभू-षित झालेली मूर्ति डोळ्यांपुढें आल्यावांचून राहणार नाहीं. विष्णुअण्णा म्हटले कीं, अण्णांची ती सतेज व दिसावयास भोळी अशी मूर्ति पुढें येते. श्रीसमर्थ विद्यालयाच्या कर्मभूमींत राष्ट्रीय शिक्षणाकरितां देह झिजविणाऱ्या त्या आधुनिक मुनिवर्यांची तीच मूर्ति दृष्टीस पडते. अण्णांनीं राष्ट्रीय शिक्ष-णाच्या कार्यांत आपलें सर्व आयुष्य खर्च केलें व राष्ट्रहितासाठीं एकाच कार्यांत आपलें सर्वस्व तनमनधन कसें अर्पण करावें याचा धडाच त्यांनीं महाराष्ट्रास घालून दिला आहे. महाराष्ट्रानें सर्वतोपरी आज श्रीसमर्थ विद्याल-यास मदत करून अण्णांच्याबद्दल आपली कार्यनिष्ठा व कर्तव्यबुद्धि दाखविली पाहिजे. आतां येथें अण्णांचें चरित्र महाराष्ट्रीय तरुणांना कसें आदर्शभूत आहे याविषयीं थोडी माहिती देऊन आह्मी वाचकांची रजा घेतों.

आज कोणतेंहि एक ध्येय मनांत धरून कार्यनिष्ठ होऊन काम करणाऱ्या तरुणांची महाराष्ट्रास जरूरी आहे. ध्येय पुढें न ठेवल्यामुळें राष्ट्रीय वृत्ती-च्या तरुणांची आज फार कुचंबणा झाली आहे. ध्येय पुढें नसल्यामुळें आजचा विद्यार्थीवर्ग अस्थिर व चंचल बुद्धीचा दिसत आहे. अण्णांनीं राष्ट्रीय शिक्षणाचें एकच ध्येय पुढें ठेवून तें साधण्यासाठीं अत्यंत कष्ट सोसले व सरकारी " मकर–दाढेंत " गेलेला राष्ट्रीय शिक्षणाचा मणि बाहेर काढला. यासाठीं त्यांना सतत आठ वर्षें खटपट करावी लागली.

नानासाहेब ओकांच्या सारखीं तेजस्वी माणसें घडपड करून दमलीं. व आतां समर्थ विद्यालय सुरू होत नाहीं असें म्हणून स्वस्थ बसणाऱ्यांना अण्णांनीं धीर देऊन सांगितलें " उत्तिष्ठत, जाग्रत. " त्यांचा आत्मविश्वास फार दांडगा असल्यामुळें 'श्रीसमर्थ विद्यालय सुरू करून दाखवीन व मगच कार्य करीत असतां बालगोपालांत या कर्मभूमींतच देह ठेवीन' अशी आपली प्रतिज्ञा, असा उत्साह व तरुणांना लाजविणारी अशी धडाडी त्यांनीं महाराष्ट्रास दाखविली.

महाराष्ट्रांतील तरुणांना अण्णांचा दुसरा दिव्य संदेश म्हणजे **"कर्तव्य-कर्म करा"** हा होय. आजकाल शाळा—कॉलेजांतून बाहेर पडलेले तरुण लोक केवळ पैसा कसा मिळवावा, या विवंचनेंत असतात. ज्यांना नोकरी नाहीं ते नोकरी मिळविण्याची खटपट करतात, ज्यांना नोकरी आहे ते वरिष्ठांची मर्जी संपादून जास्त पैसा मिळविण्यासाठीं हपापलेले असतात असें चोहोंकडे दिसतें. जे धनवान असतात त्यांना मला मानमरातब व कीर्ति कशी मिळेल ही विवंचना लागलेली असते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कनक व कीर्ति यांसाठीं सर्व लोक खटपट करीत असतात. परंतु अशा प्रकारें कोणताहि पोटाचा उद्योग करीत असतांना मनुष्यानें आपलें कर्तव्य-कर्म करण्यास चुकूं नये असें अण्णांचें स्पष्ट मत होतें. रोजच्या गरजांपैकीं एखादी कमी जरूरीची वस्तु न घेतां तो पैसा कोणत्या तरी राष्ट्रीय कार्यास द्या, असें अण्णासाहेब नेहमीं आपल्या विद्यार्थ्यांना म्हणत. राष्ट्रीय कार्यास मदत करणें हें आपलें कर्तव्यकर्म आहे असें ते म्हणत आणि शेवट-पर्यंत त्याच कार्यांत त्यांनीं आपलें तनमनधन घातलें.

स्वदेशावर स्वधर्मावर आणि स्वभाषेवर अण्णासाहेबांचें अत्यंत प्रेम होतें. त्यांचा स्वदेशाभिमान उत्कट होता. त्यांची धर्मश्रद्धा अलौकिक होती. त्याचप्रमाणें त्यांची मराठी भाषेची सेवाहि श्रेष्ठ होती. महाराष्ट्रीय तरुणांचें तिसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे त्यांनीं आपला स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांचा अभिमान धरावा. तसेंच प्रत्येकानें स्वभाषेकरितां कांहीं तरी स्वार्थत्याग करावा. अण्णांची भाषाविषयक कामगिरी ग्रंथमालेच्या द्वारें आज महा-राष्ट्रापुढें आहे. परिशिष्टांत दाखविल्याप्रमाणें ग्रंथमालेनें १२ वर्षांच्या अल्पा-वधींत सुमारें २४००० पृष्ठें मजकूर महाराष्ट्र भाषेच्या कोठारांत सांठविला व सुमारें १५० नवीन लेखकांना पुढें आणलें. मराठी भाषेंत अमुक विष-

यांवर वाङ्मय नाहीं, तमुक विषयांवर नाहीं हा ' नन्नाचा ' पाढा वाचून स्वस्थ न बसतां ' दिसामाजि कांहीं तरी ते लिहावें । अखंडीत तें सर्व वाचीत जावें ॥ असा बहुमोल उपदेश त्यांनीं नवीन होतकरू लेखकांना केला. अशा दृष्टीनें अनेक लेखकांना अण्णांनीं उत्तेजन दिलें. सर्वांना गुरु-स्थानीं शोभेल असा अण्णांचा अधिकार होता. पुष्कळ मंडळीहि अण्णांचा थोर अधिकार व त्यांची सत्प्रवृत्ति व कार्यनिष्ठा पाहून त्यांना गुरुजीप्रमाणें मान देत व त्यांचा अभिप्राय मोठ्या आदरानें घेत. अण्णाहि तितक्याच उत्सुकतेनें पाठविलेल्या ग्रंथांचें परिशीलन करीत व त्यावर स्वमतानिदर्शक खुणा करीत. ते केवळ मजकूरच पाहात नसत तर शुद्धाशुद्धहि पाहात. त्यांच्या एका शिष्यानें त्यांना एक पुस्तक पाठविलें असतां अभिप्रायांत अण्णा लिहितातः "पृष्ठ—वर आपल्या नांवापुढें M. A., S. T. C. असें पाहिजे. A व S यांमध्यें—अर्धविराम नाहीं तेथें तो पाहिजे." दुसऱ्या एकास एकदां त्यांनीं लिहिलें: पृष्ठ—वर घनःशाम असें लिहिलें आहे तेथें घनश्याम पाहिजे. तिसऱ्या एका शिष्यांना लिहिलें "हा भाग पुस्तकांत घातला नसता तरी चाललें असतें." इतकें त्यांचें बारीक पाहणें होतें. अण्णांच्या सारखी अहोरात्र देशाची, भाषेची, व धर्माची काळजी वाहणारीं कार्यनिष्ठ नररत्नें फारच विरळ सांपडावयाचीं !

अगदीं लहानपणापासून सर्वांबद्दल उदार बुद्धि ठेवून वागावें, असा गुरुवर्यांचा नियमच होता. शाळेंत अगर कॉलेजांत असतां ते सर्व विद्यार्थ्यांच्या फार उपयोगी पडत; इतकेंच नव्हे तर गरीब विद्यार्थ्यांना वाटेल ती मदत करण्यास ते एका पायावर तयार असत. कोणाला कांहींहि मदत लागली कीं गुरुवर्यांचें घर प्रत्येकाला अगदीं आपल्या घराप्रमाणें असे. कॉलेजांत प्रोफेसर असतां घरीं लागेल तो पैसा ठेऊन बाकीचा पैसा ते लोककारणीं खर्चून टाकावयास मागें पहात नसत. कोणतेंहि नवें काम निघालें कीं, त्यास मदत करावयास गुरुवर्यांचा पाय पुढें असे. सुमारें ४० वर्षांच्या त्यांच्या सार्वजनिक आयुष्यांत त्यांनीं पुष्कळांना मदत केली. साधारणपणें आजपर्यंत त्यांनीं ६ ते ७ हजार रुपयांपर्यंत सार्वजनिक संस्थांना मदत केली.

गुरुवर्य डॉ. भांडारकरांचें स्मारक करण्याची कल्पना निघाली तेव्हां त्या सभेंत गुरुवर्य हजर होते. सर्वांच्या आधीं त्यांनीं आपला शंभर रुपयांचा आंकडा प्रथम घातला. तसेंच आपले बाळपणींचे स्नेही ना. गोखले यांच्या

स्मारकाचा प्रश्न निघतांच गुरुवर्योनीं १०० रुपये स्मारक कमिटीकडे पाठविले. सर्वांना मदत करावी हें गुरुवर्यांचें मत शेवटपर्यंत कायम होतें. समर्थ विद्यालयांतील शिक्षकांनाहि गुरुवर्यांची वाटेल तेव्हां मदत होत असे. नूतन महाराष्ट्र विद्या-प्रसारक मंडळाची चालक मंडळी एखादे वेळीं मदत देऊं नये असें म्हणत, तेव्हां गुरुवर्य स्वतःच्या जबाबदारीवर वाटेल त्यांस मदत करीत. गुरुवर्यांना धोरण नाहीं असें या बाबतींत कांहीं मंडळी म्हणत. भर्तृहरीनें वर्णिल्याप्रमाणें आपल्या आचरणांत सन्मित्रलक्षण दिसेल अशी गुरुवर्यांची थोर वागणी होती. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं पुष्कळांना साधुत्व आणि वेडेपणा दिसत असे. सर्वांशीं उदारबुद्धीनें वागा, देव तुम्हांस कधींहि कमी पडूं देणार नाहीं, असें त्यांचें सर्वांना सांगणें असे.

सर्व शिक्षकांनीं, विद्यार्थ्यांनीं आणि इतर जनांनीं सभ्यतेनें वागावें, असें गुरुवर्य नेहमीं म्हणत. विशेषतः गृहस्थांनीं विद्यार्थ्यांशींहि फार ममतेनें वागावें. सभ्यता अंगीं न धरल्यामुळें मनुष्य उगीच जगाच्या उपहासास प्राप्त होतो असें ते म्हणत, आणि कायावाचामनेंकरून दुसऱ्यास यत्किंचित्‌हि त्रास होणार नाहीं अशाबद्दल ते काळजी घेत. पुण्यासारख्या विद्येच्या माहेरघरीं पुष्कळ लोक वार लावून विद्यार्थ्यांची जेवणाची सोय करितात; परंतु त्यांचें वर्तन पुष्कळ वेळां बेपर्वाईचें असतें यासंबंधीं सहानुभूतीनें सर्वांशीं वागावें असें अण्णा म्हणत. एके ठिकाणीं सभ्याचारासंबंधीं लिहितांना गुरुवर्य म्हणतात, "दैवदुर्विलासानें मनुष्य गरीब स्थितींत असला तर त्यास श्रीमंतांनीं

> कमीपणा येईल असें संबोधणें किंवा आपल्या अशा स्थितीबद्दल हे आपणांस वाईट वागवितात असें वाटूं देणें हा असभ्यपणाचा प्रकार आहे. ज्यांना दोन दिवस आज अनुकूल आहेत अशांनीं एखाद्या गरीब विद्यार्थ्यास वार दिलेला असतो. त्या मुलाला "वारकरी" म्हणून हांका मारणें ठीक नव्हे. त्याच्या देखत त्याला वारकरी म्हटल्यानें बाकीची मंडळी मागाहून तसेंच म्हणतात या शब्दाऐवजीं त्याचें नांव लक्षांत ठेऊन तें घेतलें तर किती बहारीचें होईल ! किंवा निदान या "शाळेच्या मुलाला" असें ह्मटलें तर चालेल. आज या मुलावर हा प्रसंग आला आहे. कोण जाणे तुमच्याच नातवापणतांवर हा न येईल ह्मणून!"[1]

---

१ लोकशिक्षण ( १९१३ ) व. २ अं. १ पा. १०२.

अशा स्पष्ट शब्दांत असभ्यपणें वागणाऱ्या शिष्यांची गुरुवर्यांनीं कानउघाडणी केली आहे. या प्रकरणाच्या शिरोभागीं दिलेला गीतेंतील श्लोक सर्वांनीं लक्षांत ठेवावा असें ते वारंवार म्हणत.

ममता म्हणजे आत्मीय भावना; सर्व लोकांविषयीं गुरुवर्यांच्या मनांत नेहमीं आत्मीयता असे. लहान वयाच्या विद्यार्थ्यांच्याबर अण्णांचें पुत्रनिर्विशेष प्रेम असे. नवीन विद्यार्थी विद्यालयांत आला कीं प्रथम अण्णा स्वतः त्याबद्दल माहिती विचारीत. त्याचप्रमाणें अनेक मोठी मंडळी त्यांची भेट घेण्यास तळेगांवीं जात तेव्हां त्यांच्याशीं अगदीं घरोब्यानें अण्णा बोलत. अण्णासाहेबांची सात्त्विक मूर्ति पाहून सर्वांना अत्यंत आदर वाटत असे. जसा मनुष्य भेटेल तसें त्याच्याशीं बोलावयाचें असा त्यांचा नियम असे. कधीं ते विद्यालयांत येणाऱ्या विद्वान पाहुण्यांबरोबर विद्यालयांतील अडचणींचा उल्लेख करीत, कधीं बहुश्रुत विद्वानांबरोबर प्रस्तुत शिक्षणशास्त्राबर विचारविनिमय करीत, अगर कधीं दुपारच्या भोजनानंतर आपल्या खोलीबाहेरील उघड्या जागेंत एखाद्या अल्पवयी बटूबरोबर बोलत बसत आणि आज सकाळीं फराळ केला कां? सकाळीं भाऊंनीं काय शिकविलें? असे प्रश्न विचारून त्याची ग्रहणशक्ति कशी आहे हें पहात. ते विद्यार्थ्यांत मिसळून वागत आणि त्यामुळें त्यांना फार आनंद होत असे. लहान मुलांना एक

---

१. समर्थ विद्यालयांत शिक्षकांशीं बोलतांना विद्यार्थ्यांनीं घरच्या मंडळीप्रमाणें वागावें अशी गुरुवर्यांची इच्छा होती. शिक्षकांना हांका मारतांना इतर शाळांमधून आठवले मास्तर, रानडे मास्तर, असे शब्दप्रयोग विद्यार्थी करितात; ती पद्धति टाकून शिक्षकांच्या घरच्या नांवांनीं म्हणजे भाऊ, पंत, बापू, तात्या, दत्तोपंत अशा नांवांनीं शिक्षकांना संबोधण्याची रीति गुरुवर्यांनीं अमलांत आणिली. तसेंच इतर ठिकाणीं नवी रेसिडेन्सी, जुनी रेसिडेन्सी असे शब्दप्रयोग उपयोगांत आणले जातात; त्या ऐवजीं आतां नवीन समर्थ विद्यालयांत तात्याचाळ, नानाचाळ, बाळचाळ, अण्णाचाळ अशीं नांवें पाडलीं आहेत. या चारी चाळींना एकेवेळचे समर्थ विद्यालयाचे चालक तात्यासाहेब करंदीकर, नानासाहेब ओक, बाळासाहेब चौबळ आणि गु. अण्णासाहेब विजापूरकर यांचीं नांवें देण्यांत एक प्रकारचें औचित्यच दिसून येतें.

तास आनंदांत ठेवणें म्हणजे एक तास परमेश्वरास संतुष्ट ठेवण्यासारखें आहे असें म्हणतात तें गुरुवर्यांच्या बाबतींत अगदीं खरें होतें.

गुरुवर्यांची वागणूक इतरांना आदर्शवत् अशी होती. प्रातःकालीं उठून नित्यविधि झाल्यावर त्यांचीं रोजचीं वाचनमननादि कार्यें अगदीं सुरळीत-पणें सुरू होत. सकाळीं ७। वाजले कीं, उच्च वर्गांचा कांहीं अभ्यास घ्यावा, आणि नंतर इतर कामें करावींत. नंतर रोजचें टपाल पाहून लागलींच सर्वांना आपल्या स्वतःच्या सहीनें उत्तरें लिहून टाकावींत असा त्यांचा ठराविक कार्यक्रम असावयाचाच. याशिवाय गुरुवर्यांची पुष्कळ शिष्यमंडळी आपलीं स्वतःचीं पुस्तकें अभिप्रायासाठीं पाठवीत. त्यांनाहि एका आठवड्याच्या आंत स्वतःच अभिप्राय कळविण्याचें कामहि बिनबोभाट होत असे. गुरुवर्यांचें लिहिणेंहि खुलासेवार आणि सविस्तर असे. अगदीं शेवटच्या घटकेपर्यंत ते स्वतःच आपला पत्रव्यवहार करीत होते. इतका निय-मितपणा सध्यां फारच थोड्यांच्या ठिकाणीं पहावयास सांपडतो. गुरु-वर्यांच्या अनेक गुणांपैकीं नियमितपणा या गुणाचें विद्यार्थ्यांनीं अवश्य अनुकरण केलें पाहिजे.

" वेश असावा बावळा । परी अंतरीं नाना कळा ॥ " असें सज्जनांचें वर्णन श्रीसमर्थांनीं केलें आहे तें गुरुवर्यांच्या बाबतींत अगदीं खरें होतें. त्यांचा तो साधा वेष, डोक्यास साधा पांढरा स्वच्छ खादीचा रुमाल, तसेंच नेसावयास साधा खादीचा पंचा, अंगावर छत्री ऐवजीं घेतलेली पांढरी घोंगडी पाहून, हा कोणी तरी पांथस्थ ब्राह्मण असावा असें पुष्कळांना वाटत असे. पुण्यास एका प्रोफेसरांकडे एकदां अशा पोषाखानें गुरुवर्य गेले असतां हा कोणी तरी पांथस्थ ब्राह्मण कांहीं तरी धर्म करा असें सांगावयास आला असेल असें जाणून सदर प्रोफेसरांच्या पत्नीनें " घरीं कोणी नाहींत " असें सांगून प्रो. विजापुरकरांची बोळवण करण्याचा प्रयत्न केला असें म्हणतात. परंतु या वेळीं प्रोफेसर महाशय घरांतच होते, त्यांनीं गुरुवर्यांचा शब्द ओळखून त्यांना पुनः मागें हांका मारली व मोठ्या आदरानें त्यांचें स्वागत केलें. इतका साधेपणा त्यांचे हाडींमाशीं खिळला होता. हा मनुष्य इंग्रजी शिकला असेल असें कोणालाहि वाटत नसे. गुरुवर्य अंमळनेरला एकदां राष्ट्रीय शाळेंत व्याख्यानास गेले होते. गाडींतून उतरल्यावर ते तडक स्टेशनवर मुखमार्जनादि कृत्यें व स्नान करून धोतर वाळवीत बसले

होते. त्यांना उतरून घेण्यास बरीच मंडळी स्टेशनावर आली होती. परंतु प्रो. विजापूरकर कोणते याचा तपास त्यांना मात्र लागला नाहीं असें म्हणतात. सर्व प्रातःकर्मे आवरल्यावर ते शाळेंत गेले तेव्हां सर्वांना आश्चर्य वाटलें. गुरुवर्यांचा पोषाख जरी अगदीं साधा असे तरी त्यांचे विचार उदात्त असत. "साधी राहणी परंतु उच्च विचारसरणी" असें त्यांचें वागणें असे.

गुरुवर्यांचे ठिकाणीं अलौकिक ईश्वरनिष्ठा होती ही गोष्ट सर्वांस माहीत आहे. यामुळें अनेक मोठमोठ्या संकटांतून पार पडतांना त्यांना कधींहि भीति अगर त्रास वाटला नाहीं. परमेश्वरावर निष्ठा ठेऊन ते आपलीं सर्व कार्ये उरकीत. संकटसमयीं परमेश्वरावर भरंवसा ठेऊन वागत. "जेव्हां जेव्हां मीं अगदीं अडचणींत सांपडतों, तेव्हां परमेश्वराचें नांव घेतों आणि त्यामुळें माझीं संकटें अचानकपणें नाहींशीं होतात," असें अनेक वेळां ते म्हणत. यावरून त्यांची ईश्वरनिष्ठा किती थोर होती हें स्पष्ट दिसून येतें. या ईश्वरनिष्ठेच्या जोरावर अनेक मोठमोठीं कामें त्यांना पार पाडतां आलीं. सरकारनें समर्थ विद्यालय बंद केलें आणि दोन तीन वर्षे परिश्रम करूनहि विद्यालय पूर्ववत् चालू करण्याचे सर्वांचे प्रयत्न शिथिल झाले तेव्हां कच खाऊन गुरुवर्य हताश झाले नाहींत. त्यांनीं आपले प्रयत्न चालू ठेविले होतेच. सरतेशेवटीं त्यांची आशा सफल झाली आणि नवीन समर्थ विद्यालय अस्तित्वांत आलें. ईश्वरावर निष्ठा ठेवून वागणारीं गुरुवर्यांच्या सारखीं नर-रत्नें खरोखर धन्य होत. अशी अविचल ईश्वरनिष्ठा अंगीं बाणण्यासाठीं प्रत्येक तरुणानें प्रयत्न केला पाहिजे.

अण्णा जरी वयानें व ज्ञानानें वृद्ध झाले होते, तरी त्यांचीं कार्ये बिन-बोभाट घड्याळाप्रमाणें चालत होतीं. त्यांनीं स्वतंत्र ग्रंथरचना जरी फारशी केली नाहीं तरी त्यांचें नांव मराठी भाषेच्या संवर्धनाचे कार्यांत अखंड नमूद केलेलें राहील. राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य त्यांनीं हातांत घेतलें, त्यासाठीं श्रीसमर्थ विद्यालय स्थापिलें, त्या समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनासाठीं आठ वर्षे पुनः भगीरथ प्रयत्न केले व सरतेशेवटीं नवीन श्रीसमर्थ विद्यालय स्वतःच्या प्रयत्नानें अगदीं बिकट परिस्थितींत उघडून आपली कार्यनिष्ठा जगास दाखविली आणि सरतेशेवटीं आपल्या नवीन समर्थ विद्यालयावर पुत्र-निर्विशेष प्रेम करून त्या समर्थ व पवित्र भूमींतच आपला देह ठेवला.

गुरुवर्य अण्णासाहेब कैलासवासी होऊन आज २ वर्षे होऊन गेलीं. त्यांच्या मागें त्यांचें अपत्य ' नवीन श्रीसमर्थ विद्यालय ' महाराष्ट्रांत अद्यापि कार्य करीत आहे. गुरुवर्यांनीं आपल्या प्राणांपलीकडे जपलेली आणि वाढविलेली अशी ही संस्था आहे. राष्ट्रीय शिक्षणाची आद्य संस्था या दृष्टीनें ही संस्था नमुनेदार आणि व्यवस्थित चालावी अशासाठीं चालकांनीं अटोकाट प्रयत्न चालविले आहेत, ते सफल करणें आज सर्व महाराष्ट्रीयांच्या हातांत आहे. ही संस्था नीट चालण्यास जर महाराष्ट्रांतून पुरेशी मदत झाली तर हेंच अण्णांचें एक योग्य स्मारक होणार आहे.

अण्णांचें हें चरित्र वाचून अण्णांची कार्यनिष्ठा, स्वभाषाप्रेम, स्वदेशाभिमान व खरें कार्य करण्याची तळमळ जरी महाराष्ट्रांतील एका तरुणांत उत्पन्न झाली तरी लेखकाच्या श्रमाचें चीज होईल. महाराष्ट्रीय तरुणांनो ! तुम्हांला अण्णांनीं एकच संदेश ठेविला आहे तो म्हणजे—

..."पूर्ण उत्साह बाळगून जुटीनें कार्य करा म्हणजे प्रतिकूल भासणाऱ्या परिस्थितींतहि राष्ट्रीय विद्यापीठाचा उत्कर्ष होऊन राष्ट्रीय शिक्षणवृक्ष निःसंदेह फोंफावेल. आज पालवी झडलेली दिसली तरी ती पुनः फुटेल. पण यत्न प्रचंड पाहिजे; कारण कार्य मोठें आहे. ':यावान् यक्षस्तावान् बलिः"

Great is the glory for the triumph is great.

ऋषींच्या त्या गेल्या सकलहि सुविद्या इथुनि हो।
महाव्या भूपांची अवनि विपदा भोगित कि हो ॥
स्थिती ही देखोनि रत तुमचि उद्योगिं मति हो।
निजले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥



## प्रकरण पंधरावें

# समारोप

एको हि दोषो गुणसन्निपाते ।
निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ।।

—कालिदास

गुरुवर्य अण्णासाहेब विजापूरकर यांचें चरित्र येथें संपलें. महाराष्ट्रांतील सर्व ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांना गुरुवर्यांचें चरित्र कसें आदर्शभूत झालें आहे तें मागील एका प्रकरणांत लेखकानें सांगितलें आहेच. पण आतां शेवटच्या समारोपांत एक दोन गोष्टींचा उल्लेख करावयाचा आहे.

मनुष्यप्राणी नैसर्गिक रीत्या स्खलनशील आहे. जगांत असा एकहि मनुष्य दाखवितां यावयाचा नाहीं कीं जो परिपूर्ण आहे आणि जो आपल्या सर्व आयुष्याच्या कालांत एकहि चूक करणार नाहीं. परंतु मोठ्या लोकांच्या कीर्तिवलयांत त्यांचे बारिक सारिक दोष लपून जातात असेंच म्हटलें पाहिजे. इतका वेळ आह्मी अण्णासाहेबांची स्तुतिपूर्ण शब्दांत वाचकांना ओळख करून दिली त्यावरून ते सर्व मानवी दोषांपासून अगदीं अलिप्त होते असें नाहीं. अगदीं त्यांच्या टीकाकारांच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे ( १ ) ते स्वतःच्या हिताविषयीं अगर कुटुंबाविषयीं बेपर्वा होते, ( २ ) त्यांच्या योजना अव्यवहार्य होत्या, व ( ३ ) त्यांच्या ठिकाणीं वाजवीपेक्षां जास्त सरळपणा होता. अशा तीन गोष्टींचा उल्लेख करून टीकाकारांनीं अण्णासाहेबांच्यासंबंधीं तीन आक्षेप घेतले आहेत. वास्तविक खरें पाहतां हे तीनहि आक्षेप एका दृष्टीनें खरे आहेत असेंच म्हटलें पाहिजे.

पहिल्या आक्षेपाचा विचार करितां तो आक्षेप साधारणपणें खरा आहे असें म्हणावें लागतें. कोल्हापुरांत असतां आपल्या पगारांतून कांहीं रक्कम घरखर्चासाठीं ठेवून बाकीची सर्व रक्कम ते आपल्या सार्वजनिक कार्यांत खर्च करीत. घरच्या प्रपंचाकडे मग त्यांचें बिलकूल लक्ष नसे. कधींकधीं तर जेवणापलिकडे त्यांचें घरीं येणेंहि नसे. घरीं स्वजनांशीं बोलणेंहि अगदीं नेमस्त मोजकें असे ! घरीं वडिलांबरोबर अगर मातुश्रीबरोबर इतकेंच नव्हे तर स्वतःच्या पत्नीबरोबर ते कधीं प्रपंचाच्या गोष्टी बोलत बसले असें

कधींहि कोणीं पाहिलें नाहीं. कधीं कधीं निकटवर्ति जन म्हणत " अण्णा! तुम्ही कुटुंबाविषयीं फार बेपर्वा आहांत " तर जगाच्या प्रपंचांत गुरफटून गेल्यामुळें ते ' होय ' असेंच उत्तर देऊन वेळ मारून नेत. घरच्या प्रपंचा-पेक्षां बाहेरच्या प्रपंचाकडे त्यांचें जास्त लक्ष होतें.

आतां दुसरा आक्षेप म्हणजे त्यांच्या सर्व योजना अव्यवहार्य अशा होत्या. कोल्हापूरला अनेक सहकारी संस्था काढावयास अण्णासाहेबांनीं इतरांना उत्तेजन दिलें. तसेंच समर्थ विद्यालयांत अनेक औद्योगिक योजना त्यांनीं तयार केल्या. परंतु त्या सर्वस्वीं यशस्वी झाल्या असें म्हणतां येत नाहीं. या योजना त्यांनीं पुष्कळ विचार करून केल्या, परंतु त्या तडीस नेण्यास त्यांना योग्य आणि बाकब मनुष्यें मिळालीं नाहींत हेंच खरें. ' पैशाशिवाय खऱ्या कार्यकर्त्या माणसांची जास्त जरूरी आहे ' असें अनेक वेळां अण्णा म्हणत असत. राष्ट्रीय शाळा चालविण्यासाठीं कांहीं तरी उद्योग चालकांनीं केला पाहिजे असें त्यांचें मत होतें. विद्यालयाचा एक छापखाना काढून त्यापासून विद्यालयास कांहीं फायदा व्हावा अशी एक योजना त्यांनीं केली होती. त्या-प्रमाणें छापखाना सुरुंहि झाला होता. परंतु हा छापखाना तळेगांवीं यशस्वी होऊं शकला नाहीं. आतां छापखाना संस्थेनें मोठ्या प्रमाणांत सुरुं केला आहे. छापखान्याचें शिक्षणहि विद्यार्थ्यांस द्यावयाचें असा एक हेतु योज-नेंत होता. पण तो हेतु आतां मागें पडला असेंच म्हटलें पाहिजे. त्याच-प्रमाणें चोहोंकडे विद्यालयाभोंवती पाणी खेळवून एक छोटी बाग तयार कर-ण्याची एक योजनाहि अर्धवटच पडली. या कामीं योग्य मनुष्यें गुरुवर्यांना मिळालीं नाहींत हेंच खरें. कारण ज्या गोष्टी इतरत्र शक्य झाल्या त्या येथें शक्य होऊं शकल्या नाहींत याला कारण म्हणजे तज्ज्ञांचा अभाव हें होय ! दुसरें काय ?

तिसरा आक्षेप मात्र सर्वस्वीं खरा आहे. स्वत: गुरुवर्य अत्यंत शुद्ध आणि सरळ; त्यांना मनुष्यांची योग्य पारख मात्र अगदीं शेवटपर्यंत झाली नाहीं. समर्थ विद्यालयाच्या पहिल्या अवतारांत रा. बापू देसाई, कै. नाना ओक, प्रो. वा. म. जोशी, तात्यासाहेब करंदीकर यांच्या सारखी वेचक आणि कार्यनिष्ठ मंडळी अण्णांशीं सहकार्य करण्यास पुढें सरली, त्याप्रमाणें पुढें १० वर्षांनीं समर्थ विद्यालयाच्या दुसऱ्या अवतारांत मात्र एकदोन लायक व्यक्ती-

शिवाय चांगलीं माणसें त्यांना मिळालीं नाहींत. कांहीं होतकरू तरतरीत आणि तरुण विद्यार्थ्यांना त्यांनीं स्वत:च्या मुलाप्रमाणें प्रेमानें वागविलें आणि ' माझ्या उतारवयांत हींच मुलें संस्था चालवितील असें ते सर्वांना सांगत. पण गुरुवर्यांच्या सरळ स्वभावाला जगांतील निरनिराळ्या मानवी स्वभावांचें यथार्थ ज्ञान व्हावें तसें झालें नाहीं. ज्या मंडळीवर त्यांची दृढ श्रद्धा होती तीच मंडळी " अण्णांची बुद्धी आतां चळली, त्यांना कांहीं समजत नाहीं " असा उपदेश करूं लागली तेव्हां मात्र गुरुवर्यांना वाईट वाटलें. १९२४।२५ सालीं त्यांचें उतार वय झालें होतें. शक्ति क्षीण झाली होती. तळेगांवच्या दमट हवेंत सतत राहिल्यामुळें त्यांना थंडीचा विकारहि झाला होता. मग अशा स्थितींत आहे त्या स्थितींतच त्यांनीं आनंद मानला. तरी पण त्यांच्या मनाला मात्र खरें स्वास्थ्य नव्हतें. लहान बालविद्यार्थी त्यांच्या सभोंवतीं सारखे असत. तशा स्थितींतहि आपल्या विद्यार्थ्यांच्या समवेत आनंदानें ते काल घालवीत असत. पण त्यांच्या चित्तास शांतता नव्हती. क्वचित् प्रसंगीं नवीन कलमबहाद्दर आणि शिस्तवाल्या मंडळींचा त्यांना तिटकारा येई. ' काय करूं? इलाज नाहीं. माझी प्रकृति जर चांगली असती तर या सर्वांना काढून टाकून नवीन मंडळी ठेविली असती. पण......आतां मला कोठें जावबत नाहीं म्हणून ही मंडळी डोईजड झाली आहेत " असें ते म्हणत. असो ! या ठिकाणीं आम्हांस एकच गोष्ट सांगावयाची म्हणजे गु. अण्णांना आपल्या मदतनीसांची पारख नीट करितां आली नाहीं हेंच स्पष्ट होतें.

असे दोन तीन दोष गुरुवर्य विष्णु गोविंद विजापूरकर यांच्या चरित्रांत दिसून येतात. पण त्यांच्या अंगच्या दुसऱ्या अनेक गुणांच्या सागरांत हे तीन दोष कोठें दडून जातात तें मात्र समजत नाहीं. ज्याप्रमाणें अगदीं निर्मल आणि स्वच्छ प्रकाश देणाऱ्या भगवान् निशानाथाच्या ठिकाणीं असणारा लहान काळा डाग रात्रीच्या शीतल चंद्रिकाप्रकाशांत दिसत नाहीं त्याप्रमाणें प्रस्तुतचे दोषहि अगदीं दिसत नसत.



## विद्यासूक्तम्

**विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम । गोपाय मां शेवधिष्टेऽहमस्मि ।**
**असूयकायानृजवेऽयताय । न मा ब्रूया वीर्यवती तथा स्याम् ॥**
**य आतृणत्यवितेथन कर्णा- । व दुखं कुर्वन्न मृतं संप्रयच्छन् ।**
**तं मन्येत पितरं मातरं च । तस्मै न द्रुह्येत्कतमच्चनाह ॥**
**अध्यापिता ये गुरुं नाद्रियन्ते । विप्रा वाचा मनसा कर्मणा वा ।**
**यथैव ते न गुरोर्भोजनीया । स्तथैव तान्न भुनक्ति श्रुतं तत् ॥**
**यमैव विद्याः शुचिमप्रमत्तम् । मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम् ।**
**यस्मै न द्रुह्येत्कतमच्चनाह । तस्मै मा ब्रूयान्निधिपाय ब्रह्मन् ॥**

सदर औपनिषदीय स्तोत्राचें गु० अण्णासाहेबांनीं पुढें दिल्याप्रमाणें सुंदर
भाषांतर केलें आहे. —**लेखक.**

विद्या येउनि ब्राह्मणास वदली रक्षीं मला आदरें ।
तूंतें होइन थोरलाच निधि मी मानीं सदा हें खरें ॥
आहे मत्सरयुक्त ना सरळ जो नाहींच जो संयत ।
त्यातें अर्पुं नकोच वीर्यवति मीं होईन हें निश्चित ॥ १ ॥

काना जो उघडी गुरू हळुहळू शिष्यांचिया मानसीं ।
ओतीं सत्य न लावितां सुळिं ढका बुध्दी करी छानसी ॥
ऐशा शिष्यजनीं पिता च अथवा माता न कां मानणें ।
त्याचा द्रोह करूं नयेचि कधिंही चित्तीं सुळीं आणणें ॥ २ ॥

विद्या जी गुरुनें बरीच दिधली संपादुनी छात्र जे ।
त्यातें आदरिती कधीं न वचनें चित्तें कृतीनेंहि जे ॥
शिष्यांना असल्या जशी न गुरुची लाभे कधींहि कृपा ।
विद्या देइल ती कधीं तरि फला त्यांना कशी सांग पां ॥ ३ ॥

ज्यां तूं जाणसि शुध्द आणिक कसा देईल चित्ता सदा ।
धीमान् जो शुचि ब्रह्मचर्यव्रत जो पाळी सदा सर्वदा ॥
द्रोहा जो न कधीं करील तुमच्या रक्षी दिला जो निधी ।
ऐशा शिष्यजनां पढीव विमला आटेल दोषांबुधी ॥ ४ ॥

# प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर

[ शैक्षणिक व वाङ्मयिक कार्य ]

## भाग दुसरा

### ( विषय-प्रवेश )

गेल्या विभागांत अण्णासाहेबांच्या चरित्रांतील सर्व प्रमुख भाग वर्णिला असून आतां प्रस्तुत विभागांत त्यांच्या समग्र आयुष्याचें जें एक विशिष्ट ध्येय **राष्ट्रीय शिक्षण** आणि तदंगभूत वाङ्मयकार्य यांविषयीं प्रस्तुत ठिकाणीं थोडेसें विस्तृत विवेचन करावयाचें आहे.

अण्णांनीं आपलें सर्व आयुष्य राष्ट्रीय शिक्षणाला वाहिलें आणि तेंच कार्य अखेरपर्यंत करीत असतां त्यांनीं आपला देह ठेविला. राष्ट्रीय शिक्षणा-इतकीच त्यांची दुसरी महत्त्वाची कामगिरी वाङ्मयासंबंधीं होय. ग्रंथमाला आणि विश्ववृत्त या दोहोंच्या द्वारें त्यांनीं मराठी वाङ्मयाची निरपेक्ष सेवा केली. सुप्रसिद्ध विसुभाऊ राजवाडे यांचे ऐतिहासिक संशोधनात्मक लेख आणि मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें प्रथम ग्रंथमालेनेंच उजेडांत आणलीं आणि कित्येक अज्ञात लेखकांना लेखनव्यवसाय पुढें चालू ठेवण्यास ग्रंथमालेनें एक प्रकारें उत्तेजन दिलें असें म्हटलें पाहिजे. मराठी साहित्यपरिषदेच्या बैठकी-कडे त्यांचें नेहमीं लक्ष असे. इतकेंच नव्हे तर दोन वेळां परिषदेसाठीं त्यांनीं निबंधहि पाठविले होते, हें पुढील प्रकरणीं वाचकांना समजून येईलच. त्याचप्रमाणें अण्णांचीं धार्मिक, सामाजिक आणि राजकीय मतें कशीं होतीं, वगैरे माहितीहि या विभागांत पुढें दिली आहे. तसेंच सध्या कोणत्याहि चरित्रांत न दिसून येणारी अशी माहिती म्हणजे चरित्रनायकाच्या आठवणी आणि चरित्रास पोषक अशीं मूळ कागदपत्रें परिशिष्टांत दिलीं आहेत. अण्णांच्या चरित्राचें अगदीं सूक्ष्म अध्ययन करणारास हीं फारच महत्त्वाचीं वाटतील.

## प्रकरण सोळावें

# राष्ट्रीय शिक्षणाचा पूर्वेतिहास

### राष्ट्रीय–शिक्षण–चतुःसूत्री

" आमचें राष्ट्रीय शिक्षण महाराष्ट्र भाषेंतून, महाराष्ट्रांतील मराठी भाषेंतून शिक्षण घेऊं शकणाऱ्या लोकांसाठीं—महाराष्ट्र हा भाषादृष्ट्या मानलेला हिंदुस्थानचा भौगोलिक विभाग आहे—(अशा महाराष्ट्रांतील) लोकांचे हितसंबंधाचा मुख्यत्वेंकरून विचार करून चालविलेलें शिक्षण, त्यांचा धर्म, त्यांची परंपरा व त्यांनीं वसविलेला भूमिभाग आहे त्याची माहिती मिळेल व त्यांच्याविषयीं सदभिमान जागृत राहील असें शिक्षण असा आमचा अर्थ आहे."

—महाराष्ट्रीय शिक्षण ( आत्मोद्धार ).

" राष्ट्रीय शिक्षण व सरकारी विद्याखात्याचें शिक्षण असा भेद सर्वस्वीं लुप्त व्हावा, अशी आमची मनापासूनची इच्छा आहे."

—महाराष्ट्रीय शिक्षण ( आत्मोद्धार. )

" सरकार व प्रजा एकाच राष्ट्राची असल्याशिवाय शिक्षणाची खरी शिस्त बसणें शक्य नाहीं."

—ग्रंथमाला १९०६—१२. ६. पा. ३२

" राष्ट्राचा उत्कर्ष साधणारें शिक्षण तेंच राष्ट्रीय शिक्षण. "

१२ मे १९०७ ( धारवाडचें व्याख्यान )

National Education is education conducted along national lines, controlled by the representatives of the nation, and so controlled and conducted that it should have for its object the realization of the national destiny.

**[ Babu Bipin Chandra Pal,** 1905 ]

That education is national which is for the people, by the people, and of the people.

**[ Lala Lajpat Rai. ]**

गेल्या विभागांत गुरुवर्य विजापुरकरांच्या चरित्राचा वाचकांना परिचय करून दिला आहे. आतां प्रस्तुत दुसऱ्या भागांत महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणास अनुकूल अशी भूमिका प्रथम कशी तयार झाली आणि नंतर राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य पुढें कसें वाढत गेलें याचाच प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे.

प्रत्येक देशाचा उत्कर्ष त्या देशांतील तरुणांना देण्यांत येणाऱ्या शिक्षणावर अवलंबून आहे ही गोष्ट आज प्रत्येकास पटत चालली आहे व त्याप्रमाणें चोहोंकडे देशांतील शिक्षणपद्धति कशी सुधारावी, अगदीं थोडया खर्चांत काटकसरीनें तरुण पिढीला कसें उत्कृष्ट शिक्षण देतां येईल आणि या उच्च शिक्षणानें तरुणांनीं आपलें स्वतःचें व त्याबरोबर आपल्या देशाचें आत्यंतिक हित कसें करावें याबद्दल राष्ट्रांतील नेते पुरुष विचार करीत आहेत. आज आपल्या देशांत राष्ट्रीय शिक्षणास अत्यंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. त्यांतूनहि पारतंत्र्यांत पडलेल्या राष्ट्रांतील शिक्षणाचा प्रश्न जास्त बिकट आहे. देशांत जर राष्ट्रीय सरकार असेल तर वाटेल तेव्हां आपल्या देशाच्या गरजेप्रमाणें शिक्षणांत फरक करतां येतो. परंतु परकीय अमलाखालीं असलेल्या देशांतील शिक्षणाची योजना, व परिस्थिति परावलंबी अतएव यदृच्छेनें आखलेली असल्यामुळें राष्ट्रहिताच्या प्रश्नांस गौणत्व येतें, असा अनुभव आहे. दुर्दैवानें हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धति परकीय सरकारच्या तंत्रानें चाललेली असून परकीय लोकांनींच आंखली असल्यामुळें ती सदोषच असणार. तींत आमूलाग्र फरक करून अभिनव हिंदी राष्ट्राच्या आकांक्षा ज्या योगें तृप्त होतील आणि ज्यायोगें हिंदी राष्ट्राचें हित होईल, असा मार्ग शोधून काढणें आज जरूर झालें आहे.

सध्यां जगांत उन्नतीच्या शिखरावर आरूढ झालेल्या देशांकडे नजर टाकल्यावर १९ व्या शतकाअखेर हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांना स्पष्टपणें दिसून आलें कीं, देशांतील प्रचलित शिक्षणपद्धतीमुळें, तरुण पिढीच्या आयुष्याचा व उत्साहाचा बराच अपव्यय होत आहे. आणि ही अनिष्ट परिस्थिति न सुधारल्यास देशाचें पुष्कळ नुकसान होणार आहे. अशा परिस्थितींत आज ७५ वर्षें हा प्रश्न लोकांच्या पुढें असून त्यावर पुष्कळ विचार झाला आहे. आणि आतां तो सुटण्याच्या मार्गास लागला आहे.

प्रस्तुत स्थळीं राष्ट्रीय शिक्षणाच्या दृष्टीनें महाराष्ट्रांतील शिक्षणक्रमांत कशी उत्क्रांति होत गेली, आणि महाराष्ट्रांतील शिक्षणाच्या इतिहासांत आमचे

चरित्रनायक गुरुवर्य प्रो. वि. गो. विजापूरकर यांचें कार्य कशा रीतीनें फलदायी झालें आहे हें पुढील प्रकरणांत पहावयाचें आहे.

## परकीय शिक्षणपद्धतीचा आरंभ

१९ व्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानांतील बराचसा भाग ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत गेला. त्या वेळीं देशांत चोहींकडे प्राचीन परंपरेप्रमाणें लोकांनीं स्थापन केलेल्या पाठशाळा होत्या. प्रत्येक खेडेगावांत चावडी, सार्वजनिक मारुतीचें देवालय अगर ग्रामस्थांच्या मुलांकरितां प्राथमिक स्वरूपाच्या शाळा व वरिष्ठ जातींच्या मुलांकरितां संस्कृताध्ययनासाठीं संस्कृत पाठशाळा असावयाच्याच असा क्रम अगदीं ठरलेलाच होता. परंतु कालांतरानें ब्रिटिश अंमल सुरू होतांच अत्यंत प्राचीन काळापासून चालत आलेल्या ग्रामपंचायतीसारख्या संस्था मोडकळीस आल्या व त्यामुळें त्यांवर आधारभूत अशी समाजरचनाहि ढांसळली. पुढें नवीन उभारलेल्या संस्थांना पूर्वीचा पाया नसल्यामुळें त्या संस्थाहि मृतप्राय झाल्या. त्या वेळीं देशाच्या परीस्थितीस अनुरूप अशा शाळा पुष्कळ होत्या, पण शासनसत्तेच्या आकस्मिक फेरबदलामुळें या शिक्षणसंस्था कालांतरानें आपोआप बंद पडल्या.

अशा रीतीनें जुन्या शिक्षणसंस्था एका बाजूनें नष्ट होत असतां व दुसऱ्या बाजूला नुकत्याच दृढ झालेल्या परकीय सत्तेचे पाय रोवले जात असतां या परकीय शासनसत्तेस स्वतःच्या दृढीकरणासाठीं जनतेमध्यें सहानुभूति उत्पन्न करणें आवश्यक झालें असावें यांत विशेष नवल नाहीं. नंतर राज्यकारभाराच्या सोईसाठीं कारकुनी पेशाची मंडळी तयार करून त्यांच्या कडून सर्व काम करवून घ्यावें, मात्र असें करतांना सर्व सूत्रें आपल्या हातांत ठेवावींत-अशी व्यवस्था करणें शासनसंस्थेला क्रमप्राप्तच होतें. यामुळेंच एकंदर शिक्षणक्रमाला मूळपासून जें कारकुनी वळण लागलें आहे तें आजतागायतहि इतकीं वर्षें तसेंच आहे. आतां मेकॉले साहेबांकडून हिंदी शिक्षणपद्धतीची योजना होण्यापूर्वी इकडे कोणती शिक्षणपद्धति होती हें जाणणें जरूरीचें आहे.

तत्कालीन सरकारी पत्रें आणि मिशनऱ्यांचे रिपोर्ट पाहून एकट्या बंगालमध्यें ८०००० देशी शाळा होत्या असें मॅक्समुलरनें लिहिलें आहे. त्याचप्रमाणें ब्रिटिश हिंदुस्थानचा लडको यांनीं जो इतिहास लिहिला आहे त्यांत असें

स्पष्ट म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानांत प्रत्येक गांवांत शिक्षणाची सोय केलेली असतां ग्रामसंस्थांचें उच्चाटन झाल्यावर त्या शाळा नाहींशा झाल्या. इंग्रजी शिक्षण अमलांत येण्यापूर्वी लोकांनीं स्वखर्चानें चालविलेल्या ८०००० शाळा एकट्या बंगालमध्यें होत्या. त्या सर्व शाळा सरकारी उत्तेजनाच्या अभावीं धुळीस मिळाल्या. १८३६ सालीं मेकॉलेनें जो शिक्षणसंबंधीं खलिता पाठविला त्यांत त्यानें म्हटलें कीं, 'सुशिक्षित हिंदी लोक मनानें, बुद्धीनें, नीतीनें, अभिरुचीनें डागळलेले होतील. आणि त्यामुळें इंग्रजांचा हिंदुस्थानाशीं संबंध अबाधित राहील.' यावरून हिंदी लोकांना शिक्षण देण्याचा इंग्रजांचा हेतु कोणता होता याची कल्पना करतां येण्यासारखी आहे.

मेकॉलेसाहेब पुढें म्हणतात " कोणत्याहि हिंदूला एकदां इंग्रजी शिक्षण मिळालें कीं, तो आपल्या धर्माला केव्हांहि चिकटून राहणार नाहीं. मी आंखून दिलेलें शिक्षणाचें धोरण अमलांत आलें तर बंगालमधील वरच्या वर्गांत आणखी ३० वर्षांनीं एकहि मूर्तिपूजक हिंदु औषधास सुद्धां आढळणार नाहीं. मग हिंदु धर्माविषयीं अनास्था आणि मूर्तिपूजेविषयीं अश्रद्धा हिंदु लोकांमध्यें उत्पन्न करण्यास मिशनऱ्यांची जरूरी नाहीं. आमचें शिक्षण त्यांच्या गळीं उतरलें कीं, ते आपल्या संस्कृतीस पारखे झाल्याशिवाय कसे राहतील?" हिंदुस्थानांतील आजच्या शिक्षणाचा पाया मेकॉलेसाहेबांनीं घातला आहे हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. " संस्कृतीला पारखें करणारें, धर्माविषयीं अश्रद्धा आणि अनास्था उत्पन्न करणारें इंग्रजी वळणाचें हें शिक्षण आहे," हे मेकॉलेचे शब्द प्रत्येक हिंदी माणसानें आपल्या मनांत कोरून ठेवावेत. म्हणजे आमच्या देशांतील शिक्षणाधिकारी आतां पूर्वीच्या शिक्षणपद्धतीस नांवें कां ठेवितात याचा सहज उलगडा होईल. मेकॉलेनें आमचा धर्म, आमची संस्कृति, आमची नीति यांचा नायनाट करण्यासाठीं जो डाव रचला आणि बहुतेक यशस्वी करून दाखविला त्याला, आमच्या देशांतील शिक्षणपद्धतींत कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें फरक घडवून आणणें हेंच एक समर्पक उत्तर होय.

अशा रीतीनें मेकॉलेच्या अपेक्षेप्रमाणें शिक्षण सुरू झाल्यावर इंग्लिश राज्यपद्धति या देशांत चिरकाल टिकावी व त्यांस आपल्या संस्कृतीस, धर्मास व देशास परकीयत्वाच्या दृष्टीनें पाहण्यास हिंदी लोकांनीं मदत करावी अशी

संधि प्राप्त झाली. पुढें इंग्रजी शिकलेला मनुष्य एकदम शेंकडयानें पगार मिळवून मोठा हुद्दा मिळवून राज्यकर्त्यांच्या हातांत हात घालून फिरतो अशी स्पृहणीय वृत्ति लोकांच्या अंत:करणांत उत्पन्न झाली आणि लोकहि या अभिनव इंग्रजी शिक्षणास मान देऊं लागले.

पुढें १८५७ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना झाली. देशभाषेच्या उन्नतीसाठीं नवीन साहेब मंडळी नेटिव्हांबरोबर बसून विचारविनिमय करूं लागली. मोठे शास्त्रीपंडित साहेबांभोंवतीं खुर्च्या टाकून बसून देशी भाषेंत ग्रंथ कसे लिहावेत याविषयीं खल करूं लागले. इंग्रजी राज्यांतील तारायंत्र, आगगाड्या, आगबोटी वगैरे नवनवलाच्या सुधारणा पाहून तदिपलेले आमचे शहाणे लोक साहेबवाक्य प्रमाण असें मानूं लागले. मग काय ! नेटिव्हांची पोळी पिकली दुसरें काय ! साहेबानें चार शास्त्री हाताशीं धरावेत, एक मोठा तद्देशीय भाषेचा कोष, व्याकरणें रचावींत, देशांतील भूविभागांचे नकाशे काढावेत आणि अमूक तमूक शास्त्रीपंडितांच्या साह्यानें तयार केले अशी प्रौढी मारावी व मायबाप सरकारच्या पैशानें छापून प्रसिद्ध करावेत असा क्रम सर्रास सुरूं झाला. ही उलाढाल व हा उत्साह केवळ दलित राष्ट्राला जास्त पददलित करण्याकरितांच आहे इतकी दूर दृष्टि आमच्या नेटिव्ह साहेबाला कशी असणार ? ' बा साहेब बहाद्दरा, तूंच प्रतिसृष्टि निर्माण करणारा परमेश्वर आहेस, आम्हां पामराचा तुझ्या शक्तिपुढें काय पाड ?' असें आमच्यांतील शहाणे लोकच या वेळीं म्हणूं लागले होते. पहिल्या इंग्रजी अमलाचा इतका परिणाम चोहींकडे झाला होता.

## शिक्षणाविषयीं बदललेला दृष्टिकोन

मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर २५ वर्षांनीं शिक्षणाची परिस्थिति कशी आहे याविषयीं चौकशी करण्यासाठीं १८८२ सालीं सरकारनें कमिशन नेमलें. त्या वेळीं तत्कालीन शिक्षणपद्धतींत दोष आहेत ते कसे दूर करावेत याकडे देशांतील सर्व विद्वान् मंडळींचें लक्ष गेलें.

मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर जी मंडळी या शिक्षणपद्धतींतून पुढें आली त्या पिढीचें पुढारीपण डॉ. भांडारकर यांचेकडे होतें. या वेळीं सरकारी शिक्षणखात्यांत वरिष्ठ नोकऱ्यांत युरोपियन लोकांचा भरणा जास्त असे आणि सरकारी शाळाखात्याचें काम गोऱ्या वरिष्ठ अंमलदारांमार्फत

होत असे. संस्कृत-मराठी भाषांचा प्रश्न जरी मराठी भाषापंडितांच्या मतानें सुटावयास पाहिजे तरी या बाबतींतहि युरोपियन अधिकाऱ्यांचेंच मत ग्राह्य धरलें पाहिजे असा नियमच झाला होता. यामुळें पुष्कळ वेळां अन्याय होण्याची भीति असे. या वेळीं पौर्वात्य पंडितांची जी परिषद लंडन येथें भरली होती त्या परिषदेस संस्कृतचे महापंडित व संशोधक या नात्यानें मुबई प्रांताचे प्रतिनिधी म्हणून जाण्याचा मान डॉ. भांडारकर यांचा असतां त्यांना मागें टाकून डॉ. पिटरसन यांना सरकारनें पाठविलें. पुढें काठेवाडांतील संस्थानिकांच्या मदतीनें काठेवाडचे प्रतिनिधि म्हणून डॉ. भांडारकर गेले व परिषदेस हजर राहिले ही गोष्ट निराळी. सरकारनें मात्र आपलें पक्षपाती धोरण जगाच्या निदर्शनास आणिलें.

१८८० पासून लोकमतांत विलक्षण क्रांति घडून येऊं लागली. या वेळीं महाराष्ट्रांतील लोकांच्या डोळ्यांत निबंधमालेनें चरचरीत अंजन घातलें होतें आणि महाराष्ट्र–केसरीची गर्जना चोहोंकडे दणाणत होती. सरकारी शिक्षणानें लोक दुबळे होतात व सरकार स्वतः देशाच्या उन्नतीच्या आड येतें, असा सर्व लोकांचा समज झाला होता व त्याचप्रमाणें सध्यांचें शिक्षण निरुपयोगी आहे, त्यांत फरक केला पाहिजे असा एकच ध्वनि चोहोंकडे निघूं लागला. पुढें १८८२ च्या कमिशननें कांहीं किरकोळ सुधारणा केल्या, परंतु महत्त्वाचा असा फरक घडून आला नाहीं. पुढें टिळक, आगरकर, चिपळूणकर प्रभृति मंडळींनीं न्यू इंग्लिश स्कूल काढलें व शिक्षणसुधारणा करण्याचें ठरविलें. सदर शिक्षणास राष्ट्रीय शिक्षण असें नांव चालकांनीं याच वेळीं दिलेलें आढळतें. १८८२ सालीं नेमलेल्या कमिशनचे अध्यक्ष डॉ. हंटर यांना न्यू इंग्लिश स्कूलतर्फे चालकांनीं जें मानपत्र दिलें त्यांत "आम्हीं शिक्षणपद्धति सुधारण्याचा प्रयत्न करीत आहोंत; कारण शिक्षणाचीं सूत्रें देशांतील लोकांच्या हातीं पूर्णपणें असल्याशिवाय कोणतेंहि राष्ट्र उदयास

---

1. We trust you will propose to Government such measures as would encourage *our idea of National Education* and would give a strong stimulus to the free growth of indigenous private enterprize in the country.

येत नाहीं" असा स्पष्ट[2] उल्लेख केलेला आढळतो. सदर मानपत्रास उत्तर देतांना डॉक्टरसाहेबांनींहि अगदीं योग्य असें भाषण करून सांगितलें[3] कीं, देशाची सामाजिक व राजकीय सुधारणा घडवून आणण्यास प्रथम शिक्षण सुधारलें पाहिजे. राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेचें खरें उगमस्थान या मानपत्रांतच आढळून येतें. वर निर्दिष्ट केलेल्या कमिशनपुढील प्रि. वा. शि. आपटे यांची साक्षहि[4] आज राष्ट्रीय शिक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाची अशी

---

2. We believe *a nation that has not taken its education in its own hands cannot soon rise*............and it was this thought that prompted us to open the New English School ...*etc.*

3. I agree that education is at the root of all good, and unless the people of a country take an active and zealous interest in the advancement of education in their country they will never be capable of making any advancement in their political and social status.

4. If Government means to teach the natives of the country the art of self-education as it means to teach the art of self-Government, Government should be ready to introduce a more liberal and less interfering system of grant-in-aid schools. Private institutions ought to be given perfect liberty of action in all internal arrangements......Many managers of aided institutions might desire to make some radical changes in the course of instruction but they dare not do so lest they should be in danger of forfeiting what small grants are placed within their reach.

We would make it as the first condition...that the Inspector will not see by what kind of standards the school course in regulated.

The greatest difficulty is to make the students reproduce the information in English at the time of examination......This difficulty deters teachers from imparting

आहे. न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांच्या डोक्यांत तत्कालीन शिक्षणांतील प्रमुख दोष कसे घोळत होते व शिक्षणापुरतें तरी स्वातंत्र्य साध्य करून घेण्याची महत्त्वाकांक्षा त्यांनीं कशी धरली होती हें या साक्षीपुराव्यावरून स्पष्टपणें सिद्ध होतें. प्रि. आपटे म्हणतात:—

"खासगी शिक्षणसंस्थांची वाढ होण्यास मुभा असावी व शिक्षणाच्या बाबतींत स्वावलंबनाचा धडा आम्हां लोकांनीं शिकावा; प्रचलित शिक्ष-

---

a useful practical or comprehensive knowledge of the subject......The intellectual energies are spent away in learning English first and then the subjects. More than three fourths of the time of a student is taken up in mastering the peculiarities of a foreign language itself. A progressive series for the lower standards of High Schools such as would exactly suit the wants of native youths ought to be prepared by natives themselves.

The monotonously uniform system of instruction conducted upon English models and English tastes, the removing of means by which students may be reminded of their nationality even in innocent sports and games and the adoption of such text-books as Morris' History, the tenor of which goes to magnify British influence and British power and to lower and degrade Indian men and manners...... tend to check the unrestrained growth of natural ( by which I suppose is meant national ) character. The aim of the whole educational system as at present administered appears to me to make the natives speak and write good English and not to enable them to be masters of their own mother tongue, as if the object of the University were to send forth into the world every year a lot of anglicised graduates instead of graduated natives.

Students should be compelled to learn their vernaculars at High Schools more thoroughly than now.

णांत धार्मिक शिक्षणाचा अभाव आहे; शिक्षणपद्धतींत दोष आहेत ते घालविण्यास स्वातंत्र्य पाहिजे. अभ्यासक्रम ठरविण्याचे बाबतींत आम्हांस आमच्या संस्थेचें वैशिष्ट्य राखतां यावें. हल्लींचें ज्ञान घोकंपट्टीचें आहे तें बंद झालें पाहिजे. जवळ जवळ पाऊण हिस्सा वेळ इंग्रजी भाषा शिकण्यांत खर्च होऊन विषयग्रहणास वेळ थोडा उरतो ...... आमचे विद्यार्थी स्वभाषेची हेळसांड करितात, व त्यांचेवर परीक्षांचा अपरिमित बोजा बसतो व ते पदवी मिळविलेले हिंदी नागरिक तयार न होतां आंग्लीभूत पदवीधर दरसाल उत्पन्न करणें हेंच आमच्या युनिव्हर्सिटीचें ध्येय आहे कीं काय असा भास होतो. ”

असें या ठिकाणीं प्रि० आपट्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. साधारणपणें वरील पुराव्यावरून राष्ट्रीय शिक्षणाचीं प्रमुख अंगें ठरलीं तीं अशीं:—

१ शिक्षणाचें माध्यम मातृभाषा हें असावें. २ शिक्षणाचीं सूत्रें स्वजनांच्या स्वाधीन असावींत. ३ शिक्षणानें स्वधर्म, स्वदेश, स्वभाषाभिमान उत्पन्न होईल अशी शिक्षणपद्धति स्वीकारणें. ४ शिक्षणानें स्वतःची व स्वदेशाची उन्नति घडवून आणणें.

## शिक्षण सुधारण्यास सरकारी सहानुभूति व अवकृपा

अशा प्रकारें टिळक-आगरकरांनीं न्यू इंग्लिश स्कूल स्थापून मध्यम वर्गास थोड्या खर्चांत शिक्षण देण्याची योजना यशस्वी करून दाखविली व इतरहि सुधारणा केल्या. डॉ. हंटरसारख्या शिक्षणाधिकाऱ्यानें सदर सुधारणेबद्दल चालकांचे आभार मानले. इतकें झाल्यावर पुढें सरकारी सहानुभूतीहि मिळूं लागली. पण ही सहानुभूति फार वेळ टिकली नाहीं. १८९७।९८ च्या सुमारास मुंबईस व इतरत्र प्लेगच्या निमित्तानें दंगे झाले. त्यायोगें टिळक, आगरकरादि लोकांची राजकीय कामगिरी सरकारच्या डोळ्यावर आली व हे लोक शिक्षणसंस्था चालविणारे म्हणजे तरुणांच्या मनांत तसल्याच राजकीय सुधारणा बिंबविणारे—अर्थात् सरकारविषयीं अप्रीति माजविणारे—या एका कल्पनेनेंच सर्व सरकारी अधिकारी अगदीं कावरेबावरे झाले व शिक्षणाची सुधारणा करण्यास पुढें चाललेल्या या गाड्यास खीळ घालण्यास ते मध्येंच थांबले यांत नवल तें कोणतें ? त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील हा प्रयत्न चालकांच्या मतभेदामुळेंहि कसा फसला हें योग्य स्थळीं पुढें दाखविण्यांत येईलच.

पुनः १९००।०१ सालीं शिक्षणासाठीं कमिशन बसलें. कमिशनच्या सभासदांत त्या वेळीं अगदीं नेमस्त असे प्रसिद्ध बंगाली गृहस्थ प. वा. सर गुरुदास बानर्जी यांना सरकारनें नेमिलें होतें. एकंदर कमिशनच्या कामाची पद्धति व सरकारी शिक्षणखात्याचे कुटिल मार्ग या सर्व गोष्टींचा स्वाभिमानी बानर्जी यांचा मनावर विलक्षण परिणाम झाला. कमिशनचें काम संपतांच बंगालमधील राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचे ते प्रथम पुरस्कर्ते बनले व बंगालमध्यें त्यांनीं "नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन"ची स्थापना केली.

मध्यंतरीं राष्ट्रीय सभेची स्थापना होऊन सर्व गाऱ्हाणीं अर्ज-विनंत्यांच्या द्वारें सरकारकडे जाऊं लागलीं. त्यामुळें हे राष्ट्रीय वृत्तीचे लोक राष्ट्रीय शिक्षणांत पडलेले सरकारला खपेनासे झाले. या वेळीं राजकारणी लोकांचा शिक्षणास विटाळ होत आहे ही गोष्ट सरकारला कटू वाटली इतकें मात्र खरें !

## कर्झन-कमिशनची कारवाई

लॉर्ड कर्झन इकडे आल्यावर प्रथम हिंदी शिक्षणाची स्थिति १८९९ पर्यंत त्यांना समाधानकारक दिसली. परंतु विद्यापीठांतून लोकपक्षाचें बहुमत आहे तें कमी कमी करून सरकारी बहुमत होईल असें करण्याचें त्यांच्या मनानें घेतलें. सन १९०१ मध्यें सर डब्ल्यू. ली वॉर्नर यांनीं लिहिलेलें ( Citizen of India ) 'हिंदुस्थानचे रहिवासी' हें पुस्तक शाळांतून सुरू करावें अशी सरकारची इच्छा होती. प्रवेश-परीक्षेच्या इतिहासविषयांत सदर पुस्तकाचा समावेश करण्याचा ठराव कलकत्ता विद्यापीठांत पुढें येऊन नापास झाला. त्यामुळें चिडून या बडया लाटसाहेबांनीं ही कमिशन नेमण्याची योजना पुढें ढकलली, व लागलींच सरकारनें २७-१-०२ रोजीं ठराव करून कमिशन नेमून साक्षीपुरावाहि घेण्यांत आला.

पुढें सदर बिल लॉर्ड कर्झन यांनीं १९०४ सालीं कौन्सिलपुढें आणलें. सदर बिलाचे मुख्य तीन हेतु होते. ( १ ) अभ्यासक्रमांत सुधारणा करून विद्यार्जनाचें क्षेत्र वाढविणें ( Functions to be expanded ); ( २ ) युनिव्हर्सिटीला जोडण्यांत आलेल्या कॉलेजांवर शिस्तीच्या दृष्टीनें नियम करून सक्तीनें नजर ठेवणें ( Control over affiliated colleges ) व ( ३ )

युनिव्हर्सिटी सिनेटची रचना नियमबद्ध करून जास्त कार्यक्षम करणें (constitution and control of the senate). या वेळच्या व्हॉइसरायांच्या कार्यकारी कौन्सिलचे एक सभासद मि० रिस्ले हे सदर कमिशनचे अध्यक्ष होते. कमिशनच्या सात सभासदांत एकच हिंदी सभासद सर सय्यद हुसेन बिलग्रामी हे होते. परंतु लोकांनीं पुष्कळ ओरड केली तेव्हां प. वा. गुरुदास बानर्जी यांना नेमण्यांत आलें. स्थानिक सहाय्यक म्हणून कै० सर नारायण चंदावरकर यांची नेमणूक झाली. पुढें कमिशननें आपला रिपोर्ट तयार करून त्यांतील शिफारशींप्रमाणें एक बिलहि सरकारनें कायदेकौन्सिलापुढें आणलें.

सदरहू बिल पुढें आणण्यांत लॉर्ड कर्झन यांचा अंतस्थ हेतु पुष्कळांना समजला होता. या वेळीं कौन्सिलांत ना. गोखले यांनीं या बिलास जोराचा विरोध केला. पण विद्यार्जनाचें क्षेत्र वाढविणें या दृष्टीनें या बिलाकडे पाहणाऱ्या डॉ. भांडारकरांना वरवर दिसणारें प्रगतिपर धोरण पसंत पडल्यामुळें त्यांनीं मात्र सदर बिलास सरकारच्या बाजूनें मत दिलें. त्यामुळें पुष्कळ लोकांनीं त्यांचेवर कसा गहजब केला हें डॉक्टरसाहेबांचें चरित्र वाचणाऱ्या मंडळींनाच समजणार आहे.[1]

( १ ) जास्त पैसा खर्च करा, ( २ ) नियमांत किरकोळ दुरुस्त्या करा, ( ३ ) व विद्यापीठाच्या प्रस्तुत सिनेटच्या रचनेपासून अर्धशतकभर उत्तम रीतीनें काम झालें आहे म्हणून सदर बिल एकदम पुढें आणून पुनः "नवी इटी नवा दांडू" असा प्रकार करूं नये अशा आशयाचें मुद्देसूद भाषण ना० गोखल्यांनीं या वेळीं केलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. आपण मदत करण्यास पुढें हात करीत आहांत त्या वेळीं आपला हात झिडकारून टाकूं इतके कृतघ्न व दुष्ट आम्ही खास नाहीं असें गोखले

---

१. ( डॉ. भाण्डारकर चरित्र पा. ३९६ ते ४०४ )

2. I do hope that whatever our deficiencies we are not so dense as to be incapable of understanding what is our interest and what is not; nor I hope, are we so wicked and ungrateful as to bite the hand that is stretched to feed us."

*Hon'ble Mr. Gokhale*

ह्मणाले. पण सर फिरोजशहा मेथा यांनीं कर्झन साहेबांच्या मानभावी भाषणास उद्देशून त्यांच्या आक्षेपास योग्य उत्तर दिलें. ते ह्मणाले:—

"प्रथम आम्ही भाकरी मागितली असतां आपण धोंडा पुढें ठेवितां आणि मग आम्ही तो पचवीत नाहीं म्हणून नांवें ठेवितां हा उलटा न्याय आहे असें म्हणूं नये तर काय म्हणावयाचें ?"

या वेळच्या मेथांच्या स्पष्टोक्तीचा कर्झन साहेबांच्यावर बराच परिणाम झाला; पण त्यांच्यापुढें कांहीं कालानें "सर" कीचा तुकडा टाकून कर्झनसाहेबांनीं त्यांचें तोंड बंद केलें.

एका दृष्टीनें या कर्झन–कमिशननेंच राष्ट्रीय शिक्षणाचें बीज पेरिलें आणि कमिशनमधील हिंदी सभासद प. वा. गुरुनाथ बानर्जी यांनीं बंगाल्यामध्यें राष्ट्रीय शिक्षणाची ध्वजा उभारली.

हिंदी विद्यापीठांच्या स्वातंत्र्याचा घोट घेण्यासाठीं कर्झन–कंपूनें आटोकाट प्रयत्न केले, पण त्यामुळें लोकांच्या आकांक्षा दडपून न जातां एक वर्षानेंच पुढें देशांत काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत राष्ट्रीय शिक्षणाचा जयघोषच सुरू झाला.

अशा प्रकारें राष्ट्रीय शिक्षणाच्या इतिहासांत कर्झन–कमिशनचें कार्य काय होतें हें वरील अल्प विवेचनावरून वाचकांच्या नजरेस येईल.

गु. अण्णासाहेबांनीं या संधीचा फायदा घेऊन राष्ट्रीय शिक्षणाचें महत्त्व महाराष्ट्रास समजावून देण्याचा प्रयत्न केला. या कामीं लोकमान्यांनींहि अण्णांच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्याचा प्रसार केसरींतून आणि इतर अन्य उपायांनीं चोहोंकडे केला व त्यांनीं व्याख्यानें दिलीं आणि फंडहि गोळा केला. राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य येथूनच पुढें जोरावलें असें ह्मणावयास हरकत नाहीं.

इकडे मुंबई, पुणें, कलकत्ता वगैरे ठिकाणीं अशा रीतीनें वातावरणांत दर घटकेस बदल होत होता. सर्व ठिकाणांप्रमाणें त्याचे हेलकावे कोल्हापुरलाहि बसत होते. या वेळीं सर्व चळवळीकडे प्रो. विजापुरकरांचें चांगलें लक्ष होतें. राजाराम कॉलेजमध्यें 'राजारामियन क्लब' स्थापून तेथें प्रो. विजापुर-

1. It is neither business nor logic to offer us a stone when we ask for bread and then to call us names because we cannot swallow the stone.

करांचीं व्याख्यानें होत. इतर लोकांच्या प्रमाणें त्यांचेंहि लक्ष शिक्षणाकडे या वेळीं लागलें. नंतर १९०३।४।५ सालीं राष्ट्रीय चळवळ जोरानें सुरू झाल्यावर राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न महाराष्ट्रांत जोरानें पुढें आला. याच वेळीं सुरत कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय बहिष्कारत्रयी पुढें आली. एकंदर परिस्थितीचा पूर्ण विचार करून प्रो. विजापुरकरांनीं राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यास स्वतःस वाहून घेतलें व मार्गांत जे अडथळे आले ते मुकाट्यानें सहन केले.

## नवीन शिक्षणसंस्थांची योजना

देशाच्या दुःस्थितीची या वेळीं त्यांना चांगली कल्पना आली होती. ‘परवशता तिखट सुरी’ कशी जाचक असते याचें स्पष्ट व सुंदर शब्दचित्र ग्रंथमालेंत अण्णांनीं काढलेलें आहे. ते म्हणतात:—

“सर्व संकटांत मोठें संकट राजकीय संकट. राजकीय संकट म्हणजे परवशता हें आहे. सर्व विपत्ति व आपत्ति तन्मूलक आहेत ही गांठ प्रत्येकानें आपल्या मनाशीं पक्की घालून ठेवावी. राष्ट्राचीच सामाजिक स्थिति बिघडली आहे, दुष्ट चालीरितींचा पगडा बसला आहे, सत्यप्रीति नाहींशी झाली आहे, परस्परांवरील विश्वास उडाला आहे, कलाकौशल्याचा ऱ्हास झाला आहे, व्यापार ठार बुडाला आहे, प्रजा अशक्त झाली आहे, इत्यादि सर्व मूळ रोगाचीं बाह्य परिणामचिन्हें आहेत म्हणून या चिन्हांस फाजील महत्त्व देऊं नये......राजसत्तेला मर्यादेंत आणणें हें पहिलें काम आहे व राष्ट्रांतील सर्व दूरदर्शी व दीर्घोद्योगी स्त्रीपुरुषांचें इकडे लक्ष लागलें पाहिजे......सर्व राष्ट्राचा कारभार दुसऱ्यांनीं पाहावा व राष्ट्रांतील यच्चयावत् लोकांनीं कष्टाळू व सोशिक जनावरांप्रमाणें काबाडकष्ट करावेत अशी स्थिति येऊन आपल्या देशाचे म्हणजे आपल्या जन्मभूमीचे आपण मालक आहोंत हें विसरून जावें किंवा स्मरून आंतल्या आंत झुरून जावें याहून दुसरी शोचनीय स्थिति कोणती असणार ? ...... या गोष्टी स्पष्ट समजून त्या प्रतिपादण्याचें सामर्थ्य लोकांच्या अंगीं येणें हें काम लोकशिक्षणाशिवाय होणार नाहीं. हें शिक्षणाचें काम ज्याच्या हातांत असेल तो देशांत सत्ताधारी होईल. ...... या कामासाठीं शिक्षणाच्या संस्था नवीन तऱ्हेच्या असल्या पाहिजेत.” (विश्ववृत्त व. १ लें, अं. ३ रा.)

## शिक्षणावर ताबा आमचा पाहिजे

शिक्षणखात्यावर आणि शिक्षणाच्या धोरणावर देशांतील सर्व जबाबदार पुढाऱ्यांचा ताबा असावा असेंच गु० अण्णांचें मत असे. याबद्दल अण्णा एके ठिकाणीं ह्मणतातः—

> "हिंदुस्थानांत सध्यां शिक्षण कसें चाललें आहे हें वर वर पाहणारास असें आढळून येईल कीं, " येथें सर्व विलक्षण चाललें आहे,... त्यांस कॉलेजाच्या नांवापासून अराष्ट्रीयत्वाची खूण पटेल......प्रेक्षकांच्या मनावर नांवांवरून उत्पन्न झालेला ग्रह आंत शिरून चोहोंकडे पाहिल्यानें दृढच होत जातो. जिकडे पहावें तिकडे सर्व अराष्ट्रीय. विद्यार्थ्यांची शिकावयाची भाषा व ज्ञान मिळविण्याची भाषा परकीयच आढळून येईल....... अशा विदेशी थाटाचें शिक्षण जेथें सुरू आहे तेथें राष्ट्रांतील कच्चा माल म्हणजे विद्यार्थ्यांचीं मनें...... त्यावर परदेशी पुटावर पुटें पडल्यानें त्यांत स्वदेशीपणा कांहींच उरत नाहीं... आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांचीं मनेंच जशीं व्हावीं तशीं तयार होत नाहींत. तीं तशीं तयार होण्यास राष्ट्रीय शिक्षण नीट वळवणार नेलें पाहिजे. अर्थात् तें राष्ट्रांतील लोकांच्याच हातीं असलें पाहिजे."
>
> ( विश्ववृत्त वर्ष १ लें, अंक १ ला ).

सरकारी नियंत्रणाखालीं राहून आपणांस लागेल ती शैक्षणिक सुधारणा करितां येईल असें अद्यापि पुष्कळ शिक्षणतज्ज्ञ म्हणतात. परंतु सरकारी विद्याखात्यानें अमुक नको, तमुक नको, असें वारंवार बजावीत जावें व त्यास आमच्या संस्थांतील चालकांनीं मान तुकवावी हें विजापुरकरांना कधींहि पटलें नाहीं. त्यासंबंधीं मध्यंतरीं " केसरींत " पत्रव्यवहार चालला होता. त्यांत शिकविण्याच्या पद्धतीस सरकारी अधिकारी कशा रीतीनें नांवें ठेवीत असतात हें त्यांनीं स्पष्ट दाखविलें होतें.

## विद्यापीठ आणि मराठी भाषा

आज मराठी भाषेविषयीं अगर मातृभाषांविषयीं मुंबई विद्यापीठांत थोडी जागृति झाल्याचीं चिन्हें दिसत आहेत. मुंबई युनिव्हर्सिटीनें आपला संसार लंडन युनिव्हर्सिटीच्या नमुन्याप्रमाणें थाटला असल्यामुळें मातृभाषांचा प्रश्न आज कित्येक दिवस मागें मागें पडत आहे. इतके दिवस एम्. ए.

च्या वर्गांतच विद्यार्थ्यांचा मातृभाषांशीं संबंध येत होता; पण नुकतीच बी. ए. साठीं मातृभाषा घेण्याचा ठराव झाल्यामुळें अध्ययनाचें क्षेत्र बरेंच वाढलें आहे. मातृभाषेची ही लढत फारच आश्चर्यकारक आहे यांत शंका नाहीं.

मुंबई विद्यापीठांतून डॉ. भांडारकर १८६० सालीं संस्कृत घेऊन बी. ए. झाले. त्याच सालीं माधवराव रानडे, वामन आबाजी मोडक, बाळ मंगेश वागळे हे मराठी भाषा घेऊन बी. ए. झाले. रानडे हे पहिल्या वर्गांत आले. मराठी भाषेचा पुढें विद्यापीठांत अगदीं खालपर्यंत प्रवेश करून घेण्यास न्यायमूर्तींनीं आटोकाट प्रयत्न केले हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. १८७० पर्यंत मातृभाषांचा सहवास विद्यापीठानें कसा तरी कष्टानें सहन केला. या कालांत एकंदर ११६ गृहस्थांनीं बी. ए. च्या पदव्या घेतल्या त्यांत ३४ संस्कृत व ३३ मराठी घेऊन बी. ए. झाले. गुजराथी भाषा घेऊन अवघे १७ इसम पास झाले. आम्हांला मातृभाषेचा त्रास कां, असें विद्यापीठांतील बहुमतवाल्या पारशी सभासदांचें नेहमीचें गाऱ्हाणें होतें. वर पास झालेल्या सतरा पदवीधरांत तेरा इसम पारशी होते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १८६७ सालीं देशी भाषांच्या ठरावास मान्यता देणाऱ्या सभासदांत डॉ. विल्सन व सर रेमंड वेस्ट ही मंडळी होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १८८१ सालीं न्यायमूर्तींचे मित्र कै. ग. व्यं. जोशी यांनीं "विद्यापीठ व देशी भाषा" असा निबंध सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत लिहून मातृभाषेच्या चळवळीचें रणशिंग जोरानें फुंकलें. त्यानंतर १८८८ सालीं पदवीपरीक्षेस मातृभाषेंत एक निबंध लिहावा व भाषांतर करण्याची जोड द्यावी असा ठराव सेनेटपुढें आला. या ठरावाप्रमाणें काम करण्याचें तेलंगांनीं ठरविलें होतें. इकडे महाराष्ट्रांत अशा प्रकारें मोडक, तेलंग, रानडे, डॉ. मॅकीकन, वर्डवुड, ऑक्सेनहॅम वगैरे मातृभाषेचा पक्ष घेणारी मंडळी असतांनाहि मातृभाषेचा प्रश्न एकीकडे भिजत पडला! तरी मातृभाषेचे कैवारी स्वस्थ बसले नाहींत. वामन आबाजी मोडक यांनीं पुनः १८९० मध्यें सेनेटमध्यें ठराव आणला कीं, 'संस्कृत, फारशी वगैरे भाषांबरोबर देशी भाषेंतलेंहि एक पुस्तक नेमावें'. विद्यार्थ्यानें परीक्षेसाठीं एक तरी देशी भाषेंतील पुस्तक काळजीपूर्वक

१ रा. न. र. फाटककृत न्या. रानडे यांचें चरित्र, पान ५७४ पहा.

वाचावें असा मोडकांचा हेतु होता. परंतु विरुद्ध पक्षास थोडीं जास्त मतें पडून सदर ठराव नापास झाला.

मोडकांचा ठराव नापास झाला तरी मातृभाषेचे कैवारी गलितधैर्य झाले नाहींत. १८८८ मध्यें मागें पडलेली आपली सूचना न्या. रानडे यांनीं पुनः १८९४ सालीं पुढें मांडली!

पण विद्यार्थ्यांवर अभ्यासाचा बोजा पडेल व ज्यांची देशभाषांपैकीं एकहि जन्मभाषा नाहीं, त्यांच्या बाबतींत अन्याय होईल अशा सबबीवर सेनेटनें माधवरावांचा ठराव हाणून पाडला; यापूर्वी देशी भाषेला उत्तेजन देण्यास सरकारची मनोभूमिका सरकारी रिपोर्टरे[1] रा. सा. गोपाळ मोरेश्वर साठे यांनीं आपल्या वार्षिक अहवालांत प्रसिद्ध केली होती आणि त्याप्रमाणें १८९३ मध्यें भारतमंत्र्यांनींहि या बाबतींत प्रांतिक सरकारची कानउघडणी केली होती. असो!

---

१. हे गृहस्थ बरेच दिवस सरकारी खात्यांत मोठ्या हुद्याच्या नोकरीवर Reporter on the Native Press म्हणून होते. दरसाल देशी भाषांतील ग्रंथांवर हे आपला अभिप्रायात्मक अहवाल प्रसिद्ध करीत. १८९३ च्या अहवालांत सुशिक्षित लोकांचें आपापल्या मातृभाषांमध्यें नवीन ग्रंथ तयार करण्याकडे कसें दुर्लक्ष होतें तें त्यांनीं दाखविलें आहे. अहवालांत ते म्हणतात:--

The intellects that are working to develop the literature of the country do not very often belong to the highly educated class and the leading intellects do not devote much of their time and energy to the enrichment of their vernacular literature.

शिक्षणखात्यांतील एका पेन्शनर अधिकाऱ्याचा पुढील अभिप्राय पहाण्यासारखा आहे. या गृहस्थांनीं बी. ए. ला मराठी विषय घेतला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

" The vernaculars afford no means of instruction and it is a waste of time for High School students to study the different Vernacular books and others of a similar character.

पुढें १९०० सालीं एम्. ए. पुरता तरी मराठीचा प्रवेश विद्यापीठांत झाला. पुन: १९०८ सालीं ना. परांजपे यांनीं मराठी भाषा बी. ए. मध्यें इतर भाषांप्रमाणें घेण्याची मोकळीक असावी असा ठराव पुढें आणण्याची खटपट केली, परंतु हा विषय तूर्त आणूं नये असें त्यांना सिंडिकेटनें कळविलें.

१९१५ सालापर्यंत चोहोंकडे सामसूम होती. या वेळीं महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनें एक ठराव पास करून युनिव्हर्सिटीकडे पाठविला; आणि नंतर १९१७ सालीं प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं मराठीचा प्रवेश विद्यापीठांत करण्यासाठीं अगदीं सारखा पिच्छा पुरविला; पण बी. ए. मध्यें मराठीचा प्रवेश होण्यापूर्वीच त्यांनीं परलोकची वाट धरली.

पण आतां मात्र विद्यापीठाचें धोरण सहानुभूतीचें आहे. युनिव्हर्सिटीचें कार्य केवळ परीक्षा घेणें हें नसून शिक्षणकार्य करणें, संशोधकांना मदत करणें व नवीन संशोधनात्मक ग्रंथ छापविणें हें आहे, ही जाणीव विद्यापीठाच्या चालकांत आतां उत्पन्न झाली आहे. तसेंच युनिव्हर्सिटी-कमिशननें पुणें विश्वविद्यापीठ काढून मराठी भाषेस प्रामुख्य द्यावें असें धोरण आतां जाहीर केलें आहे.

अद्यापि मृतभाषा, मातृभाषा, कीं चालू युरोपियन भाषा असा मतभेद कायम आहे. मातृभाषेचा अभिमान ज्यांनीं बाळगावा असे आमच्या विद्यापीठाचे सीनेटर मातृभाषेची हयगय करण्यास मुद्दाम पुढें येतात व मातृभाषेच्या सशास्त्र अभ्यासाऐवजीं एक चांचणीवजा अगर निबंधासारखी[1]

१. प्रि. कानिटकर यांचे पुढील दोन ठराव ता. २८।१।२८ च्या सिनेटच्या बैठकींत विचारासाठीं होते.

(1) That the vernaculars be removed from the list of Additional Languages at the School Leaving Examination for the purposes of Matriculation, that a paper in vernacular composition be introduced at that Examination, and that every candidate appearing at the Examination with a view to qualifying for Matriculation at the University be required to pass in that paper.

(2) That at First Year College and Intermediate Arts Examinations, a candidate shall take one of the classical Languages or a Modern European Language or a Vernacular.

परीक्षा असली म्हणजे पुरे असें प्रतिपादन करितात ! मराठी भाषेविषयीं कोण हा आदर आणि प्रेम ! ज्यांनीं नाइलाज म्हणून गुजराथी भाषा पत्करली अशा मुंबईतील एखाद्या पारशी सीनेटरनें ' अहो ! आम्हांला स्वतःची मातृभाषा नाहीं ! मग ही मातृभाषेच्या अभ्यासाची सक्ती कां ?' असें म्हटलें तर बरें दिसेल. पण ज्यांची मातृभाषा आतां चांगली सुसंपन्न झाली असून तिचें अध्ययन तरुण पिढीकडून होणें जरूर आहे अशा महाराष्ट्रीयांनीं मातृभाषेला दूर ढकलावें ही गोष्ट अत्यंत लाजिरवाणी इतकेंच नव्हे तर निंद्यहि आहे असेंच म्हणावें लागतें.

### उज्ज्वल भवितव्य

पण कांहींहि असो ! आज मराठीचें भवितव्य उज्ज्वल आहे असा योगायोग दिसत आहे. मराठीच्या अभ्यासासाठीं नवीन नवीन मंडळें दररोज निघत आहेत. विद्यापीठानें आपलें पूर्वीचें आडमुठें धोरण सोडून दिलें असून मातृभाषांच्या अध्ययनाची जी उपेक्षा आजवर दाखविली ती आतां नाहींशी होत आहे. आज मराठी, संस्कृत, गणित, इतिहास वगैरे विषय मातृभाषेंत शिकविले तरी चालतील अशी सवड ठेविल्यानें शिक्षणांतील एकांगीपणा व अनैसर्गिकपणा आतां नाहींसा होत आहे. मराठीच्या अभ्यासक्रमांत आतां आधुनिक विद्वान् साहित्यसेवकांचे लेख वाचण्यांत यावेत अशी प्रवृत्ति दिसत आहे. अशा रीतीनें मराठी भाषेचा उदयकाल लवकर येत आहे अशीं "प्रसाद–चिन्हें" दिसत आहेत. या विचारक्रांतीचें सर्व श्रेय मराठी भाषेच्या अनेक अभिमान्यांनाच दिलें पाहिजे. रानडे, टिळक, आगरकर, चिपळूणकर, देशमुख, दीक्षित, गोळे वगैरे पहिल्या पिढीची पाइक मंडळी प्रथम मराठी भाषेची सेवा करण्यास पुढें सरसावली. नंतर कोल्हटकर, राजवाडे, जोशी, विजापूरकर, केळकर, सातवळेकर, खाडिलकर, टिकेकर, पांगारकर, भिडे वगैरे साहित्यसेवकांनीं पहिल्या पाइकांनीं लाविलेल्या मराठी रोपड्याची योग्य निगा राखून मराठीच्या उपवनांतील पूर्वीच्या लतावेलींची पुनः योग्य मशागत केली आणि आज नव्या दमाचे नवीन लेखक मराठीच्या स्वतंत्र प्रांतांत नव्यानें वावरण्यास पुढें येत आहेत. त्यांत चरित्रलेखक—गर्दे, साने, हुद्दार, ताम्हणकर, भावे; लघुकथालेखक—जोशी, गोगटे, गुर्जर, देशपांडे, कुळकर्णी; कोशकार केतकर, आपटे, जोशी;

नाटककार—कोल्हटकर, गडकरी, कुळकर्णी, वरेरकर; ऐतिहासिक लेखक आणि संशोधक–चांदोरकर, पोतदार, जोशी, लेले, घाटे वगैरे वगैरे बरेच लेखक प्रमुख आहे. या सर्वांची मराठी भाषेची निरपेक्ष सेवा अव्याहत चालू आहे. ही मराठी भाषेची उन्नति पाहून गुरुवर्य अण्णासाहेबांना फारच आनंद वाटत असे. कारण मराठी भाषेच्या संवर्धनाचा अग्रमान ग्रंथमाले-मुळें त्यांच्याकडे येत असे. मराठी भाषेची ही विजयपताका अशीच पुढें फडकाविली जावो इतकीच मराठी भाषेचा अभिमान असणाऱ्यांची सदिच्छा आहे. असो; थोडेसें विषयांतर झालेलें येथेंच थांबविणें जरूर आहे.

## शिक्षणाचें माध्यम देशभाषाच पाहिजे

आपल्या राष्ट्रीय शिक्षणसंस्थेंत मराठी हीच बोधभाषा राहणार असा आपला निश्चय गु० अण्णांसाहेबांनीं प्रथम जाहीर केला होता. आमच्या उच्च शिक्षणांत व माध्यमिक संस्थांत इंग्रजीचें प्रस्थ जास्त माजल्यानें तरुण विद्यार्थ्यांच्या ग्रहणशक्तीवर फार ताण पडतो. व त्यामुळें विषयाचें सुगम-पणें आकलन करण्याची विद्यार्थ्यांची ग्राहकशक्ती बिघडते असा सर्वांचा अनुभव आहे.

राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्थांतून सर्व शिक्षण स्वभाषेच्या द्वारेंच मिळालें पाहिजे, आणि "राष्ट्रीय वाङ्मयाशिवाय प्रगति नाहीं" हें ओळखून त्याच्या चांगल्या अध्ययनास उत्तेजन मिळालें पाहिजे, असेंच गुरुवर्यांचें मत होतें. ते म्हणतात:—

> "राष्ट्रभाषेचा व राष्ट्रोदयाचा फार संबंध आहे व पूर्वजांनीं जतन करून ठेवलेला वाङ्मयरूपी ठेवा गमावणें म्हणजे एक घोर पातक आहे. प्रत्येक राष्ट्रानें अनादि कालापासून केलेल्या कामगिरीचें प्रतिबिंब राष्ट्राच्या वाङ्मयांत जसें दृष्टीस पडतें व त्याच्या इतिहासाचे यथार्थ ज्ञानास वाङ्म-याचें जसें साहाय्य होतें व त्याच्या पुढील प्रवृत्ति कळून येणें वाङ्मया-पासून जसें सुलभ होतें तसें दुसऱ्या कशानेंहि होत नाहीं. राष्ट्रास जें वळण लागतें तें राष्ट्रांतील वाङ्मयानेंच लागतें."
>
> ( विश्ववृत्त वर्ष १ लें, अं. १ ला. )

इंग्रजीऐवजीं मराठी बोधभाषा ठेवा म्हणजे शिक्षणाचें खरें कार्य होईल असा स्पष्ट इषारा न्यायमूर्ती रानडे यांनीं प्रथम दिला व पुढें ना.

गोखल्यांनीं तेंच सांगितलें. " आमचे पदवीधर अल्पायुषी कां होतात ? " या संबंधीं गु० डॉ. भांडारकर आणि न्या. रानडे यांनीं तत्कालीन सरकारी अधिकाऱ्यांना व जनतेसहि योग्य वेळीं धोक्याची सूचना दिली, पण तिकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं ही फार दुःखाची गोष्ट आहे ! पुढें प्रो. विजापुरकरांना ही दुःस्थिति लवकर कळाली. समर्थ विद्यालय काढण्यापूर्वी 'सर्व शिक्षण मराठींतूनच दिलें जाईल' असें अण्णांनीं प्रथमच जाहीर केलें होतें. अशा रीतीनें मराठीचा प्रश्न त्यांनीं प्रथम समाधानानें सोडविण्याचें ठरविलें. मराठी भाषेची योग्यता इंग्रजी भाषेइतकी किंबहुना थोडी अधिकच आहे असें त्यांचें मत होतें. टिळक-महाविद्यालयांत इंग्रजी भाषा पदवीकरितां आवश्यक आहे असें जेव्हां त्यांना समजलें तेव्हां त्यांनीं आपणांस ही गोष्ट पसंत नाहीं असें स्पष्ट लिहिलें. विद्यापीठाच्या चालकांना याविषयीं लिहितांना गुरुवर्य आपल्या पत्रांत म्हणतात:--

" कोणत्याहि राष्ट्रांत परक्या भाषेला जितकें महत्त्व दिलें जात नाहीं तितकें परकीय सरकार स्वतःच्या भाषेस हिंदुस्थानांत देतें; तसेंच महत्त्व देऊन इंग्रजी भाषा जोंपर्यंत अवश्य मानली जाते तोंपर्यंत तरी राष्ट्रीयत्वास वैगुण्य आलें असें मीं समजतों. कोणती तरी एक भाषा दुसरी भाषा म्हणून ऐच्छिक विषयांत ठेवण्यास हरकत नाहीं. परंतु इंग्रजी येत नाहीं येवढ्याचसाठीं कोणाहि मनुष्यास विद्यापीठाची अंतिम पदवी मिळूं नये यांत राष्ट्रीयपणाचा ऱ्हास आहे. "

( केसरी, २–२–१९२६ )

मातृभाषेबद्दल गुरुवर्यांच्या मनांत इतका आदर व इतकी अनन्य निष्ठा होती !

## भारतीय संस्कृतीचा विकास

भारतवर्षाच्या प्राचीन संस्कृतीबद्दल आपले गुरु डॉ. भांडारकर यांनीं संशोधन केलें व पूर्वींचे शिलालेख, ताम्रपट, व नाणीं यांवरून लुप्त झालेली भारतीय संस्कृति कशी उजेडांत आणली याबद्दल अण्णांना आनंद वाटत असे. समर्थ विद्यालयांतून कांहीं विद्यार्थी संशोधक म्हणून पुढें यावेत अशी त्यांची इच्छा होती. त्याप्रमाणें विसूभाऊ राजवाडे यांना " संशोधनाचें शिक्षण कांहीं प्रबुद्ध विद्यार्थ्यांना देतां कां " असें अण्णांनीं

विचारलें होतें. पण राजवाडे काय ? त्यांनीं उलट उत्तर दिलें "अण्णा, संशोधन शिकवून येणार कां ? अहो कुठें हीं कोंवळीं मुलें आणि कुठें आमचें रानोमाळीं चालणारें संशोधन ! एक वर्षभर सतत पायीं फिरावयला यांची आगोदर तयारी करा !" एवढ्या उद्गारांनीं त्या कल्पनेचें पर्यवसान झालें.

राष्ट्रीय शिक्षणक्रमांतून भारताच्या प्राचीन वैभवाची साक्ष विद्यार्थ्यांना पटवून दिली पाहिजे असें त्यांचें मत होतें. राष्ट्रीय शिक्षणाचें पहिलें एक महत्वाचें गमक म्हणजे संस्कृतिविकास होय. प्राचीन उज्ज्वल परंपरा कायम ठेऊन तरुणांच्या मनांत आपल्या देशांतील संस्कृति ज्यायोगें बिंबविली जाईल अशा प्रकारचा प्रयत्न राष्ट्रीय शिक्षणांत झाला पाहिजे. ते म्हणतात :—

"आपल्या धर्मांची, चालीरीतींची व सांप्रदायांची चांगली माहिती प्रत्येक हिंदूला असली पाहिजे. फाजील देवभोळेपणा वाढविल्याशिवाय शरीरसामर्थ्यवृद्धीला व स्वधर्मजागृतीला उपयोगी पडणाऱ्या अशा ज्या गोष्टी आहेत त्यांच्याकडे दुर्लक्ष होऊं नये असें आमचें मत झालें आहे." ( विश्ववृत्त वर्ष १ लें, अंक ३ रा. )

अशा रीतीनें शिक्षणानें तरुणांच्या मनांत स्वधर्माभिमान उत्पन्न केला पाहिजे. हिंदु धर्मांचीं सोपीं प्रमेयें हंसत खेळत जर मुलांच्या कानीं पडलीं तर धार्मिक शिक्षणानें त्यांचीं कोमल अंतःकरणें सुविचारांनीं प्रफुल्ल होऊन आपल्या धर्माबद्दल त्यांना दिवसेंदिवस जास्तच सहानुभूति वाटेल. ते एके ठिकाणीं म्हणतात :—

परंतु राष्ट्रीय शिक्षणसंस्थांनीं धार्मिक आचरणाकडे दुर्लक्ष करतां कामा नये. कारण "धार्मिक आचरणाशिवाय राष्ट्राचें एकीकरण अशक्य आहे. धर्माच्या बाबतींत ठरविलेल्या मर्यादांचा व वर्तनक्रमाचा विचार निवळ तर्कांच्या कसोटीस लावावयाचा नाहीं. धर्म व नीति यांची विशिष्ट ठेवण म्हणजेच राष्ट्र. रूढ सांप्रदायांत नकळत होत जाणारे फेरफार राष्ट्रास मान्य होतात व ते धर्मसंस्थेच्या द्वारें अमलांत येत गेल्यानें दृढ होतात. असेंच कशासाठीं, तसेंच कशासाठीं, हे राष्ट्रविघातक विचार दुष्ट लोकांनीं आपल्या मायावीपणानें शिकविलेले असतात. त्याची पुरी पायमल्ली करण्यास एकच स्पष्ट व यशोवह प्रयत्न

असेल तर तो धर्मनीतीकडे पुरें लक्ष पुरविणारा रा ्रीय तत्त्वांवर उभारलेला शिक्षणक्रम हाच आहे." (विश्ववृत्त वर्ष १ लें, अंक १ ला)

धार्मिक शिक्षणाचा परामर्ष घेत असतांना तरुणांची धार्मिक वृत्ति भलतीकडे वाहात जाऊं नये असें अण्णांचें मत असे. धर्माविषयीं श्रद्धा बाळगतांना विद्यार्थी वेदान्ती निघावेत व त्यांना खऱ्या धर्मतत्त्वांचा विसर पडावा असें अण्णांना एक दिवसहि वाटलें नाहीं. समर्थ विद्यालयाच्या विद्यार्थ्यांविषयीं अण्णा एके ठिकाणीं म्हणतात:—

"राष्ट्रीय विद्यालयांतील विद्यार्थी धर्माविषयीं श्रद्धा बाळगणारे निघतील, परंतु भलत्याच दुरभिमानाच्या भरीं भरून **वेदांती न बनतां पृथ्वीवर कोठें काय आहे तें जाणण्याची व तें आपल्या देशांत आणण्याची हांव उत्पन्न होईल असे कांहीं तरी विद्यार्थी निपजतील अशी उमेद आहे.** समर्थ विद्यालयांतील विद्यार्थी निकरानें वागतील, परंतु जगाच्या इतर भागांत जीं जीं उत्कर्षाचीं, सुखाचीं, सोयीचीं व समाधानाचीं साधनें प्राप्त होण्याजोगीं असतील तीं आपणांस व आपल्या देशास मिळविण्यासाठीं लागेल तें शिक्षण प्राप्त करून घेण्याकरितां वाटेल तें साहस करण्यास व लागेल तो उद्योग करण्यास सिद्ध होतील. तरच या शाळेच्या प्रस्थापकांस आपल्या निरपेक्ष श्रमाचें व स्वार्थविन्मुखतेचें चीज झालें असें वाटेल. स्वदेशी माल तयार करून कोणत्याहि परदेशांतील सुखांचा व मौजेचा उपभोग घेण्यास राष्ट्र तयार झालें म्हणजे अर्वाचीन सुधारणेचा कळस झाला. हें नवीन मिळून आपली प्राचीन **नीतिमत्ता, आस्तिक्यबुद्धी व मानसिक शास्त्रांतील प्रमेयें या सर्वांची सांगड घालणें हीच हल्लींच्या जगांत पहिलें पद प्राप्त करून घेण्याची गुरुकिल्ली आहे.** साऱ्या दुनियेंत हें कार्य करण्यासाठीं परमेश्वरानें आपल्या अपार औदार्यानें एक देश योजिला असेल तर तो आमचा देश होय, अशी येथील हवा—पाणी, नद्या—डोंगर, सुपीक जमीन व समुद्रकिनारा इत्यादि बाह्य सृष्टीचें ऐश्वर्य व अंतःसृष्टीकडे वळलें असतांहि सर्व जगास थक्क करून सोडणारें बुद्धिसामर्थ्य यांवरून आमची खात्री झाली नसती व हा सुदिन येण्यास बहुत युगें लागावयाचीं नाहींत ही अतर्कित प्रेरणा झाली नसती तर या दुर्घट प्रयत्नास

आम्हीं हातच घातला नसता. सद्धर्माच्या आश्रयानें नैतिक सुधारणा व ज्ञानवृद्धि या दोन गोष्टी साधल्या म्हणजे सर्व ऋद्धिसिद्धी हात जोडून पुढें उभ्या राहतात. " ( विश्ववृत्त वर्ष १ लें, अंक ३ रा ).

या देशांतील लोकांचे आचारविचार पाहून जगांतील इतर लोकांनीं वागावें अशी आद्यधर्मप्रवर्तक मनूनें जशी प्रतिज्ञा केलेली मनुस्मृतींत दिसते, तशीच प्रतिज्ञा या उताऱ्यांत गु॰ विजापुरकरांनीं केलेली आहे.



१. याच ग्रंथांतील प्रारंभीच्या पानावर "अस्मद्देश॰" हा श्लोक दिला आहे.

## प्रकरण सतरावें

# * राष्ट्रीय शिक्षण

कार्याणामुत्तमं कार्यं साधनानां च साधनम् ।
आधारः सर्वचेष्टानां राष्ट्रीयं लोकशिक्षणम् ॥

—गु. विजापूरकर.

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत राष्ट्रीय शिक्षणाचें महत्त्व पुष्कळ वर्णिलें आहे. महाभारतकालांत अगर रामायणकालांत प्राचीन आर्य पूर्वजांपैकीं शहरांपासून दूर रानांत राहून एखाद्या नदीच्या कांठीं आपला आश्रम थाटून तेथें आपल्या हजारों शिष्यवृन्दासह कालक्रमणा करणारे अनेक मुनि भारतवर्षांत असत. त्यानंतर बौद्धकालांत ज्यांची माहिती सांपडते अगर प्राचीन ग्रंथांत ज्यांचा उल्लेख आज सांपडतो अशीं विद्यापीठें बनारस, नालंदा व तक्षशीला वगैरे ठिकाणीं होऊन गेलीं यांपैकीं नालंदा नांवाच्या विद्यापीठाची माहिती बरीच उपलब्ध झाली आहे.

### राष्ट्रीय शिक्षणाचे घटक

आतां या ठिकाणीं राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं अण्णांनीं कोणकोणतीं साधनें उपयोगांत आणिलीं आणि त्या कामीं आलेल्या अडचणी कशा दूर केल्या हें प्रत्यक्ष तेथील स्थितीवरून येथेंच सांगावयाचें आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या घटकावयवांत ( १ ) अनुकुल परिस्थिति, ( २ ) राजसत्तेची मान्यता, ( ३ ) विद्यार्थीवर्ग आणि ( ४ ) शिक्षण यांचा समावेश होतो. यांपैकीं पहिल्या साधनाचा आपण विचार करूं.

---

* महाराष्ट्राच्या शैक्षणिक इतिहासांत प्रो. वि. गो. विजापुरकरांच्या कार्याला फार मोठें महत्त्व आहे. या विषयांत त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे. सदर प्रकरणांत महाराष्ट्रांतील शिक्षणविषयक क्रांतीचें थोडक्यांत विहंगमावलोकन केलें आहे. यायोगें प्रो विजापुरकरांची कामगिरी कशी थोर आहे हें समजण्यास पुष्कळ मदत होईल.

प्रथम राष्ट्रीय शिक्षणाच्या कामीं देशांतील वातावरण राष्ट्रीय करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. त्याप्रमाणें टिळक, चिंतामणराव वैद्य वगैरे पुढाऱ्यांसह त्यांनीं कल्याण, भिवंडी, सोलापूर, पंढरपूर, धारवाड, बेळगांव वगैरे ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. नंतर लोकांमध्यें राष्ट्रीय शिक्षणाविषयीं जागृती उत्पन्न करून आपली ' समर्थ विद्यालय ' संस्था प्रथम कोल्हापुरास स्थापिली. पण कोल्हापुरची स्थिति राष्ट्रीय वातावरणास पोषक अशी नव्हती. एक वर्षाचे आंत त्यांनीं तळेगांव स्टेशनजवळ इंद्रायणीच्या काठांवर एक प्रशस्त जागा खेरेदी केली, आणि त्या ठिकाणीं आपल्या संस्थेच्या इमारती बांधिल्या. त्या ठिकाणीं शेजारच्या जलसंचयाचा उपयोग करून घेऊन विद्यालया-सभोंवतीं पाणी खेळवावें आणि तेथें इमारतीभोंवतीं लहान लहान बागा कराव्यात असा त्यांचा हेतु होता, परंतु तशी सुस्थिति आणि इतर काम करण्यास लागणारें मनःस्वास्थ्य त्यांना मुळींच लाभलें नाहीं. प्राचीन गुरु-कुलाच्या पद्धतीवर आपल्या शिक्षणसंस्थेचें ध्येय त्यांनीं आखलें होतें. या-संबंधीं स्पष्ट विवेचन " महाराष्ट्रीय शिक्षण " या लेखांत त्यांनीं केलें आहे.

या ठिकाणीं प्रस्तुत लेखांत अण्णा ह्मणतातः—

"धर्मशिक्षण, ब्रह्मचर्यपालन, नैतिक वर्तनाविषयीं खबरदारी, शारीरिक शिक्षणाकडे पूर्ण लक्ष, बहुश्रुतपणा, इ० साधून एकाच विषयाकडे सर्व परिश्रम या प्राचीन गुरुकुलपद्धतींतील गोष्टी अलीकडील शिक्षणांत अदृष्ट आहेत असें म्हटलें तरी चालेल. दृष्ट असल्या तरी वरील कलमांत दर्शविलेल्या अस्वाभाविक दोषानें ग्रस्त असतात. त्याचप्रमाणें शिष्य म्हणजे **अंतेवासी** आणि गुरु म्हणजे **देशिक** यांचा परस्पर संबंध निकट पाहिजे. विद्यार्थ्यास गुरूचें सान्निध्य असल्यानें अनुकरण शक्य असतें. यासाठीं गुरूवर केवढी जबाबदारी असते व त्याचें शील कसें असलें पाहिजे याची कल्पना 'टाकभाड्या' पद्धतींत कशी होईल? कोमल वयापासून तारुण्यापर्यंत बहुतेक संसारी जनांच्या सामान्य मोहापासून अलिप्त राहाणें हें विद्यैकपरायणतेस किती जरूर आहे याची नीट कल्पना नसल्यानें केवढे घोटाळे होतात हें शांतपणें विचार करील त्याच्याच ध्यानांत येणार आहे. ती गोष्ट साधण्यासाठीं जनवसतीपासून विद्यालय दूर असल्यानें मोकळी हवा, स्वच्छ राहणी, व खेळण्याफिरण्यास मुब-

लक जागा या गोष्टी सहजच लाभतात. सभोंवतालच्या परिस्थितीचें वर्णन पुढील संस्कृत श्लोकांत अण्णांनीं केलें आहे.:—

**आढ्या ब्राम्ह्या लक्ष्या यास्ताः । सन्तु श्लाघ्याः शाला बह्व्यः ।**
**अध्याप्यानां मध्ये तॄणां । भूयान्यत्राऽऽनन्दो भूयात ॥**
**नद्यास्तीरे स्थानं रम्यं । हृद्या वन्या श्रीरालक्ष्या ।**
**एकान्तस्थः कान्तो देशः । क्रीडाभूः सा सद्विद्यायाः ॥**

यानंतर राष्ट्रीय शिक्षण साध्य होण्यासाठीं देशांतील राष्ट्रसत्तेचें मुख्यतः पाठबळ पाहिजे ही गोष्ट अण्णांना माहीत होती. आजहि सरकारी अधिकाऱ्यांस संमत असा शिक्षणक्रम असल्याशिवाय शिक्षणसंस्थांवर लोकांचा विश्वास बसणें शक्य नाहीं. पण कर्झनसाहेबांनीं युनिव्हर्सिटी कमिशन बसविल्यामुळें हिंदुस्थानांतील राज्यसत्तेचें धोरण आमच्या राष्ट्रीय शिक्षणास विरोधी आहे, म्हणून सरकारी मान्यता आह्मांस नको, आमचा शिक्षणक्रम स्वतंत्र असूं द्यावा अशी त्यांची मागणी होती. त्याचप्रमाणें सरकारी मान्यता आणि सरकारी मदत आपण घेतली कीं सरकारी नियंत्रण पाठीमागून येणारच असें ते म्हणत. आज नव्हे उद्यां परकीय सरकार येथून निघून जाऊन राष्ट्रीय सरकार त्या जागीं प्रस्थापित होईल असा पूर्ण भरवंसा त्यांना वाटत असे. ते म्हणतः—

" सरकार व प्रजा एका राष्ट्राची असल्याशिवाय शिक्षणाची शिस्त बसणें शक्य नाहीं. राष्ट्रीय विद्यापीठें निराळीं इतकेंच नव्हे तर परस्पर विरुद्ध हेतूनें चालणारीं अशीं असतील तर त्या देशाच्या वाटणीस सुख व समाधान फारच थोडें येईल. अशा दुहेरी राष्ट्रीय शिक्षणव्यवस्थेची नांदणूक फार दिवस एकत्र लागणें शक्य नाहीं. "

( ग्रं. मा. १९०५ सप्टेंबर, वर्ष १२, अंक ६. )

उलट ते असें स्पष्ट प्रतिपादन करीत कीं,

" राष्ट्रीय शिक्षण व सरकारी विद्याखात्याचें शिक्षण असा भेद सर्वस्वीं लुप्त व्हावा अशी आमची मनापासूनची इच्छा आहे. "

( आत्मोद्धार–महाराष्ट्रीय शिक्षण, पान ४२१ )

राजसत्तेवांचून शिक्षणसंस्था जोमांत येणार नाहींत असें म्हणून ते कधींहि स्वस्थ बसले नाहींत. उलट स्वतंत्र शिक्षणसंस्था त्यांनीं स्थापिली आणि आमरणांत शिक्षकाचा पवित्र पेशा शेवटपर्यंत स्वीकारला.

राष्ट्रीय शिक्षणांतील तिसरें प्रमुख साधन म्हणजे शिक्षक हें होय. वर अंतेवासी शिष्य व देशिक गुरु यांचा परस्परसंबंध कसा असावा याबद्दल सांगितलें आहेच. भावी पिढीच्या कल्याणाची सर्व जबाबदारी एका दृष्टीनें शिक्षकांवरच आहे हें विसरूनच चालायचें नाहीं. शिक्षकाची वागणूक, शिक्षकाचा पोषाख किंवा शिक्षकाचें बोलणें चालणें वगैरे गोष्टी विद्यार्थ्यांच्या मनांवर हितकारक अगर अहितकारक परिणाम करतात. या गोष्टीकडे राष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं अवश्य लक्ष दिलें पाहिजे. शिक्षकांविषयीं लिहितांना ते एके ठिकाणीं लिहितातः—

"आमचे शिक्षक तरी हल्लींचे पदवीधरच पाहिजेत असा आम्ही निर्बंध ठेवीतच नाहीं. मात्र त्या त्या विषयांत तरबेज होण्याची त्यांची इच्छा असावी. त्यांना शिक्षकाचा धंदा मनापासून आवडत असून ते त्या कामास आमरण वाहून घेणारे असावेत या हेतूनें शिक्षकाश्रम पृथक् ठेविला आहे. म्हणजे सर्व शिक्षकांना एका ठिकाणीं एकाच शिक्षकालयांत राहण्याची सर्व व्यवस्था केली आहे. शिक्षणाचें धोरण एक रहावें म्हणून सहवासानें व संभाषणानें मतें व आचरण दृढ होण्यासाठीं शिक्षकाश्रमाची योजना आहे. यापैकींच निदान एक-असामी विद्यार्थी-वसतिगृहांत राहील. शिक्षकांचा खर्च चालविला जाईल. त्यांना कोणत्याहि प्रकारें कुटुंबचिंतापाश असूं नये हें चांगलें. अशा निग्रहानें विद्याव्यवसायी, राष्ट्रोदयेच्छु तरुण हल्लींच्या शिक्षणाप्रमाणें एम्. ए. पासून खालीं मॅट्रिकपर्यंत जे कोणी या अटीवर व येथील शिस्तीप्रमाणें वागण्याचें कबूल करून समर्थ विद्यालयाच्या कार्यास साहाय्य करूं इच्छीत असतील, त्यांनीं शिक्षकाश्रमांत प्रवेश करावा." ( समर्थ-विद्यालय )

अशा रीतीनें स्वार्थत्यागी शिक्षकवर्ग जमवून त्यांच्या साह्यानें शिक्षणाचें महत्त्वाचें कार्य पुढें चालवावें असें अण्णासाहेबांनीं ठरविलें होतें.

नवीन शिक्षक नेमतांना तो पदवीधर असलाच पाहिजे असा अण्णांचा मुळींच आग्रह नसे. तो सुशिक्षित, ज्ञानजिज्ञासु, उत्साही आणि आनंदी

अशा चार विशेषणांनीं युक्त असला म्हणजे त्यांना पसंत होई. " शिक्षकानें नेहमीं विद्यार्थ्यांप्रमाणें ज्ञानजिज्ञासु असलें पाहिजे. जो शिक्षक स्वतः ज्ञान संपादण्याच्या कामीं कुचराई करतो तो विद्यार्थ्यांना काय शिकविणार ? असें अण्णासाहेब नेहमीं म्हणत. त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांशीं वागतांना त्यांनीं अंगीं नम्रता धारण करावी आणि त्यांच्याशीं अगदीं प्रेमानें वागावें असें ते नेहमीं प्रत्येक शिक्षकास सांगत. त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांनीं शिक्षकांबरोबरहि अगदीं वरच्या वडील भावाप्रमाणें वागावें अशी त्यांनीं विद्यालयांत शिस्त ठेविली होती हें पुढील प्रकरणांत स्पष्ट केलें आहेच.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कविकुलगुरु कालिदासानें पुढील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें उत्तम शिक्षक म्हणून त्यांची योग्यता होती.

**शिष्टाः क्रियाः कस्यचिदात्मसंस्थाः । संक्रांतिरन्यस्य विशेषयुक्ताः ॥**
**यस्योभयं साधु स शिक्षकाणाम् । धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥**

"कांहीं शिक्षक स्वतःपुरतेच विद्वान असतात तर कांहीं दुसऱ्याला शिकविण्याच्या कामांत तरबेज असतात. जे स्वतः उत्तम शिक्षक असून दुसऱ्याला शिकविण्याच्या बाबतींतहि तज्ज्ञ असतात असे शिक्षक खरोखर अव्वल दर्जाचे असें समजावें." या पहिल्या प्रतीच्या शिक्षकांप्रमाणें गुरुवर्यांची योग्यता होती. त्यांचें अध्ययन आणि अध्यापन वाखाणण्यासारखें होतें; म्हणूनच ते सर्वांस प्रिय होते.

सहवासानें खरी विद्या शिष्याला प्राप्त होते अशी पूर्वीची गुरुकुलाची परंपरा आज दिवसानुदिवस नाहींशी होत आहे. सध्यां गुरुशिष्यांचा संबंध फारच अल्पकाल एकत्र येत असल्यामुळें गुरूचें उच्च वर्तन आणि साधी वागणी याचा सुपरिणाम विद्यार्थ्यांच्या मनावर मुळींच होत नाहीं. यासाठीं सवसतिगृह विद्यालयें निघावींत असें न्या. रानडे, ना. गोखले, वगैरे मंडळी म्हणत. परंतु त्यांचा उपदेश पसंत पडून विद्यार्थीगृहें काढण्याचें श्रेय कोणींहि जोडलें नाहीं. अहर्निश आईबापांस सोडून वसतिगृहांत विद्यार्थी राहिले आहेत असें कधींहि घडलें नाहीं. "गुरुच्या ठायीं भक्ति ठेवून विद्यार्थी विद्या प्राप्त करून घेईल अशी योजना ( समर्थ विद्यालयाप्रमाणें ) होणें जरूर आहे. हें काम नुसत्या कवाइतीनें किंवा यंत्रपद्धतीनें रेटावयाचें नाहीं. येथें

अंत:करण-प्रेमळ अंत:करणच-पाहिजे. कानउघाडणी करून जो सत्य शिकवितो व तें शिकवितांना क्लेश होऊं देत नाहीं अशा गुरूला आई अगर बाप कां मानूं नये बरें ? " असा प्रश्न गुरुवर्यांनीं केला आहे. आज सुधारलेल्या युरोप-अमेरिका सारख्या देशांतूनहि सवसतिगृह विद्यालयें जास्त लोकप्रिय होऊं लागलीं आहेत. लहान वयांत कोंवळ्या बुद्धीच्या तरुण विद्यार्थ्यांवर विद्यालयांतील वसतिगृहांत राहिल्यावर तेथील सरस्वती-मंदिरांतील पवित्र वातावरणाचा परिणाम इष्ट असा घडतो असें आतां अनुभवानें सिद्ध झालें आहे. विद्यालयांतील शुद्ध अंत:-करणाच्या आणि विद्यार्थ्यांशीं प्रेमळ मनानें वर्तन ठेवणाऱ्या अध्यापकांच्या सहवासाचाहि विद्यार्थ्यांच्या पुढील आयुष्यक्रमांवर चांगला परिणाम घडतो असें शिक्षणखात्यांतील तज्ज्ञ विद्वानांचेंहि मत आहे. प्राचीन गुरुकुलपद्धति हिंदुस्थानांतील विद्यार्थीजनांच्या हितासाठीं कशी उपयोगी पडली होती याचें वर्णन आपण प्राचीन ग्रंथांवरून वाचतो. ती अध्यापनपद्धति आजहि गुरुकुल, ऋषिकुल किंवा आज चोहोंकडे गाजलेल्या डॉ. रवींद्रनाथ टागोर यांच्या शांतिनिकेतनमध्यें थोड्या फार फरकानें पुन: प्रगट झाली आहे. आत्मोन्नति हें ध्येय पूर्वीप्रमाणें सरस्वतीमंदिरांत आजहि कायम आहे. परंतु त्या ध्येयाबरोबरच राष्ट्रोन्नतीचें ध्येयहि दृष्टीआड होतां उपयोगी नाहीं अशी परिस्थिति आज दिसत आहे. आत्मोन्नति व राष्ट्रोन्नति हीं दोन ध्येयें एकत्र करून सध्याच्या तरुणांनीं आत्मोन्नतीबरोबर राष्ट्रोन्नतीहि घडवून आणली पाहिजे. राष्ट्राची राजकीय परिस्थिति आतां पूर्वीप्रमाणें शांततामय नसल्या-मुळें प्रत्येक राष्ट्रानें राष्ट्रीय जीवनक्रम निष्कंटक होण्यासाठीं स्वार्थत्यागाची जोड आपल्या शिक्षणक्रमास दिली पाहिजे. राष्ट्र जिवंत राहण्यास आणि परसत्तेचा प्रतिकार करावयास आज जें शिक्षण उपयोगी पडेल तेंच शिक्षण राष्ट्रीय सरकारनें विद्यापीठांतून दिलें पाहिजे. प्रसंगविशेषानें शिक्षणाचें स्वरूप थोडेंसें बदललें तरी आत्मोन्नति आणि देशोन्नति हीं शिक्षणविषयक ध्येयाचीं दोन अंगें आजहि कायम आहेत. ज्या योगें या दोन उपायांचा विचार करण्यास विद्यार्थ्यांना विद्यालयांतून अवसर मिळेल तीच विद्या

---

१. य आतृणयवितथेन कर्णावदुःखं कृण्वन्न मृतं संप्रयच्छन्। तं मन्येत पितरं मातरं च तस्मै न द्रुह्येत्कतमच्चनाह। -**यास्क.**

' वीर्यवती ' अशी म्हटली पाहिजे. यासाठीं पूर्वीप्रमाणें गुरुशिष्यांचा एक-मेकांशीं संबंध जास्त वेळ जेथें येईल अशीं नवीन समर्थ विद्यालयासारखीं उच्च विचाराचीं विद्यालयें आजहि चोहोंकडे निघणें जरूर आहे.

## समर्थ विद्यालयांतील शिक्षणाच वैशिष्ट्य

समर्थ विद्यालयांतील शिक्षण कसें असतें असें विचारणारास—

समर्थविद्यालयनाम्नि कीर्तिते ।
समुद्भवत्येकपदे खलु द्वयं ।
न द्वीपसेवांकितवेतने मतिः ।
स्वकीयविज्ञानबलेन जीवनम् ॥

असें आमच्या संस्थेंतील शिक्षण असतें असें गुरुवर्यांनीं सांगितलें आहे. याबद्दल जास्त सविस्तर विवेचन येथें करावयाचें आहे. १९०६ सालीं समर्थ विद्यालयांत कार्यपद्धति कशी असावी याबद्दल गुरुवर्यांनीं एक अभ्या-सक्रमासंबंधीं पत्रक काढलें होतें. अभ्यासक्रम पुढें दिला आहेच. त्याचे शेवटीं कार्यपद्धतीविषयीं गुरुवर्य लिहितातः—

"प्रत्येक विषय शिकवितांना व्यावहारिक दृष्टि ठेऊन अनवश्यक भाग गाळला जाईल. शक्य तितकें मूर्त वस्तूंचे द्वारें व निरनिराळीं उदाहरणें देऊन स्पष्ट ज्ञान देण्याची योजना होईल. परीक्षांचा कांच नाहींसा करून घोकंपटीला अजीबात फांटा द्यावयाचा. शास्त्रीय विषय शिकवितांना वरील इयत्तेंतील विद्यार्थ्यांनीं स्वतः प्रयोग करावेत अशी तजवीज राहील. हस्त-कौशल्य, बिनचूकपणा व कल्पनाशक्ति यांची वाढ व्हावी म्हणून शिल्प-शाळेंत त्यांचेकडून हातकाम करून घेतलें जाईल. इंग्रजीमध्यें प्रवेश करून देतांनाच पुढेंहि संभाषणपद्धतीचा उपयोग केला जाईल. संस्कृत व्याक-रणाचा निरर्थक बोजा कमी करून वाङ्मयाची ओळख सुलभ रीतीनें करून दिली जाईल. भूगोलांतील नुसत्या याद्या पाठ करणें नीरस व निरुपयोगी आहे म्हणून नकाशांचाच उपयोग पुष्कळ करण्यांत येईल. एकंदरीनें शिक्षणशास्त्रांतील नवीन नवीन सर्वमान्य पद्धतीच्या साहाय्यानें शिक्षण देण्याचें धोरण आहे. संस्था अमूकच अभ्यासक्रमानें बांधली गेली नसल्यानें फक्त साधनांचें अनुकूल्य मिळालें म्हणजे या गोष्टी सहज साध्य होतील.

## सामुदायिक व व्यक्तिविषयक शिक्षणपद्धति

इतर सरकारी अगर निमसरकारी शिक्षणसंस्थांमधून एक ठराविक सांच्याची शिक्षणपद्धति चालू असते. त्यामुळें विद्यार्थ्यांची वैयक्तिक बुद्धिमत्ता पुष्कळ वेळां निस्तेज होते असा अनुभव आहे. सध्याच्या शाळांतून विद्यार्थ्यांच्या वैयक्तिक गुणावगुणांकडे शिक्षकांचें लक्ष जाणें शक्य नसतें. एका उभ्या वर्षांत वर्गांत ५० वर विद्यार्थी असल्यामुळें शिक्षकांची व विद्यार्थ्यांची दोन दोन वर्षें ओळखहि पडत नाहीं. यामुळें सामुदायिक शिक्षणपद्धति जास्त प्रमाणांत अमलांत येत आहे. परंतु या बाबतींत कांहीं तरी नियंत्रण असणें आज फार जरूरीचें झालें आहे. समर्थ विद्यालयांत प्रत्येक वर्ग २०।२५ विद्यार्थ्यांचा असावा असा नियम गुरुवर्यांनीं पाळला होता. शिवाय सर्व विद्यार्थी शाळेच्या वसतिगृहांत राहात असल्यामुळें शिक्षकांचा व विद्यार्थ्यांचा निकट संबंध येई; यामुळें विद्यार्थ्यांच्या प्रगतीकडे शिक्षकांचें जास्त लक्ष जात असे.

## वसतिगृह

प्रत्येक शाळेस आणि कॉलेजास वसतिगृह असणें अत्यंत जरूर आहे. वसतिगृहांत सर्व वर्गांचे व जातींचे विद्यार्थी एके ठिकाणीं विद्यार्जनासाठीं राहिल्यानें सर्व विद्यार्थ्यांची दृष्टि विशाल होते आणि त्यांच्या भावी चरित्रावर श्रीसरस्वतीच्या पवित्र वातावरणाचा उत्तम परिणाम होतो असें आतां अनुभवानें सिध्द झालें आहे. विद्याव्यासंगी, एकनिष्ठ आणि सुविचारी गुरूंच्या सान्निध्यांत वसतिगृहांतील विद्यार्थी अध्ययनांत काल घालवीत असतां भावी नागरिकांना साजेसा असा भावी आयुष्यक्रम कसा आंखावा याचें शब्दचित्र याच वेळीं प्रत्येक विद्यार्थी आपल्यापुढें रेखाटीत असतो. अशा वेळीं सद्विचारी गुरुजनांचें सान्निध्य फार उपयोगी पडतें. याविषयीं मागें लिहिलें आहे. शिक्षणसंस्थास वसतिगृह असावी यावर गुरुवर्यांचा विशेष भर होता. वसतिगृहांत न राहतां बाहेर राहून विद्यालयांत येण्यास ते सहसा कोणासहि परवानगी देत नसत. वसतिगृहांतील वागण्याची शिस्त, आपापलीं कामें बिनबोभाट करण्याची संवय, वसतिगृहांतील सर्व विद्यार्थ्यांना उपयोगी अशीं सामुदायिक कामें एकमेकांच्या सहकार्यानें पार पाडण्याची उत्सुकता आणि गुरुशिष्यांमध्यें निरंतर वर्धिष्णु

असें प्रेम या अनेक गुणांनीं विद्यार्थ्यांचें शील सुधारतें असा अनुभव सर्वांना असेलच. शिक्षणसंस्थेचें वसतिगृह हें एक अंग आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशीं विद्यालयें चोहोंकडे स्थापन करण्याचा गुरुवर्यांचा निश्चय होता; पण तो अनेक अपरिहार्य कारणांनीं सिद्धीस गेला नाहीं.

## शाळेची वेळ

शाळेची वेळ कोणती असावी हा एक शिक्षणाइतकाच महत्त्वाचा प्रश्न आहे. पण इकडे शिक्षणतज्ज्ञांचें व शिक्षणाधिकाऱ्यांचें लक्ष असावें तसें नाहीं ही मोठी खेदाची गोष्ट आहे. दुपारीं ११ वाजतां घाईनें चार घास पोटांत भरून लागलींच तशाच भरल्या पोटानें शाळेंत जाणें प्रकृतीच्या दृष्टीनें योग्य आहे कां? असा प्रश्न आज पुष्कळ दिवस हिंदुस्थानांतील विद्वानांपुढें आहे; परंतु तो अद्यापि सुटावयाच्या मार्गास लागला नाहीं. या कामीं गु. अण्णासाहेबांनीं पुढाकार घेतला आणि सकाळीं ३ तास व दुपारीं ३ तास अशी शाळेची वेळ त्यांनीं निश्चित केली. सकाळीं वाङ्मयाचें शिक्षण आणि दुपारीं ११ वाजतां भोजन केल्यावर २॥ वाजतां पुनः तीन तास औद्योगिक शिक्षण घ्यावें असा क्रम अद्यापि नवीन समर्थ विद्यालयांत चालू आहे. लहानपणीं विद्यार्थ्यांना शाळेंत एकसारखें सहा तास डांबून ठेविलें तर त्याचा अनिष्ट परिणाम विद्यार्थ्यांच्या शरीरप्रकृतीवर झाल्यावांचून राहत नाहीं. दुपारीं ११ ते ५ ही वेळ आज बरींच वर्षें जरी सर्वमान्य झाली आहे असें दिसतें तरी ती सर्वथैव अयोग्य व अनैसर्गिक अशी आहे. म्हणून नवीन समर्थ विद्यालयाप्रमाणें या बाबतींत इष्ट असा फरक इतर विद्यालयांनीं घडवून आणला पाहिजे. राष्ट्रांतील भावी तरुण पिढीच्या कल्याणासारखा महत्त्वाचा प्रश्न पुढें असतांना शिक्षणाधिकाऱ्यांचें लक्ष तिकडे जात नाहीं ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. शिक्षणाधिकारी आतां तरी या गोष्टीकडे पाहतील काय?

आतां समर्थ विद्यालयांत शिक्षणक्रम कोणता आंखला होता त्याचें दिग्दर्शन पुढीलप्रमाणें गुरुवर्यांनीं स्वतः प्रसिद्ध केलेल्या अभ्यासपत्रकांत प्रसिद्ध केलें आहे तें असें:—

## अभ्यासक्रम

( १ ) **मराठीः**--मराठी भाषेचें व वाङ्मयाचें मार्मिक व व्यापक ज्ञान; निरनिराळ्या कवींचे वेंचे, थोर पुरुषांचीं चरित्रें, निवडक लेख व निबंध इत्यादि. व्याकरण, व्युत्पत्ति, साहित्यशास्त्राची सामान्य माहिती व निबंधलेखन.

( २ ) **गणितः**--अंकगणित सर्व, बीजगणित व भूमिति--शास्त्रीय व औद्योगिक शिक्षणास आवश्यक व व्यवहारांत लागणारा सर्व भाग, त्रिकोणमितीचा व्यवहारोपयोगी भाग, यंत्रशास्त्राचीं सामान्य तत्त्वें, देशी पद्धतीचा जमाखर्च व इतर पद्धतींचें सामान्य ज्ञान.

( ३ ) **इतिहास, भूगोल, नागरिकत्व व अर्थशास्त्रः**--( क ) **इतिहास**--महाराष्ट्राचा व हिंदुस्थानचा सविस्तर इतिहास आणि जगाच्या इतिहासाची ठोकळ माहिती.

( ख ) **भूगोल**--हिंदुस्थानचा सविस्तर सृष्टिविषयक, व्यापारीय, राजकीय, सांपत्तिक, धार्मिक, सामाजिक, शिक्षणविषयक इत्यादि व जगांतील इतर सर्व देशांचा इतिहास व व्यापार समजण्यापुरती भूगोलाची माहिती.

( ग ) **नागरिकत्व**--हिंदुस्थानांतील प्रचलित राज्यपद्धतिः--गांव, तालुका, जिल्हा, इलाखा व देश; इंग्लंड व हिंदुस्थान यांचा संबंध; हिंदुस्थानांतील समाजव्यवस्था, जगांतील निरनिराळ्या राज्यपद्धती; नागरिकांचे हक्क व कर्तव्यें.

( घ ) **अर्थशास्त्रः**--अर्थशास्त्राचीं ठोकळ तत्त्वें; औद्योगिक प्रगतीच्या तत्त्वांची ओळख; हिंदुस्थानच्या व्यापाराची व धंद्यांची माहिती.

( ४ ) **इंग्रजीः**--या विषयांत संभाषणपध्दतीनें प्रवेश; नंतर वाचनपुस्तकमाला; पांचव्या इयत्तेपासून गोष्टी, चरित्रें, नागरिकत्वाचीं पुस्तकें व वाङ्मय, इतिहास किंवा शास्त्रीय विषयांचें कोणतेंहि पुस्तक चांगलें समजेल इतकें अध्ययन; सर्व तऱ्हेचा पत्रव्यवहार व निबंधलेखन. व्याकरण--फक्त सर्वसामान्य नियमांची माहिती, वाचनपुस्तकांचें आधारें देणें.

( ५ ) **चित्रकलाः**--दिलेली आकृति व पुढें ठेवलेले पदार्थ पाहून आकृति काढणें; कर्तव्यभूमिति निरनिराळ्या आकाराचे मातीचे पदार्थ बनविणें; पानांची व फुलांची हुबेहुब आकृति काढणें, वेलबुटी काढणें, घन-

भूमिति, यथादर्शन पदार्थलेखन, प्रकाशछाया व यांचीं मूलतत्त्वें; रंगित चित्रें काढणें, पुतळे पाहून आकृति काढणें; मनुष्य पुढें बसवून चित्र काढणें; अस्थि व स्नायू यांची घटना व चलन.

( ६ ) **संस्कृत**:–१. सामान्य व्याकरण ( वाङ्मयोपयोगी ) २. वाङ्मय ( वेद, रामायण, महाभारत व उत्तरकालीन काव्यादि ग्रंथ ). ३. देवविद्यात्मक पौराणिक, तत्त्वशास्त्रीय व आचारसंस्कारादिविषयक ग्रंथ. ४. नित्यनैमित्तिक कर्में चालविणारे पुरोहित होऊं इच्छिणारास पाठांतर याज्ञिकी.

( ७ ) **धर्मशिक्षण**:–प्रातःस्मरणाचे निवडक श्लोक, भारत व रामायणाची मराठींतून अनुक्रमानें साद्यंत माहिती, आचार, नित्यकर्में व सण इत्यादि गोष्टींची सविस्तर व सोपपत्तिक माहिती, मनुस्मृति, गीता व उपनिषदें इ० ग्रंथांवरून वरच्या इयत्तांस धर्मतत्त्वांची सामान्य माहिती देणें; जगांतील प्रसिद्ध धर्मांचा तुलनात्मक अभ्यास.

( ८ ) **आरोग्यशास्त्र**:—आरोग्याचे सामान्य नियम, हवा, पाणी, अन्न, इत्यादींचे गुणधर्म व शरीरावर परिणाम, शरीररचनेची सामान्य माहिती.

## सवडीप्रमाणें हातीं घेण्याचे विषय

( १ ) **पदार्थविज्ञान व रसायन**—( क ) पदार्थविज्ञान—सर्व भौतिक शास्त्रांत उपयोगी पडणारा भाग.

( ख ) पृथक्करण, निरिंद्रिय व सेंद्रिय रसायन शास्त्राचीं सामान्य तत्त्वें; रासायनिक धंद्यांस जरूर अशी सर्व माहिती, प्रयोगशाळेंत विद्यार्थ्यांनीं स्वतः काम करणें.

( २ ) **ऐच्छिक विषय**:–( क ) सुतारी-लांकडाच्या जाती व उपयोग ओळखणें; हत्यारें वापरण्यास शिकविणें; सर्व प्रकारचे सांधे; चौकटी, पेट्या, टेबलें, कैच्या व व्यवहारांत लागणाऱ्या लहान लहान जिनसा तयार करण्याइतकें कातकाम.

( ख ) विणकाम—सर्व प्रकारच्या हातमागांवर विणण्याचें पूर्ण ज्ञान, माग तयार करणें.

( ३ ) शारीरिक शिक्षणः—( क ) सर्व प्रकारचे मर्दानी खेळ. ( ख ) तालीम व कसरत. ( ग ) कवाईत.

( ४ ) हिंदी, गुजराथी, कानडीः— इत्यादि भाषा समजण्यापुरती व बोलण्यापुरती.

( ५ ) गायनः—फक्त होतकरू मुलांना गायनशिक्षण.

अशी साधारण रूपरेषा देतां येईल; तरी शिकविणाऱ्या शिक्षकांच्या इच्छेप्रमाणें त्यांत इष्ट तो फरक करितां येण्याजोगा होता. तसेंच अमुक विषयाचा इतका भाग झालाच पाहिजे अशी कोणत्याहि प्रकारची सक्ती शिक्षकावर नसे. त्यामुळें ठराविक पुस्तकांचें अगर शिस्तीचें नियंत्रण शिक्षकांवर असू नये असें गुरुवर्यांचें मत होतें. सध्याच्या सरकारी शिक्षणखात्याच्या नियमांप्रमाणें सरकारनें पसंत केलेल्या पुस्तकांपेक्षांहि जास्त सरस पुस्तकें उपलब्ध असतां तीं शिक्षकांना नेमतां येत नाहींत, याविषयीं एकदां मुंबई कौन्सिलांत डॉ. परांजपे यांनींहि खटपट करून पाहिली. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. या प्रश्नांचा निकाल सरकारी विद्याधिकाऱ्यांनीं योग्य रीतीनें लावणें जरूर आहे. शिक्षणखातें लोकांच्या हातांत पाहिजे आणि त्यांत इष्ट सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत असें म्हणणें सर्वस्वीं योग्यच आहे.

## परीक्षापद्धति

सध्याची शाळांमधून चालू असणारी परीक्षापद्धति सदोष आहे असें आतां सर्व विद्वानांनीं मान्य केलें आहे. विशिष्ट विषयांत पास होऊन इतके गुण मिळविले पाहिजेतच, नाहीं तर त्यांना वरच्या वर्गांत घातलें जाणार नाहीं, असा नियम असल्यामुळें पुष्कळ चांगले विद्यार्थी परीक्षांच्या काचांतून सुटण्यासाठीं सर्व विषयांत प्रथम पाठांतरावर भर देतात. त्यामुळें अध्ययनाचें खरें उद्दिष्ट बाजूला राहतें आणि घोकंपट्टीनें विद्यार्थ्यांच्या मेंदूवर वाईट परिणाम होतो. क्वचित् प्रसंगीं परीक्षेंत नापास होऊन एकादा भावनाप्रधान विद्यार्थी आत्महत्येसहि प्रवृत्त होतो अशीं उदाहरणें घडलेलीं आहेत. ही परीक्षापद्धति काढून टाकून त्याऐवजीं प्रत्येक विषयाची चांचणी व्हावी असा क्रम गुरुवर्यांनीं विद्यालयांत सुरू केला. वार्षिक परीक्षांवरून

विद्यार्थ्यांचा अभ्यास कितपत झाला आहे हें अजमावणें बरेंच कठीण आहे. आतां सदर परीक्षापद्धति सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतहि कुचकामी ठरली असून त्याऐवजीं विद्यार्थ्यांची मासिक प्रगति कशी असते, वर्गात त्याचा अभ्यास कसा असतो, त्याची ग्राहकशक्ति किती तरतरीत असते, या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मग त्याची चांचणी, परीक्षा घ्यावी. हा प्रयोग गुरुवर्यांनीं नवीन समर्थ विद्यालयांत करून पाहिला आणि तो यशस्वी झाला आहे असें सिद्ध केलें. चांचणीच्या द्वारें परीक्षा घेण्याची पद्धती रूढ झाली तर पुष्कळ विद्यार्थ्यांची होणारी हानि टळेल आणि अभ्यासक्रमाला इष्ट व नैसर्गिक असें वळण लागेल.

## मराठीचें अध्ययन

मराठी वाङ्मयाचा सशास्त्र अभ्यास विद्यालयांत करण्यांत आला पाहिजे अशाविषयीं गुरुवर्यांची विशेष दक्षता असे. मराठी अभ्यासक्रमांत ग्रंथराज दासबोध, नवनीत-वेंचे, किनऱ्यांच्या वाचनपाठमाला, प्रो. भानूंचें 'नाना आणि महादजी' हें पुस्तक, प्रो. माट्यांचीं प्रवासवर्णनें, वगैरे पुस्तकें पहिल्या तीन वर्गांना लावण्यांत येत होतीं. तसेंच वरील वर्गात सुप्रसिद्ध लेखकांचे निबंध, थोर विभूतींचीं चरित्रें, टिळक-चरित्रांतील निवडक भाग, वगैरे विद्यार्थ्यांना बोधपर आणि उपयोगी कथाभाग वर्गांत शिकविला जात असे. याशिवाय अगदीं उच्च वर्गांतील विद्यार्थ्यांकडून गुरुवर्य गीतारहस्यांतील 'स्थितप्रज्ञाचीं लक्षणें' व राजवाड्यांचे 'संकीर्ण लेख'हि वाचून घेत.

भाषाविषय शिकवितांना गुरुवर्यांच्या पुढें दोन प्रकारची दृष्टी होती. एक गोष्ट म्हणजे विद्यार्थ्यांना भाषाविषय अवगत व्हावा व दुसरी गोष्ट त्यांना तदनुरोधानें हिंदुस्थानच्या आणि जगाच्या इतिहासाचें यथार्थ ज्ञान प्राप्त व्हावें. मराठी, इतिहास, भूगोल, इंग्रजी वगैरे विषय शिकवितांनाहि ही दृष्टी शिक्षकांनीं डोळ्याआड करूं नये असें त्यांचें मत असे.

भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं मातृभाषेशिवाय दुसरें अन्य साधन नाहीं. मातृभाषेच्या द्वारें हिंदुस्थानांतील थोर आणि प्रभावी पुरुषांचीं चरित्रें बालवाचकांना चांगलीं अवगत झालीं पाहिजेत. त्या दृष्टीनें प्रो. भानू यांचें 'नाना आणि महादजी' हें पुस्तक व रा. वि. स. वाकसकर यांचीं 'कांहीं अप्रसिद्ध चरित्रें' वगैरे पुस्तकें अत्यंत प्रभाव-

झाली होतीं. दिवंगत थोर पुरुषांचीं चरित्रें वाचून बाल-वाचकांना एक प्रकारची स्फूर्ति मिळत असते. त्याचप्रमाणें भारतवर्षांतील सुप्रसिद्ध स्थळांचीं प्रवासवर्णनेंहि फारच उद्बोधक होत असतात. त्यायोगें अनायासें भारत-वर्षांतील पवित्र क्षेत्रांचा परिचय विद्यार्थ्यांना होतो आणि आपणहि तीं पाहावींत अशी स्वाभाविक इच्छा मनांत उत्पन्न होते.

वर लिहिल्याप्रमाणें मराठीच्या अभ्यासानें एकामागून एक असे अनेक फायदे होतात. त्या दृष्टीनें आतां सरकारी शाळाखात्यांतील क्रमिक पुस्तकांची पुन-र्घटना करून सुरस आणि मुलांच्या कोमल भावनांना हलवितील असे सुंदर धडे घालणें फारच अत्यावश्यक आहे. 'आंधळा शंभू', 'बोलका ढलपा' यासारखे निरस धडे काढून टाकून त्या ऐवजीं 'वीर अभिमन्यु', 'स्वदे-शाभिमान', 'हिंदुस्थानचें गतवैभव' अशासारखे धडे घालणें जरूर आहे. तसेंच 'हा हिंद देश माझा', 'प्रियकर हिंदुस्थान', 'भारत हमारा देश है' 'जय! हे जय हे! भारत–भाग्य–विधाता' हीं आतां चोहोंकडे सर्वमान्य झालेलीं पद्येंहि मराठी क्रमिक पुस्तकांत अवश्य यावयास पाहिजेत. आज देशांत चोहोंकडे सर्व प्रकारें विचारक्रांति होत असल्यामुळें अभ्यासक्रमांतहि इष्ट असा फरक घडून यावयास पाहिजे.

मातृभाषेबद्दल विद्यार्थ्यांच्या मनांत प्रथमपासून जिज्ञासा उत्पन्न करून त्यांच्या हातूनहि कांहीं तरी साहित्यसेवा घडवावी अशा सद्धेतूनें गुरुवर्यांनीं आपली शिक्षणपद्धति आंखली होती. आज महाराष्ट्रांत त्यांचे अनेक शिष्य चोहोंकडे विखुरले आहेत. मराठीचा व्यासंग स्वत: पुढें चालवून अगर मराठी वाङ्मयास उत्तेजन देऊन त्यांना गुरुवर्यांच्या दिवंगत आत्म्यास संतोष देतां येईल. तें कार्य करण्यास आतां त्यांनीं पुढें यावयास पाहिजे. ते पुढें येणार कां मागेंच राहणार?

मराठीच्या अध्ययनांत पूर्वींच्या संतकवींचा विद्यार्थ्यांशीं परिचय अवश्य झाला पाहिजे. त्याचप्रमाणें श्रीसमर्थ रामदासांच्या सरस आणि स्फूर्ति देणाऱ्या काव्याचा परिचय सर्व विद्यार्थ्यांना करून देण्याचा उपक्रम गुरुवर्यांनीं प्रथमपासून केला होता. याबद्दल जास्त माहिती मागें एके ठिकाणीं सविस्तर दिली आहेच.

## संस्कृत शिक्षणाचें वैशिष्ट्य

संस्कृत भाषेचा व्यासंग गुरुवर्यांनीं अगदीं शेवटपर्यंत कायम ठेविला होता. ते उत्तम संस्कृत शिक्षकहि होते, त्यामुळें संस्कृत शिक्षणाबद्दल त्यांना विशेष आस्था वाटे. समर्थ विद्यालयांत संस्कृत शिकविण्यासाठीं नवीन दिशा गुरुवर्यांनीं आंखली होती. त्याप्रमाणें संस्कृत शिकविण्यासाठीं संस्कृतप्रवेश, संस्कृत गीर्वाणलघुकोश, संस्कृत रामायणांतील उतारे, वगैरे नवीन पुस्तकें अण्णासाहेबांच्या प्रेरणेमुळेंच तयार झालीं. त्यांनीं तयार करविलेलीं संस्कृत-प्रवेश व कोष हीं पुस्तकें तर आतां सरकारी शाळा–खात्यानेंहि मंजूर केलीं असून संस्कृतप्रवेशाची तर आतां आठवी आवृत्ति निघाली आहे. हा एक गुरुवर्यांच्या धोरणाचा विजयच होय. संस्कृतबद्दल त्यांचें प्रेम किती उच्च प्रकारचें होतें हें पुढील उताऱ्यावरून दिसून येतें.

'त्वच्चित्तं मम चित्तमनु । त्वच्चरित्रं मे चरित्रमनु ।' माझ्यासारखें तुझें मन होऊं दे, माझ्या आचरणासारखें तुझें आचरण होऊं दे. असें शिक्षाध्यायांत सांगितल्याप्रमाणें गुरूचें चांगलें तेवढें अनुकरण करावें, इतर न करावें, हें तत्त्व आम्हीं पाळलें नाहीं, आणि अमरवाणीलाहि 'मृत' हें विशेषण लावूं लागलों. देवांचा हा उपमर्द परमेश्वरास कसा सहन व्हावा ? ज्यांनीं साऱ्या जगभर या भाषेचा प्रचार करण्यास झटावें आणि आपल्या सनातन धर्माचें पाणी तमाम दुनियेला दाखवावें, त्यांनींच आमच्या सनातन भाषेला मृत म्हणून तिच्या संकोचाची इच्छा धरावी आणि त्या यत्नाला लागावें काय ? तुम्ही आम्ही, सर्व हिंदु राष्ट्र, रामायण-महाभारतादि ग्रंथ, चारी वेद, अनंत उपवेद, जोंपर्यंत जगांतून नाहींसे झाले नाहींत, तोंपर्यंत संस्कृत मरत नाहीं; आत्म्याप्रमाणें ती अमर आहे. सर्व लौकिक भाषांचें अध्ययन जोरानें करा. लोकांत ज्ञान पसरावयाचें, जागृति करावयाची तर लोकांस समजेल त्या भाषेंतच बोललें पाहिजे, ग्रंथ केले पाहिजेत. गौतमबुद्धांनीं उपदेश त्या वेळच्या भाषेंत केला; पण संस्कृताला 'मृत' किंवा अशा कांहीं विशेषणानें उल्लेखिलें नाहीं. सर्व भाषा देवांच्याच आहेत असें म्हणण्याची मोकळीक आहे व आम्हीहि म्हणतों. पण त्यासाठीं गीर्वाणवाणीचें अग्रस्थान कोणीं हिरावून घेणें शक्य नाहीं. प्रत्येक सुशिक्षित आर्यास ती आली

पाहिजे, असा आमचा कटाक्ष आहे. आमच्या देशांतील सर्व भाषांस तिची जरूर आहे. त्यांची वाढ व्हावयाची असेल तर संस्कृताचें साहाय्य त्यांना अवश्य आहे. आईच्या दुधासारखें साधन उपलब्ध असतांना, ती जीवंत असतां ' मेली ' ह्मणून डांगोरा पिटवून वरच्या दुधावर मुलांस वाढवूं पहाणाऱ्या लोकांस काय ह्मणावें ? हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न प्रांतांतील लोकांत ' नवा जोर नवी हिम्मत ' उत्पन्न करण्यास देशी भाषांचें अध्ययन जोरानें झालें पाहिजे. जिकडे तिकडे आर्य लोकांच्या बुद्धीला अज्ञानराहूनें ग्रासिलें आहे. त्याचा शिरच्छेद केला पाहिजे. एका भाषेच्या अस्त्रानें हें कार्य होत नाहीं, तर अनेक भाषारूपी अस्त्रांनीं तें केलें पाहिजे. पूर्वींचीं असलेलीं अस्त्रें मोडलीं असलीं तर नीट करून त्यांना पाणी दिलें पाहिजे. परंतु त्या सर्व अस्त्रांस मूठ एकाच लांकडाची आहे हें विसरतां कामा नये. सर्व देशी भाषांस संस्कृताची फार जरूर आहे.

## संस्कृत अध्ययनाची एक योजना

निव्वळ मराठी जाणणाऱ्या प्रौढ जनतेंत संस्कृतचें अध्ययन वाढावें आणि मराठी उत्तम जाणणाऱ्या लोकांना संस्कृतमधील रामायण-महाभारतादि सोपे सोपे ग्रंथ सुलभपणें समजावेत या हेतूनें गुरुवर्यांनीं एक लहानसें पत्रक संस्कृत शिकविण्यासाठीं तयार केलें होतें. मराठी समास, संधि व थोडेसें व्याकरण इतकी तयारी झालेल्या मंडळींना या पत्रकाच्या द्वारें संस्कृत शिकविण्याची योजना त्यांनीं केली होती. या बाबतींत मराठी शिक्षणेच्छु विद्यार्थ्यांबरोबर १९२५-२६ सालीं त्यांचा पत्रव्यवहारहि चालत असे. विद्यार्थ्यांच्या पत्रांचीं उत्तरें व त्यांच्या शंकांचें निरसन स्वतः गुरुवर्य करीत. आजहि या योजनेचा उपयोग झाल्यास वाचकांनीं पहावा म्हणून आम्ही ती योजना येथें साग्र देत आहोंत. ती अशी:—

## गीर्वाणवाणीसुलभप्रवेश

१. भाषा शिकावयाची म्हणजे स्वाभाविक रीतीनें म्हणजे संभाषणानें, श्रवणानें व अवलोकनानें शिकली तर सुलभपणानें येते. संस्कृतहि तसें शिकावें, पण तशी सोय नसेल तर एकदम ग्रंथ वाचण्यास सुरवात करावी. त्यापूर्वीं कांहीं थोड्या गोष्टी लक्षांत वागविल्यास उपयोग होईल.

२. वाक्यांत क्रियापद मुख्य आहे. त्याच्याशीं कारक संबंधानें निरनिराळ्या विभक्तींत नामें असतात. ( विशेषणें नामावलंबी व तदनुसार रूपधारी असल्याकारणानें त्याचा निराळा विचार करण्याची जरूरी नाहीं. ) विभक्ति-प्रत्यय असणें किंवा नसणें ही गोष्ट वेगळी, पण विभक्त्यर्थ सर्व भाषांत सारखेच. विभक्ति, वचन, काळ, रूप, भेद वगैरेंचीं लक्षणें व कार्यें जगांतील सर्व भाषांत एकच असतात. भाषा निराळी याचा अर्थ शब्द व शब्द-रूपें निराळीं. तेव्हां कोणचीहि एक भाषा व्याकरणज्ञानपुरःसर आली म्हणजे त्या गोष्टी पुनः शिकण्याचें कारण नाहीं.

३. या दृष्टीनें संस्कृत ग्रंथ वाचणारानें नामें व क्रियापदें यांच्या रूपांवरून अर्थ कसा करावा इतकें शिकलें म्हणजे झालें. यासाठीं अगदीं ठोकळ व सर्वव्यापी अशा कांहीं गोष्टी सांगावयाचा विचार आहे. संस्कृतांत धातु बावीसशें आहेत. त्यांचे (धर्मावरून, वर्णावरून, गुणावरून, कर्मावरून वगैरे माणसांचे, जनावरांचे, पक्षिकीटकांचे वर्ग बांधतात, तसे ) दहा गण बांधले आहेत; परंतु वाचकांस याचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. गणांचीं चिन्हें म्हणजे धातूंना प्रत्ययापूर्वीं एखादें अक्षर लागणें न लागणें किंवा आद्याक्षराची पुनरावृत्ति होणें, हीं पुनः पुनः येणाऱ्या क्रियापदावरून कळून येतील. अमळ लक्ष दिलें पाहिजे इतकेंच. पूर्वपश्चात् आगमावरून व प्रत्ययावरून काळ, रूप, भेद व अर्थ ओळखतां येणें शक्य आहे.

४. मागें 'अ' अधिक लावला म्हणजे भूतकाळ आहे असें ओळखावें. भूतकाळाचा परोक्ष भूत, म्हणून एक महत्त्वाचा प्रकार आहे. त्याचें मुख्य स्वरूप धातुस्वराची आद्य व्यंजनासह पुनरावृत्ति होते हें होय. त्याचीं तृतीय पुरुषाशिवाय रूपें येत नाहींत, कारण हा काळ कथनरूपींच येतो. धातूच्या पुढें व प्रत्ययाच्या पूर्वीं 'स्य' असला कीं भविष्यकाळ समजावा.

५. संभाषण स्वरूपी असेल तेव्हांच प्रथम व द्वितीय पुरुषांच्या रूपांचा विचार पहावा लागतो.

६. मुख्य प्रत्यय लक्षांत ठेवले पाहिजेत. ते पुढीलप्रमाणें आहेत. कर्त्यावरून क्रियापद कोण पुरुषीं आहे तें प्राय: ओळखेल.

वर्तमान

परस्मैपद

| | ए. व. | द्वि.व. | ब. व. |
|---|---|---|---|
| प्र. | मि | वः | मः |
| द्वि. | सि | थः | थ |
| तृ. | ति | तः | अन्ति ( ति ) |

आत्मनेपद

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | ए | वहे | महे |
| द्वि. | से | इ (आ) थे | ध्वे |
| तृ. | ते | इ (आ) ते | अन्ते (ते) |

भूत ( मागें अ )

परस्मैपद

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | अम् | व | म |
| द्वि. | स् | तम् | त |
| तृ. | त् | ताम् | अन् |

आत्मनेपद

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | इ | वहि | महि |
| द्वि. | थाः | इ (आ) थाम् | ध्वम् |
| तृ. | त | इ (आ) ताम् | अन्त (त) |

परोक्षभूत

| | | | |
|---|---|---|---|
| परस्मैपद | अ | अतुः | उ |
| आत्मनेपद | ए | आते | इरे |

भविष्य काळाचे प्रत्यय वर्तमानाप्रमाणेंच. फक्त त्यांच्यापूर्वी ' स्य ' आगम येतो.

विध्यर्थाचे बहुतेक प्रत्यय भूतकाळाप्रमाणेंच. फक्त त्यांच्यापूर्वी ' इ ' किंवा ' या ' लागतो.

आज्ञार्थाचीं रूपें तृतीय व विशेषतः द्वितीय पुरुषाचींच फार येतात. त्याचे प्रत्यय पुढीलप्रमाणें:—

परस्मैपद

| | ए. व. | द्वि. व. | ब. व. |
|---|---|---|---|
| प्र. | आनि | आव | आम |
| द्वि. | हि | तम् | त |
| तृ. | तु | ताम् | अन्तु ( तु ) |

आत्मनेपद

| | ए. व. | द्वि. व. | ब. व. |
|---|---|---|---|
| प्र. | ऐ | इ (आ) वहै | आमहै |
| द्वि. | स्व | आथाम् | ध्वम् |
| तृ. | ताम् | इ (आ)ताम् | अन्ताम् (ताम्) |

आशीर्वाद, आज्ञा, प्रार्थना या अर्थी याचा उपयोग होतो. उ. गच्छ, गच्छतु, वंदस्व, वन्दताम्, इत्यादि.

गम्—गच्छति, अगच्छत्, अगमत्, जगाम, गमिष्यति, गच्छेत्, गच्छतु.
वन्द—वन्दते, अवन्दत, अवन्दिष्ट, ववन्दे, वन्दिष्यते, वन्देत, वन्दताम्.
कृ—करोति, अकरोत्, अकार्षीत्, चकार, करिष्यति, कुर्यात्, करोतु.
कुरुते, अकुरुत, अकृत, चक्रे, करिष्यते, कुर्वीत, कुरुताम्.

९. सर्व धातूंचा कर्मकर्तरी त्यांस 'य' जोडून आत्मनेपदी प्रत्यय लाविल्यानें होतो. अस्यते, ग्रथ्यते, पूज्यते, वगैरे.

१०. धातुसाधितें कित्येक सविभक्तिक नामांप्रमाणें चालतात व कित्येक अव्ययाच्या ( कायम ) स्वरूपाचीं आहेत; तीं वाचतां वाचतां कळतील. गन्तुं, गत्वा, ( अवगम्य, ) गच्छत्, गमिष्यत्, गत, गंतव्य, गम्य, गमनीय; वंदितुं, वंदित्वा, ( अभिवंद्य, ) वंदमान, वंदित, वंदितव्य, वंद्य, वंदनीय; श्रोतुं, श्रुत्वा, ( प्रतिश्रुत्य ) शृण्वत्, श्रुत, श्रोतव्य, श्रव्य, श्रवणीय; कर्तुं, कृत्वा, ( संस्कृत्य, ) कुर्वाण, कृत, कर्तव्य, कृत्य, करणीय.

११. विभक्तिविचार याहून सुगम आहे. स्वरांती नामांपैकीं राम, हरि, भानु, रमा, रुचि, नदी, धेनु, यांचीं रूपें आलीं म्हणजे बहुतेक काम भागेल.

१२. व्यंजनांती नामें फार येत नाहींत, तरी महत्त्वाचीं आहेत, त्यांचा विभक्तिविचार फार सुलभ आहे. प्रत्यय लावणें ( संधिनियम सांभाळून ) इतकेंच काम आहे. भूभृत् किंवा सरित् शब्दांच्या रूपांवरून प्रत्यय सहज कळून येतील.

| | ए. व. | द्वि. व. | ब. व. |
|---|---|---|---|
| प्र. | स् (:) | औ | अः |
| द्वि. | अम् | ,, | ,, |
| तृ. | आ | भ्याम् | भिः |
| च. | ए | ,, | भ्यः |
| पं. | अः | ,, | ,, |
| ष. | ,, | ओः | आम् |
| स. | इ | ,, | सु |
| सं. | – | औ | अः |

१३. नपुसकलिंगी नामें प्रथमा व द्वितीया या दोन विभक्तींखेरीज बाकी पुल्लिंगाप्रमाणें चालतात.

१४. हरिणा, कविना, गृहेण, फलेन, नृपेण, पर्वतेन, मिषेण, रमासु, हरिषु, भानुषु, कर्मसु, अशा रूपांवरून चाणाक्ष वाचक 'न' चा 'ण' व 'स' चा 'ष' होण्याचा नियम बसवितील. मराठी पोषण, पतन, रक्षण, आरोपण, स्मरण, करण, साधन, अभिषेक, विषण्ण इत्यादि, या शब्दांस हाच नियम लागू आहे हें सहज आठवेल.

१५. मराठींत संस्कृत शब्द व लहान समास पुष्कळ जसेच्या तसेच आल्यानें स्वरसंधि, स्वरव्यंजनसंधि, व व्यंजनसंधि निराळे शिकण्याचें कारण नाहीं. रूपान्तर, कवीश्वर, भानूदय, विश्वेश्वर, गंगोदक, स्थित्यंतर, मन्वंतर, जलौघ, एकैक, राज्याभिषेक, भिषग्वर्य, वागीश्वर इ० समासांची घटना कोणत्या संधिनियमांनीं झाली आहे हें कळल्यावर संस्कृत स्वरसंधि कळणें जड नाहीं. संस्कृतांत संधि भिन्न पदांमध्येंहि होतात. उ० हरेर्नाम, हरत्यघम्.

१६. व्यंजनसंधिसंबंधांत इतकेंच लक्षांत घेण्याचें आहे कीं पुढें येणाऱ्या व्यंजनावरून मागच्याचें रूप बदलतें. पुढचा कठोर तर मागचा कठोर होणार, पुढें मृदु असेल तर मागच्यास मृदु करतो. व्यंजनापुढील स्वर

मृदु वर्णाप्रमाणें गणला जातो असें दिसून येईल. उ० ककुप्प्रां ( प्+प्रां ) त, उद्ग ( त्+ग ) तम, वाग्गी ( क+ई ) श्वर, अधुना नास्ति पूर्वमासीदित्य ( त्+इ+ति+अ ) वदत्.

१७. संधिप्रकारांत विसर्गसंधिप्रकरण तेवढें संस्कृतांत नवीन आहे, व तें वाचतां वाचतां कळून येण्याजोगें आहे. जना इति असें वाचण्यांत आलें तर दोन शब्दांतील विसर्ग लुप्त झाला असें तर्कावरून कळेल; राम उवाच, हरिरुवाच; रामो जगाद, नरोऽवदत्, जना वदन्ति, सूर्य उदेति, हरी रक्षति, कपिः पतति, देवः करोति, पशुश्चरति, नदीस्तरति, बालकांस्ताडयति, अशीं निरनिराळीं रूपें पाहून विसर्गसंधीचे नियम सहज बांधतां येतील. नियम पाठ करण्याचें कारण नाहीं.

१८. धोरण ठेवून ग्रंथ वाचील त्यास कांहीं कठीण जाणार नाहीं. म्हणजे आलेल्या रूपांचें स्मरण किंवा टांचण ठेऊन त्यांची तुलना करून त्यांच्यामधील साम्यवैषम्य नीट ध्यानांत घेऊन व वरील गोष्टी लक्षांत ठेवून मराठी चांगलें जाणणारानें सुलभ ग्रंथ वाचावयास सुरवात करावी. अडचणी येतील त्या कळवाव्या.

वाचतां वाचतां अधिक परिचयानें काळ व धातुसाधितरूपें, संधि, समासघटना सहज समजतील. अपवादाविषयक रूपें निराळीं शिकलीं पाहिजेत हें सांगावयास नको. पण वाचकांचें त्यापासून फार नडेल असें नाहीं. धातूपासून व नामापासून ( यांत विशेषणें व सर्वनामें येतात ) साधितधातु, नामें व अव्ययें होतात. त्यांचीं रूपें वाचनांत येतील तशीं धोरणानें ओळखणें कठीण जाणार नाहीं. या कामीं बुद्धीस होणारा श्रीण आनंदच देईल. स्वावलंबन वाढवून कोणताहि विषय शास्त्रीय पद्धतीनें कसा शिकावा हें कळेल.

अशा तऱ्हेनें संस्कृत भाषेचा गुरुवर्यांचा व्यासंग नेहमीं वाढत असे. फावल्या वेळीं आपल्या ऋक्संग्रहांतील उतारे ते वाचून वरील वर्गाच्या विद्यार्थ्यांना समजावून देत. प्रसंगीं गुरुवर्य संस्कृत कविताहि करीत. 'श्रीसमर्थ विद्यालय', 'प्रबोधसूक्त' 'बालवीर' वगैरे त्यांच्या कविता अत्यंत रसाळ आहेत. त्या मूळांतूनच वाचल्या पाहिजेत, म्हणून त्या या प्रकरणांच्या अखेर मुद्दाम दिल्या आहेत.

## इतिहास-भूगोल

शाळांतून व कॉलेजांतून इतिहास-भूगोलाच्या सशास्त्र अभ्यासास योग्य अशीं प्रमाणभूत पुस्तकें आतां तयार होऊं लागलीं आहेत. या कामीं गुरुवर्यांनीं पुढाकार घेतला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आपल्या देशाचा इतिहास वाचून देशांतील तरुण पिढीस आनंद आणि उत्साह वाटावयास पाहिजे. अण्णासाहेबांनीं अध्यापनास सुरवात केली त्या वेळीं मराठ्यांच्या इतिहासावर एकहि चांगलें पुस्तक नव्हतें. त्यासाठीं प्रथम साधनग्रंथ तयार करणें जरूर होतें. ग्रंथमालेंत प्रथम मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें त्यांनीं प्रसिद्ध केलीं; या योगानें यथार्थ इतिहास-लेखनास चांगलें साधन झालें. नंतर रा. मोडकांनीं 'मुलांचा महाराष्ट्र' हें पुस्तक लिहिलें. तें प्रथम नवीन समर्थ विद्यालयांत लावण्यांत आलें. पहिलें समर्थ विद्यालय बंद झालें तरी राष्ट्रीय दृष्टीनें पुस्तकें तयार होतच होतीं. आज सरकारनेंहि या राष्ट्रीय पुस्तकांना मान्यता दिली आहे. राष्ट्रीय दृष्टीनें लिहिलेल्या या पुस्तकांचा हा एक अपूर्व विजयच आहे !

युरोपच्या इतिहासाचें एक भाषांतर गुरुवर्यांनीं पूर्वींच ग्रंथमालेंत प्रसिद्ध केलें होतें. पुढें १९२२ मध्यें नवीन समर्थ विद्यालयांतील एका अभ्यासक शिक्षकांकडून त्यांनीं 'इंग्लंडच्या राज्यव्यवस्थेचा इतिहास' लिहाविला. त्याचा दुसरा भाग अद्यापि प्रसिद्ध व्हावयाचा आहे.

त्याचप्रमाणें भूगोलाच्या अध्ययनाचे वेळीं हिंदुस्थानांतील आणि इतर देशांतील व्यापारी उलाढालींचा चटकदार इतिहास विद्यार्थ्यांना सांगून भूगोलाचे पाठहि इतिहासाप्रमाणें फारच चटकदार करितां येतात. राष्ट्रीय विद्यालयांतील शिक्षकांना अमूकच पाठ शिकविले पाहिजेत, इतकाच भाग झाला पाहिजे, असें नियंत्रण नसतें. त्यामुळें विशिष्ट मर्यादा राखण्याची काटेतोल जबाबदारी त्यांच्यावर नसते.

हे विषय शिकवितांना शिक्षकांना स्वत: बरेच परिश्रम करावे लागतात. आतां भूगोलावर निरनिराळीं वर्णनात्मक बरींच पुस्तकें झालीं असल्यामुळें शिकवितांना त्या पुस्तकांचा अत्यंत उपयोग होतो. त्या सर्वांचा उपयोग करून इतिहास-भूगोलाचें शिक्षण जितकें जास्त मनोरंजक करितां येईल तितकें करावयास पाहिजे. आतां सरकारी अभ्यासक्रमांतहि अशीं पुस्तकें तयार केलीं जावींत असें धोरण सरकारी शिक्षणखात्यासहि मान्य होत चाललें आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

भूगोल हा विषय शिकवितांना शिक्षकांनीं जगाचा इतिहास आणि वेळोवेळीं होणारा फरक ध्यानांत घेतला पाहिजे. या बाबतींत 'Teacher's World' 'Asia', 'Nature', 'Tit-bits' आणि इतर जगांतील मानववंशासंबंधीं व सृष्टिज्ञानासंबंधीं उपलब्ध होणारी माहिती शिक्षकानें मिळविली पाहिजे. तसेंच दैनिक व साप्ताहिक वर्तमानपत्रांवरून जगांतील रोजच्या उलाढाली कशा चालल्या आहेत, त्याची माहिती विद्यार्थ्यांना असावयास पाहिजे. यासाठीं शिक्षकानें शक्य तितका ज्ञानसंग्रह करून योग्य वेळीं धडे समजावून देतांना आपला ज्ञानाचा उपयोग केला तर पुष्कळ काम होईल. पण अशा दृष्टीनें शिक्षकांनीं मधुकरवृत्ति धारण करून आपल्या हृदयकपाटांत ज्ञानाचा सांठा केला पाहिजे.

पण इतिहास आणि भूगोल हे विषय शिकविण्याच्या बाबतींत केवळ सनावळ्या अगर नद्या, भूशिरें, जिल्हे, शहरें यांच्या नामावळ्या पाठ करण्याचे दिवस जाऊन आतां नामावळ्यांऐवजीं त्या त्या प्रांतांतील विशिष्ट ऐतिहासिक, औद्योगिक अगर प्राचीन माहितीच्या अनुसंधानानें विचारशक्तीला जागृत करून सदर माहिती एकाद्या गोष्टीप्रमाणें ध्यानांत ठेवण्याचा उपक्रम सुरू झाला आहे तो सर्वथैव इष्ट असा आहे. या पद्धतीप्रमाणें आतां हिंदुस्थानचा, मुंबई इलाख्याचा इतकेंच नव्हे तर जिल्ह्याचे भुगोलहि छापले जात आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. नकाशा आणि चित्रें या दोन द्वारांनीं स्थानमहत्त्व, उद्योगधंदे, इतकेंच नव्हे तर पाऊसपाणी, हवामान, यासारखे महत्त्वाचे विषयहि सुगम करण्याची पद्धति आतां वाढूं लागली आहे. सरकारी शिक्षणक्रमाची दिशा आतां बदलली आहे याचेंच हें लक्षण आहे.

### इंग्रजी

समर्थ विद्यालयांत इंग्रजी विषय शिकविण्यांत येत असे. पण तो विषय संभाषण—पद्धतीनें शिकविण्याचें धोरण त्यांनीं ठेविलें होतें. यासंबंधीं बडोद्याचे सुप्रसिद्ध इतिहासकार गो. स. सरदेसाई 'यांचा इंग्रजीसंभाषणपद्धति'

१. हे पुष्कळ दिवस बडोदा कॉलेजमध्यें इतिहासाचे शिक्षक होते. नुतकेंच त्यांनीं निवृत्तवेतन (पेन्शन) घेतलें असून ते आतां लोणावळ्यानजीक खडकाळग्रास (कामशेट स्टेशन) राहत असतात. गुरुवर्यांचा आणि त्यांचा फार लोभ होता.

हा लेख ग्रंथमालेंत प्रसिद्ध झाला होता. इंग्रजी शिकविण्यासाठीं अमेरिकेंतील ब्रुक्स् रीडर्स उपयोगांत आणलीं होतीं. संभाषणपद्धतीमुळें विद्यार्थ्यांची ग्रहण-शक्ती वाढते व भाषांतरपाठमालेंतील नीरस नियम पाठ करावयाचे असल्या अनैसर्गिक क्रमानें विद्यार्थ्यांच्या मानसिक शक्तीवर पडणारा ताण कमी पडतो असा त्यांचा अनुभव आहे. आतां चोहोंकडे ही प्रत्यक्ष–पद्धति (Direct Method)इंग्रजी शिक्षणांत सरकारनें मान्य केली आहे. थोड्याशा फरकानें हीच पद्धति समर्थ विद्यालयांत चालू आहे.

याशिवाय दुसरा एक फरक गुरुवर्यांनीं इंग्रजी शिक्षणक्रमांत ठेविला होता. पहिल्या दोन तीन इयत्तांत इंग्रजी लिपीचीं मूळाक्षरें प्रथम न शिकवितां इंग्रजी पाठ मराठी लिपींतच त्यांनीं विद्यार्थ्यांना लिहिण्यास शिकविलें. परभाषा शिकवितांना हीच पद्धति चोहोंकडे प्रचारांत आहे. इंग्रज लोक, संस्कृत, पाली, अगर मराठी शिकतांना अशीच पद्धति स्वीकारतात. इंग्रजी लिपींत कित्येक संस्कृत ग्रंथहि असेच छापले गेले आहेत. १६ व्या शतकांत फादर स्टीफन्सननें आपलें मराठी खिस्तपुराण असेंच इंग्रजी लिपींत छापविलें आहे. या पद्धतींतील विशिष्ट उच्चाराचे विशिष्ट अक्षरसमूह असावयाचे, But चा उच्चार बट्, मात्र Put चा उच्चार 'पट्' न करितां 'पुट्' असाच करावयाचा, असे भाषेंतील विशेष निर्बंध पाहून लहान वयाच्या विद्यार्थ्यांनीं मध्येंच ठेंचाळून पडूं नये, अशी गुरुवर्यांची एक सुधारणा होती. याविषयीं तत्कालीन लोकशिक्षणांत त्यांनीं एक लेख लिहिला होता. या विषयावर आजहि विचार करून विद्वान् मंडळींनीं गुरु-वर्यांची ही सुधारणा यशस्वी होईल कीं कसें याविषयीं पुनः विचार करावा अशी अनेकांची इच्छा आहे. इतर भाषांचा अभ्यास करितांना युरोपियन लोक ज्याप्रमाणें त्या भाषांतील ग्रंथ इंग्रजी लिपींत आणून मग त्यांचा अभ्यास करितात त्याप्रमाणें हिंदुस्थानांत सध्यां बंगाली, हिंदी, मराठी, गुजराथी या भाषा संस्कृतोत्पन्न अशा असल्यामुळें सर्व भाषांतील प्रमुख ग्रंथ जर एका देवनागरींतच प्रसिद्ध केले तर अल्प कालांत कोणाहि सुसंस्कृत मनु-ष्यास भरतखंडांतील प्रमुख भाषांमधील उच्च वाङ्मयाचा परिचय करून घेतां येईल असें म्हणावयास हरकत नाहीं. गुजराथी, हिंदी, बंगाली वगैरे सुसंमृद्ध देशी भाषांचा परिचय करून घेण्यासाठीं देवनागरी भाषेचा अव-लंब करणें जरूर आहे.

## धार्मिक शिक्षणाची आवश्यकता

धार्मिक शिक्षणासंबंधीं गुरुवर्यांनीं समर्थ विद्यालयांत चांगली शिस्त ठेविली होती. धार्मिक शिक्षण म्हणजे काय याचें अद्यापि पुष्कळ लोकांना मोठें गूढ पडतें. पण पुण्यामुंबईच्या शाळा–कॉलेजांतील मिशनऱ्यांची ती कडक शिस्त पाहिली म्हणजे हिंदी लोकांनीं तोंडांत बोटेंच घालावींत ! सकाळीं सूर्योदयापूर्वीं उठून स्नानसंध्योपासनादि कृत्यें झाल्यावर भूपाळ्या, प्रातःस्मरणीय स्तोत्रें[1] अगर गीतेंतील पाठ म्हणण्याचा कार्यक्रम चांगला आहे. आतां न. रू. विद्यालयांतील सकाळचा धार्मिक कार्यक्रम कसा असतो या संबंधीं आतां विद्यालयानें **प्रातःस्मरण** नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे यावरून वाचकांना चांगली कल्पना येईल. प्रथम अभ्यास सुरू होण्यापूर्वीं समर्थांच्या मनोबोधांतील पुढील श्लोक ह्मटला जातो.

> शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।
> वशिष्ठापरि ज्ञान आणीक साचें ॥
> कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा ।
> नमस्कार माझा तया रामदासा ॥

अशा प्रकारें श्रीशुकाचार्य, वशिष्ठमहर्षी, आणि श्रीसमर्थ यांच्यासारख्या ज्ञानी आणि तपस्वी विभूतींचें स्मरण करून विद्यार्थ्यांच्या अभ्यासास सुरवात होत असते. शाळेंतील कार्यक्रमास सुरवात होण्यापूर्वीं आतां बहुतकरून सर्व खासगी व सरकारी शाळांतूनहि अशी सामुदायिक ईशस्तवनपध्दति प्रथम सुरू करण्याचें श्रेय सर्वस्वीं कै. वा. गु. अण्णासाहेब विजापूरकर यांनाच दिलें पाहिजे. समर्थ विद्यालयांतील सर्व विद्यार्थी वसति-

---

१. सध्यां प्रातःस्मरणासाठीं जीं स्तोत्रें अगर भूपाळ्या म्हणतात त्या पुढील पुस्तकांत आढळतात. **बृहत्स्तोत्ररत्नाकर** ( निर्णयसागर प्रेस, मुंबई ), **बृहस्तोत्रमुक्ताहार** ( गुजराथी प्रेस, मुंबई ), साखळकरकृत **कवनहार**, पांगारकरांचा **भक्तिमार्गप्रदीप**, हीं तीं पुस्तकें होत. नुकतेंच पुणें येथील मु. ग. मिरजकरशास्त्री यांनीं **'शालोपासना'** नांवाचें पुस्तक तयार केलें आहे.

गृहांतच राहात असत. सर्वांचें भोजनहि एकत्र होत असे. नंतर सायंकाळीं ७॥ नंतर भोजन होऊन थोडी विश्रांति घेतल्यावर भावार्थ-रामायण, एकनाथी भागवत, पांडवप्रताप, रामायण अगर महाभारत यांमधील कांहीं भाग, अर्धा तासपर्यंत कोणातरी शिक्षकांच्या देखरेखीखालीं वाचण्याचा संप्रदाय विद्यालयांत अखंड चालू आहे. अगदीं लहान वयाच्या विद्यार्थ्यांसहि पुराणांतील सोप्या गोष्टी कोणीतरी शिक्षक सांगत असतात. या प्रकारच्या शिस्तीनें महाभारत-रामायणादि धार्मिक ग्रंथांशीं विद्यार्थ्यांचा परिचय वाढूं लागतो व पुढें कांहीं काळानें या पवित्र नीतिग्रंथांचीं भाषांतरें वाचावीत अशी नैसर्गिक प्रवृत्ति विद्यार्थीजनांत उत्पन्न होते. हिंदी संस्कृतीचा परिचय लहानपणीं अशा धर्मग्रंथांच्या परिशीलनानें व्हावा असा यांत गुरुवर्यांचा एक पवित्र आणि उदात्त हेतु होता.

वर्णाश्रमधर्मासंबंधीं गुरुवर्यांचीं मतें पुढील एका प्रकरणांत निराळीं दिलीं आहेत. या ठिकाणीं त्याविषयीं एकच मुद्दा जरा स्पष्ट करावयाचा आहे. वर्णाश्रमधर्माचे ते पूर्ण अभिमानी होते. विद्यालयांत सर्व वर्णांचे विद्यार्थी एकत्र रहात, मिसळत आणि सर्व आचारविचारानेंहि समसमानतेनें वागत. आश्रमधर्माच्या दृष्टीनें मात्र सर्व विद्यार्थ्यांचा एक आश्रम असावा, सर्व विद्यार्थी अविवाहित असावेत, यावर गुरुवर्यांचा फार कटाक्ष होता.

आम्हांस जात नको, धर्म नको, देव नको, असें म्हणणाऱ्या कांहीं आधुनिक लोकांना धर्मशिक्षणाचें स्तोम माजविणें ही गोष्ट पसंत नाहीं. 'एको देवः सर्वभूतान्तरात्मा' असें समजणारे अमानुष अगर देवकोटींतील प्रत्येक देशांतील चार दोन लोक सोडून दिले तर बहुजनसमाजाच्या आधारास धर्माचें अधिष्ठान अवश्य पाहिजे. धर्माचें बाह्य अवडंबर फेकून देऊन जगाच्या आद्यंतास कारणीभूत असें जें अनंत तत्त्व त्याचा मनुष्यानें थोडा विचार करावा आणि आपली व आपल्या देशाची उन्नति करून घ्यावी असाच धर्मशास्त्रकारांचा उदात्त हेतु होता. तो उदात्त हेतु जर धर्मशिक्षणानें थोडासा साध्य झाला तरी बरें! निदान विशिष्ट पंथाच्या अगर संस्थेच्या नियमांचें यथाशास्त्र परिपालन करणें ही उदार शिकवण जरी धार्मिक शिक्षणापासून विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबली तरी धार्मिक शिक्षणानें पुष्कळ कार्य घडतेंच असें म्हणतां येईल.

## औद्योगिक शिक्षण

१८९८ सालीं गुरुवर्यांचें 'समर्थ' वर्तमानपत्र सुरू होण्यापूर्वी ग्रंथमालेचा अवतार झाला होता. हिंदुस्थानच्या सध्याच्या अवनत परिस्थितींत स्वदेशी उद्योगधंदे काढणें अत्यंत जरूरीचें आहे हें त्यांनीं ग्रंथमालेंत अनेक ठिकाणीं दाखविलें आहे. तसेंच औद्योगिक विषयांवर ग्रंथमालेंत अनेक लेख तज्ज्ञ लेखकांकडून लिहवून त्यांनीं व्यापारविषयक विचारविनिमयाला बरीच चालना दिली होती. नंतर १९०४–५ सालीं राजकीय वातावरणांत बराच इष्ट फरक झाला व स्वदेशीची चळवळ जोरावली त्या वेळीं या बदललेल्या परिस्थितीचा त्यांनीं पुरा फायदा घेतला आणि कोल्हापूर सदर्न बँक, सहकारी–मंडळी स्थापन करून नवीन उद्योगधंदे स्थापण्यास मदत केली. समर्थ विद्यालयांत औद्योगिक शिक्षण द्यावें असें त्याचें मत होतें. शाळेंत औद्योगिक शिक्षण मिळाल्यास सरकारी नोकरींत वाया जाणारी मध्यम वर्गाची चांगली बुद्धी देशाच्या उत्कर्षाच्या गोष्टींत अनायासें पडावी आणि नवीन उद्योगधंदे वाढून परदेशांत जाणारा द्रव्यौघ थांबवावा असा त्यांचा सद्हेतु औद्योगिक शिक्षणांत प्रामुख्यानें होता. १९२६ सालीं नवीन समर्थ विद्यालयांतील पदवी घेऊन सात विद्यार्थी बाहेर पडले त्या वेळीं गुरुवर्यांचें अत्यंत कळकळीचें भाषण झालें. त्यांत ते म्हणालेः—

"आज तुम्ही विद्यालयांतून पदवी घेऊन बाहेर पडत आहांत. यापुढें स्वदेशाचा विचार तुम्ही नेहमीं पुढें ठेवा. त्याचप्रमाणें इकडचा कच्चा माल तिकडे परदेशांत न जातां आपल्या स्वदेशांतच तो कसा उपयोगांत आणतां येईल इकडे तुम्हीं लक्ष पुरविलें पाहिजे. रॅली कंपनी इकडे येऊन गबर होते आणि इकडचा माल खेडोपाडीं जाऊन गोळा करिते आणि परदेशीं पाठविते. या कंपन्यांचे चालक काय स्वर्गांतून उतरले आणि तुम्ही पृथ्वीवर जन्मास आलांत ? तेहि तुमच्यासारखेच मनुष्य आहेत ! त्यांचा उद्योग आणि अविरत परिश्रम लक्षांत घ्या. आज चोहोंकडे परदेशी लोक दिसत आहेत **हा परदेशी येथें कां, व हा परदेशी माल येथें कां न व्हावा, असा विचार सतत तुमच्यापुढें उभा राहिला पाहिजे.**"

या गुरुवर्यांच्या भाषणांत त्यांचें औद्योगिक धोरण कशा प्रकारचें होतें हें उत्तम रीतीनें प्रतिबिंबित झालें आहे. विणकाम, सुतारकाम, लोहारकाम वगैरे उद्योग शिकविण्याची सोय आज विद्यालयांत करण्यांत आली आहे. परंतु सर्व साधनें तयार असतांना लायक शिक्षकांची मात्र बरीच अडचण भासते. " द्रव्यापेक्षां तज्ज्ञ शिक्षक मिळण्याची फारच अडचण आहे " असें अण्णा वारंवार म्हणत तें खरें आहे. उद्योगधंद्यांचें शिक्षण देतांना त्या धंद्यांची प्राथमिक माहिती देण्यांत यावी आणि नंतर धंद्यांत प्रत्यक्ष पडून काम करून मग प्रत्यक्ष धंदेशिक्षण मिळवावें असें ठरलेलें होतें. साधारणपणें धंद्यांत प्रवेश करणारास हें प्राथमिक शिक्षण अत्यंत उपयोगी पडत असतें.

सध्यां कित्येक ठिकाणीं औद्योगिक शिक्षण देण्याचे प्रयत्न चालू आहेत. परंतु पालक स्वत: म्हणतात, 'काय हो ! ही सुतारकी, ही लोहारकी कशाला ? आमच्या मुलांना कांहीं सुतार व्हावयाचें नाहीं.' नवीन समर्थ विद्यालयांत सर्वांना ३ तास कांहीं तरी हातकाम करावें लागतें. या योगानें हातकाम करणाऱ्या वर्गाबद्दल आदर वाढावा आणि आपण मोठ्या प्रमाणांत जर तो धंदा आरंभला तर खात्रीनें किफायतशीर व्हावा असें उत्तेजन मिळावें अशा प्रकारचें त्यांचें धोरण असे.

गुरुवर्यांनीं धंदेशिक्षणाची सोय अशी अगदीं अल्पस्वल्प केली होती. पण या बाबतींत त्यांना यावें असें यश आलें नाहीं. आपल्या कल्पनांना मूर्त स्वरूप देण्यासाठीं त्यांनीं अहोरात्र प्रयत्न केले. परंतु समर्थ विद्यालयां-तून उद्योगधंद्यांना मदत करणारे अगर स्वत: उद्योगधंदा अंगावर घेऊन काम करणारे विद्यार्थी निघाले असें मात्र अद्यापि म्हणतां येत नाहीं. नवीन समर्थ विद्यालय, टिळक महाविद्यालय वगैरे सारख्या संस्थांनीं औद्योगिक विषयां-संबंधीं जाणीव विद्यार्थ्यांत प्रथम उत्पन्न करून ठळक ठळक उद्योगधंद्यांची माहिती करून दिली पाहिजे. त्याप्रमाणें हिंदुस्थानच्या अर्थशास्त्राचाहि अभ्यास विद्यार्थ्यांकडून करविला पाहिजे. या कामीं गुरुवर्यांनीं उपक्रम केला होता. परंतु हाताशीं कार्यक्षम आणि कर्ती मनुष्यें न मिळाल्यामुळें त्यांच्या प्रय-त्नांना यावें तसें यश आलें नाहीं.

## शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण

१९०५ सालीं लिहिलेल्या ग्रंथमालेंत ' समर्थ विद्यालय ' या विषयावर लिहितांना "शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षण समर्थ विद्यालयांत दिलें जाईल " असें आश्वासन गुरुवर्यांनीं सर्वांना दिलें होतें. पुढें विद्यालयांत विणकाम, सुतारकाम वगैरेची सोय त्यांनीं केली. नंतर एक ऑईल-एंजिन आणून लोहार कामाची व्यवस्था करण्याचा चालकांनीं उपक्रम केला. नंतर कांहीं कालानें एक लहानसें मुद्रणालयहि ( छापखाना ) काढण्याचें ठरलें होतें. पण या सर्व व्यापाचा आजपर्यंत विद्यालयाला फायदा मात्र झाला नाहीं. उलट रुपया दोन रुपये करून सांठविलेली रक्कम उद्योगधंद्याचीं उपकरणें विकत घेण्यांत खर्च झाली. विद्यालयानें आपल्या इमारतीच्या तारणावर काढलेलें ५००० रु. चें कर्जरोखेहि यासाठींच खर्चीं पडले. त्याचप्रमाणें शास्त्रीय विषय शिकविण्याचीं साधनेंहि विद्यालयांत आहेत. परंतु या कामीं आणखी बरीच रक्कम गुंतविणें जरूर आहे. पण येथें पैशाशिवाय तज्ज्ञ शिक्षकांची अडचण आज तीव्रतेनें भासत आहे.

शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षणाकडे अद्यापि लोकांचें जावें, तसें लक्ष जात नाहीं. औद्योगिक शिक्षणाची उपयुक्तता आज राष्ट्रांतील सर्व लोकांना पटते, परंतु त्यासाठीं काय साधनें जमवावींत, व सर्वांना परिणामीं फलदायी होईल असें कोणतें शिक्षण द्यावें, याची कल्पना आमच्या शिक्षण-तज्ज्ञांना नाहीं. आजहि "टेक्निकल इन्स्टिटयूट्स" सारख्या संस्था पुणें, पंढरपूर, अहमदनगर, अहमदाबाद या ठिकाणीं आहेत. वार्षिक १४।१५ हजार रुपये या औद्योगिक संस्थांवर खर्चहि होतात, परंतु त्यांतून उत्तम शिकलेले विद्यार्थी निघतातच असें मात्र म्हणतां येत नाहीं. १९१४।१५ सालीं सरकारनें कमिशन नेमून औद्योगिक पाहणी केली; परंतु औद्योगिक शिक्षण संस्था स्थापन करण्यास सरकारजवळ पुरेसा पैसा नाहीं. औद्योगिक शिक्षणाची उपयुक्तता आतां सरकारलाहि पटली आहे. त्या दृष्टीनें तरुण पिढीच्या मनांत औद्योगिक शिक्षणाबद्दल प्रेम उत्पन्न करून त्यांच्या हातून देशांतील उद्योगधंदे वाढावेत आणि राष्ट्राच्या गरजा पुरविण्याचीं साधनें येथें निर्माण व्हावींत असा औद्योगिक शिक्षणाचा प्रधान हेतु आहे. तो हेतु सिद्धीस जाण्यासाठीं राष्ट्रांतील सर्व वृद्धतरुण लोकांनीं खटपट केली पाहिजे.

## उदार आणि औद्योगिक शिक्षणाची सांगड

सध्याच्या दुय्यम व उच्च शिक्षणपद्धतीमुळें बहुजनसमाजांतील जुनीं कोतीं मतें निघून जात आहेत आणि त्याऐवजीं ' राजा म्हणजे विष्णूचा अवतार ' ' राजा कालस्य कारणम् ' नवऱ्यानें मारलें, पावसानें भिजवलें, व राजानें लुटलें, तर शरण कोणास जावें ? वगैरे म्हणींत प्रतिबिंबित झालेल्या एकतंत्री राज्यपद्धतीच्या कल्पना नाहींशा होऊन त्या जागीं देशाभिमान, मातृभूमिप्रेम स्त्रीपुरुषांचे समान हक्क वगैरे लोकशाहीच्या कल्पना चोहोंकडे पसरल्या आहेत. आज प्रत्येक समाजांत जागृति झाली आहे. मागासलेल्या वर्गांनाहि आतां मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळतात हें आमिष पुढें दिसत असल्यामुळें पदवी मिळविण्यासाठीं तेहि पुढें सरसावत आहेत. त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं शाळा–कॉलेजांची वाढहि होत आहे.

गेल्या १०।१२ वर्षांची प्रगति पाहतां सर्व प्रकारच्या सरकारी व निम–सरकारी संस्थांची वाढ झपाट्यानें होत आहे. १९१८ सालीं मुंबई विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेस ५००० वर विद्यार्थी बसले होते, तर १९२७ सालीं ही संख्या १०००० वर गेली आहे. तसेंच १९१८ सालीं मुंबई इलाख्यांत हायस्कुलें व कॉलेजें यांची संख्या २०० व १६ होती ती अनुक्रमें ३०० व १९ इतकी झाली. यावरून केवळ उदार शिक्षणाची कशी विद्युद्वेगानें वाढ होत आहे हें समजून येतें. उच्च शिक्षणाची गोडी मागासलेल्या वर्गांनाहि कशी लागत आहे त्याची कल्पना वरील आंकड्यांवरून स्पष्टपणें निदर्शनास येईल.

पण वरवर जरी उदार शिक्षणाची वाढ झालेली दिसते तरी सुशिक्षितांत या शिक्षणाबद्दल वाढणारा असंतोष उलट वाढतच आहे. इतक्या दिवस पोटापाण्याचा प्रश्न या शिक्षणामुळें कांहींसा सुटत असे; परंतु आतां त्या बाबतींत सुशिक्षित तरुणांच्या वाट्यास जास्त जास्त निराशा येत आहे. आतां सुशिक्षितांच्या गरजा दिवसानुदिवस वाढत आहेत परंतु त्या कामीं लागणारे जिन्नस स्वदेशीं तयार होत नाहींत. त्यामुळें परदेशी वस्तूंचा खप मनस्वी वाढला आहे. इकडे आधुनिक शिक्षणांमुळें गरजा वाढत असतां मासिक उत्पन्न

१. **चित्रमयजगत्** च्या जानेवारी १९२८ च्या अंकांतील ' उदार व औद्योगिक शिक्षण ' हा लेख पहा.

## उदार आणि औद्योगिक शिक्षणाची सांगड

सध्याच्या दुय्यम व उच्च शिक्षणपद्धतीमुळें बहुजनसमाजांतील जुनीं कोतीं मतें निघून जात आहेत आणि त्याऐवजीं ' राजा म्हणजे विष्णूचा अवतार ' ' राजा कालस्य कारणम् ' नवऱ्यानें मारलें, पावसानें भिजवलें, व राजानें लुटलें, तर शरण कोणास जावें ? वगैरे म्हणींत प्रतिबिंबित झालेल्या एकतंत्री राज्यपद्धतीच्या कल्पना नाहींशा होऊन त्या जागीं देशाभिमान, मातृभूमिप्रेम स्त्रीपुरुषांचे समान हक्क वगैरे लोकशाहीच्या कल्पना चोहोंकडे पसरल्या आहेत. आज प्रत्येक समाजांत जागृति झाली आहे. मागासलेल्या वर्गानाहि आतां मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळतात हें आमिष पुढें दिसत असल्यामुळें पदवी मिळविण्यासाठीं तेहि पुढें सरसावत आहेत. त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं शाळा-कॉलेजांची वाढहि होत आहे.

गेल्या १०।१२ वर्षांची प्रगति पाहतां सर्व प्रकारच्या सरकारी व निम-सरकारी संस्थांची वाढ झपाट्यानें होत आहे. १९१८ सालीं मुंबई विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेस ५००० वर विद्यार्थी बसले होते, तर १९२७ सालीं ही संख्या १०००० वर गेली आहे. तसेंच १९१८ सालीं मुंबई इलाख्यांत हायस्कुलें व कॉलेजें यांची संख्या २०० व १६ होती ती अनुक्रमें ३०० व १९ इतकी झाली. यावरून केवळ उदार शिक्षणाची कशी विद्युद्वेगानें वाढ होत आहे हें समजून येतें. उच्च शिक्षणाची गोडी मागासलेल्या वर्गांनाहि कशी लागत आहे त्याची कल्पना वरील आंकड्यांवरून स्पष्टपणें निदर्शनास येईल.

पण वरवर जरी उदार शिक्षणाची वाढ झालेली दिसते तरी सुशिक्षितांत या शिक्षणाबद्दल वाढणारा असंतोष उलट वाढतच आहे. इतक्या दिवस पोटापाण्याचा प्रश्न या शिक्षणामुळें कांहींसा सुटत असे; परंतु आतां त्या बाबतींत सुशिक्षित तरुणांच्या वाट्यास जास्त जास्त निराशा येत आहे. आतां सुशिक्षितांच्या गरजा दिवसानुदिवस वाढत आहेत परंतु त्या कामीं लागणारे जिन्नस स्वदेशीं तयार होत नाहींत. त्यामुळें परदेशी वस्तूंचा खप मनस्वी वाढला आहे. इकडे आधुनिक शिक्षणांमुळें गरजा वाढत असतां मासिक उत्पन्न

---

१. **चित्रमयजगत्**च्या जानेवारी १९२८ च्या अंकांतील ' उदार व औद्योगिक शिक्षण ' हा लेख पहा.

मात्र वाढत नाहीं. उलट एकाच ठशाचें शिक्षण झाल्यामुळें हातकामाबद्दल विद्यार्थ्यांच्या मनांत प्रेम वसत नाहीं आणि पोटापाण्याचा प्रश्न तर जास्तच बिकट होत चालला आहे. त्याचप्रमाणें स्वातंत्र्याच्या अवास्तव कल्पना प्रचलित झाल्यामुळें पूर्वींची कुटुंबव्यवस्था सर्वस्वीं बिघडून गेली आहे. आणि त्यामुळें अनेक विपरीत गोष्टी समाजांत शिरूं पाहात आहेत.

सध्याच्या उदार शिक्षणांत व उच्च शिक्षणांत आपलें सर्व आयुष्य घालविलें आहे असे वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध प्रिन्सिपॉल गो. चिं. भाटे यांच्या शब्दांत सुधारणपणें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे:—( १ ) उदार शिक्षण उदरभरणाचें साधन नाहीं; ( २ ) उदार शिक्षण ज्यांना ऐपत आहे त्यांनीं घ्यावें; ( ३ ) उदार शिक्षणांत जास्त विविधता असणें आवश्यक आहे; ( ४ ) उदार शिक्षणास औद्योगिक धंदेशिक्षणाची जोड दिली पाहिजे.

अशा तऱ्हेनें उदार शिक्षणास आज औद्योगिक शिक्षणाची जोड देणें जरूर आहे असें सर्व शिक्षणतज्ज्ञांना वाटूं लागलें आहे. सुमारें २० । २५ वर्षांपूर्वीच गुरुवर्य विजापुरकरांनीं चालू शिक्षणाबरोबर घरगुती धंदेशिक्षणाची सोय करावयास पाहिजे असें लिहिलें होतें. आजहि त्यांच्या नवीन श्रीसमर्थ विद्यालयांत सकाळीं वाङ्मयात्मक शिक्षणक्रम व दुपारीं सुतारकाम, विणकाम, * मातकाम, शेतकाम वगैरे कांहीं तरी धंदेशिक्षण घेतात. औद्योगिक शिक्षणाची जोड दिल्यास सध्याचें शिक्षण सुफलदायी होईल असें म्हणावयास हरकत नाहीं.

नवीन समर्थ विद्यालयाप्रमाणें अलिबागचें औद्योगिक हायस्कूल, अहमदनगर, येवलें इत्यादि ठिकाणचीं राष्ट्रीय विद्यालयें वाङ्मयात्मक अगर उदार आणि औद्योगिक अशा जोड-शिक्षणाचा प्रयोग करीत आहेत. कांहीं ठिकाणीं तो यशस्वीहि ठरला आहे. तरी त्याकडे लक्ष देऊन शिक्षणाधिकारी आणि सरकार यांनीं या नव्या शिक्षणप्रयोगाचा फायदा घेऊन सुशिक्षितांची बेकारी घालविण्यास मदत करावयास नको कां ?

---

* पैसाफंड कांच कारखान्यांत आतां 'पॉटरी'ची (मातकाम) शाखा काढण्यांत आली आहे. तेथें विद्यार्थी मातीचीं भांडीं कशीं करावींत तें शिकतात.

## अखेर

समर्थ विद्यालय एक नमुनेदार शिक्षणसंस्था ( Model Institution ) करावयाची असा अण्णासाहेबांचा विश्वास होता. त्याप्रमाणें त्यांनीं आपला हेतु सिद्धीस नेला. गुरुवर्यांनीं समर्थ विद्यालयांत हा प्रयोग करून पाहण्याचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें त्यांना बरेंच यश आलें आहे. हे सर्व शैक्षणिक प्रयोग मात्र त्यांनीं जितक्या उत्साहानें प्रसिद्ध करावयास पाहिजे होते तितक्या उत्साहानें त्यांनीं प्रसिद्ध केले नाहींत व ऐनवेळीं हट्टी स्वभावानेंहि त्यांना आपल्या औद्योगिक शिक्षणाची होणारी सोय करून घेतां आली नाहीं, असें दुःखानें म्हणावें लागतें. पण आतां झाल्या गोष्टी पुनः प्रस्तुत स्थळीं सांगण्याची जरूरी नाहीं.

गुरुवर्यांनीं आपलें पहिलें समर्थ विद्यालय स्थापतांना जे उच्च हेतु ठेविले होते ते पुष्कळ अंशीं सिद्धीस गेले. सरकारी शिक्षणखात्यास आज त्यांचीं विशिष्ट मतें मान्य झालीं आहेत. त्याचप्रमाणें शिक्षणक्रमांत आणि अध्यापन-पद्धतींतहि इष्ट त्या सुधारणा झाल्या आहेत.

तथापि, आज समर्थ विद्यालयाचें कार्य संपलें असें मात्र समजतां उप-योगी नाहीं. आजहि शिक्षण-प्रयोग या दृष्टीनें चालकांनीं नवीन समर्थ विद्यालयाचें कार्य जसें जोरानें चालविलें आहे तसेंच–किंबहुना जास्त जोरानें तें पुढें चालविलें पाहिजे. कितीहि संकटें येवोत; पण माघार न घेतां पुढें जावयाचें असा दंडक गुरुवर्यांनीं चालकांना स्वतःच्या उदाहरणानें घालून दिला आहे. तो ध्यानांत ठेवून नवीन समर्थ विद्यालयानें शिक्षणक्रमांत कांहीं तरी वैशिष्ट्य अवश्य ठेविलें पाहिजे. तें आहे म्हणूनच आज महाराष्ट्रांत या विद्यालयाचा बोलबाला आहे. कालमानाप्रमाणें नूतन महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळाच्या ध्येयांत फरक न करितां इष्ट त्या सुधारणा चालकांनीं शिक्षणक्रमांत योजून, संग्राहक बुद्धीनें गुणी लोकांचें साह्य मिळवावें आणि विद्यालयांतील कार्यक्रम यशस्वी करावा.

आतांपर्यंत राष्ट्रीय शिक्षणासंबंधींच्या इतिहासाची प्रथम थोडी माहिती देऊन आम्ही राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत प्रो. विजापुरकरांनीं किती मह-

त्वाचें कार्य केलें, त्याची संगतवार हकिकत सांगितली आहे. "राष्ट्रीय शिक्षण व सरकारी विद्याखात्याचें शिक्षण असा भेद सर्वस्वीं लुप्त व्हावा अशी आमची मनापासूनची इच्छा आहे" असें नवीन समर्थ विद्यालय काढतांना अण्णांनीं म्हटलें होतें, तें भविष्य खरें ठरण्याची वेळ जवळ जवळ येत आहे. राष्ट्रीय शिक्षणासंबंधींचीं सर्व अंगें आतां सरकारनें मान्य केलीं असून त्या दृष्टीनें पुष्कळ ठिकाणीं उपक्रमहि सुरू झाला आहे. मराठी माध्यमाचा उपयोग, राष्ट्रीय दृष्ट्या लिहिलेलीं "संस्कृत प्रवेश", "मुलांचा महाराष्ट्र" वगैरे सारखीं सुंदर पुस्तकें, इंग्रजीव्यतिरिक्त सर्व विषय मराठींतून शिकण्याची सोय आणि त्याबरोबरच शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रमांत प्रवेश अशा बहुतेक सर्व गोष्टी सरकारी शिक्षणखात्यास पुष्कळ वर्षांच्या अनुभवानें कां होईना पण मान्य झाल्या हा अण्णांच्या तत्त्वांचा एक प्रकारचा विजयच होय. थोडक्यांत नानासाहेब ओकांच्या ओजस्वी भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'राष्ट्रीय शिक्षणामध्यें धर्मशिक्षण जरूर असलें पाहिजे. स्वभाषेचें उत्तम ज्ञान व स्वभाषेंतील वाङ्मयाचें मार्मिक अध्ययन होणें जरूर आहे. आपला धर्म, संस्कृति व पूर्वेतिहास हा संस्कृत वाङ्मयांत सांठविलेला आहे म्हणून संस्कृत भाषेचें ज्ञान व जिवंत संस्कृत वाङ्मयाशीं—रामायण, महाभारत, स्मृति, उपनिषदें यासारख्या अस्सल राष्ट्रीय ग्रंथांशीं—विद्यार्थ्यांचा परिचय झाला पाहिजे. स्वदेशाचा खराखुरा इतिहास पाश्चात्यांनीं अपुऱ्या माहितीनें व क्वचित् पूर्वग्रहदूषित अशा मनानें लिहिलेला नव्हे-तर आपल्या लोकांनीं इतिहास-संशोधनानें पुराव्यानिशीं सिद्ध केलेल्या इत्थंभूत हकिकतींचा ज्यांत समावेश केला आहे असा इतिहास विद्यार्थ्यांना कळला पाहिजे. मात्र त्याचें कामचलाऊ ज्ञान पुरें होईल. इतर सर्व विषय विद्यार्थ्यांच्या मातृभाषेंत शिकविले पाहिजेत. देशाची वर्तमान स्थिति—सांपत्तिक व इतर—चांगली कळली पाहिजे. अनुपयुक्त विषय गाळून उपयुक्त ज्ञान मिळेल अशी व्यावहारिक दृष्टि सामान्य अभ्यासक्रम शिकवितांना ठेविली पाहिजे, व प्रत्येक विषय शिकवितांना तेंच धोरण ठेवणें जरूर आहे. देशाच्या गरजा, देशांत होणारा कच्चा माल वगैरेंचा विचार करून स्वदेशी उद्योगधंदे ऊर्जितावस्थेस येतील असें शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण देण्याची तजवीज पाहिजे. खेळ व व्यायाम हा समर्थ

---

१. आत्मोद्धार मासिक (१९१७ ?)–'महाराष्ट्रीय शिक्षण' पहा.

विद्यालयाप्रमाणें अभ्यासक्रमांतील एक विषय म्हणून ठेविला पाहिजे. स्वाभिमानी व सदाचारसंपन्न अशा गुरूंच्या सहवासांत व शक्य तर विद्यार्थीगृहाच्या शिस्तीखालीं राष्ट्रीय सद्गुण उत्पन्न केले पाहिजेत. प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या कलास अनुसरून चरितार्थाचा एखादा धंदा शिकतां येईल अशी सोय व्हावयास पाहिजे. ''

या व इतर बाबींचा राष्ट्रीय शिक्षणांत समावेश होतो हें राष्ट्रीय शिक्षणाच्या मागें दिलेल्या अनेक व्याख्यांवरून सहजच लक्षांत येणार आहे. राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं हिंदुस्थानांतील अनेक वंद्य पुढाऱ्यांनीं विचार करून राष्ट्रीय शिक्षणासंबंधींच्या आपल्या कल्पना सूत्रमय भाषेंत ग्रथित केल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं वर दिल्या आहेत. त्या प्रस्तुत स्थलीं वाचकांना उद्बोधक वाटल्यावांचून राहणार नाहींत. राष्ट्रीय शिक्षणाचा जास्त अभ्यास करणाऱ्या जिज्ञासु लोकांसाठीं पुढें पुरवणी–प्रकरणांत अण्णासाहेबांनीं राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं इतरत्र लिहिलेले दोन लेख मुळावरून समग्र दिले आहेत. तसेंच १९०७ सालीं लिहिलेला ' इंडियन रिव्ह्यू ' मधील इंग्रजी लेखहि दिला आहे. तसेंच पुढें राष्ट्रीय शिक्षणाचीं साधनें कोणतीं आहेत तें स्पष्ट केलें आहे. जिज्ञासूंनीं तीं साधनें अवश्य डोळ्याखालून घालावींत.



# राष्ट्रीय शिक्षण ( पुरवणी )

## परिशिष्ट १

### नवीन समर्थ विद्यालयाचें वैशिष्ट्य

१. शहरापासून कांहीं अंतरावर मोकळ्या मैदानांत, नदीपासून दूर नाहीं व सृष्टीचा मनोरम देखावा सदोदित पुढें राहील अशा प्रशांत स्थळीं स्थापलेलें.

२. बाळपणापासून विद्यार्थी घेऊन त्यांस अष्टौप्रहर गुरूंच्या देखरेखीखालीं ठेवून चांगल्या शारीरिक व मानसिक शिक्षणाची सोय करून देणारें.

३. सर्व शिक्षण स्वभाषाद्वारां देण्याची व्यवस्था करणारें.

४. मन सुसंस्कृत व्हावें म्हणून उच्च वाङ्मयशिक्षणाची सोय करून पोटासाठीं आपल्या देशांतील सांपत्तिक साधनांचा व इतर आनुकूल्यांचा विचार पाहतां हरहुन्नरी शिक्षण देण्याची नीट व्यवस्था लावणें हेंच आपलें मुख्य ध्येय म्हणून पुढें ठेवणारें.

५. कोणत्याहि सरकारी व इतर शिक्षणक्रमाहून मुद्दाम ठरविलेल्या निराळ्या अभ्यासक्रमाप्रमाणेंच चालणारें.

६. परीक्षाचक्रापासून व तत्संबंधीं चढाओढीपासून विद्यार्थ्यास मुक्त करणारें.

७. धार्मिक व नैतिक वळण नीट लावून देणारें.

सारांश—प्राचीन व अर्वाचीन शिक्षणपद्धतींतील उत्तम गुणांचा संग्रह करणारें अशा प्रकारचें हें विद्यालय आहे. म्हणूनच महाराष्ट्रीयांनीं या विद्यालयास मदत केली पाहिजे.

**प्रवेश:**—विद्यालयांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या साठीं खालील अटी ठेवल्या आहेत. त्या वाचल्या म्हणजे विद्यालयांत राष्ट्रास उपयोगी असे कार्यकर्ते कसे निर्माण होतील हें दिसेल.

१. नवीन मुलें वर्षांतून प्राय: दोनदां विद्यालयांत घेण्यांत येतात:— ( अ ) कार्तिक वद्य ( नोव्हेंबर ) पंचमीपासून अमावस्येपर्यंत व ( आ ) चैत्र वद्य ( एप्रील ) पंचमीपासून अमावस्येपर्यंत.

२. दहा वर्षे पूर्ण झालेल्या व चौदा वर्षे पूर्ण न झालेल्या अविवाहित अशा कोणत्याहि जातीच्या मुलास घेतलें जातें. मुलांनीं विद्यालयांतील अभ्यासक्रम पुरा होईपर्यंत अविवाहित राहिलें पाहिजे.

३. नवीन येणारा मुलगा निरोगी व अव्यंग असावा व त्याच्या मराठी ४ इयत्ता झाल्या असाव्यात.

४. प्रत्येक विद्यार्थ्यानें विद्यालयाचे वसतिगृहांतच राहिलें पाहिजे.

५. प्रत्येक विद्यार्थ्यानें प्रवेशसमयीं १० रु. अनामत ठेविले पाहिजेत. पाकपात्रमूल्याबद्दल प्रत्येक विद्यार्थ्यास दरसाल १ रुपया द्यावा लागेल. श्रीसमर्थ सहकारी भांडाराचा एक भाग १ रु. चा घ्यावा लागेल.

६. दरमहा खर्च २० रुपये येईल. यांत पिण्याचें दूध, दोन वेळचें भोजन, मधला फराळ, न्हावी, परीट, दिवाबत्ती इतक्या बाबींचा समावेश होतो. दरमहा भाड्याकरितां रु. १ व फी म्हणून पहिल्या ४ इयत्तांस रु. १ व पुढील इयत्तांस रु. २. खर्चाची रक्कम प्रत्येक महिन्याच्या १० तारखेच्या आंत अगाऊ पाठविली पाहिजे.

असें हें एकच राष्ट्रीय विद्यालय महाराष्ट्रांत आहे. येथील दिनक्रम पुढील प्रमाणें राष्ट्रीयत्वास पोषक असाच आंखला आहे.

**दिनक्रम:**–सकाळीं ५। वाजतां उठणें. ५। ते ७॥ प्रात:स्मरण, प्रातर्विधि, स्नानादिक धार्मिक कार्यें व उपहार. ७॥ ते १० शाळा ( वाङ्मय-विषय. ) १०॥ ते ११॥ भोजन. १२ ते १ वाचनालयांत अगर पुस्तकालयांत वाचन. १ ते २ अभ्यास. २ ते ५ दोन प्रहरचे वर्ग. ५ ते ६॥ व्यायाम ( तालीम, खेळ, पळणें ) वगैरे. ६॥ ते ७ स्तोत्रें, प्रार्थना. ७ ते ८ भोजन. ८॥ ते ९ पौराणिक वाचन व किरकोळ कामें. ९ ते ५ निद्रा.

विशेष–ऋतुमानप्रमाणें व कामाच्या सोईप्रमाणें थोडाबहुत फेरफार होतो. वार्षिक सुटी–वर्षांतून एक वेळ सुमारें दीड महिना दसऱ्यानंतर मिळते.

## परिशिष्ट २

[ या पुरवणी-प्रकरणांत तीन परिशिष्टें दिलीं आहेत. तीं म्हणजे ( १ ) **आधुनिक वंद्य विभूति, प्रबोधस्तोत्रम्, बालवीर,** ( २ ) **नवीन समर्थ विद्यालयाचें वैशिष्ट्य,** ( ३-४ ) लोकमान्य दैनिकाच्या खास अंकांत अण्णांचे प्रसिद्ध झालेले दोन लेख **राष्ट्रीय शिक्षणच कां घ्यावें?** व **राष्ट्रीय शिक्षण म्हणजेच स्वायत्त शिक्षण** ( ५ ) **राष्ट्रीय शिक्षणवाद्यांची जबाबदारी व कर्तव्य,** ( ६ ) The need of a Hindu University ( ७ ) व राष्ट्रीय शिक्षणाचीं मूळ साधनें. यावरून गु. अण्णासाहेबांच्या राष्ट्रीय शिक्षणविषयक कल्पना जास्त स्पष्ट होतील. ]

### १. आधुनिक वंद्य विभूति

ज्ञानेश्वर नामदेव एकनाथ जनार्दन ।
तुकाराम निळोबा हे पांच साधु सदा स्मरा ॥ १ ॥

निबंधमालारचकः समुद्योगपरंपराम् ।
निर्ममे यः प्रयासेन नमोऽस्मै विष्णुशास्त्रिणे ॥ २ ॥

बृहस्पतिसमो बुद्ध्या सर्वांगीणसुधारकः ।
अश्रांतो यो महाव्यापी नमोऽस्मै माधवात्मने ॥ ३ ॥

गंगाधरसुतो मानी **केसरी**पत्रचालकः ।
**गीतारहस्य**निर्माता तस्मै बालात्मने नमः ॥ ४ ॥

राष्ट्रीये शिक्षणे शास्ता विद्यादानाधिपो मुनिः ।
विजापुरकरायादौ नमोऽस्मै विष्णुशर्मणे ॥ ५ ॥

### २. प्रबोधस्तोत्रम्

ऋषीणां देशोऽयं गतसकलविद्यः सुचिवियाम् ।
नृपाणामाढ्यानां विपदमनुयातावनिरियम् ॥
निरीक्ष्यैतत्प्रेष्ठा भवत विपुलोद्योगमतयः ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ १ ॥

प्रभूतं द्रव्यं नोऽवनिजमुपलब्धं परजनैः ।
महापोताः काष्ठैर्भरतवनलब्धैः सुविहितः ॥
प्रपातैर्वारान्तैर्दिशिदिशि घनं निर्मितमहो ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ २ ॥

निमित्तैर्नाना तैः कृतमखिलवित्तस्य हरणं ।
सदैश्वर्यं नोत्र प्रथितमिह सान्किंकरजनः ।
इयं हा गौराणां प्रभवति व उद्दिश्य भाणितिः ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ ३ ॥

गते काले दीर्घेऽपि किमपि न नूनं वसुमती— ।
तले पाश्चात्यैस्तन्न समधिगतं यन्न ऋषिभिः ॥
स्वबुद्धेः सामर्थ्यान्निगदितामिह स्पष्टवचसा ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ ४ ॥

मतिर्धर्माचारे मनुसममुनीनामनुमते ।
परा भक्तिर्देवे भवति च यथा सर्वसुखदे ॥
तथा यत्नः कार्यो निजजनमनः शिक्षणविधौ ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ ५ ॥

कदा गङ्गादीनां शुभतटभुवो नादभरिताः ।
भवंत्यध्याप्यानां गुरुजनसमीपे प्रपठनैः ॥
सदा वश्चान्येषां भवतु मनसि श्रेष्ठसुहृदः ।
प्रबोधः सुप्तानां भवतु भवतां शीघ्रमधुना ॥ ६ ॥

## ३. बालवीरः

प्रामाणिकत्वेन युवा मतोऽसौ । स्वराज्यनिष्ठोऽधिकृतेषु निष्ठः ।
स्वदेशनिष्ठः स्वनियोतृनिष्ठः । प्रशस्तशीलः किल बालवीरः ॥ १ ॥

परोपयोगी परसाह्यकारी । वर्णेषु सर्वेष्वपि मैत्रवृत्तिः ।
शूरोऽखिलः प्राणिदयापरश्च । प्रशस्तशीलः किल बालवीरः ॥ २ ॥

आज्ञाकरत्वेन च मंडितोऽसौ । सोल्हासवृत्तिश्च मितव्ययश्च ॥
संशुद्धभावः शुचिकर्मवाक्यः ॥ प्रशस्तशीलः किल बालवीरः ॥ ३ ॥

## ४. नवीन श्रीसमर्थविद्यालयप्रशस्तिः

समर्थविद्यालयकार्यकारिणः । सुशीलवृत्ता निजकार्यतत्पराः ॥
सुशासनाः सर्वमनोविलोभना । भवन्तु संतोषधनाग्रयायिनः ॥ १ ॥

समर्थविद्यालयकार्यकारिभिः । शिरोधृतं कार्यमतीवदुर्घटम् ॥
महाशयैर्यद्यपि दत्तजीवनम् । न शीघ्रसाध्यं स्वपरैश्च विघ्नितम् ॥ २ ॥

प्रजासु कश्चिन्न भवेदशिक्षितः । सुशिक्षितो यः स लभेत जीविकाम् ॥
इति प्रयत्नो जगदीशदर्शितः । सशिल्पशास्त्रे मतिः शिक्षणे कृता ॥३॥

समर्थविद्यालयनाम्नि कीर्तिते । समुद्भवत्येकपदे खलु द्वयम् ॥
न दीनसेवाङ्कितवेतने मतिः । स्वकीयविज्ञानबलेन जीवनम् ॥ ४ ॥

स्वधर्मनिष्ठा निजवाङ्मये रतिः । स्वलोककार्येषु सदा समुद्यमः ॥
पुराणशास्त्रेष्वपि मात्रमादरः । समर्थविद्यालयलक्षणं स्फुटम् ॥ ५ ॥

अतो न वर्णाश्रमधर्मबाधकम् । विधीयते किंचन तत्र वर्तनम् ॥
अपेयतां देशसमुद्धतिः खलु । यथोचितं कर्मण एव साधनम् ॥ ६ ॥

सुविद्यविप्रोऽभयभीतराजकः । तथा च वाणिज्यसमृद्धवैश्यकः ॥
त्रिवर्गशुश्रूषणशीलशूद्रकः । स एव देशः सकलर्धिशोभितः ॥ ७ ॥

सुशिक्षणेन प्रथमर्णमोचनम् । भवत्यतस्तत्प्रथमा श्रमावधिः ॥
यथा भवेन्न श्रमसंकरस्तथा । समर्थविद्यालयशासनं ध्रुवम् ॥ ८ ॥

अविप्लुतब्रह्मचरित्रसाधितम् । तदेव शिष्टं निरुपाधिशिक्षणम् ॥
सकृत्प्रविष्टः प्रथमाश्रमित्रतं– । स्थितः सुविद्यां सकलां समश्नुते ॥ ९ ॥

इति स्थिते कार्यमिदं महोदयम् । प्रबुध्यतां राष्ट्रहितस्य वर्धकम् ॥
धनावहं शिल्पकलाप्रवर्तकम् । यशस्करं बुद्धिबलस्य साधकम् ॥ १० ॥

विधीयतामस्य विवर्धने मनः । प्रदीयतामस्य विवर्धने धनम् ॥
समर्प्यतामस्य विवर्धने तनुः । निपीयतां श्रोत्रपुटैरियं वचः ॥ ११ ॥

---

## परिशिष्ट ३

## राष्ट्रीय शिक्षणच कां घ्यावें ?

[ हा लेख गु० अण्णासाहेबांनीं मुंबईच्या लोकमान्य दैनिकाच्या हिंदुस्थान अंकांत (१९२४) लिहिला आहे. ]

**कार्याणामुत्तमं कार्यं साधनानां च साधनम् ।**
**आधारः सर्वचेष्टानां राष्ट्रीयं लोकशिक्षणम् ॥**

सर्व रामायण ऐकून " रामाची सीता कोण ? " असा प्रश्न विचारणारांस काय म्हणावें ? ही जगांतील सामान्य उक्ति कोणास अतिशयोक्तीची आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु सीनियर रँग्लर परांजपे यांना आपण राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते नाहीं, विरोधी आहां, असें म्हटल्याबद्दल वाईट वाटलें हें दाखवितांना ते जाहीरपत्रक काढून जगास निवेदन करूं लागले कीं, 'काय हो, मला तुम्ही राष्ट्रीय शिक्षणाचे विरोधी म्हणतां, आज तीस वर्षें मी ज्या शिक्षणास वाहून घेतलें तें राष्ट्रीय शिक्षण नव्हे तर काय ?' एका प्रागतिक पत्रांत आपल्या उघड उघड सहीवर एक गृहस्थ पृच्छा करितात कीं, 'सरकारी व सरकारी मदतीच्या शाळांत दिलें जाणाऱ्या शिक्षणांत आणि राष्ट्रीय नामधारी शाळांत दिलें जाणाऱ्या शिक्षणांत फरक काय ? राष्ट्रीय शाळा या नांवाखालीं चालणाऱ्या सर्व विद्यालयांनीं व्यर्थ पैशाची उधळपट्टी चालविली आहे. ती बंद करावी आणि प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याच्या उद्योगास लागावें ' अशी सदर गृहस्थ गंभीरपणानें शिफारस करितात. राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न पूर्वी १९०६ त निघाला होता त्या वेळीं मरहूम सर फेरोजशहा मेथा एकदां म्हणाले, ' राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय हेंच मला समजत नाहीं ' त्यांच्यावर ताण करणारे बहाद्दर अजून आहेत इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षणाची सर फेरोजशहांच्या वेळीं जितकी चर्चा झाली नव्हती, तिच्या किती तरी पट या प्रश्नाचा खल तेव्हांपासूनच आजवर झाला तरी तें सर्व उपड्या घागरीवर पडलेलें पाणी किंवा दुश्चित्त श्रोत्यांपुढें सांगितलेलें रामायणच ठरलें असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं. एरवीं ही पेंडसे, परांजपे आणि मंडळी कोरडी ठणठणीत कशी राहतील ? चालू शिक्षणाचे अनिष्ट परिणाम कांहीं इंग्रजांनींच वर्णिले आहेत ते येथें आधीं देऊन

त्या तऱ्हेचें आमच्या सारख्यांचें म्हणणें मग पुढें आणावें म्हणजे वरील प्रतिनिविष्ट मंडळींची खातरी झाली तर होईल. सर एम्. मॉनियर विल्यम्स् यांचें ह्मणणें सुशिक्षित ह्मणविणाऱ्यांविषयींचें काय आहे तें पहा:—"ते आपल्या स्वतःच्या भाषांची उपेक्षा करितात; आपल्या स्वतःच्या वाङ्मयाकडे दुर्लक्ष करितात; आपला स्वतःचा धर्म सोडून देतात; आपल्या स्वतःच्या धर्मशास्त्रास तुच्छ मानितात; आपले स्वतःचे जातिनिर्बंध मोडतात; आणि आपल्या स्वतःच्या कालक्रमागत सांप्रदायांचा उपहास करितात." कलकत्ता स्कूल ऑफ आर्टस्चे (मार्जी) प्रिन्सिपाल मि. हॅवेल ह्मणतातः "हिंदुस्थानांत सुरू केलेली शिक्षणपद्धति राष्ट्रीय संस्कृतीशीं एकतानता पावेल अशी नाहीं; त्या संस्कृतीला पूरक होईल अशी नाहीं, तर तिचा विध्वंस करील अशी आहे." आमच्या मुंबई इलाख्यांत प्रसिद्ध होऊन गेलेले सर जार्ज बर्डवूड यांचे प्रचलित शिक्षणपद्धतीविषयीं काय उद्गार आहेत ते पहा. "या पद्धतीनें हिंदी सुशिक्षितांच्या मनांतून स्वतःच्या वाङ्मयाबद्दलचें प्रेम पूर्णपणें नष्ट केलें आहे; त्यांच्यांतील जीवनदायक आत्म्याचेंच ठाणें उठविलें आहे; परंपरागत कलाकौशल्यापासून त्यांना आनंद होत नाहीं; आपल्या राष्ट्रीय धर्मानें त्यांच्या मनास शांति-समाधान होईनासें झालें आहे; आपली कुटुंबावस्था त्यांना सर्वथैव त्याज्य व तिरस्करणीय वाटूं लागली आहे; मातापितर, भगिनी आणि खुद्द बायको ही त्यांना सहवासास नको असें झालें आहे." सारांश काय कीं, आमचे सुशिक्षित लोक कुटुंब, समाज, धर्म, राष्ट्र या सर्वांस पारखे बनलेले आणि एका अर्थी मेकॉलेनें वर्णिलेले वर्णमात्र भिन्न असे इंग्रज बनलेले आहेत, असें म्हणण्यास् हरकत नाहीं. परवांच्या सॅडलर कमिशनपुढें साक्ष देतांना सर जे. वुड्रोफ यांनीं हल्लींचें शिक्षण परकीय लोकांनीं एका विशिष्ट राजकीय धोरणानें दिल्यामुळें जसें झालें पाहिजे तसेंच झालें आहे असें स्पष्ट व निर्भीड मत दिलें आहे. स्वकीय जातिगुणांचा विध्वंस करणारें, शारीरिक दौर्बल्य आणणारें, आणि सर्वथा विद्रूप करून सोडणारें असें शिक्षण शास्त्यांनीं शासितवर्गाला दिलें आहे. जिच्यांत अगदीं चांगुलपणा नाहीं अशी गोष्टच जगांत असूं शकत नाहीं, '**दृष्टं किमपि लोकेऽस्मिन्न निर्दोषं न निर्गुणम्**' या न्यायानें झालेलें हित जमेस धरतां येणार नाहीं. एकंदरीनें हानिच झाली आहे, असें या सर्वांचें ह्मणणें आहे हें वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहाणार नाहीं. ही हानि भरून निघण्यास राष्ट्रीय

लोकांच्या हुकमतीनेंच चाललेलें शिक्षण पाहिजे. परकीय लोक जें धोरण घालून देतील तें कोठेंहि शिक्षण घेणारांच्या उत्कर्षास साहाय्यभूत होईल अशी आशा करणें व्यर्थ आहे. ही गोष्ट या परकीयांपैकीं कांहीं उदारात्म्यांनीं बोलून दाखवावी आणि आम्हांपैकीं शहाण्यासुरत्यांनीं ध्यानीं देखील आणूं नये हें राष्ट्राचें मोठें दुर्दैव आहे. परकीय सरकार अशा लोकांच्या हातीं कारभार देऊन स्वजनांचा गळा कापण्याचें घोर पातक करवून आपण नामानिराळें राहाण्याची अजब युक्ति न साधील, तर त्या सरकारास धूर्त व आपमतलबी असें कधींहि म्हटलें जाणार नाहीं. साक्षरता पसरविण्यासाठीं उच्च शिक्षणाची गळचेपी करणें आणि अंत्यजादि वर्गाचा दुवा घेण्यासाठीं ब्राम्हणादि वर्गांच्या प्रगतीच्या गाड्याला खीळ घालणें हे प्रकार यांपैकींच आहेत. साक्षरता आणि ज्ञान यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. साक्षरतेच्या अगोदर आरोग्य, आयुर्वृद्धि आणि आर्थिक सुस्थिति या गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे. लोकांचें मीठ तोडावें आणि त्यांना व्याकरणाचे धडे जबरीनें द्यावे असें राष्ट्रास नामशेष करूं पाहाणारें सरकारच करील. पंधराशें सिव्हिलियन परपुष्ट करावयाचे आणि पाऊण लाख लष्करास खुराक चारावयाचा हा मुख्य हेतु पुढें ठेवणारें सरकार स्वजनांकडून हिंदी राष्ट्राचा घात करावयाचें सोडून गरीब शाळामास्तरांस खूष ठेऊन थोड्याच शाळा पण त्या चांगल्या चालविण्याचा विचार करण्यास कधींहि प्रवृत्त होणार नाहीं. मी अंत्यज आहें म्हणून कोणा ब्राह्मणाच्या मुलानें स्कॉलर-शिप मागितली तर तूं जातीचा अत्यंज कोठें आहेस म्हणून सरकार विचारील. पण जातिभेद मोडला पाहिजे असें मात्र सरकार ठरावाच्या रूपानें फर्मावण्यास कमी करणार नाहीं. सरकारी शाळांत व राष्ट्रीय शाळांत अंतर काय असें विचारणारांनीं बळजबरीनें धर्म मोडला जातो ती सरकारी शाळा आणि चातु-र्वर्ण्य व पुनर्जन्म या मूळ तत्त्वांवर अवलंबून असणाऱ्या सनातन धर्माप्रमाणें चालणारी ती राष्ट्रीय शाळा असें एक भेदक लक्षण पुरें लक्षांत धरावें. असो. आजवर आम्ही सरकारास धर्मौदार्याबद्दल तरी वाखाणीत होतों; परंतु आपल्या राज्याचें थडगें खणण्यास सरकारानें आतां प्रारंभ केला आहे असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं. या कामीं त्यांना आमच्यांतील अत्यंत बुद्धिमान म्हणून गणलेल्यांचें साहाय्य मिळावें आणि तेच म्हणतात कीं आम्हांस राष्ट्रीय शिक्षणाचे विरोधी म्हणूं नका! राष्ट्र म्हणजे काय? धर्म, देश आणि भाषा

या तिन्हींचा लोप होतो त्या शिक्षणास राष्ट्रीय म्हणणारास कोणी तरी शुद्धीवर असलेला माणूस म्हणेल ?

राष्ट्रीय शिक्षणाचें एक विशिष्ट स्वरूप धार्मिक शिक्षण आहे ही गोष्ट ज्यांना मान्य आहे असे लोक सुद्धां तें देणें फार कठीण आहे असें मानून विचारतात कीं, काय हो, धार्मिक शिक्षण तुम्हीं कसें देतां ? पृथ्वींतील अनेक धर्मांचा तुलनात्मक विचार वाढवून लोकांचीं मनें या विषयाकडे वळवितां काय ? या सर्व पृथ्वींतील लोकांच्या धर्मसमजुती व आचार यांचा सांगोपांग विचार धार्मिक शिक्षणांत येत नाहीं. हा विचार ऐतिहासिक शिक्षणांत मोडेल व यास शिकणारे लोक कोणच्याहि धर्माचे किंवा नास्तिक म्हणजे ईश्वराचें अस्तित्व न मानणारे असले तरी चालेल. पण भावनात्मक शिक्षण देण्यास अशी धर्मांच्या उहापोहाची जरूर नाहीं. आपले परंपरागत आचार पाळणें हें पहिलें काम. आपल्यांतील प्रासादिक ग्रंथकारांनीं लिहिलेल्या ग्रंथांच्या साहाय्यानेंच भक्ति, ज्ञान, वैराग्य यांची माहिती करून देऊन मन नेहमीं प्रसन्न व शांत ठेऊन त्याचा निग्रह करण्यास म्हणजे इंद्रियांच्या मागें त्यानें धांवत जाऊन पापाकडे त्याची प्रवृत्ति न होईल असें त्याला वळण देण्यास शिकविणें हें धर्मशिक्षण होय. याच्या योगानेंच वैयक्तिक व सामाजिक वर्तन शुद्ध होऊन मनुष्य राष्ट्रहितक्षम बनेल. भगवद्भजन वाढविणें हें पहिलें काम व परमेश्वराचें स्वकर्माचरणानें अर्चन करणें याशिवाय दुसरें कर्तव्य नाहीं. हें यथास्थित झालें म्हणजे सर्व सुखें आपोआप प्राप्त होतात. स्वदेश, स्वराज्य या सर्व गोष्टी, निर्विघ्न रीतीनें भगवद्भजन चालावें यासाठीं आहेत. यज्ञयागास विघ्न करणाऱ्या राक्षसांचें निर्दालन करण्यास परमेश्वराच्या प्रेरणेनें शूर पुरुष प्रवृत्त व समर्थ होतात. हे राक्षस आपल्यापैकीं असोत किंवा परकीय असोत,त्यांचें पारिपत्य करण्याची सात्विक बुद्धि धार्मिक वळण नीट मिळाल्या-शिवाय कधीं उत्पन्न होणार नाहीं. संपत्ति मिळवावी, ती मिळविण्यासाठीं सहस्रावधि खटाटोप करावेत; परंतु आसक्त न होतां परोपकारबुद्धि कायम ठेवून स्वजनांसह तिचा उपभोग घेण्यापूर्वीं ती सर्व संपत्ति देवास अर्पण करून शेष आपण घेणार, ही बुद्धि लहानपणापासूनच प्रत्येक लहानसहान गोष्टींत दिसून यावी असें शिक्षण राष्ट्रीयच असणार. पृथ्वींतील इतर लोक कसें आचरण करितात हें पाहण्याचें कारण नाहीं. त्यांचें कलाकौशल्य व त्यांचे उद्योगधंदे उचलण्यास हरकत नाहीं. परंतु त्यांचें अधार्मिक किंबहुना

क्रूर वर्तन आपण घेतलें नाहीं, तरच आपल्या राष्ट्राचें वर्चस्व कायम राहील. आपण ज्या गोष्टी पवित्र मानीत आलों त्यांचें पवित्रपण कायम राहूं नये हें लाजिरवाणें आहे. गयेच्या गयावळांनीं विष्णुपदाच्या जागीं गव्हर्नरांस बूटांसह जाऊं दिलें याची चीड आसेतुहिमाचल हिंदी जनांस आली नाहीं ही स्थिति लाजिरवाणी नव्हे तर काय ? इंग्रज लोकच किती एक वेळां मर्यादा राखून बूट काढूं लागतात, पण त्यांस आमची शिकलेली मंडळी म्हणतात, ' छे ! तसें करण्याचें कारण नाहीं.' त्या वेळीं तो साहेबच ह्मणतो, " माझ्याबद्दलचा तुमचा आदर तुमच्या देवाबद्दलच्या पूज्य बुद्धी-पेक्षां अधिक असूं नये असें मला वाटतें " अशा उदाहरणांनींसुद्धां आमच्या शिक्षितांना शरम वाटत नाहीं. हें फळ धर्मशिक्षणाची हयगय केलेल्याचें नव्हे तर कशाचें बरें ? धर्म बुडाला म्हणजे नीति कशी राहील ? धर्म म्हणजे सत्य आणि सत्य म्हणजे धर्म, दुसरें कांहीं नाहीं. म्हणून सत्याची सगुण मूर्ति राम हें आमचें परम दैवत. श्रीसमर्थ सांगतात, ' राम नाहीं तें धाम ह्मणजे घर सोडा. सुख पाहिजे तर अरण्यांत जा; पण 'विराम' ह्मणजे रामहीन घरांत राहूं नका.' एका थिऑसफिस्ट मित्रांशीं भाषण करीत असतांना असा विषय निघाला कीं, ' स्वदेश ही जी आपली हल्लींची कल्पना आहे ती पूर्वीं स्पष्ट रीतीनें आपल्यांत होती कीं नाहीं ?' याचा संशय आहे ! त्यांस असें सांगणें भाग पडलें कीं, देशासाठीं देव नाहीं; देवासाठीं देश आहे. देश आणि विदेश हें सर्व देव करितो. देव जर आपल्याजवळ आहे तर विदेशच स्वदेश होतो आणि देव नसेल तर स्वदेश असून तो विदेशच. आपण सर्व खिस्ती झालों आणि स्वराज्य मिळालें तर स्वदेश कोठें राहिला ? भाषा गेली, धर्म गेला, मग काय उरलें ? ही गोष्ट श्रीसमर्थ एका स्फुट अभंगांत स्वच्छ सांगतात. तो अभंग त्यांस म्हणून दाखविला तेव्हां ते मित्र ह्मणाले, " अहो, हा खराच कां जुना अभंग आहे ? अलीकडे तर कोणीं केला नाहीं ना ?" अशी आमची स्थिति झाली आहे. " **जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ?** " हा अभंग श्री. शंकरराव देवांनीं छापलेल्या पुस्तकांत १६१ वा पाहून घ्या. वाचकांसाठीं तो येथेंहि देतों:—

**रामेंविण देश तो जाणावा विदेश । विदेशाचा देश राम करी ॥ १॥**
**राम भेटे ज्यासी तो नव्हे विदेसी । सर्व देश त्यासी आपलेची ॥२॥**

आपलेची देश या रामाकरितां । होये सार्थकता जेथें तेथें ॥ ३ ॥
जेथें तेथें राम देखतां विश्राम । संसारींचा श्रम आठवेना ॥ ४ ॥
आठवेना तेथें आठव विसर । दास निरन्तर जैसा तैसा ॥ ५ ॥

राष्ट्रीय शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यास संसाराचा श्रम चुकवावयाचा नाहीं, सडकून करावयाचा आहे. पण त्यांच्या रोमरोमांत राम सांठविला तर श्रम आठवत नाहीं, त्यापासून कष्ट वाटत नाहींत असें झालें पाहिजे. संसार किंवा प्रपंच नेटका म्हणजे थाटाचा व्हावयाचा आहे. तमाम दुनियेंत काय चाललें आहे ? कोणतें राष्ट्र कोणत्या मतलबानें आपलें घोडें दामटीत आहे ? ह्या विषयीं पुरी खबर राष्ट्रीय शिक्षणवाल्यास असणार. पण हें शिक्षण प्रचलित शिक्षणांत विद्यार्थ्यांच्या मानेवर बसविलेल्या परकीय भाषेच्या जोखडाखालीं कसें मिळणार ? २५० वर्षांपूर्वीच्या मिल्टनच्या काव्याची संथा देऊन ( त्याच कालांतील शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या सालींच मिल्टन मरण पावला ) श्रीसमर्थांच्या ग्रंथाची ओळख होऊं न देणारें शिक्षण विद्यार्थ्यांस शरीरानें असमर्थ करतें तसेंच मनानेंहि दुर्बल करील यांत नवल काय ? परकीय भाषेचें वाङ्मय व परकीय भाषेच्या द्वारां शिक्षण या मुद्यावर आतां नवीन लिहिण्यासारखें नाहीं. पण राष्ट्रीय शिक्षण व प्रचलित शिक्षण यांत अंतर काय म्हणून विचारणारांना एवढी सूर्यप्रकाशासारखी गोष्ट दिसूं नये हें आश्चर्य नव्हे तर काय ?

हिंदुस्थानचे विभाग भाषावारच झाले पाहिजेत. या कामांत राष्ट्रीय सभेनें उत्तम प्रारंभ करून स्वराज्यस्थापनेचा उपक्रम केला आहे. त्या त्या प्रांतांचीं संस्थानें बनून संयुक्त हिंदुस्थान कधीं काळीं–शीघ्र किंवा विलंबानें हें त्या त्या भाषावाल्यांच्या कळकळीवर व जुटीच्या परिश्रमावर अवलंबून राहील, बनल्याशिवाय राहणार नाहीं. गुजराथ विद्यापीठ आणि बनारस विद्यापीठ किंवा बोलपूर भारती विश्वविद्यापीठ हे प्रयत्न इंग्रजी भाषेला हल्लीं जें महत्त्व देतात तें तूर्त म्हणून देत आहेत, ही केवळ आत्मवंचना होय. याच्याच पुढची पायरी म्हणजे सरकारी हुकमतींतील विद्यालयें राष्ट्रीय शिक्षणांतील कांहीं अंगांचें अनुकरण करून आपल्या चालू शिक्षणास बालचमू, गीताशिक्षण, हातकामशिक्षण, राष्ट्रीय देवतांचे किंवा महापुरुषांचे उत्सव, वस्तुभांडार वगैरे ठिगळें लावून जुनें नवें मिळून राष्ट्रीय शिक्षणाच्या महावस्त्राची योग्यता आपल्या कार्यास प्राप्त झाली अशी बतावणी करतात, ती होय.

कोणी कोणी राष्ट्रीय विद्यालयास टिळक उपपद लावतात ते आपण होऊन आपली स्वत:ची फसवणूक करून घेतात. अशा प्रकारास कित्येक वेळां तात्यासाहेब केळकरांसारखी मंडळी उत्तेजनहि देतात; पण खरे राष्ट्रीय शिक्षणाचे चहाते असलें अर्धवट बोलणें व लिहिणें ऐकून व वाचून विषाद पावतात यांत आश्चर्य नाहीं. हल्लींचा काल सत्य स्पष्ट बोलण्याचा आहे. निरुपाय म्हणून सरकारी नोकरी करावयाचीच असा ज्यांचा कृतसंकल्प असेल त्यांनीं सरकारी व निमसरकारी शाळांत व महाशाळांत ( कॉलेज ) जावें. पण खरा राष्ट्रहिताचा मार्ग राष्ट्रीय शिक्षणच आहे असेंच प्रतिपादिलें पाहिजे. जनमतप्रवाह तिकडे जोरानें धांवत आहे. आपण त्यांच्याबरोबर वाहत आहों असें दर्शविणें सत्यमार्गदर्शकास शोभत नाहीं. कमी अधिक प्रखर भाषा उपयोजिणें हें स्वभावावर आहे. पण तत्त्वाला बाध येतां कामा नये. आदले दिवशीं नमून दिलेले धडे दुसरे दिवशीं घेण्यापलीकडे शिष्यशिक्षकांचा संबंध न येणाऱ्या केवळ बुद्धिशिक्षणाच्या शाळांस शारीरिक, बौद्धिक, धार्मिक व औद्योगिक शिक्षण देणाऱ्या राष्ट्रीय शाळांची बरोबरी येईल काय? सुशिक्षित लोकांच्या सुद्धां मनांत हें बिंबलें नाहीं म्हणून अशा शाळांस भरपूर द्रव्यसाहाय्य मिळत नाहीं. देऊं केलेली मदत सुद्धां एका नाहीं दुसऱ्या कारणानें मिळत नाहीं. यासाठीं शेती, व्यापार व कारागिरी या तीन्ही उपायांनीं लोकांची सेवा करून आपलीं राष्ट्रीय विद्यालयें तरतीं ठेवण्याची पाळी येते व या कामीं शिक्षकांबरोबर खांद्याला खांदा भिडवून किंबहुना त्यांच्यावर ताण करून विद्यार्थी जेथें मदत करतात, त्या राष्ट्रीय शाळा एकदोन दिवस त्यांच्या ठिकाणीं राहून पहाव्या आणि मग त्यांच्याविषयीं नीट कल्पना बनवावी. हा एक आणि एकच उपाय राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळांची योग्यता मनांत ठसविण्यास योग्य आहे. भाषा, गणित, इतिहास, भूगोल, सृष्टिशास्त्र वगैरे विषय सर्व शाळांत सरकारी व राष्ट्रीय शाळांत एकच प्रकारचे. एके ठिकाणीं परीक्षेस व यंत्रबद्ध धोरणास प्राधान्य आहे, दुसरे ठिकाणीं सरासरी संस्कार व्हावेत आणि स्वावलंबनास व स्वराष्ट्रसेवेस उपयुक्तता वाढावी इकडे सर्व लक्ष असतें. ज्ञान म्हणजे न्याय, व्याकरण, अलंकार, वेद ज्योतिष वगैरे विषय असें भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें नाहीं, तर घमेंडखोर होऊं नको, ढोंगी बनूं नको, सरळ वाग, चंचलता सोडून स्थिरपणा धर, गुरुसेवा करीत जा, इंद्रियांच्या चोचले-

खोरपणास बळी पडूं नको, कसलाहि प्रसंग आला तरी डगमगूं नको वगैरे शिकवण म्हणजे ज्ञान, याहून इतर तें ज्ञान नव्हे म्हणजे पोट भरावयाच्या विद्या म्हणजे प्रपंचोपयोगी ज्ञान म्हणावें असा रोख आहे. श्रेष्ठ विद्या अध्यात्मविद्या असें म्हणण्यांत बाकीच्या विद्याहि पाहिजेत असेंच होतें. त्याप्रमाणें शील बनविणें आणि हरएक प्रकारच्या राष्ट्रकार्यास तयार करणें हें राष्ट्रीय शाळांचें कार्य आहे. सरकारी व सरकारी धोरणाच्या शाळांतील शिक्षणाचा पहिला हेतु सरकारास नोकर मिळावेत असा होता. आतां शिक्षण तेंच, पण हेतु तो मुख्य नाहीं. आतां त्या शिक्षणानें नोकरी मिळाली नाहीं म्हणजे माणूस हताश होतो. यासाठीं शिक्षण मुळीं न मिळालेल्या माणसापेक्षां शिक्षित माणूस आर्थिक दृष्ट्या कमी ठरतो. म्हणजे शिक्षण घेऊन परीक्षा दिल्यावर नामर्द होतो. अशा स्थितींत परकी भाषेंतून शिक्षण मिळाल्यानें बुद्धिविकास थोडा, विद्याव्यासंग त्याहून थोडा, धर्मवृद्धि त्याहून थोडी, आर्थिकदृष्ट्या योग्यता म्हणजे स्वावलंबनानें द्रव्यार्जनाचें सामर्थ्य सर्वांत थोडें असें शिक्षण घेण्यापेक्षां राष्ट्रीय शिक्षणच घ्यावें हेंच ठीक.



## परिशिष्ट ४

### राष्ट्रीय शिक्षण म्हणजे स्वायत्त शिक्षण

स्वायत्त शिक्षण असेल जिथें जनांचें।
तेथेंच तें सुफल होइल तेंच साचें ॥
नेणून तत्त्व असलें फसलांत फार
आतां तरी पुढति नीट करा विचार ॥ १ ॥
जेते जितां शकवितीच बहु प्रकारें।
जें ज्ञान फोल गळिं ओतिति तेंच सारें ॥
भाषाहि ती सतत घोकविती स्वकीया।
शास्त्रें कला शिकविती नच नांव घ्याया ॥ २ ॥
भूमीपराक्रमण हाच प्रधान हेतु।
येथील सर्व हरणें स्वहितार्थ वस्तु ॥
येथील लोक करणें निज बंदिदास।
स्त्रैण प्रजा बनविणेंच उपाय खास ॥ ३ ॥
हें सर्व होत असतें पुरुषस्वभावें।
नाहींच हें घडत नाइक दुष्ट भावें ॥
जे सुज्ञ ते स्वहित साधिति या जगांत।
अज्ञान मूढ जन ते निजती निवांत ॥ ४ ॥

राष्ट्रीय धोरण व राष्ट्रीय शिक्षण त्याचप्रमाणें राष्ट्रीय उन्नति व राष्ट्रीय हितसंबंध हे शब्द-प्रयोग आपणांसच पूर्वी अगदीं अपरिचित होते असें नाहीं. परंतु यांची विशेष घोषणा १९०६ सालापासून म्हणजे वंगभंगाच्या चळवळीपासून सुरू आहे. त्यांत राष्ट्रीय शिक्षण हा नुसता चर्चेचा विषय नसून एका कृतिरूप चळवळीचा विषय असल्यानें व त्याचें सरकारास व लोकांस कमी अधिक महत्त्व वाटल्यानें त्यासंबंधीं थोडी बहुत खळबळहि उडाली. राष्ट्रीय सभेनें निश्चित व निःसंदेह अर्थ ठरवून एक ठराव पसार केला. ती स्पष्ट व तत्त्वाविषयीं संशय उरूं न देणारी भाषा पुढें राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांस पटली नसल्यामुळें त्या ठरावांतील राष्ट्रीयत्व

निःसत्व करून टाकण्याजोगे ठराव कांहीं दिवस करून हळूहळू राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांतून त्या विषयास अर्धचंद्र देण्यांत आला. पुढें महात्मा गांधींनीं बहिष्कार पुकारला त्यांत राष्ट्रीय शिक्षणास सात्त्विक व तात्त्विक स्वरूपापेक्षां राजकीय किंवा सरकारशीं विरोधी असें स्वरूप प्राप्त झालें. सरकार आपल्या धोरणानें शिक्षण चालवो, पण त्यापासून आपल्या राष्ट्राचें त्यांत कल्याण नाहीं असें आढळून आल्यानें सर्व देशभर विचारी व उद्योगी लोकांनीं शिक्षणाच्या कार्याचा गाडा आपण स्वतः ओढला पाहिजे. सरकारी शिक्षण परकीयांनीं आंखलेल्या मार्गानें व परकीयांनीं तें कमी अधिक मानानें हिंदुस्थानांतील लोकांच्या कल्याणाच्या दृष्टीनें न आंखलेल्या मार्गाचें असल्यामुळें तें सर्वथा दूषित आहे, हें ओळखलें नव्हतें तोंपर्यंत त्याचा आपण प्रेमानें व गोडीनें आदर केला. अगदीं वाईटांतून सुद्धां कांहीं तरी बरें निघतें या तत्त्वास अनुसरून थोडेंबहुत आमचें त्यापासून बरेंहि असेल, नाहीं असें नाहीं; पण वस्तुस्थितीच्या अज्ञानानें व झालेल्या थोड्याशा कल्याणाच्या मोहानें आपण फसलों. आतां सावध व्हावें असें ठरवून १९०६ सालीं केलेल्या ठरावाचा डंका राष्ट्रांत वाजला. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं त्या शब्दयोजनेंतील मर्म बहुतेक लोक पार विसरून गेले. शिक्षण आपले हातीं घेतलें पाहिजे हें पहिलें तत्त्व. म्हणजे आपल्या राष्ट्राच्या गरजांस अनुसरून वाङ्मयिक, शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण देतां येईल. सरकार आपण होऊन राष्ट्रीय परंपरांना मान देऊन, खरें उपयुक्त शिक्षण देईल किंवा चळवळ करवून त्यांजकडून तें देववितां येईल हें शक्य नाहीं असें एकमतानें जाहीर करण्यांत आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुर्दैवानें शास्ते व शासित यांचे हितसंबंध–विशेषतः आर्थिक हितसंबंध–भिन्न असल्यामुळें ज्या योगानें शासित राष्ट्र संपन्न होईल असें शिक्षण शास्त्यांकडून त्यास मिळणें अशक्य आहे. असें होणें मानवस्वभावास विरुद्ध आहे, ही गोष्ट त्या ठरावांत ध्वनित आहे. अशा नाजूक गोष्टीचा स्पष्टोच्चार कोणी झालें तरी वारंवार करीत बसत नाहीं. स्वपरबलाबल जाणून शहाणे व दूरदृष्टि विचारी पुढारी आपल्या देशबांधवांची जागृति करण्यासाठीं प्रयत्न करितात. त्याप्रमाणें कार्य केलें पाहिजे. भलतीच आशा लावून लोकांना स्वतंत्र राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रयत्नापासून विन्मुख करण्याचें काम कोणीही राष्ट्रहितैषी करणार नाहीं.

स्वत:ची पुरी खातरी झाली तरी स्वतंत्र प्रयत्न यशस्वी होणार नाहींत असें वाटल्यामुळें कित्येक लोक सद्धेतूनें चालू असलेल्या सरकारी व निम-सरकारी शाळांतच सुधारणा करून कार्य भागवावें असें प्रतिपादन करतात व तसें शक्य आहे असें वाटून स्वतंत्र विद्यालयें काढण्याचे अपुरे व अल्पयशस्वी प्रयत्न सोडून देण्याचा कळकळीनें उपदेशहि करतात. दुसरे कित्येक खासगी शाळा, सरकारी शाळांस पूरक म्हणून काढून, त्यांमध्यें आपल्या राष्ट्रीय विचारांची मनमुराद पेरणी करावी असें सुचवितात. सरकारी शाळांतील मुलांनाच आपल्याकडे येण्यानें हा फायदा होईल. तास दोन तास वेळ खर्चून वकील वगैरे राष्ट्रीय विचारांच्या मंडळींस हें काम शक्य होईल, मग हल्लीं राष्ट्रीय शाळांना लागतो तो पैसा जमविण्यासाठीं लोकांवर भार घालण्याचें कारण पडणार नाहीं. असे विचार अलीकडे गंभीरपणानें प्रकट करण्यांत येत आहेत. त्यांत शिक्षणखातें अलीकडे आपल्या दिवाणाकडे आल्यानें या व अशा अनेक देशहिताच्या गोष्टी होणें शक्य आहे असेंहि प्रतिपादन भरीस पडत असतें. नागपूर येथील महा-राष्ट्र पत्रांत येऊन गेलेली संपादकीय लेखमाला, रा. रा. हरिभाऊ मोहनी यांचें **तेजस्वी शिक्षण** हें पुस्तक व पत्रराज केसरींत आलेले रा. दत्तात्रय केशव केळकर, बी. ए., यांचे नऊ लेख, या सर्वांवरून शक्याशक्यतेचा भ्रम अजून जनतेस सुटण्यास किती दिवस लागतील कोण जाणे असेंच म्हणणें भाग पडतें.

हा विषय जरा नीट व्यापक ऐतिहासिक दृष्टीनें विचार करण्याजोगा आहे. शिक्षणपद्धतींत किंवा निराळे निराळे विषय शिकविण्यांत यावेत किंवा गाळावेत अशा अवस्थेंत साधे फेरफार करावयाचें कामसुद्धां किती अवघड जातें व त्यास किती कालावधि लागतो हें ज्यांना माहिती आहे ते एकंदर धोरण पालटणें शक्य आहे असें कधींहि म्हणणार नाहींत. शेजारच्या जपाननें चाळीस वर्षांत जें केलें तें आजच्या राजकीय स्थितींत सरकाराकडून चाळीस चाळीस सोळाशें वर्षांत होण्याची आशा नको हें पटवून घेण्यास साम्राज्याकांक्षी राष्ट्रांचा इतिहास नीट पाहिला पाहिजे. साम्राज्याकांक्षा म्हणजे 'इंपीरिऑलिझम' ज्या राष्ट्रानें आपल्या वर्तनांत प्रकट केली त्या राष्ट्रानें जित राष्ट्रास आपल्या स्वतःच्या राष्ट्रांतील लोकांप्रमाणें विद्या शिकविल्या आहेत असें कधीं झालें आहे काय ? जिंकलेल्या देशां-

तील लोकांनीं आपणांस निराळें राष्ट्र समजून वागूं नये तर आपण साम्राज्याचे अवयव आहों यांतच अभिमान मानावा, आपली पूर्वपरंपरा, आपली भाषा, व आपला धर्म सोडून साम्राज्याशीं तदाकार होऊन तल्लीन व्हावें हें धोरण साम्राज्याभिमानी शास्त्या राष्ट्राचें असतें. जित राष्ट्रांतील लोकांनीं स्वराष्ट्रीयत्व विसरावें व जेत्यांचे स्तुतिपाठक दास व्हावें म्हणूनच त्यांचीं मनें बद्ध करून टाकणारें शिक्षण त्यांना देण्यांत येत असतें. परवां १९१८ त तिभंगलेला पोलंड परराज्याच्या मगरमिठींतून सुटला. त्याचा शंभर वर्षांचा अनुभव आपणांस फार बोधप्रद आहे. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झालें तरी तेथील कित्येक सुशिक्षित लोकांचीं मनें परकीय संस्कृतीच्या व परकीय भाषादिकांच्या मोहापासून मुक्त झालीं नाहींत. खुद्द त्यांच्या विरोधानें तेथें राष्ट्रीय पुनर्घटनेस प्रतिबंध होत आहे. मग आमच्या देशांतील आंग्लभाषादिकांनीं मोहित झालेले लोक राष्ट्रीय शिक्षण म्हणजे चालू शिक्षणाहून निराळें तें काय ? असें विचारतात याचें नवल वाटण्याचें कारण नाहीं. राजकर्त्यांचें शैक्षणिक धोरण यशस्वी झालें आहे याचा तो पुरावाच होय. हरिनामाचा घोष केला म्हणजे मनाला शांति मिळते आणि मुक्तीचा मार्ग सुलभ होतो असा आमच्या पूर्वजांचा विश्वास होता आणि अजूनहि पुष्कळ लोक असे देवभोळे आहेत ही त्यांची भाषा असते आणि आपण असल्या मूर्खपणांतून सुटलों म्हणून ते आपल्यास धन्य मानतात. धर्मशिक्षणाविषयीं हें धोरण ठरलें आहे. साम्राज्यबुद्धियुक्त शास्ते यांत काय साधतात ? त्यांना यापासून काय मिळतें ? असें कांहीं लोक भोळेपणानें विचारतात. पूर्वजांविषयीं अवमान म्हणजेच स्वत्वच्युति. त्यांचे विचार म्हणजे त्यांचे ग्रंथादिक सर्व कांहीं समुद्रास्तृप्यन्तु किंवा अग्निस्तृप्यतु या मंत्राच्या उपयोगाचे असें ठरल्यावर मग रक्षण करण्याजोगें कांहीं उरलें नाहीं. मग शास्त्यांशीं तदाकार होण्याचा मार्ग खुला झाला.

दुसरा किंवा कित्येकांच्या मतानें आतां वर्णिलेल्या उद्देशाचीच पहिली जागा पटकावण्यास योग्य असा साम्राज्यवाद्यांचा उद्देश म्हणजे जिंकलेल्या देशांतील सर्व सांपत्तिक साधनांचा यथास्थित उपयोग करून आपल्या देशांतील लोकांस वैभवशाली करणें. या जिंकलेल्या लोकांच्या हातीं करटी देण्याच्या उद्योगास **पराक्रमण** म्हणजे 'एक्सप्लॉयटेशन' असें नांव आहे. या कामासाठीं आपल्या स्वतःच्या लोकांच्या अंगीं धाडस व शास्त्रीय ज्ञान यावें

म्हणून करावयाच्या खटपटींचा लवलेश जिंकलेल्या देशांत प्रविष्ट करून द्यावयाचा नाहीं. जिंकलेल्या देशांत केवढे प्रचंड उद्योग हातीं घेतले जातात व ते सर्व कोण चालवितात व त्यायोगें किती संपत्ति जेते मिळवूं शकतात याची कांहीं थोडी कल्पना यावी असें ज्यास वाटत असेल त्यानें इतर औद्योगिक नियतकालिकें पहावींतच पण दर शुक्रवारच्या टाइम्सचीं एंजिनिअरिंग सप्लिमेंट ( औद्योगिक पुरवणी ) अवश्य पहात जावी. लॉर्ड कर्झन यांनीं येथें सम्राट्प्रतिनिधि असतांना स्वजनांस उद्देशून केलेल्या एका जाहीर भाषणांत स्पष्टच म्हटलें आहे कीं "आम्ही कारभार करतों, तुम्हीं पराक्रम करा. तुम्ही कसूर केली तर आमच्या कारभाराचा काय उपयोग?" तात्पर्य आमच्या शिक्षणांत शास्त्रीय शिक्षणाचा औद्योगिक दृष्टीनें पूर्ण अभाव आहे. याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नाहीं. स्वहिताविरुद्ध वागून आम्हांस अशा कामीं तरबेज कोण करील?

तिसरा हेतु **निर्बलीकरण**. वाढत्या दारिद्र्यानें हें काम होत आहेच. पण शस्त्रास्त्रशिक्षण तर कायद्यानेंच बंद. तेव्हां शिक्षणांत हा भाग येण्याची आशा नाहीं. सारांश स्वभाषेचें शिक्षण, स्वधर्माचा अभिमान, शारीरिक बलवृद्धि, औद्योगिक कौशल्याची वाढ या सर्व गोष्टी साम्राज्यकांक्षेस वावड्या आहेत. त्या आपल्या स्वतःच्याच हातीं शिक्षण असल्याशिवाय त्यांत प्रविष्ट होण्याची आशा नाहीं. शिक्षणपद्धतींत सुधारणा करून सर्व मुलांच्या बुद्धीचा यथायोग्य उपयोग करणें व सर्वांस एकाच चरकांतून ओढून काढण्याचा क्रम हल्लीं चालू आहे तो सोडून देणें, बाह्यांगावर म्हणजे इमारती, बांकें, टेबलें यांकडे फाजील लक्ष देण्याचें सोडणें हीं कामें कांहीं अंशीं प्रचलित पद्धतींतील निमसरकारी विद्यालयें करूं शकतील. पण शिक्षणाचा खरा प्राण म्हणजे स्वराष्ट्रीयत्वाची भावना, तज्जन्य उद्योगपरंपरा, आर्थिक उत्कर्ष, व धार्मिक उन्नति आणि शरीरबलाभिवृद्धि या गोष्टी लोकांनीं आपण होऊन साधल्या पाहिजेत.

हें लोकांस पटलें नाहीं तोंपर्यंत चालली आहे तशीच तरुण जनांची दुर्दशा चालू राहील. अर्थात् शिक्षणक्रमांत असलेल्या तरुण जनांविषयींच हें आमचें म्हणणें आहे. राष्ट्रांतील बहुजनसमाजांत अठरा विश्वे दारिद्र्य आहे. त्याच्याबरोबर विचार आणि विवेक यांच्या नांवानें शून्याकार आहे. कांहीं लोक देशांतल्या देशांत देवघेव व लहानसा व्यापार करून आहेत.

त्यांच्या दृष्टीस रोजच्या व्यवहारापलीकडे कांहीं दिसत नाहीं. सुशिक्षित एक निराळीच जात बनल्यासारखी झाल्यानें हे अशिक्षित सघन लोक वाळींत पडल्याप्रमाणें झाल्यामुळें राष्ट्रकार्यास त्यांचा उपयोग नाहींच असें झालें आहे. अशा स्थितींत राष्ट्रीय शिक्षणाचा फैलाव करूं इच्छिणारे लोक वेड्यापिरांत गणले जात आहेत आणि त्यांचे प्रयत्न विफल होत आहेत यांत आश्चर्य नाहीं. आपणांस झालेली जागृति इतरांस झाली नाहीं तोंपर्यंत मोठ्या कष्टानें कांहीं दिवस परिस्थितीशीं झगडून निराशेनें माघार घेण्याची त्यांच्यावर पाळी येते. म्हणून राष्ट्रीय शिक्षण ही चीजच झूट आहे असें प्रतिपादणें आत्मघातकीपणाचें आहे. मद्यप्यांचा समाज मोठा झाला तरी सुरापान हें घातकी आहे या विधानास बाध येणार नाहीं. विचारी लोकांनीं आपल्यास आज साध्य होत नसेल तर तसें नीट समजून तें कसें साध्य होईल या दिशेनेंच राष्ट्रीय शिक्षणाविषयीं उहापोह करून कृति केली पाहिजे.

राज्यकर्त्यांस दोष देऊन त्यांच्यावर शिव्याशापांचा भडिमार करून कांहीं साध्य होणार नाहीं. ते सामान्य माणूसकोटींतील आहेत. स्वहिताचा विचार ज्याचा त्यानें केला पाहिजे. नाहक दुष्टपणानें आमचा देश बुडविला आणि आह्मांस वाईट शिक्षण दिलें अशा अधम कोटींत घालण्याजोगी कोणचीहि कृति इंग्रजसरकारकडून झाली असें म्हणतां येणार नाहीं. अज्ञानानें, मोहानें, मदानें, किंवा अशाच आत्मगत दोषानें आम्हींच आमच्या हिताची उपेक्षा केली आहे. त्यांचा देश एवढासा असून एवढा साम्राज्यविस्तार त्यांनीं केला, याबद्दल त्यांचें कौतुकच केलें पाहिजे. त्यांना सर्व जगानें गुरु करावें अशी प्रापंचिक दृष्टया त्यांची वाखाणणीच करावी. अमानव पशूंवर किंवा सृष्टीवर त्यांनीं जसा अंमल गाजवला तसाच मानवपशूंवर गाजविण्याची संधि फुकट जाऊं दिली नाहीं. यासाठीं आपणहि आपल्या डोक्यांत मेंदु शिल्लक असेल तर त्यांना गुरु करावें आणि यापुढें तरी फसूं नये. भर्तृहरीनें माणसांचे चार वर्ग केले आहेत, त्याप्रमाणें भरतवर्षाचे प्रस्तुत राज्यकर्ते तिसऱ्या वर्गांत पडतील. ह्मणजे त्यांना मानवराक्षस ह्मणावें लागेल; परंतु तें वर्गीकरण आजकालच्या जगांत लागू पडणारें नाहीं. दुसऱ्याचें हित स्वहितासाठीं बुडविणें हें सामान्य मनुष्याचें लक्षण ज्या वेळीं समजांत निंद्य मानीत होते असा काळ आज राहिला नाहीं. भर्तृहरीच्या कालास साधुयुगच म्हटलें पाहिजे. दुसऱ्या एका गोष्टीमुळें हें मत आमचें

ठाम झालें आहे, तेंहि जातां जातां नमूद करून ठेवितों. त्या काळीं दुसऱ्याचें नुकसान म्हणजे हितनाश करण्यासाठीं आपल्या हिताचा नाश करणारे केवळ विघ्नसंतोषी लोकांहून हलक्या दर्जाचे लोक त्या वेळीं नसतीलच. कारण त्यांचा भर्तृहरी उल्लेखच करीत नाहीं. त्यानें विघ्नसंतोष्यांपुढें हात टेकले आहेत. आम्हांस विघ्नसंतोष्यांना मानवराक्षस म्हणून स्वहितघातपूर्वक परहितविघाती म्हणजे आपलें नाक कापून दुसऱ्यास अपशकुन करणाऱ्यांपुढें हात टेकावे असें वाटतें. यासाठीं भर्तृहरीच्या श्लोकाची सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति आम्हीं तयार केली आहे. ती देऊन आम्ही वर ठरविलेला आमच्या राजकर्त्यांचा सामान्य या कोटींत निवेश कसा करितों हें स्पष्ट करून दाखवूं.

भर्तृहरीचा मूळ श्लोक

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान्परित्यज्य ये
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये ।
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नंति ये
ये तु घ्नंति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥

नवीन सुधारून वाढविलेली आवृत्ति

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान्परित्यज्य ये
ते मान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये ।
सामान्याः खलु मानवाः परहितं स्वार्थाय निघ्नंति ये
ये तु घ्नंति निरर्थकं परहितं ते मानवा राक्षसाः
ये घ्नंति स्वहितं परार्थहतये ते के न जानीमहे ॥

सत्पुरुष, मान्य पुरुष, सामान्य पुरुष, मानवराक्षस आणि काय नांव द्यावें हें कळत नाहीं असे पुरुष असे पांच वर्ग आहेत. त्यांपैकीं पुष्कळ लोक तिसऱ्या वर्गांत येतात. त्यांतच आपलें हित साधण्यासाठीं आमचें हित न पाहणारे आमचे राज्यकर्ते येतात. आपण मात्र कोणच्याच वर्गांत नाहीं असें झालें आहे. आम्हांसाठीं सहावा वर्ग करून ठेवला आहे तो—

मूढा ये विमुखा हितं प्रति निजं धिक्कान्पशून् मानवान् ॥

त्यांच्यातर्फे एकच मार्ग आज सुचत आहे, तो नमूद करून हा लेख संपवितों.

**कल्याणं भगवान् करोतु कृपया तेषां जनानामिह ।**
**प्राप्त्यै राष्ट्रियशिक्षणस्य सततं कुर्वन्तु यत्नं च ते ॥**

---

# परिशिष्ट ५

## THE NEED FOR A HINDU UNIVERSITY

BY PROF. V. G. BIJAPURKAR

[ *Indian Review–April 1906* ]

No one in India that takes any interest in education now needs any preliminary dissertation on what a University is and in what consists its importance. Education in all its branches was going on in India but without any co-ordination of these into one single institution. When, however, the idea of uniting the so called faculties into one system by bringing together the best that belonged to these for the sake of making an onward march in concert instead of in isolation was suggested, it was readily taken up by the Indian mind. But in the regulation of the corporate existence of these faculties, in other words, in the management of University affairs, they had no hand. It was, at any rate, wholly taken by the Europeans that here, too, as in the Government of the land the Sahebs were the masters. Indeed, when the veteran Sanskritist, Dr. Bhandarkar, brought out his first book, he introduced himself to the world in the title page as holding the title of Master of Arts conferred by a body of European scholars. The policy of not allowing Indians to rule the destinies or regulate the operations of the University is of very ancient date. The earlier Europeans, however, seemed not bent upon appropriating the field exclusively to themselves, as Indians including such eminent graduates as the late Mr. Ranade and Dr. Bhandarkar, were admitted into the Senate. Indians did take part in the deliberations of the University, but the policy on which its constitution and management were originally

based, has never been departed from during all the stages of the improvement and modification of the details connected with its working. For about a score of years the very novelty of Western ideas captivated and dazzled the mind of the products of our University, but they were not long in perceiving that the University was creating a class of men totally dissociated from the traditions of their own nation, and that if the same process were allowed to continue, thorough denationalisation was sure to be the result. The traditions of the Indian nation as embodied in the social institutions and the literature of the classical language of India, proved too strong for the political aims of those who inaugurated a foreign system of education through the medium of a foreign language. If India had no civilization of its own, it could have been easily anglicized and evangelized. But that is not the case. Both the Sanskrit and the vernacular languages have inspiring literatures and the national mind could not be weaned from them, however much the study of these was discouraged by the exigencies of the new educational course. I cannot speak with authority about other parts of India, but in our portion of the country, notwithstanding the complete severance of the vernacular from the University course, there has been a keen sense of a forced separation as from a dear relative, weighing upon the heart of almost every University student. Never finding time to attend to the teachings of Ramdās, Tukārām, Jnāneshwar, Vāman, Eknāth, Mukteswar, Moropant and others, the University student has always felt that grave injustice has been done to his nation in denying a share to these master minds in the formation of the mind of the Marathi-speaking portion of the student world. With the progress of years this impression is gaining deeper and deeper ground, and students are reading their vernacular

literature—even though they have not to bring up any portion of it for the examination. For about a dozen years after the establishment of the University, any of the vernaculars could have been taken up as a second language, and it is not unlikely that this state of things may come into existence again at no distant date. That will, however, not satisfy the aspirations of the advocates of the vernaculars; nor will even the introduction of vernaculars as an independent necessary subject. The needs of the nation require that they should be made the medium of instruction imparted in all the Colleges affiliated to the Universities. This does not seem to be within the range of practical possibility so long as the present spirit continues to guide the operations of British Rule. Not only in the Colleges but in the High Schools also greater importance is being attached to a thorough study of the language of the rulers. The need of a common language for the whole of India is, indeed, a problem that is pressing on the attention of the mind of the leaders of Indian thought and however divided they may be in other matters, there seems to be a fair unanimity that that language cannot be English in spite of the valuable service rendered by it in making the modern united India of the educated people. No foreign language can permeate large masses of the nation. The problem will be solved in the natural evolution of the country and it need not detain us here. What is not tolerated by the Indians at present is that they should be made to undergo an extraordinary degree of mental strain, as a result of the imposition of a foreign tongue to the neglect and decay of their vernaculars. A satisfactory solution of this question is impossible unless the people work on independent lines and establish a University of their own. There is nothing to prevent the Hindus and Mahamedans from having one National Uni-

versity, but as the latter have already taken up the work of independent organization, the Hindu University may spring up as a sister movement almost on the same lines.

When a general survey of the educational methods adopted by the British Government is taken, the first point that strikes any observer is the one we have touched upon hitherto, *viz.*, the medium of instruction. Throughout the world no nation is educated except through its own language, and the Indians have every reason to feel that the anomaly of a foreign language being necessary to instruct them is humiliating in the extreme as being the result of foreign domination. While their sacred language is studied by all the nations of the world, that that or any one language directly derived from it should not serve their educational purposes is a thought which must ever prevent any truce with or reconciliation to the present course. But what lies deeper than this question of language is the graver question of the ideas and ideals of foreigners being impressed on the people of this country. The system of education adopted by the rulers of India is wholly detrimental to the growth of a national spirit in the minds of those that are brought under its influence. The growth of the nation must proceed from within. Foreigners can only plant exotic ideas in the minds of their pupils, ideas that cannot be readily assimilated, and can only create unrest in the minds of the learners, and dissatisfaction in the country all round owing to the introduction of notions inconsistent or discordant with the time-hallowed thoughts of the nation. It is only a national system of education that can draw out the capacities and capabilities of a nation, and national educators alone can clearly perceive what modifications are required in the traditional modes owing to the impact with new contacts and circumstances. Every assistance rendered by outsiders is, of course, helpful, but

१९०७ मध्यें सुरतेच्या राष्ट्रीय सभेंत प्रागतिक व राष्ट्रीय पक्षांतील पुढाऱ्यांचा मतभेद झाला. राष्ट्रांतील इष्ट सुधारणा घडवून आणण्यास नेमस्त पुढाऱ्यांनीं या जनमनस्थितीकडे दुर्लक्ष न करितां तिचा फायदा घेऊन तिला योग्य वळण व प्रोत्साहन द्यावें तें सोडून पूर्वीच्या अंधपरंपरेला चिकटून राहावें यासारखें दुर्दैव कोणतेंच नाहीं असें अण्णांचें मत होतें. नेमस्त पुढारी जुने, मुरलेले, विचारी आणि दूरदर्शी म्हणून नांवाजलेले होते. ‘ हार खाल्ली,’ ‘कशी फजिती झाली’ असें म्हणून पोरेंबाळें उपहास करतील या भीतीनें राष्ट्रांतील तरुण वर्गाशीं वृद्ध व अनुभविक लोकांनीं स्वेच्छाचारीपणाचें वर्तन ठेवावें हें पुढारीपणास साजत नाहीं. ‘तुमचें ह्मणणें काय आहे ? या, बसा, बोला. ’ अशा प्रकारें आदरानें त्यांस बोलावण्यांत कोणाहि वृद्धांचा अपमान नाहीं अशी आमची पक्की समजूत आहे. त्यांच्या कडून कांहीं गोष्टी चुकल्या असतील तर त्यांची समजूत घालणें व त्यांस ताळ्यावर आणणें हें त्यांचें कर्तव्य आहे. परंतु त्यांच्या उत्साहाची दिशा बरोबर असतांना केवळ त्या उत्साहाचा अतिरेक पाहून गांगरून जाणें अगदीं बरोबर नाहीं. सरकार व त्यांत परकी सरकार आज शें-दीडशें वर्षें आपल्याशीं कसें वागलें आहे व त्याचे डोळे उघडण्याचा प्रयत्न करतां करतां निराश झालेल्या पितामहानें दाखविलेला मार्ग कसा आहे, या गोष्टीचा विचार करून तरुण पिढीच्या प्रयत्नाचें अभिनंदन करण्याचें सोडून त्यांस नांवें ठेवणाराचे पदरीं राष्ट्रहितविघाताचें पातक येतें असा आमचा पूर्ण ग्रह आहे.”

( विश्ववृत्त, डिसेंबर १९०७ )

या वेळच्या राष्ट्रीय आणि नेमस्त यांचें वर्णन विश्ववृत्ताच्या वरील अंकांतील मासिक स्फुटांत अण्णासाहेबांनीं पुढील शब्दांत सुरेख केलें आहे.

“ जहाल पक्षाचीं मतें कोणास मान्य असोत व नसोत, त्यांचें या वेळचें मागणें अगदीं सार्थ होतें. स्वदेशाचें संरक्षण करणारांचा पक्ष जसा न्याय्य असतो व परकीय स्वारी करणाऱ्या लोकांच्या पक्षाकडे जसें आततायीपणाचें पातक येतें, तसा जहाल नेमस्तांचा प्रकार होता. जहाल हे घर धरून बसलेले, व त्यांचें मालकीचें ठरलेलें धन बुचाडण्यास नेमस्त आले होते. आकस्मिक बहुमताच्या जोरावर हें कार्य करूं देणें ह्मणजे राष्ट्राच्या हितास आपण जागलों नाहीं असें होणार. ही पवित्र संरक्षणाची जबाबदारी राष्ट्रीय पक्षांतील मंडळींच्या पुढें आपल्या कार्याची पवित्रता व न्याय्यता उज्वल-

त्यानें ठेवीत होती. नेमस्त पक्षाकडील लोकांची श्रीमंती, सरकारांतील वजन, समाजांतील मान्यता यांमुळें कांहीं कालपर्यंत जहालांविषयीं गैरसमज होईल; पण राष्ट्राच्या हिताच्या उत्कर्षाचा ध्वज त्यांच्याच हातांत आहे व त्यांच्या छायेखालीं लवकर किंवा उशीरा सर्व समंजस लोक येणार ही त्यांच्या मनाची खात्री आहे. आपशांत खासगीपणानें भांडून झगडून, शेवटीं सार्वजानिक दृष्ट्या ऐक्य प्रगट करण्याचा शुद्ध, सरळ व मामूल मार्ग सुटल्यानें, २३ व्या कॉंग्रेसचा भंडवडा झाला याबद्दल कोणच्या खऱ्या देशभक्तास वाईट वाटणार नाहीं? राष्ट्रांतील कांहीं शिष्ट शिष्ट नेमस्तांचा संग्रह सरकारनें करावा व त्यांच्याकडून आपल्या देशभक्तांचा गळा कापविण्यास मदत करावी हें कोणा राष्ट्रहित-चिंतकास मानवेल? फूट पाडून राज्य करणें हें तत्त्व उराशीं बांधणें परकीय राज्यकर्त्यांना साजतें व त्यांत यश मिळाल्यास त्यांचा फायदा होतो. परंतु ज्या राष्ट्रांतील लोकांवर या डावाचा प्रयोग होतो त्याला कोणत्याही प्रकारें तें सन्मानावह किंवा हितावहही होत नाहीं. बुडावें तर सर्वांनीं बुडावें, तरावें तर सर्वांनीं तरावें यांतच खरें हित व खरा मान आहे."

असो, वारांगनेप्रमाणें घटकेंत निरनिराळे पेहराव करणारी नृपनीति अगर जनपदभाषेंत बोलावयाचें म्हणजे राजकारण स्थिर नसतें. तें परिस्थितीप्रमाणें बदलत असतें. आजहि भरतखंडांत प्रागतिक, राष्ट्रीय, सहकारितावादी, असह-कारितावादी, फेर–नाफेरवाले असें अनेक पक्षोपपक्ष निर्माण झाले आहेत. प्रत्येक पक्षास कांहीं तरी स्वतंत्र निश्चित मतें व तत्त्वज्ञान असतें. प्रसंगीं हे सर्व पक्ष एक होऊन राष्ट्रीय प्रगतीस पोषकच होतात असा ताजा अनुभव आहे.

असो ! सर्व पक्षांनीं देशाची उन्नति करावी असा उपदेश गुरुवर्यांनीं केला आहे. देशांतील राजकारणांत अशा प्रकारें दर घटकेस नवीन नवीन फेरफार होत असल्यामुळें देशांतील सर्व पक्षांतील लोकांवर ज्यांचें वजन पडेल असे प. वा. न्या. रानडे व ना. गोखले यांचीच आठवण होते. आजहि मतमतांच्या गलबल्यांत त्यांचीच आठवण झाल्यावांचून राहात नाहीं.

Ranade ! Thou shouldst be living at this hour,
India hath need of thee ! !

" न्यायमूर्ति रानडे ! आपण जर आजच्या घटकेस आमच्यांत असतां तर आमच्या देशास आजहि आपली जरूरी आहे. आज हर घटकेसही तुमची आठवण होते. पण इलाज नाहीं " असें एके ठिकाणीं गुरुवर्यांनीं लिहिलें आहे तें अक्षरशः खरें आहे.

———

## पुरवणी परिशिष्ट

## वि. गो. विजापुरकरांचें पत्र

### खरा प्रकार आहे तरी काय ?

[ हें पत्र 'चोराच्या उलट्या बोंबा' या ९ फेब्रुवारी १९१५ च्या केसरींतील लेखाला अनुलक्षून लिहिलेलें होतें. पण केसरींत त्याला स्थान मिळालें नाहीं व टिळक चरित्रांतहि याचा उल्लेख कोठेंहि केलेला आढळत नाहीं. या पत्राच्या साह्यानें वाचकांस इतर अनेक गोष्टींचा उलगडा करून घेतां येईल. ]

सुरतेच्या अनिष्ट प्रसंगानंतर राष्ट्रीय सभेपासून अलग राहणाऱ्या पक्षाचा आंत प्रवेश व्हावा यासंबंधानें हल्लींच्या म्हणजे अलाहाबाद कन्वेनशननें केलेल्या नियमांत जरूर तो फेरफार करण्यासंबंधानें चाललेल्या विचारास समेटाचें बोलणें असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. या कामीं नामदार गोखले विलायतेहून आल्यापासून राष्ट्रीय सभा भरेपर्यंत ज्या गोष्टी पुण्यांत घडून आल्या त्या सर्व प्रायः माझ्यासमक्ष झाल्या असल्यामुळें हल्लीं चाललेल्या वादाच्या प्रसंगीं वस्तुस्थिति लोकांपुढें यावी व संयमपणानें विचार करण्यास त्यांना मदत व्हावी म्हणून ज्या एका गोष्टीमुळें म्हणजे रा. टिळक यांच्या रा. सुब्बारावांबरोबर झालेल्या संभाषणासंबंधानें मला जें कांहीं माहीत आहे तें केवळ सत्याची चाड बाळगून लोकांपुढें मांडावें म्हणून आज दोन शब्द लिहीत आहें. प्रस्तुत वादासंबंधानें आपलें प्रसंगप्राप्त कर्तव्य बजावण्यासाठीं दुसरे अनेक विचार बाजूस सारावे लागत आहेत त्यास माझा नाइलाज आहे. शिवाय प्रस्तुत प्रसंगीं आपल्याला तडजोड करण्याची जरूरी आहे. त्या कामींही माझ्या लेखाचा उपयोग होईल अशीही मला आशा आहे. आजच हें काम हातीं घेण्याचें कारण माघ वद्य १० चा केसरीचा अंक व नामदार गोखले यांनीं आपलें म्हणणें म्हणून वर्तमानपत्रास पाठविलेला लेख हें होय. या दुसऱ्यांत माझा नामनिर्देश केला आहे व पहिल्यांतही करतां आला असता. किंबहुना रा. केळकरांचा केला म्हणून माझाही नामनिर्देश करणें सरळपणाचें झालें असतें. अशामुळें मजवर एक प्रकारें खरा प्रकार काय आहे तो महाराष्ट्रबंधुजनांस सांगण्याची जबाबदारी आली आहे असें मला वाटतें. त्यांत विशेषतः मला ज्याबद्दल अत्यंत खेद

वाटला व जिच्या अभावीं लेख लिहिणें कदाचित् लांबणीवर टाकलें असतें तिचा उल्लेख प्रामुख्यानें पुढें येईलच. त्याच्यापूर्वी इतर गोष्टींविषयीं थोडें थोडें लिहितों.

केसरींतील अग्रलेखामध्यें कित्येक विधानें केलीं आहेत तीं सत्यास सोडून आहेत.

१. मि. सुब्बाराव यांस रा. टिळक भेटावयास येणार होते असें माहीत नव्हतें आणि त्यांनीं केलेलें टांचण रा. टिळकांस दाखविलें हें यदृच्छेनें झालें.

आदल्या दिवशीं गायकवाडवाड्यांतून निघते वेळीं दुसरे दिवशीं आठ वाजतां आम्ही परत भेटीस येऊं असें मि. सुब्बारावांस रा. टिळक म्हणाले, त्या वेळीं मि. सुब्बाराव म्हणाले, "कशाला तसदी घेतां ?" रा. टिळक म्हणाले "नाहीं. येईनच. सुमारें ८ वाजतां येईन." "बरें तर या." असें भाषण होऊन आम्ही निघालों.

परत आल्यावर मग आपल्याशींच विचार करीत असतां कांहीं टांचण करून बरोबर न्यावें असें रा. सुब्बारावांस वाटलें. असें केल्यानें आपल्यास मद्रासची मंडळी विचारतील त्यावेळीं नक्की जबाब देतां येईल. असें टांचण करून ठेवल्यावर रा. टिळक व मी त्यांच्या खोलींत गेल्याबरोबर आपण टांचण केलें आहे, त्यांत कांहीं कमीजास्ती असल्यास कळवा, मी दुरुस्ती करीन, असें बोलल्यानंतर त्याप्रमाणें काम सुरू झाल्यावर थोडया वेळानें म्हणजे सुमारें १० मिनिटांनीं रा. नरसोपंतही आले. त्यांच्या व माझ्यादेखत पुढें सर्व भाषण व दुरुस्त्या झाल्या. रा. टिळकांनीं सांगावें व सुब्बारावांनीं दुरुस्ती करावी असा प्रकार चाले. सुब्बारावांनीं एकहि सुधारणा करण्याचें नाकारिलें नाहीं. रा. केळकर व रा. टिळक मिळून बोलत असत व फेरफार सुचवीत व ते अखेर रा. टिळक नक्की शब्दयोजना करून सांगत. यासाठीं पुढील विधानही सत्यास धरून नाहीं.

२. 'सुब्बाराव यांस सुचविलेले सर्वच शोध त्यांनीं दाखल केले असें नाहीं; ते तसे केले असते तर या लेखाचें स्वरूप वेगळें झालें असतें.'

आपण मराठ्यांत छापलेलें 'स्टेटमेंट' मराठींत भाषांतर दिलेलें आहे व मग प्रतिपादिलें आहे कीं, तेवढेंच जमेस धरलें पाहिजे. लेखी टांचणा-संबंधानें आपलें विधान मला बरोबर दिसत नाहीं. या टांचणाची प्रत हातीं

येण्यापूर्वीच रा. गोपाळरावांनीं मि. बसू यांस पत्र लिहिलें. या टांचणाची मातब्बरी मि. सुब्बारावांसच विशेष होती. त्यांनीं आपल्या स्मरणासाठीं व निश्चितपणानें बोलतां येण्यासाठीं व मुख्य मुख्य मुद्दे रा. टिळकांच्याच पूर्ण मान्यतेनें व तपासणीनंतर आणले आहेत हें दाखविण्यासाठीं तें टांचण केलेलें होतें व तोच हेतु मि. सुब्बारावांनीं रा. टिळकांचेजवळ व्यक्त केला होता. पुष्कळ झालेलें भाषण तें झाल्यापासून १० मिनिटांचे अंतरावर हाव-भावासह रा. गोखले यांस त्यांनीं निवेदन केलें. तें सर्व लिहून काढण्यास वेळ नव्हता व सुब्बारावांस जरूरीही वाटली नाहीं. परंतु तें सर्व सांगितलेलें ऐकून त्यावरून झालेला परिणाम मि. बसू यांस पाठविलेलें पत्र होय. जेवढें टांचणांत नमूद करणें सुब्बारावांस बरें म्हणजे एका अर्थी लेखनांत नमूद करणें अनपायकारक वाटलें तेवढेंच नमूद केलें. इतर भाग सर्व किंवा आठवेल तसा तोंडी सांगावा व तसें करण्यास सूत्ररूपानें टांचण करावें इतकाच त्यांचा हेतु होता. कायद्याच्या कोडतांत या कागदाचा उप-योग व त्या दृष्टीनें त्याची योग्यता हे विचार त्या वेळीं आमच्या कोणा-च्याच ध्यानींमनींहि नव्हते. जो ग्रह स्वतःच्या मनावर झाला तो सर्व बहुतेक भाषणासह सुब्बारावांनीं सांगितल्यावर ना. गोखल्यांच्या मनावर कॉंग्रेसवरील संकट टाळणें आपलें कर्तव्य वाटावें असा परिणाम झाला. या सर्वांचा उल्लेख उघड चव्हाट्यावर येईल अशा पत्रांत द्यावा हें ना. गोख-ल्यांस बरें वाटलें नाहीं. मि. बसू यांच्या मनावर तर योग्य ग्रह होऊन हें समेटाचें काम जेथल्या तेथें थबकावें व त्याचा विचार करण्यास चांगला वेळ मिळावा, एवढें होण्यासाठीं अत्यंत सद्बुद्धीनें व कळकळीनें तें पत्र लिहिलें आहे.

गोपाळरावांचे मनांत समेट व्हावा असें फार आहे व त्याबद्दल त्यांना तळमळ लागली आहे. हें मीं स्वत: तोंडी व लेखी रा. टिळक यांस कळ-विलें होतें. मुंबईचा गड हातीं आल्याशिवाय मात्र तें करणार नाहींत; पण तो कोणत्या तीन पायऱ्यांनीं हस्तगत होईल हेंही त्यांनीं सुचविलें होतें. तेंही मी रा. टिळकांस लेखी टांचण करून कळविलें असतें तर मोठ्या खट-पटीनें हेंही झालें असतें; परंतु तो सर्व मार्ग सुटला, कारण ना. गोखल्यांनीं केलेली सूचना जी. रा. साने, ना. बेळवी वगैरेंस पसंत पडली ती रा. टिळ-कांनीं मान्य केली नाहीं. अखेर ती मान्य केली असती असें मानण्यास

मला कारण आहे. पण यापेक्षां ज्यास्ती कांहीं मिळतें काय पाहूं यावर ते उलट गेले. अशा स्थितींत आपलें वजन खर्चण्यास मद्रासेहून मिसेस बिझांट-बाई व सुब्बाराव आले. व बाई असतांना जें बोलणें झालें नाहीं तें 'मोकळ्या मनानें' सुब्बारावांजवळ पुढें झालें, तेंही सुब्बारावांचें मुंबईहून परत येण्या-नंतर झालें. त्या भाषणाचें पुरें पुरें परिज्ञान झाल्यावर रा. गोखले यांच्या मनानें एकदम उलट खाल्ली. या मन:स्थितींत असतां मि. बसू यांचें विचा-रणें झाल्यानें त्यांच्या पत्रास उत्तर म्हणून ' विश्वासाचें ' पत्र लिहिलें. व इतर ठिकाणींही समेट करण्यास आपण पूर्वींच दिलेलें पाठबळ काढून घेतलें. यांचे प्रकारांत ' गुप्त घात ' कोठेंच मला दिसला नाहीं व दिसत नाहीं. हल्लींच्या प्रकृतीच्या नादुरुस्त स्थितींत त्रास करून घेऊन निवळ समेटासाठींच जरूर पडल्यास, कांहीं झालें तरी, जाईन इतकें वचन दिलें होतें त्या जाण्याचेंही आतां कारण उरलें नाहीं असें म्हणूं लागले. सर्वांच्या मनो-वृत्तीस जुळेल आणि सर फेरोजशा यांची आवश्यक ती मान्यता, मोठ्या कष्टानें कां होईना, मिळवितां येईल इतकी सूचना चिकट गिऱ्हाइकी वृत्ति सोडून आणखी टाक, आणखी टाक न म्हणतां आनंदानें अखेरचें म्हणून त्या प्रकरणाचा कायम निकाल समजून सर्वांनीं हल्लींच्या प्रसंगीं एकदिलानें व सर्वांच्या संहत जोरानें राष्ट्राचें काम करण्यास खांद्यास खांदा भिड-वून कामास लागलें पाहिजे अशा तयारीनें रा. टिळक आंत येतील तरच तो समेट. तो सालमजकुरीं होत नाहीं असें वाटून त्यांस खेद झाला ही गोष्ट मला माहीत असल्यानें तिसरें विधान जें घडघडीत खोटें व लोकांत ना. गोखले यांच्याविषयीं द्वेष उत्पन्न करण्यास कारण होईल असें वाटतें व जो उत्पन्न झाला असतां कांहीं तरी अनिष्ट ओढवेल अशी भीति वाटते तें विधान हें.

३. 'टिळकांना कोणीकडून तरी मारावयाचें आणि ते सरकारच्या विरुद्ध आहेत असें जाहीर केलें म्हणजे आयतीच त्यांची वाट लागेल. यापेक्षां यांचा दुसरा विचार नसतो. '

या विधानाचें जितक्या जोरानें व पूर्ण माहिती असल्या कारणानें जितक्या अधिकारानें निराकरण करतां येईल तितक्या रीतीनें करावें, याच एका हेतूनें हें पत्र लिहिण्यास मी प्रवृत्त झालें आहें. आणि केसरी पत्रांतच याची प्रसिद्धि होणें जरूर आहे. कारण ' यावान् पक्षस्तावान् बलि: " या

न्यायानें मूळ विधानाइतकी प्रसिद्धि निराकरणाची होणें योग्य आहे. म्हणजे सरळ मनाच्या लोकांस दुसरी बाजूही कळणें तितकेंच आवश्यक आहे. हें ओळखून इतर कोणत्याही विकारास वश होऊन हें पत्र प्रसिद्ध न करावें असें वाटल्यास तो विकार बाजूस सारावा अशी माझी आग्रहाची विनंती आहे ! अशीं विधानें कोणींही करूं नयेत. आग लावणें सोपें, विझविणें कठीण आहे असा अनुभव आहे. असो, याविषयीं विशेष लिहावयास नको.

साक्षात् सत्य नसलेल्या विधानांविषयीं इतकें लिहिल्यावर केसरीच्या अग्रलेखांतील एक विचारसरणीसंबंधानें लिहिणें जरूर दिसतें. [illegible]ी टांचणाशिवाय कांहींच खरें मानूं नये असा कायदा आहे वगैरे आपण लिहितां; परंतु तें पटण्याजोगें नाहीं. अगोदर प्रस्तुत वाद कायद्याच्या कोडतांतील नाहीं. सही, शिक्का, स्टँप वगैरे गोष्टींचा संबंध नाहीं. कायद्याची भाषा उपयोजून, राष्ट्रीय कार्यास प्रवृत्त झालेल्या इतक्या दूर येणाऱ्यावर अशी आग पाखडणें बाजवी नाहीं. मराठा पत्रांतील सुमारें चाळीस ओळी व्यापणाऱ्या स्टेटमेंटशिवाय दुसऱ्या चाळशीनें या विषयाकडे पाहावयाचें नाहीं तर चार चार पांच पांच तास संभाषणांत व चार आठ दिवस प्रवासांत खर्च करावयाचे कशासाठीं ? सचोटीनें वागणाऱ्यांस कागदाची जरूरीच नाहीं. कायद्यानें सवड ठेविली तरी इमानी माणूस अनीतीचें वर्तन करणार नाहीं. तीन वर्षें निघून गेलीं म्हणून कर्जाची फेड करण्याचें टाळणें कायदेबाजास साजेल पण माझ्यासारख्यास तें कर्ज फिटलें नाहीं तर पुढच्या जन्मीं धनकोच्या शेतांत बैल होऊन तें फेडावयाचें चुकणार नाहीं असेंच वाटेल. खरें तें खरें. त्याला कायदा कशाला आणि पुराव्याचा ॲक्ट तरी कशाला ? सचोटीच्या माणसांनीं आपल्या छातीवर हात ठेवून श्रीहरीचें स्मरण करून बोलावें व लिहावें हेंच युक्त आहे.

समेटासंबंधीं झालेल्या सर्व खटपटी व सारीं खलबतें लिहून काढलीं तर एक ग्रंथच होईल; परंतु सत्य विधान व शुद्ध बुद्धि यांशिवाय कांहीं इतर असेल असें नामदार गोखल्यांसंबंधानें कोणांस वाटत असेल तर त्यांनीं पत्रद्वारां, समक्ष किंवा मित्रद्वारां माझ्याकडून खुलासा करून घ्यावा म्हणजे मी त्याची खात्री करून देईन. या गोष्टी अर्थात् विश्वासाच्या आहेत. तेवढा नसेल तेथें साक्षात् परमेश्वर काय करणार !

समेट व्हावा या पक्षाचा मी पूर्ण आहें. खरा नाहीं तरी दिखाऊ समेट होऊन कामास प्रारंभ व्हावा. आपण जवळ आलों म्हणजे परस्परांविषयींचे गैरसमज दूर होतात. कोण कसा हें कळून येतें. आजचा काल आपणांस अनुकूल आहे. नवीन कांहीं मिळालें नाहीं तरी मॉर्ले-मिंटो यांच्या सुधारणेनें आपली झालेली प्रगति व त्या योगानें मिळालेली संधि यांचा उपयोग केला तर कौन्सिलांत बिल व बाहेर लोकमतासाठीं जारी प्रयत्न केले तर बरेंच कार्य होईल असा ना. गोखले यांचा भरंवसा आहे. रा. टिळक यांनींहि या सुधारणांपासून आपलें एकूल चांगलेंच पुढें पडलें आहे असें म्हटलें आहे. तेव्हां आतां बंगभंगाची फाळणी रद्द झाली, सरकार व प्रजा यांची बरीच दिलजमाई झाली, तेव्हां आतां राजकीय दृष्ट्या बहिष्काराचें आज कारण नाहीं. स्वराज्याचा ठराव क्रीडमध्यें समाविष्ट झाला, स्वदेशीविषयीं सर्वांचें पूर्ण ऐकमत्य आहे व राष्ट्रीय शिक्षणाविषयीं विचार होण्याचा संभव आहे. अशा स्थितींत बहुमताचें कारणच उरलें नाहीं असें मला वाटतें.

वि. गो. विजापूरकर



# प्रकरण विसावें

## वाङ्मय-सेवा

**विविध विषयांच्या शिक्षणाचा ज्यांच्या मनावर संस्कार झालेला असतो अशा लोकांनीं, महाराष्ट्र वाङ्मयाची अभिवृद्धि करण्याचें कंकण हातीं बांधलें पाहिजे. या दृढ समजुतीनें प्रत्येक पदवीधरास तुह्मी कांहीं तरी स्वभाषेची सेवा करा, अशी विनंति करण्याचा प्रघात आम्हीं ठेविला आहे**

—गु० विजापूरकर, ग्रंथमाला.

आतां या प्रकरणांत गु. अण्णासाहेबांच्या वाङ्मयसेवेबद्दल थोडी माहिती लिहून आम्हीं पुढील प्रकरणीं त्यांच्या वाङ्मयाचा परिचय करून देणार आहोंत.

गुरुवर्यांची वाङ्मयसेवा अगदीं निरपेक्ष अशी होती. वाङ्मयतप आचरणाऱ्यानें द्रव्याभिलाष कधींही ठेवतां कामा नये असें ते वारंवार म्हणत. देशसेवा करणारे स्वातंत्र्यवीर ज्याप्रमाणें देशास उपयोगी असतात त्याप्रमाणें निरभिमानी, निर्व्यसनी, आणि निरभिलाषी वाङ्मयसेवक निर्माण झाल्याशिवाय वाङ्मयवृद्धी होणें शक्य नाहीं असें त्यांचें मत होतें. वाङ्मयनिर्मितीनें पैसा मिळवावा ही गोष्ट त्यांच्या मतें अत्यंत गौण आहे. लोकांस ज्ञानामृत पाजून त्यांना शहाणे करून सोडावें, असा उदात्त हेतु साहित्य-सेवकांनीं आपल्यापुढें ठेवावा. लोकांना प्राप्त झालेली '**विद्या वीर्यवती भूयात्**' अगर '**या विमुक्तये सा विद्या**' या न्यायानें विद्या प्रभावशाली होवो, अगर मनुष्याच्या मुक्तीस कारणीभूत होवो अशी त्यांची इच्छा होती. वाङ्मयनिर्मितिकारांचा हा एक विशेष आहे. त्याचप्रमाणें साहित्यसेवकांनीं स्वार्थत्यागी झालें पाहिजे व सर्वांनीं नवीन प्रसिद्ध होणाऱ्या अभिजात साहित्यग्रंथांना मदत करण्यास पुढें आलें पाहिजे असें ते म्हणत.

गुरुवर्यांची उदार बुद्धी वाङ्मयक्षेत्रांतहि दिसून येत होती. डॉ. भांडारकर–संशोधन–मंदिराची केवळ कल्पना निघतांच प्रथम त्यांनीं शंभर रुपये दिले. त्याचप्रमाणें रा. रानडे यांच्या इंग्रजी–मराठी कोशासाठींही त्यांनीं पुढाकार घेऊन द्रव्य जमविलें. मराठी भाषेंत अशा प्रकारचे संदर्भग्रंथ तयार करण्याच्या कामीं त्यांनीं पुष्कळ उत्तेजन दिलें. साहित्यसेवकांचा गौरव करून

व त्यांच्या कृतीबद्दल अभिमान व्यक्त करून सदासर्वदा ते साहित्याबद्दल आदर व्यक्त करीत, आणि वाङ्मयचिकित्सकाच्या दृष्टीनेंही ते ग्रंथांचें मार्मिक अवलोकन करीत.

संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांत ज्याप्रमाणें डॉ. भांडारकरांचें नांव ' संशोधक ' या नात्यानें कायमचें ग्रथित झालें आहे त्याप्रमाणें मराठी भाषेच्या इतिहासांतहि 'भाषासंवर्धक' म्हणून अण्णांचें नांव चिरकाल टिकून राहील. प्रथम शिक्षकाचा जिकीरीचा धंदा पतकरल्यामुळें त्यांतून त्यांना स्वास्थ्य फारच थोडें मिळत असे. पण पुढें कॉलेजांत प्रोफेसर झाल्यावर मात्र इतर वाचन, मनन, व अध्ययन करण्यास त्यांना बराच वेळ सापडे, आणि या वेळेचा त्यांनीं सदुपयोग केला. मराठी भाषेच्या संवर्धनाच्या कामीं त्यांनीं आपली बुद्धि आणि पैसा वेंचला. वाङ्मयनिर्मितीचे कामीं ते लोकांना उत्तेजन देत. पुढें १०।१२ वर्षांत अनेक तरुणांना त्यांनीं वाङ्मयाकडे खेंचलें ही गोष्ट ' ग्रंथमालें'तील लेखकांच्या यादीवरून सहज लक्षांत येणार आहे.

तरुण महाराष्ट्रीयांनीं मराठी भाषेची सेवा करण्यास लवकर पुढें यावें याविषयीं ग्रंथमालेंत गुरुवर्यांनीं अनेक वेळां उत्तेजनाचे शब्द लिहिले आहेत. यांपैकीं एक उतारा वर शिरोवतरणांत दिला आहेच.

" पदवीधरांपैकीं ज्यांनीं आपल्या परीक्षाक्रमाचा शेवट लावून व्यवसाय पतकरून स्थिरता आणली आहे, अशांनीं आपल्या उद्योगांतून वेळांत वेळ काढून सालीना १६ पृष्ठांचे एकदोन निबंध लिहावे." (वि. वृ., अं. १ ला.)

" 'आम्ही इंग्रजींतच वाचतों, तेंच आम्हांला चांगलें कळतें, मराठींत चांगले ग्रंथ होणें शक्य नाहीं, नुसतीं भाषांतरें करून काय उपयोग आहे ? नवीन ग्रंथ व स्वतंत्र निबंध लिहिले पाहिजेत,' अशी विध्वंसक टीका कित्येक पदवीधर मंडळींतून करण्यांत येते तींत कांहीं अर्थ नाहीं."

( व. ९, अं. १३, मार्च १९०३.)

त्याचप्रमाणें केवळ लेख लिहून साहित्यसेवकांनीं थांबूं नये. प्रत्येक विषयाच्या यथापूर्ण अभ्यासासाठीं त्या त्या विषयांतील तज्ज्ञांनीं एखादें वाङ्मयमंडळ स्थापावें आणि सभासदांनीं आपल्या विशिष्ट ग्रंथांचा सशास्त्र अभ्यास करावा अशा मताचे गु. अण्णासाहेब होते. ग्रंथमालेच्या एका अंकांत याचा उल्लेख करून ते म्हणतातः—

"शुद्धमूल पुस्तकें छापून झालीं म्हणजे सर्व आटपलें असें मानणें रास्त नाहीं. पाश्चात्य देशांत जशीं कांहीं कविमंडळें असतात व दर एक सभासद आपण वाचलेल्यापैकीं कांहींना कांहीं तरी टिपून ठेवून त्याचा फायदा आपल्या समाजास देतो तसा प्रकार झाला पाहिजे.' (ग्रंथमाला, ९।१२।१९०३.)

'ग्रंथमाला' हें मासिक एक तप चाललें होतें. त्यानंतर दोन वर्षें 'विश्ववृत्त' चालू होतें. पुढें गु. अण्णासाहेबांच्यावर खटला झाल्यामुळें तें बंद करावें लागलें. इतक्या १४ वर्षांत या दोन मासिकांत सुमारें १३३ लेखकांनीं ३८२ लेख लिहिले. म्हणजे प्रत्येक लेखकानें साधारणपणें तीन लेख लिहिले आहेत. यांपैकीं ऐतिहासिक सदरांतील बरे लेख प. लो. विसुभाऊ राजवाडे यांचेच आहेत. मराठींतील अत्युपयोगी व कार्यक्षम मासिकें अशा रीतीनें राजवाडे हे ग्रंथमाला आणि विश्ववृत्त मासिकांसंबंधीं नेहमीं गौरवपूर्ण शब्दांत उल्लेख करीत. ग्रंथमालेची योग्यता मराठी भाषेच्या इतिहासांत फार महत्त्वाची आहे, हें पुढील थोडयाशा माहितीवरून स्पष्ट होईल.

## ग्रंथमालेंतील निबंधांची विषयवार लेखसंख्या

| विषय | संख्या | विषय | संख्या |
|---|---|---|---|
| १ उपदेश–प्रोत्साहनपर | ७२ | ९ भाषाविषयक | १३ |
| २ शास्त्रीय | ५५ | १० पुस्तकपरीक्षणें | १० |
| ३ धार्मिक | ४५ | ११ व्यायाम | १० |
| ४ संशोधनात्मक | ३७ | १२ सामाजिक | ९ |
| ५ शैक्षणिक | २७ | १३ टीकापर | ९ |
| ६ राजकीय | २५ | १४ संपादकीय | ८ |
| ७ चरित्रात्मक | २० | १५ निबंध | ५ |
| ८ पौराणिक | १९ | १६ किरकोळ सारसंग्रह | |

वरील आंकड्यांवरून पाहतां १८९५ ते १९०५ या दशकांतील वाङ्मयाची स्थिति विशेष समाधानकारक नव्हती. महाराष्ट्र–वाङ्मयाचा हा उषःकाल होता. नुकतेच नवीन नवीन लेखक वङ्मयाच्या अभिनव प्रांतांत पदार्पण करीत होते. अशा वेळीं ग्रंथमालेचा अवतार झाल्यामुळें नवीन लेखकांना ग्रंथमालेंत प्रसिद्धिस्थान मिळालें. यावेळीं सुशिक्षित समाजाला उपदेश करून प्रोत्साहनपर भाषा बोलण्याला योग्य संधि होती. त्यामुळें 'ग्रंथमालें'त उत्साहपर निबंध सर्वांत जास्त म्हणजे ७२ आले. त्या खालोखाल

शास्त्रीय व धार्मिक लेखांची संख्या ५५ व ४५ अशी होती. त्याचप्रमाणें लोकशिक्षणास व लोकजागृतीस या वेळीं अगदीं सुरवात झाली होती. यामुळें ऐतिहासिक, संशोधनात्मक, पौराणिक, टीकापर आणि इतर अशा निबंधांची संख्या ३७, १९, ९, ५ अशी अनुक्रमें होती. त्याचप्रमाणें शैक्षणिक २७ लेख आले आणि राजकीय लेखांची संख्या २५ होती. त्या खालोखाल भाषाविषयक ( १३ ) व परीक्षणात्मक ( १० ) लेख अगदीं बेतांत होते. मराठी वाङ्मयाचा उषःकाल या दृष्टीनें हें वर्गीकरण बरें आहे असें कोणीहि म्हणेल. असो.

मागील विभागांत ' वाङ्मयसेवेचीं पहिलीं बारा वर्षें ' या प्रकरणांत गुरुवर्यांच्या वाङ्मयसेवेचें एकत्र पर्यालोचन केलें आहे. आतां या वाङ्मयांतील विशेष भागांचा विचार येथें थोडयाशा विस्तारानें करावयाचा आहे इतकेंच. यावरून चरित्रनायकाच्या विविध कार्यांची वाचकांना चांगली कल्पना येईल असें वाटतें.

### संस्कृत-मराठी वाङ्मयाचा दृढ परिचय

असल्यामुळें गुरुवर्यांच्या लेखनांतून अगर व्याख्यानांतून नेहमीं संस्कृत श्लोक आणि सुभाषितें बाहेर पडत. त्यांची मराठी भाषा फारच साधी असे आणि भावनेच्या भरांत लेखन सुरू झालें कीं मोठमोठे समासहि येत. एका बाजूस शुद्ध बाळबोध धाटाचे मराठी शब्द तर दुसऱ्या बाजूस भगवद्भक्तिशून्यता, अकार्यकरत्व, उपदेशानर्हता असे संस्कृतप्रचुर शब्दसमूह दृष्टीस पडतात. ग्रथमालेंतून लहान लहान सुभाषितें जर कोणीं निवडून काढलीं तर तींहि फारच सरस अशीं ठरतील. त्यांतील कांहीं वाक्यें पुढें दिलीं आहेत.

सर्व यशाचें पहिलें साधन शरीरसामर्थ्य म्हणजे अंगांत बल किंवा तकवा येणें हें आहे. ( सारसंग्रह, ग्रं. मा., १९०६-१२-१२)

सच्छील म्हणजे शुद्ध विचार व आचार. ( सा. ग्रं. सदर )

ज्याचें बरें करावयास झटावें त्यानेंच उलटून पडावें असा कलिमहिमा आहे. ( सा. ग्रं. सदर )

प्रत्येक प्रापंचिक मनुष्य रौप्यशृंखलाबद्ध असणारच. ( सा. ग्रं. सदर )

शिस्त म्हणजे आज्ञाधारकपणा, तो शाळेंत, कारखान्यांत, लष्करांत, घरीं, सारांश प्रत्येक ठिकाणीं अवश्य आहे. ( ग्रं. मा. १२-६ )

साऱ्या जगांत, राजराज्यांत असो किंवा लोकराज्यांत असो रौप्य किंवा कांचन नाणें थोडें तरी प्राप्त करून घेतल्याशिवाय चालणार नाहीं.

मुलांना काय, श्रेष्ठांनीं वळण लावावें तसें लागतें.

( वि. वृ., व. २, अंक ६, पा. १२ )

अनुकरणशीलता हा बालांचा धर्म आहे. ( १९०५-१२-६, पा. २९ )

तरुणांच्या हातून तरुणासारखेंच वर्तन व्हावयाचें.

( १९०५-१२-६, पा. ३५ )

राष्ट्राच्या भाषेंत व त्याच्या वाङ्मयांत जसें त्याचें हृद्गत प्रतिबिंबित होतें तसें कशांतच होत नाहीं. ( ग्रं. मा., व. १९०६, १२।११ )

राष्ट्ररचना होण्यास धर्म व भाषा या दोहोंपेक्षां दुसरा भक्कम पाया नाहीं.

(ग्रं. मा. १९०६, व १२, अं. ११)

वाङ्मय हें राष्ट्रांतील मुख्य चेतनासाधन आहे. (सारसंग्रह १२—११)

ज्या राष्ट्राचा उत्कर्ष होत आहे त्या राष्ट्रांत बोलघेवडेपणा कमी आणि कर्तृत्व पुष्कळ असतें. ( भारतीय विश्वविद्यालय )

स्वतःचा अभिमान नाहीं असें राष्ट्रच नाहीं. (ग्रं. मा., १९०५-१२-६)

राष्ट्रहित व पत्करलेलें व्रत हीं सर्व गोष्टींहून श्रेष्ठ मानल्याशिवाय देशाचा उदयकाल होत नाहीं. ( सारसंग्रह, ग्रं. मा., १९०६, वर्ष १२, अं. १२)

सर्व प्रकारच्या सुखास व प्रेमास लाथाडून देऊन राष्ट्रदेवतेची निस्सीम भक्तीनें आराधना केल्याशिवाय परतंत्र राष्ट्रांचीं स्वतंत्र राष्ट्रें बनत नसतात.

( सारसंग्रह, ग्रं. मा., १९०६, व. १२, अं. १२)

## पुस्तकपरीक्षण

उत्तम वाङ्मय निर्माण होण्यासाठीं उत्तम वाङ्मयाचें परीक्षणहि होणें जरूर आहे ही गोष्ट गुरुवर्यांना मान्य होती. परंतु परीक्षणाची सध्याची पद्धति मात्र त्यांना दोषास्पद वाटत होती. यासंबंधीं गुरुवर्य म्हणतातः—

" पुस्तकपरीक्षणाच्या नांवावर आमचे लेखक आपल्या खाजगी द्वेषबुद्धीचें प्रदर्शन करीत आहेत कीं काय ? ....... वर्तमानपत्रकारांनीं वाटेल तशी टीका करून मोठ्या मोठ्यांचीं मनें दुखविलीं, लहानांनीं थोरांचा

उपमर्द केला, थोरांनींहि लहानांवर वाटेल तसे आरोप केले अशा नाना प्रकारच्या गोष्टी घडून ज्यांच्यामध्यें एक जूट पाहिजे असे ग्रंथकार आणि लेखक यांच्यामध्यें गैरसमजानें छत्तिसाच्या आंकड्याप्रमाणें स्थिति झाली आहे. परंतु या गोष्टीस आळा घालण्यास साहित्यसंमेलनाचा उपयोग कांहींच होणार नाहीं काय ? " ( लो. शि., व. १, अं. ३ )

असें या: बाबतींत अण्णा लिहितात. सर्व हस्तलिखित ग्रंथांचें परीक्षण करून त्यांतील दोष योग्य सहानुभूतीनें दाखविले जावेत अशासाठीं एक ग्रंथनिरीक्षणपरिषद् या नांवाची सभा स्थापन करावी अशी सूचना अकोला-साहित्यसंमेलनाच्या प्रसंगीं लिहिलेल्या निबंधांत गुरुवर्यांनीं केली होती. तिचा विचार आजहि सर्व विद्वान् मंडळानें केला तर कांहीं तरी उपयुक्त कार्य होईल. सध्याच्या वर्तमानपत्री अभिप्रायांनीं उत्तम ग्रंथांचें परीक्षण व्हावें तसें होत नसल्यामुळें चांगल्या लेखकांनीं स्वतःची पदरमोड करून छापविलेले उत्तम ग्रंथ आजहि तसेच ग्रंथकारांच्या घरीं धूळ खात पडले आहेत. महाराष्ट्रीय साहित्यसेवकांनीं या कामीं कांहीं तरी उपयुक्त संघटना करून उत्तम ग्रंथांचा प्रसार कसा होईल याकडे सर्वांचें लक्ष वेधावयास पाहिजे.

**दोषैक दृष्टीपेक्षां सहानुभूति पाहिजे,** असा एकच मुद्दा ग्रंथपरीक्षकांना गुरुवर्यांनीं सांगितला आहे. अशा तऱ्हेनें आपल्या ग्रंथकारमित्रांना परस्पर ग्रंथकारांनीं मदत करावी, साहाय्य करावें व प्रेमानें दोष दाखवावेत अशाबद्दल लिहितांना गुरुवर्य म्हणतातः--

> गच्छतः स्खलनं कापि भवत्येव प्रमादतः ।
> हसन्ति दुर्जनास्तत्र समादधति सज्जनाः ॥

" सर्वांनीं हें ध्यानांत धरून आपण सर्वदा सज्जनांप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे. विशेषतः मित्रांविषयीं तर फार जपलें पाहिजे. आतां मित्राचें कल्याण झालें पाहिजे, त्याचे दोष नाहींसे झाले पाहिजेत तर ते त्यांस दाखविले पाहिजेत. हें काम गुप्त रीतीनें ह्मणजे खासगी संभाषणांत किंवा पत्रव्यवहारानेंच केलें पाहिजे. गुणांचें वर्णन प्रसिद्ध रीतीनें केल्यास लोकांपासून उत्तेजन मिळून त्यांस कार्य करण्यास साहाय्य होतें. याविषयीं फार लिहिण्याचें कारण नाहीं.

संकटकाळीं मदत करणें हें तर मोठेंच कर्तव्य आहे. सन्मित्रसंबंध पूर्वीपासूनचे असल्यास लोकांत आपल्यापैकीं कोणाविषयीं गैरसमज झाल्याचें आढळून आल्यास त्याचें निराकरण करण्याचा किंवा त्या गैरसमजाच्या दुष्परिणामापासून वाचविण्याचा प्रयत्न करणें हें महत्त्वाचें काम आहे. रा. टिळकांस पुस्तकें वाचावयास द्यावींत व चांगलें वागविण्यांत यावें अशी सूचना मरहूम प्रो. मॅक्समुल्लर यांनीं केली होती. या उदाहरणाचें मनन इकडील मंडळींनीं करण्याजोगें नाहीं असें कोण म्हणूं शकेल ?

( लो. शि., १९१२, व. [illegible] अं. ३ )

## गंभीर विनोद

गुरुवर्यांच्या लेखनांत आणि बोलण्यांत ज्याप्रमाणें स्पष्टोक्ती असे त्याप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं गंभीर विनोदहि भरलेला असे. कोणी कितीहि जीव तोडून त्यांच्यापुढें आपलें वाक्पटुत्व दाखवित असोत ! अण्णासाहेब त्यांचें बोलणें ऐकून घेत आणि शांतपणें ' तुमचेंच खरें ' असें म्हणून आपली बाजू त्यांचे पुढें मांडीत आणि सरतेशेवटीं तसें नाहीं असें त्यांचेकडूनच वदवीत. ग्रंथमालेंतून अनेक विनोदपर उल्लेख काढून दाखवितां येतील. स्वदेशी चळवळीसंबंधीं ते एके ठिकाणीं म्हणतात:—

" स्वदेशहिताची जी चळवळ ती स्वदेशी चळवळ ...... स्वदेशी चळवळ हा माल मध्यमपदलोपी समास कल्पिणें प्राप्त आहे. "

सुरतेच्या राष्ट्रीय सभेंतील बखेडा झाला त्यावेळीं तत्कालीन राजकीय परिस्थितीबद्दल लिहितांना ते म्हणतात:—

" येथून राष्ट्रीय सभेचें स्थानांतर झाल्यानें वृद्ध दादांनीं (दादभाई नवरोजी यांनीं ) लावलेलें झाड करपून जाण्याचीच भीति वाटत होती." ( वि. वृ. )

गुरुवर्यांचा विनोदी स्वभाव पुढें कायम टिकला होता ही मोठी मौजेची गोष्ट आहे. विद्यालयाच्या पुनरुज्जीवनाची खटपट करीत असतां १९१० मध्यें पुण्याच्या कलेक्टरची त्यांनीं बऱ्याच वेळां गांठ घेतली आणि ' शाळेसंबंधीं सरकारचे गैरसमज दूर करा ' अशी त्यांनीं विनंति केली. यावेळीं खिस्तमसपूर्वी एक विनोदी पत्र त्यांनीं पुढीलप्रमाणें कलेक्टर मि. मॉटफर्ड यांजकडे पाठविलें तें पाहण्यासारखें आहे.

*25th December, 1914*

Dear Sir,

For these X'mas days, I beg to send you the accompanying lines, quite unexpected I feel sure, somewhat interested I frankly admit, still coming from the bottom of my heart, I assure.

Full of kindness at first, now seeming to be cold,
Your feelings will better. To say this may be bold.
If all that I urge on your mind will have hold,
The result I expect will be blessings untold ! !

Yours sincerely
**V. G. Bijapurkar**

ग्रंथमालेंत गाजलेले दुसरे एक विनोदपूर्ण परंतु महत्त्वाचें असें प्रकरण म्हणजे 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूरांवरील काल्पनिक खटला हें होय. यासंबंधीं विनोदी हकिकत येथें गुरुवर्यांच्या शब्दांत पुढें सांगितली असतां वाचकांना ती फार मनोरंजक अशी वाटेल.

"ज्यांनीं लिहावें ते लिहीतनासे झाले म्हणजे अनर्थ कसा होतो याचें एक उदाहरण आमच्या वाचकांस रा. रा. नरहर बाळकृष्ण जोशी, बी. ए., एल्‌एल्. बी., राजकोट, यांनीं या सालांत दाखविलें. आपल्या लेखास मोहकपणा आणण्यासाठीं व आपणांस लिहिण्यांत कांहीं सवलती मिळाव्यात म्हणून त्यास वाटेल तें स्वरूप देणेची कोणाही लेखकास मोकळीक आहे. रा. रा. जोशी यांनीं आम्हांस न्यायाधीश कल्पून श्री. विवेकानंदजींच्या व्याख्यानांचे भाषांतरकार व प्रकाशक यांजवर खटला केला आहे. हें पद त्यांनीं आम्हांस दिलें आहे म्हणून आम्हीं त्या थाटांत

१ कै. **कृष्णाजी नारायण आठल्ये** यांनीं सुप्रसिद्ध 'केरळकोकीळ,' 'नवें मन्वंतर,' 'लोकमित्र' वगैरे मासिकें चालविलीं होतीं. हे अत्यंत चटकदार सोप्या भाषेंत शास्त्रीय विषय मांडीत. यांची कविताहि बरीच असून ती सुबोध, प्रासादिक आणि बाळबोध वळणाची आहे. हे मोठे जबरदस्त लेखक होते. ज्ञानेश्वरी, दासबोध, भागवत एकादशस्कंध वगैरे ग्रंथांचीं त्यांनीं भाषांतरें लिहिलीं आहेत. परंतु हीं भाषांतरें फारच विपर्यस्त व पुष्कळ ठिकाणीं चुकीचीं अशीं झालीं आहेत. हे नुक्तेच दोन वर्षांपूर्वीं कालवश झाले.

आपलें मत, ह्मणजे निवाडा देणें ठीक नाहीं. बाकी खरोखर ह्मटलें तर हें काम आमच्या पोटाच्या धंद्यांतलेंच असून विनाकारण रा. रा. जोशी यांनीं तें न्यायखात्यांत नेलें आहे. हल्लीं रा. रा. जोशी यांनींहि आमचा ह्मणजे शिक्षकाचा धंदा पतकरला आहे, तेव्हां त्याच भाषेंत आह्मीं आपलें मत द्यावें हें बरें. रा. रा. आठल्ये यांचे भाषांतरास शून्य गुण (मार्क) देणें योग्य आहे इतकेंच नव्हे तर त्यांच्या इतर विषयांतील प्रावीण्यास लुब्ध होऊन लोक त्यांची योग्यता मानितात तीसहि या भाषांतरानें वैगुण्य येणार आहे. अब्रू घालविणारें असें काम रा. रा. आठल्ये यांनीं करण्याचें सोडावें असें आमचें त्यांस सांगणें आहे व असलीं इंग्रजी ग्रंथांवरून [illegible]रणेचीं कामें आमचे राजारामीय तरुण मित्र त्यांचे चिरंजीव बी. ए. झाले आहेत त्यांजकडून करवावींत. रा. रा. जोशी यांची भाषा कडक झाली आहे असें म्हणतात; परंतु कविकल्पित शाखामृगाच्या उपमेशिवाय त्यांच्या लेखांत कांहीं प्रखरता नाहीं असें आह्मांस वाटतें. तुकारामास खरा राग येई तेव्हां कडक व बीभत्सही शब्द अभंगांत आले आहेत. पण याविषयीं जपावें हें चांगलें. एकपक्षीय लिहिण्याच्या भरांत शुद्ध शब्दांस सुद्धां रा. रा. जोशी यांनीं क्वचित् स्थलीं अशुद्ध म्हटलें आहे. 'निमेष' हा शब्द अपभ्रष्ट नाहीं. चांगला शुद्ध कालिदासानें उपयोजिला आहे. पण असे दोष थोडे. एकंदरीनें त्यांचें लिहिणें यथार्थ आहे. त्यांस नांवें ठेवणें गैरवाजवी आहे. त्यांचें सर्व लिहिणें सद्बुद्धीचें आहे. रा. रा. आठल्ये यांच्याशीं त्यांचा मत्सर-भाव असण्यास कांहीं कारण नाहीं. आमच्यावर कांहीं तरी पंकप्रक्षेप करावा म्हणून कवितादेवीची आराधना रा. आठल्ये यांनीं केली आहे म्हणून कोणीं सांगितलें; परंतु जोंपर्यंत एकनाथ, तुकाराम, रामदास, मोरोपंत वगैरे कवींचीं काव्यें वाचावयास मिळतात व अर्वाचीन कवी खरे, सरवटे, रिसबूड, मोगरे, भांडारे, भिडे, निपाणीकर, इत्यादींच्या निर्मळ अंतःकरणानें रचिलेल्या कविता आहेत, व खुद्द रा. रा. आठल्यांचे मनोरंजक फटके वाचून करमणूक होते तोंपर्यंत त्यांचीं तसलीं कवनें कां पहावींत ? अगोदर कळल्यावर आंत काय आहे तें पहा कशास ? तर आमचें इतकेंच सांगणें कीं प्रथम वाईट साईट कांहीं करूं नये. घडलें तर 'चुकलों' ह्मणावें व पुनः तसें करूं नये."

## काव्यशक्ति

ज्याला हृदय असतें तो कवि असतो असें म्हणतात. गुरुवर्यांनाहि इतर कवींप्रमाणें भावनात्मक हृदय होतें. त्यामुळें त्यांची काव्यशक्ति ( Muse ) नेहमीं जागृत असे त्यांच्या काव्यांतहि एक प्रकारचा जोम आहे. श्रीसमर्थांच्या दिव्य वाणीचा प्रभाव त्यांच्या लेखनांत ठिकठिकाणीं दिसतो. त्यांचें श्रीदासबोधाचें नित्य वाचन, मनन, आणि श्रवण चाललेलें असे. मनाचे श्लोक तर त्यांच्या जिव्हाग्रीं वसत होते. कोणतेंहि इंग्रजी-मराठी पुस्तक वाचतांना त्यावर समान कल्पनेच्या दासबोधांतील ओव्या गुरुवर्य त्या पुस्तकावरच नमूद करून ठेवीत असत. मनोबोधाप्रमाणें त्यांनीं कांहीं १०८ श्लोकहि तैयार केले आहेत. ते हुबेहुब दासबोधासारखे सरळ आणि ठसकेबाद आहेत. गुरुवर्यांचें खरें हृद्गत त्यांच्या मराठी व संस्कृत प्रबोधस्तोत्रांत उमटलेलें आहे. तें मराठी स्तोत्र मुद्दाम खालीं दिलें आहे. सर्वांनीं तें पाठ करावें इतकी त्याची आजकाल योग्यता आहे.

### प्रबोधस्तोत्र

ऋषींच्या त्या गेल्या सकलहि सुविद्या इथुनि हो ।<br>
महाव्या भूपांची अवनि विपदा भोगित किं हो ॥<br>
स्थिती ही देखोनी रत तुमचि उद्योगिं मति हो ।<br>
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ १ ॥**

बहूत द्रव्यातें अवनितुनि नेलें परजनीं ।<br>
महाकाष्टीं घेती बडिंबडिं जहाजें विरचुनी ॥<br>
प्रपातीं पाण्याच्या मिळविती धना बाजुनि चहूं ।<br>
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ २ ॥**

निमित्तांनीं नाना हरिति धन सारेंच तुमचें ।<br>
धनी आम्ही आहों जन सकल हे दास अमुचे ॥<br>
तुम्हां गोरे ऐशा सतत नजरेनें बघति हो ।<br>
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ ३ ॥**

---

१. सदर श्लोक लवकरच त्यांचे बंधु छापविणार आहेत. याशिवाय गुरुवर्यांची जी किरकोळ कविता आहे ती न. स. विद्यालयाच्या '**प्रातःस्मरण**' या पुस्तकांत आली आहे.

प्रभावें बुद्धीच्या कितितरि युगांपूर्वीच बघा ।
ऋषी गेले गोष्टी अमित बरव्या देउनि जगा ॥
दिलें पाश्चात्यांनीं किमपिहि न त्यांच्यापरिस हो ।
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ ४ ॥**

मती धर्माचारीं मनुसम मुनींना अनुमती ।
भली भक्ती देवीं जडुनि सुख होईल जगतीं ॥
करा ऐशा यत्नें निजजनमना शिक्षित अहो ।
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ ५ ॥**

कधीं गंगादींचे सुभगतट आनंदिं भरती ।
गुरू विद्या देती; प्रमुदित मनें शिष्य पढती ॥
असो चिंता चित्तीं सतत आशि ही जागृति अहो ।
**निजेले व्हा जागे झडकरि तुम्ही बंधुजन हो ॥ ६ ॥**

गुरुवर्यांच्या गद्य लेखनाप्रमाणें त्यांचें पद्यलेखनहि जोरदार आहे. गद्या-प्रमाणें पद्यांतहि त्यांच्या राष्ट्रीय उत्कृष्ट भावना स्पष्टपणें दिसून येतात. समर्थ विद्यालय आणि बालवीर अशा त्यांच्या दुसऱ्या दोन कविताहि प्रसादमय आहेत. परंतु विस्तारभयास्तव त्यांचा येथें उल्लेखच करणें प्राप्त आहे.



## प्रकरण एकविसावें

## ग्रंथमालेचा आस्वाद

'...हो ग्रंथमाले कृतार्था' अशी प्रार्थना १९०७ मध्यें गुरुवर्यांनीं परमेश्वराजवळ केली आणि ती अक्षरशः खरी ठरली आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या ऐतिहासिक लेखांचे खंड प्रथम ग्रंथमालेनेंच पुढें आणले. महाराष्ट्रांतील लोकांत उच्च वाङ्मयाची गोडी आणि तरुणांत लेखनाची संवय ग्रंथमालेनेंच उत्पन्न केली. अशा प्रकारें ग्रंथमाला आज एका दृष्टीनें कृतार्थ झाली आहे.

गुरुवर्यांची साहित्यविषयक कामगिरी जरी दिसावयास अल्प आहे तरी त्यांची कळकळ मोठी आहे. त्यांची स्वतंत्र ग्रंथरचना जरी विशेष नाहीं तरी मराठी मासिकांत आजहि पुरोगामी आणि नमुनेदार म्हणून ज्यांकडे बोट दाखवितां येईल अशीं **ग्रंथमाला** आणि **विश्ववृत्त** हीं मासिकें गु. अण्णासाहेबांच्या साहित्यसेवेचीं निदर्शक म्हणून अजरामर राहतील असा भरंवसा आहे.

### शब्दसृष्टीचे ईश्वर

" गुरुवर्यांनीं आपल्या पगाराचा नीट उपयोग करून घेतला नाहीं. त्यांनीं शब्दांची टांकसाळच सुरू केली. " असा आक्षेप नेहमीं गुरुवर्यांचे मित्र त्यांचेवर करीत. घरखर्चाकरितां पुरेशी रक्कम ठेवून बाकीचा पैसा ते ग्रंथमाला, समर्थ वर्तमानपत्र, आणि श्रीसमर्थप्रसाद छापखाना यांवर खर्च करीत. प्रसंगीं अडचणींत सांपडलेल्या विद्यार्थ्यांनाहि ते मदत करीत. घरच्या प्रपंचांत मात्र चैनीनें व्यर्थ खर्च वाढविणें त्यांना पसंत नसे. त्यांच्या वडिलांचीहि वृत्ति विशाल होती. घरच्या चार लोकांच्या कुटुंबापेक्षां सभोंवतालचें विश्वकुटुंब विजापूरकर पितापुत्रांना अत्यंत प्यारें होतें. 'तुझे कारणीं देह माझा पडावा ' असें त्यांचें रघूनायकापाशीं नेहमीं मागणें असे. मराठींत इतरांनीं ग्रंथरचना करावी व तरुणांनीं कांहीं तरी अभ्यास करून लेख लिहावेत असें त्यांचें सर्वांना सांगणें असे. यासाठीं " फ्रीमनकृत युरोपचें इतिवृत्त " त्यांनीं लिहिलें. ग्रंथमालेंतील सारसंग्रह नांवानें संबोधिलेला २०००।३००० पानांचा मजकूर त्यांनीं या दृष्टीनें लिहिला.

' जें जें आपणांस ठावें । तें तें सकळांसि शिकवावें ॥
शहाणें करून सोडावें । सकल जन ॥'

हा श्रीसमर्थांचा उपदेश गुरुवर्यांनीं स्वतःच्या आचरणांत आणला होता.

नवीन इंग्रजी शब्द मराठी प्रचारांत आणतांना गुरुवर्यांनीं प्रथम बरीच खटपट केली व समानार्थक बरेच शब्द त्यांनीं प्रचारांत आणले. त्यांपैकीं कांहीं आजहि रूढ झाले आहेत. अमूकएक शब्द उपयोगांत आणलाच पाहिजे असा आग्रह मात्र त्यांचा नव्हता. पण इंग्रजी शब्द मराठींत तसेंच वापरणें त्यांना आवडत नसे. त्यांना साजेसा मराठी पेहराव देऊन मग ते वापरावेत असें त्यांचें मत असे. भाषांतर करणें अशक्य असल्यास त्यांचें स्पेलिंग मराठींत द्यावें, त्यांचा इंग्रजी अवतार आपणांस कशाला पाहिजे असें ते वारंवार म्हणत.

पुढील शब्द गुरुवर्यांनीं आपल्या लेखनांत वापरले आहेत, ते पुष्कळ दृष्टीनें संग्राह्य आहेत. ग्रंथमालेच्या वाचकांना याशिवाय दुसरे अनेक शब्द सांपडतील.

| | |
|---|---|
| अग्रलेख = Leader | अध्येय = Teacher |
| प्रात्याहिक= Daily | अध्याप्य = Taught |
| दैनंदिन = ,, | नाभिकमलापासून= From the bottom of the heart |
| प्रदीपिका = Directory | प्रास्तविक पुस्तकें= Primers |

अण्णासाहेबांनीं इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द अनेक निर्माण केले. त्यांपैकीं कांहीं रूढ झाले आणि कांहीं रूढ झाले नाहींत इतकेंच नव्हे तर त्यांचे इंग्रजी प्रतिशब्द समजल्याशिवाय त्यांचा अर्थबोधहि स्पष्ट होत नाहीं. त्यांपैकीं कांहीं शब्द पुढें दिले आहेत.

**सत्र**–sitting बैठक ( सद् = बसणें ), **गर्भस्वतंत्र**–Free-born ( गर्भश्रीमंत याप्रमाणें ), **उत्कोचजीवन**–लाच खाऊन राहणें.

| | |
|---|---|
| **वृद्धसभा** = Senate | **पूर्णक्रम** = Full college course |
| **लोकसभा**= Assembly | **देशमुख** = Leader |
| **दृष्यपर** = Objective | **संभूयसमुत्थान** = Co-operative |
| **द्रष्टृपर** = Subjective | **सहकारी–मंडळ**= Credit Society |

असे अनेक शब्द रूढ करण्याचा गुरुवर्यांनीं प्रयत्न केला. त्यांच्या टांकसाळींतील कांहीं शब्द मराठींत रूढ झाले यांत संशय नाहीं. शब्द-घटनेच्या बाबतींत त्यांची दृष्टि स्वतंत्र होती. संस्कृत भाषेच्या साहाय्यानें मराठींत आपण वाटेल ते शब्दसमूह बनवूं अशी उत्कट इच्छा त्यांचे मनांत अहर्निश वसत असे. गुरुवर्यांनीं जरी स्वतंत्र ग्रंथरचना विशेष केली नाहीं तरी वाटेल त्या विषयांवर मराठींत ग्रंथरचना व्हावी ही त्यांची सदिच्छा मात्र कालांतरानें सफल झाली.

आतां प्रस्तुत चरित्राचा हा दुसरा भाग पुरा करण्यापूर्वी गुरुवर्यांच्या लेखांतील कांहीं नमुनेदार उतारे देतों.

## मराठी ग्रंथकर्तृत्वाची योग्य दिशा

१९०६ च्या मे महिन्यांत मराठी लेखकांना योग्य दिशा दाखविण्याच्या हेतूनें गुरुवर्यांनीं विश्ववृत्तांत वर लिहिल्याप्रमाणें मराठी वाङ्मयासंबंधीं एक लेख लिहिला आहे. तो आजहि एकवार डोळ्यांखालीं घालण्याजोगा आहे. सदर लेखाचा समारोप करितांना ते म्हणतात:—

ग्रंथकर्तृत्वाच्या दिशेचा विचार करितां एक महत्त्वाची व अत्यंत जरूरीची गोष्ट लक्षांत येते. तिचाही उल्लेख करणें जरूर आहे. आपणांस परमेश्वरकृपेंकरून इंग्रजी भाषा बरीच चांगली येते व त्यामुळें इंग्रजी ग्रंथ व वर्तमानपत्रांतले लेख वाचतां येतात. त्यांच्या वाचनानें माझ्या मनावर एक गोष्ट बिंबली आहे ती ही कीं, आमच्या विषयीं लिहितांना इंग्रज लेखकांची समबुद्धि कायम राहत नाहीं. कित्येक वेळां निवळ अज्ञानामुळें गैरसमज होऊन त्यांच्याकडून भलभलतीं विधानें केलीं जातात. ही गोष्ट आमच्या संबंधानें जशी होते तशीच इतर राष्ट्रांविषयींहि लिहितांना झालीच पाहिजे. स्वतःची माहिती स्वतःस जशी प्रायः पूर्णपणें असते तशी दुसऱ्याची नसते. आपल्याहून निराळ्या संस्था व संप्रदाय ज्या लोकांत आहेत त्यांच्या स्थितीची व विचारांची तंतोतंत कल्पना करणें म्हणजे सर्वथा आपण तद्राष्ट्रीय बनून लिहिणें किंवा बोलणें शक्य होत नाहीं. यामुळें आपल्या लेखांत व भाषणांत गौणपणा येतो ही गोष्ट कबूल करणें देखील कित्येकांस आपल्या अभिमानास कमीपणा आणणारें आहे असें वाटतें. परंतु ज्या आम्हांस या पक्ष-पाताचा किंवा कल्पनादौर्बल्याचा अनुभव आला आहे, त्यांनीं सर्व जगाविषयीं

माहिती मिळवावयाची ती इंग्रजांच्याच द्वारानें सदैव मिळवून संतुष्ट कां रहावें ? फ्रेंचांविषयीं, जर्मनांविषयीं, रशियनांविषयीं माहिती त्यांच्या त्यांच्या देशांत जाऊन जरी झाली नाहीं तरी खुद्द त्यांच्या त्यांच्या भाषा शिकून मिळविली पाहिजे. शिवाय इंग्रज यांच्याविषयीं काय म्हणतात हें कळण्याचें जसें आपणांस साधन आहे, तसें इंग्रजांविषयीं ते काय म्हणतात हेंही कळून घेण्याचें आपणांस साधन असलें पाहिजे. म्हणून परकी भाषांचें अध्ययन व तद्वारां त्या त्या लोकांच्या माहितीनें आपलें राष्ट्र बहुश्रुत करण्याचें काम ग्रंथकारांचें आहे.

## ज्ञानवृद्धि करणारे व्यापारी कीं ग्रंथकार ?

परखंडीय भाषेविषयीं बोलतांना व लिहितांना साक्षात् ज्ञानाची इतकी जरूरी भासते तर स्वखंडीय व स्वदेशीय भिन्न भिन्न भाषांच्या ज्ञानाची आवश्यकता केवढी आहे हें सांगणें नकोच. कांहीं बंगाली कादंबऱ्यांचें भाषांतर मराठींत झालें आहे. परंतु याहून अधिक संमिश्रणाचा काळ आला आहे. हिंदी भाषा आपल्या देशांत मोठ्या भागांत बोलण्यांत येते यामुळें युरोपांत फ्रेंच आहे त्याप्रमाणें सर्वांच्या व्यवहारास ती उपयोगी पडेल असा सुमार आहे. परंतु हें कामसुद्धां ग्रंथकारांच्या मर्दुमकीवर अवलंबून आहे. हल्लीं हिंदुस्थानचें एकराष्ट्रीभवन जोरानें होण्याचा रंग आहे. प्रत्येक भागांत सर्व प्रमुख देशभाषांचा अभ्यास सुरू होईल. हिंदी व बंगाली भाषांचें अध्ययन आमचेकडे सुरू होईल, त्याप्रमाणें तिकडे मराठी व गुजराथी भाषा अगदीं प्राथमिक शाळांपासून सुरू होतील अशा स्थितींत इतर भाषांतील ग्रंथकारांपेक्षां मराठी ग्रंथकार अधिक योग्यतेचे ठरले तर मराठी भाषेचाच अभ्यास चोहोंकडे वाढेल. नामांकित ग्रंथ झाला म्हणजे तो वाचण्याची इच्छा सहजच होते. निवळ केसरी वाचतां येण्यासाठीं आपण मराठी शिकलों असें आगगाडींत एकादोघा गृहस्थांनीं मला सांगितलें त्यावेळीं मला सानंदाभिमान वाटला. सारांश दुसऱ्या भागांत आपल्या हिंदु व मुसलमान बंधूंचे विचार काय चालले आहेत हें कळून घेण्यासाठीं व आपल्या ग्रंथांत त्यांचें प्रतिबिंब पाडण्यासाठीं कांहीं ग्रंथकारांनीं आपल्या देशांतील इतर भाषांचें अध्ययन करून तिकडील भांडारांचीं द्वारें आपल्या महाराष्ट्र वाचकांस खुलीं करून दिलीं पाहिजेत.

अशा अनेक प्रकारांनीं आपलें अवलोकनक्षेत्र वाढवून त्याचा फायदा आपल्या वाचकांस जे ग्रंथकार देतील ते आपल्या राष्ट्राचे उपकर्ते होतील. राष्ट्रांतील सांपत्तिक द्रव्याचा उपयोग आपला आपण करून देश द्रव्य-संपन्न करण्याच्या इच्छेप्रमाणेंच राष्ट्रांतील लोकांच्या मनास योग्य शिक्षण देऊन त्यांना ज्ञानसंपन्न करण्याची इच्छाहि उदात्त आहे. सामान्य धनाची वृद्धि करणारे व्यापारी जसे राष्ट्रास उत्कर्षस्थिति आणून देतील तसेच ज्ञान-धनाची अभिवृद्धि करणारे व्यापारी ह्मणजे ग्रंथकार हेहि राष्ट्रोदयास सहाय्यभूत होणार आहेत. आपल्या राष्ट्रास कोणच्या मालाची जरूर आहे याबद्दल दोघांनींहि सारखेंच जपलें पाहिजे.

( विश्ववृत्त, मे १९०६, व. १, अं. २ )

## गुरु कसा असावा ?

निबंध किंवा लेख वाचल्यापासून या कामीं जितकें शिक्षण मिळण्याजोगें आहे त्यापेक्षां चांगल्या माणसांच्या सहवासापासून हें शिक्षण फार चांगल्या रीतीनें मिळण्याजोगें आहे. पूर्वी आपल्या देशांत हें शिक्षण फार चांगलें मिळत असे. याचें कारण शिष्य हे गुरूचे अंतेवासी ह्मणजे सन्निध राहणारे असत. त्याचें आचरण चांगलें असेल तरच शिष्य तो कित्ता गिरवतील आणि चांगले होतील. ‘ शिक्षणावरील विचार ’ ह्या ग्रंथांत इंग्रज ग्रंथकार लॉक म्हणतो “ मार्गदर्शक गुरु स्वतः चांगल्या मंडळींत वाढलेला असला पाहिजे. त्यास वर्तनाचे सर्व चांगले प्रकार व सभ्यतेच्या सर्व मर्यादा ह्मणजे निरनिराळ्या व्यक्तींशीं भिन्न भिन्न प्रसंगीं वेगवेगळ्या स्थळीं वागण्याच्या रीतींचा परिचय असावा. त्यानें हे सर्व प्रकार नेहमीं शिष्याच्या अवलोक-नांत येतील अशी योजना केली पाहिजे. ही एक कला आहे. ही पुस्तका-वरून शिकवितां यावयाची नाहीं. सत्समागम व अवलोकन या दोन मार्गांनीं ही साधणारी आहे. ” गुरूच्या आचरणावर शिष्याचें सर्व कांहीं अवलंबून आहे, हें निराळें सांगावयास नको. परंतु इतकी साधी गोष्ट दुर्मिळ झाल्यामुळें अनेक वाईट परिणाम होतात. गुरूच्या ठायीं भक्तिच नाहीं व चांगल्या गुरूचा सहवास नाहीं. ८।१० महिन्यांपूर्वीच्या ‘ सेंचरी ’ नामक अमेरिकन मासिकांत वर्णिलेल्या ‘ डे स्कूल ’ची स्थिति इकडेही आहे. दिवसांतून कांहीं थोडे तास पुस्तकी अभ्यासापुरता गुरुशिष्यांचा

योग येतो आणि वर्षाचा चवथा भाग सुटींत [illegible]ल्यामुळें तितक्या काळांत तर मुळींच येत नाहीं. त्यांत कर्णोपकर्णीं गु[illegible]च्या दुर्वर्तनाच्या गोष्टी शिष्यांच्या कानांवर आल्या तर किंवा शाळागृह [illegible]व नीतीला किंवा सभ्याचाराला प्रतिकूल अशा ठिकाणीं असलें तर मग [illegible]सूच नये. या कामीं पूर्वींचीं तपोवन–विद्यालयें किती चांगलीं बरें?

## विद्यार्थ्यानें वागावें कसें ?

श्रीमद्भगवद्गीतेंतील १७ व्या अध्यायांतील शारीर, [illegible]ङ्मय व [illegible]नस या त्रिविध तापाचे सप्रयोग घडे देण्यास किती सुरेख संधि [illegible]डत असे. विद्यार्थ्यांनीं हे श्लोक ( १४–१६ ) मुखोद्गत तर करावे[illegible] पण हृत्पटलावर कोरलेले आहेत असें त्यांच्या आचरणांतील प्रत्येक [illegible]गावर वठलेल्या परिमाणानें व्यक्त करावें अशी त्यांस आमची [illegible]ग्रहाची सूचना आहे. वृद्ध, विद्वान् किंवा देव यांना वंदन करण्याचा [illegible]संग आपल्यापैकीं कोणीं टाळला तर प्रेमभावानें त्यास जागें करण्यास [illegible]कूं नये. मन गंगाजळासारखें स्वच्छ ठेवावें. दुसऱ्याच्या मनाला लागे[illegible] असें भाषण तोंडावाटे कधीं न येईल असें करावें! उघडच आहे, [illegible] जर गंगाजळ तर त्यांत घाणेरडा विचार टिकावयाचा नाहीं. बाहेरू[illegible] कांहीं अमंगळ शिरलें तर त्याचा नाश होऊन पुनः सर्व स्वच्छ होणार. अमका मनुष्य हलक्या कानाचा आहे असें ह्मणतात. याचा अर्थ कर्णद्वारां त्याला जी माहिती मिळते तिच्याविषयीं विचार न करतां तो एकदम तिला आपल्या मनांत कायम स्थळ देतो आणि त्या योगें त्याचें मन क[illegible]षित होतें. असें मन कलुषित किंवा गढूळ होणें वाईट. भागीरथीच्या [illegible]ण्याचा रसायनशास्त्रसिद्ध गुण असा आहे कीं, त्यांत कृमि वगैरे जाऊन सर्व मळ स्वच्छ करण्याची शक्ति आहे. आपण तर तें अत्यंत पवित्र मा[illegible]तों, म्हणून तें स्वच्छतेबद्दल व पवित्रतेबद्दल उपमानभूत झालें आहे. मनांत येईल तें मुखांत; अर्थात् तें स्वच्छच. तेंच आचरणांत. मग अमंगळपणा राहणार नाहींच. ( लो. शि. १९१३, व. १, अं.४ )

## ब्रह्मचारी संरक्षक

अशी पहाणी करण्यास व अशा तऱ्हेनें लोकशिक्षणाचें काम करण्यास ब्रह्मचारी संचारक तयार केले पाहिजेत. त्यांना साधारण रीत्या वकिलाच्या कामांस उपयोगीं पडण्याइतकेंच चालू कायद्याचें ज्ञान असलें पाहिजे. विचार-

घरणींत शुद्धता असावी व आपलें म्हणणें लोकांपुढें व्यवस्थित रीतीनें मांडतां यावें यासाठीं त्यांस तर्कशास्त्रा(विगमन, निगमन, इंडक्टिव व डिडक्टिव)चीं सामान्य तत्त्वें शिकविलीं पाहिजेत. राजनीतिशास्त्राची ठोकळ माहिती व अर्थशास्त्राचें साधारण ज्ञान असणें अगत्याचें आहे. स्वातंत्र्यप्राप्ति करून घेणाऱ्या निरनिराळ्या राष्ट्रांचे इतिहास या लोकोपदेशकांना अवगत असले पाहिजेत. स्वदेशाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास व सांप्रतच्या स्थितीचें हुबेहूब वर्णन हा तर या उपदेशकांचा विशेष अध्ययनाचा विषय होय. सद्यःस्थिति समजावून देऊन लोकांच्या मनांत पुढील काल सुखावह करून देण्याची तयारी करविणें हें काम खरोखर राष्ट्रीय सभेसारख्या संस्थेनें हातीं घेतलें पाहिजे. दादाभाई नौरोजी, डिग्बी व दत्त यांचे ग्रंथ, राष्ट्रीय व प्रांतिक सभांच्या हकीकती, विशेषतः अध्यक्षांचीं भाषणें, वर्तमानपत्रें, या सर्वांचा या प्रबुद्ध शिक्षकांस अभ्यास चांगलाच पाहिजे. भाषण व लेखन या दोहोंमध्यें बरेंच नैपुण्य प्राप्त करून घेण्यासाठीं साहित्य व वक्तृत्वकला ( रेटरिक व एलोक्यूशन ) या दोहोंचा थोडा बहुत परिचय असला पाहिजे. तांत्रिक वैद्यक, आयुर्वेद व हकीमी माहिती असली तर तिचा स्वतःस व इतरांस उपयोग होऊन लोकसंग्रहाचे कामास मदत होणार आहे. थोडें स्वरज्ञान असलें म्हणजे राष्ट्रीय कार्याच्या अनेक चळवळींसंबंधाचीं चार पदें म्हणून लोकांचें मन करमणुकीचे द्वारां ओढून घेण्यास तो समर्थ होईल. याज्ञिकी, हरिदासी, पुराणकी पुठ्यांपैकीं माहिती असणारा माणूस त्या प्रकारानेंहि आपले विचार लोकांच्या मनांत उतरविण्यास कमी करणार नाहीं. समाधानवृत्ति राखून, प्रसंगोचित भाषण करणाऱ्या अशा लोकशिक्षकांचें आज आमच्या देशास जितकें आगत्य आहे तितकें पूर्वीं केव्हांही नव्हतें व पुढें कांहीं वर्षांनीं राहणार नाहीं. इंग्रजी भाषेचें सामान्य ज्ञान प्राप्त करून घेऊन गणित व सृष्टिशास्त्राचें अध्ययन केलेले लोक हरएक प्रकारच्या औद्योगिक शिक्षणासाठीं तयार होणें हल्लीं जरूर आहे. त्यांनीं परदेशीं जाऊन हरहुन्नर साध्य करावयाचे आहेत. त्याचप्रमाणें देशांत संचार करून वर दर्शविल्याप्रमाणें जरूर ती माहिती गोळा करणें व लोकांस आपल्या अवस्था, अपेक्षा व आकांक्षा यांचें ज्ञान करून देणें या दोन कार्यांस तसेच तयार पाहिजेत.

( धारवाड येथील १२।५।१९०७ चें व्याख्यान, विश्ववृत्त. )

## धर्माचरणाचीं तत्त्वें

धर्माचरणाचीं तत्त्वें सनातन धर्मास म्हणजे श्रुतिस्मृतिपुराणोक्त पद्धतीस अनुसरून आहेत असें आम्ही मानतों. आम्ही आर्य किंवा प्रार्थना असा कांहीं निराळा समाज काढला नाहीं. किंवा तशा कारणास मिळालों नाहीं. आमचे वृद्ध पूज्य गु. रघुनाथराव ह्मणतात त्याप्रमाणें आमचीं शास्त्रें कोणत्याही खऱ्या राष्ट्रहिताच्या सुधारणेस आड येणारीं नाहींत. व्यापक दृष्टि ठेवून बदलणाऱ्या परिस्थितीस योग्य अशा सवडी ठेवून आचाराचे नियम प्राचीन मुनींनीं ठरविले आहेत. यासाठीं

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥

भगवदुक्तीप्रमाणें वागावें हेंच आम्ही श्रेयस्कर मानतों. 'आचारः प्रथमो धर्मः' असें ह्मटलें आहे याचें तरी कारण इतकेंच कीं, कोणाच्या मनांत कोण शिरतो? वागणुकीवरून माणसांची सामान्यतः कल्पना होते. देशाचार भिन्न भिन्न असतात त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें. विशिष्ट परिस्थितींत शास्त्राची अनुज्ञा मिळेल तितका फरक करावा. सर्व ठिकाणीं व्यवस्थितपणा पाहिजे. राज्यव्यवहारांत जसें सर्व अनुशासन असतें, तसें धर्मव्यवहारांतहि पाहिजे म्हणून धर्मस्थानें व गुरुस्थानें आहेत. राजा जसा जुलमी, अज्ञानी किंवा बेफिकीर होऊं शकतो व समाजास त्याचे परिणाम भोगावे लागतात त्याप्रमाणें धर्मपीठांवीहि कधीं कधीं गत होईल. पण सामान्य स्थिति कशी असावी याचा विचार करण्याचाच प्रस्तुत प्रसंग आहे. आह्मी समर्थ विद्यालयांतील विद्यार्थ्यांस कोणचें वळण लावूं याचें फक्त दिग्दर्शन केलें आहे. मी पाहिजे तसा वागेन, असें म्हणणारा शिक्षक किंवा शिष्य आमच्या येथें खपावयाचा नाहीं. शिष्टसंमत आचरण पाहिजेच. ( वि. वृ. सदर )

## देवाप्रमाणें देशाचें ध्यान करा

जर आमचा उदय व्हावयाचा असेल तर कांहीं वर्षें तरी सर्व जातींच्या, धर्मांच्या, व स्थितींच्या लोकांनीं देशाचें एकसारखें ध्यान केलें पाहिजे. सामान्य व्यवहार करावयाचे असें सुद्धां मनांत वागवावयास नको. राष्ट्र मात्र

---

१. विश्ववृत्त–' उभय पक्षांचें कर्तव्य ' हा लेख.

दृष्टीआड होतां कामा नये. त्यापासून आपली दृष्टि दुसरीकडे चाळविणारा तो आपला दुस्मान असें वाटलें पाहिजे. उपनिषदांत सांगितलें आहे कीं, ' मातृदेवो भव, ' ' पितृदेवो भव, ' ' आचार्यदेवो भव, ' त्याचप्रमाणें याउपर ' राष्ट्रदेवो भव, ' असा उपदेश प्रत्येकास केला पाहिजे. पितृभक्ति, गुरुभक्ति, तशी राष्ट्रभक्ति मानली पाहिजे. त्यांत राष्ट्रास सर्वथा जेणेंकरून मोठेपणा येईल त्या गोष्टी करण्यास झटणें हें राष्ट्रासंबंधीं प्रत्येकाचें कर्तव्य होय. भर्तृहरीनें म्हटल्याप्रमाणें सत्पुत्राचें लक्षण असें आहे कीं जो वडिलांस आपल्या चांगल्या आचरणानें सुख देतो तो सत्पुत्र. आपली जन्मभूमि किंवा मातृभूमि ही सुद्धां वडिलांप्रमाणेंच आहे.

### राष्ट्राभिमान

राष्ट्राभिमान आम्हांस इंग्रजांनींच शिकवला आहे, व तो आम्हीं जागृत ठेविला पाहिजे यासंबंधीं उल्लेख करून धारवाडच्या वरील व्याख्यानांत अण्णा म्हणाले:—

जसा व्यक्तीचा स्वतःविषयींचा अभिमान तसाच राष्ट्राचा स्वतःविषयींचा अभिमान म्हणजे स्वदेशाभिमान किंवा राष्ट्रभक्ति. अभिमान हा चांगल्या गोष्टीबद्दलचा असला पाहिजे. कुलाभिमान असणाऱ्या माणसानें आपल्या कुलांत जे थोर, विद्वान् व सुशील पुरुष होऊन गेले त्यांच्या बद्दलचा अभिमान बाळगून त्यांचें अनुकरण करावयाचें असतें. नाहीं तर "तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति । " असा प्रकार करावयाचा नाहीं. यासाठींच आमचे आजे वडील गरीब होते, आम्ही गरीबच राहणार असें कोणीं म्हणत नाहींत. भलत्याच गोष्टीचा अभिमान तो दुरभिमान. यासाठींच मोरोपंत म्हणतात, ' दुरभिमान सारा गळो ! ' आपल्यास स्वाभिमान, स्वदेशाभिमान पाहिजे ही गोष्ट कोणीही अमान्य करणार नाहीं. खुद्द आमच्या राज्यकर्त्या इंग्रजांसहि ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. तो सद्गुण आहे व तो सर्वांस प्राप्त व्हावा म्हणून तशा प्रकारचें त्यांच्या कवीचें वचन त्यांनीं आम्हांस शिकविलें आहे. सर वॉल्टर स्कॉटचें एक लहानसें काव्य सर्वतोमुखीं असतें; नसलें तर असण्याच्या योग्यतेचें आहे. असा जडात्मा कोण आहे कीं ज्याच्या मनांत ही माझी, ही माझी भूमि आहे असें येत नाहीं ? अशा अर्थाचें तें आहे.

Breathes there the man with soul so dead
Who never to himself hath said,
'This is my own, my native land ?'

## स्वार्थत्याग

राष्ट्रासाठीं देशांतील सर्व लहानथोर मंडळींनीं स्वार्थत्याग केला पाहिजे. सदरहू लेखांतच अण्णा पुढें म्हणतात:—

"राष्ट्रकल्याणासाठीं आपण झीज सोसण्यास तयार झालें पाहिजे. याला स्वार्थत्याग म्हणतात. तो ज्याला जितक्या प्रमाणानें शक्य असेल तितका त्यानें केला पाहिजे. पुष्कळ दिवस जगणें, आपल्या सर्व इंद्रियांस सुखाचा उपभोग करून देणें हा सामान्य सृष्टिनियमानुसार क्रम आहेच. परंतु आणखी कांहीं दिवस जगतां येणें शक्य असेल तरी राष्ट्रासाठीं आपल्या आयुष्यांतील तितके दिवस कमी झाले तरी विहेत्तर आहे असें वर्तन ठेवणें किंवा सुख घ्यावेंसें वाटलें तरी किंवा द्रव्यसंग्रह करण्याचा मोह पडला तरी, त्या सुखाची किंवा द्रव्याची पर्वा न करणें या गोष्टीलाच स्वार्थत्याग म्हणतात; आणि असा स्वार्थत्याग करणारे लोक तयार असतील तरच देशास आनंदाचे दिवस येतील. पेरावें तसें उगवतें. परोपकार करून ठेवलेला असावा, केव्हांना केव्हां तरी त्याचें फळ मिळेलच मिळेल, हा व्यक्तिनीतीचा नियम राष्ट्रनीतीसहि लागू आहे. योग्य वेळीं थोड्या स्वार्थत्यागानें जें काम भागेल तेंच काम साधण्यास पुढें अत्यंत नुकसान सोसावें लागेल. (वि. वृ. सदर)

## स्वदेशी चळवळ

या गोष्टीचा म्हणजे स्वदेशी चळवळींत आपल्या राष्ट्रांत पूर्णपणें यश येण्यास सरकारचें साहाय्य नसतां आपणांस काय करितां येईल याचा विचार करावयाचा झाल्यास आपण हल्लीं बहुतेक पंगु आहों अशी आपली खातरजमा झाली असेल. इतर राष्ट्रांतील लोक स्वतंत्र असल्यानें व त्यांचें वजन सरकारावर पडत असल्यानें ज्या गोष्टी त्यांना शक्य होतात त्या गोष्टी आमच्या राष्ट्रांत शक्य नाहींत ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. सरकार आमच्या धंद्यांस उत्तेजन देण्यासाठीं संरक्षक व्यापारतत्त्वाचा अंगीकार करण्यास म्हणजे परदेशी मालावर जकात बसविण्यास व एतद्देशीय मालास सवलत देण्यास म्हणजे ड्यूटी व बाउंटी या दोन्ही मार्गांनीं देशी हुन्नरास टेकू देण्यास तयार होण्याची आशा नाहीं.

परक्या देशाचा कच्चा माल आपल्या देशांतील लोकांस उपयोगी पडावा म्हणून त्यावर जबर जकात बसवावयाची अशी फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, व खुद्द ब्रिटिशांच्या वसाहती वगैरेंची रीत आहे; पण हिंदुस्थानांत मात्र खुला दरवाजा, ' आव जाव घर तुमारा ' असा प्रकार आहे. आमचे धंदे बुडवीपर्यंत इंग्लंडनें आमच्याशीं किती नीचपणाचें व दुष्टाव्याचें वर्तन केलें याचा इतिहास सांगत बसण्याचा हा प्रसंग नव्हे. परंतु ज्यांनीं आमच्या हरहुन्नरांचा इतक्या निर्दयपणें गळा कापून टाकला त्या सरकारनें व त्याच्या अम्मलदारांनीं आमच्या औद्योगिक उत्कर्षाबद्दल आम्हांस काळजी आहे असें आज म्हटलें म्हणजे त्यांचा तिटकारा येतो. तशा प्रकारचे अमके अमके यत्न आम्ही करीत आहों असें त्यांनीं जाहीर केलें म्हणजे त्यांत कांहीं तरी अंतस्थ हेतु असावा असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. तात्पर्य काय कीं या स्वदेशी चळवळीचा विजय म्हणजे आमच्या राष्ट्राचा सांपत्तिक उत्कर्ष आणि त्या मानानें हिंदुस्थानाशीं व्यापार करून गबर होणाऱ्या राष्ट्राचें नुकसान. अशा राष्ट्रांपैकीं पहिल्या प्रतीचें राष्ट्र आमच्या राजकर्त्यांचें असल्यानें केवळ स्वत:चें संरक्षण करण्यासाठीं अथवा आजवर चाललेली चंगळ कायम राखण्यासाठीं कांहीं तरी निमित्त ठेऊन या चळवळीच्या मुळाशीं कुऱ्हाड घालण्याचा प्रयत्न केल्याशिवाय राहणें त्यांना शक्य नाहीं. राज्यसत्ता पूर्णपणें त्यांच्या हातीं असल्यानें त्यांचे प्रयत्न सफलही होणारच, परंतु अशा स्थितींत आम्ही स्वस्थ बसावें काय याचा विचार आपणच करावा.

### ना विष्णुः पृथिवीपतिः

राजा ईश्वरी अंश खरा, पण कोठवर ? तो ईश्वरप्रमाणें वागेल तोंपर्यंत. परंतु प्रथमतः मी तुमचें रक्षण करीन असें म्हणून जो रक्षण करणार नाहीं, घातासच प्रवृत्त होईल त्यास ईश्वरी अंश मानणें हें अत्यंत गर्हणीय आहे, हें तत्त्व इंग्लंडच्या इतिहासानेंच शिकविलें आहे. वेन राजाची कथा आमच्या राष्ट्रीय राजनीतिशिक्षणानें आमच्या वाडवडिलांच्या हृत्पटलावर कोरून ठेवलेली असते; परंतु ज्ञान असणें आणि त्याप्रमाणें वर्तन घडणें या दोन गोष्टी सदासर्वदा एकत्र कोठून सांपडतील ? हँप्डन सारखा एखादा पुढारी राजसत्तेस प्रतिरोध करण्यास दंड ठोकून उभा राहिला म्हणजे त्याच्यामागून बाकीचे लोक सज्ज होतात. जहाजपट्टी ती काय ? हल्लींच्या दरानें १५ रुपये बसविली होती; पण पहिल्या चार्लसची ही उच्छृंखल

वृत्ति चालू द्यावयाची नाहीं ह्मणून कंकण बांधून तयार झालेल्या हॅम्प्डननें तीं तेवढी क्षुद्र रक्कम देण्याचें नाकारलें. इंग्रज लोकांचीं आपल्या देशांत वागण्याचीं तत्त्वें अशींच जोराचीं आहेत. त्यांचा महाकवि त्यांस उपदेशितो कीं एका गवताच्या काडीसाठीं रणें पडलीं तरी फिकीर नाहीं; मात्र त्या काडीच्या तंत्र्यांत तत्त्वाचा प्रश्न असला पाहिजे. सामान्य नीतिदृष्ट्या पक्ष खरा, स्वतंत्रतादेवीची आज्ञा, महाकवींचें प्रोत्साहन, देशबांधवांच्या अनुमोदनाचीच नव्हे तर अनुकरणाचीहि खात्री, आणि स्वर्गीं वसणारा रसरशीत देशाभिमान इतकी तयारी असल्यावर राजसत्तेनें नुसता जाहीर केला म्हणूनच एखादा कायदा मान्य करावा किंवा एखादी पट्टी [illegible] द्यावी हें जॉन हॅम्प्डन सारख्या वीराकडून कसें घडणार? आणि तेंच नीतिशिक्षण, तोच शेक्सपिअर, व तेंच हॅम्प्डनचें उदाहरण पुढें असतां जुलमी अमलाचीं, पैन् पै ओढण्याच्या राजनीतीचीं [illegible]वर वर्षें पाहूनहि केवळ आज्ञापत्रारूढ झाला ह्मणूनच एखाद्या [illegible]धाखालीं लोकांनीं आपली मान द्यावी हें इतःपर शक्य नाहीं असें स्थापित होण्याचे दिवस हिंदुस्थानांतहि जवळ आले आहेत असें ह्मणणारा पक्ष हल्लीं राष्ट्रांत बळावत चालला आहे. (विश्ववृत्त)

### राजसेवक व लोकसेवक

प्रत्येक प्रापंचिक मनुष्य रौप्यशृंखलाबद्ध असणारच. साऱ्या जगांत, राजराज्यांत असो किंवा लोकराज्यांत असो, रौप्य किंवा कांचन नाणें हें थोडें तरी प्राप्त करून घेतल्याशिवाय चालावयाचें नाहीं. आजवर राजराज्यांतून वेतन मिळत असल्यानें लोकराज्याची केलेली सेवा मोफत केली व पदरमोडही केली; परंतु इतउप्पर लोकराज्यांतील सेवक बनण्याचा संकल्प केला आहे. उद्यांचा विचार मनांत आणून संचय करण्याची बुद्धि आजवर मनाला शिवली नाहीं व यापुढेंही हा प्रापंचिक दूरदर्शीपणा येईल हें तर कठीणच. परंतु या बाबतींत काडीमात्र काळजी वाटत नाहीं. राष्ट्रांत विशेषतः सर्व प्रकारच्या स्वदेशी चळवळीच्या वेळीं अत्यंत कामगिरी करावयाची आहे. अनेक अंगांनीं राष्ट्राचें पाऊल पुढें पडण्यास किती तरी लोक पाहिजे आहेत. त्यांपैकीं एका जाग्यावर आपली नेमणूक करून घेऊन जीवांत जीव आहे तोंपर्यंत झटण्याची बुद्धि व सामर्थ्य परमेश्वराजवळ भाकून कार्यास जुंपून घेणें एवढेंच आमचें काम आहे. सिद्धिदाता तोच समर्थ आहे. (ग्रंथमाला)

---

गुरुवर्य

कै. वि. गो. विजापूरकर, एम्. ए.

[ आठवणी ]

# भाग तिसरा

# प्रो० विष्णु गोविंद विजापूरकर

[ आठवणी ]

## भाग तिसरा

लेखक—रा. गो. कानडे, (पुणें)

अण्णांचें सर्व आयुष्य राष्ट्रीय शिक्षणाच्या चिंतनांत व तन्निमित्त कार्यांत गेलें. आपल्या आयुष्याचीं सुमारें ४० वर्षें त्यांनीं एकनिष्ठपणानें शिक्षकाचें कार्य केलें. म्हणून महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाशीं त्यांचें नांव कायमचें निगडित आहे. पुढेंपुढें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत ते इतके समरस झाले कीं, कोठेंही राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न निघाला कीं अण्णांचें तिकडे लक्ष गेलेंच ! राष्ट्रीय शिक्षणाविरुद्ध कोणींहि बोललेलें त्यांना खपत नसे. त्यासंबंधीं अण्णांच्या कांहीं आठवणी पुढें दिल्या आहेत. यांवरून अण्णांची राष्ट्रीय शिक्षणाचे बाबतींत किती निष्ठा होती हें दृष्टीस पडतें.

### १. नक्कल कां करितां ?

नवीन समर्थ विद्यालयांत ७ व्या वर्गांतील मुलांची शेवटची परीक्षा होऊन प्रमाणपत्र द्यावें कीं कसें याबद्दल बराच वादविवाद झाला. सध्यांच्या शिष्टसांप्रदायाप्रमाणें प्रमाणपत्रकें द्यावींत असें इतर शिक्षक मंडळींचें व चालकांचें ठरलें. परंतु परकीय पद्धतीची अगदी नक्कल न करितां **सुविद्य** अगर **सुविनीत** 'असें त्यांना म्हणण्यांत यावें व त्यासाठीं पूर्वपद्धती-प्रमाणें समारंभ करावा असें त्यांचें मत होतें. परंतु इतर मंडळींस तें रुचलें नाहीं. त्यांनीं निराळीं प्रमाणपत्रकें छापविलीं. "ही गोष्ट मला साफ मान्य नाहीं" असें अखेर अण्णांनीं जेव्हां आग्रहानें सांगितलें, तेव्हां मग तो बेत मागें पडला व प्रमाणपत्रकेंही मागें पडलीं हें सांगणें नकोच.

### २. पातिव्रतेचा दाखला

नवीन समर्थ विद्यालयांतील मुलांना राष्ट्रीय विद्यापीठाच्या परीक्षांना बसण्याची सोय व्हावी म्हणून नवीन समर्थ विद्यालय बनारसच्या हिंदु

विश्वविद्यालयास अगर कलकत्त्याच्या राष्ट्रीय शिक्षणमंडळास ( National Council of Education ) जोडावें असा विचार चालक मंडळींत चालला होता. अण्णांना हें बिलकुल पसंत पडलें नाहीं. या संबंधीं बोलतांना ते ह्मणाले, "आमचें विद्यालय सर्वस्वीं स्वतंत्र असलें पाहिजे. ते कोणत्याहि विद्यापीठाशीं जोडावयाचें नाहीं. विद्यालय जोडा, मग प्रमाणपत्रें द्या, हें सर्व थोतांड आहे. अहो, पतिव्रतेला एकाद्या राजानें सांगितलें, 'मी तुला सर्व राज्य देतों, पण एक दिवसभरच तू माझी बायको हो.' तर ही पतिव्रता राजाच्या मोठ्या राज्यावर भाळून एक क्षणभरहि त्याची बायको होण्यास तयार होणार नाहीं. तद्वतच हें तुमचें बोलणें!"

## ३. कऱ्हाडच्या चिपळया व नाशिकचे यज्ञेश्वर भट

अण्णांचा स्वभाव विनोदी असे हें प्रसिद्धच आहे. नेहमीं बोलण्यांत ह्या त्यांचा विनोद ओतप्रोत भरलेला असे. त्यांच्या सान्निध्यांत राहाणाऱ्या मंडळींचीं त्यांनीं कांहीं सांकेतिक नांवें ठेविलीं होतीं. त्यामुळें अगदीं परिचित अशा मंडळींनाच त्यांचें सांकेतिक बोलणें कळे. त्यांपैकीं कांहीं नांवें पुढील प्रमाणें होतीं: —

चिपळया—रा. स. खं. ऊर्फ आप्पासाहेब आळतेकर. ( यांच्या हातांत नेहमीं चिपळया असत. )

मि. सीक्रेट—रा. गो. म. गुप्ते, एम्. ए., एल्एल्. बी.; आडनांवाचा इंग्रजी अर्थ विनोदानें ध्वनित केला आहे.

इन्स्पेक्टर—मांजर. ( कोठें दूध आहे वगैरे टेहळण्यांत मांजर असतें त्यास संबोधून म्हटलें आहे. )

यज्ञेश्वर भट अगर तोटी—रा. सा. वझे. तोटी असें म्हणण्याचें कारण पाण्याच्या तोटीप्रमाणें यांचा व्याख्यानामध्यें वाक्प्रवाह अस्खलित चालू असतो.

अशा प्रकारें त्यांनीं कांहीं नांवें दिलीं होतीं. तसेंच परप्रत्ययनेयबुद्धि व होस हो ठोकणाऱ्या एका अधिकारी गृहस्थास 'भोसले' असें त्यांनीं नांव दिलें होतें. कारण इतिहासप्रसिद्ध भोसल्यांचें राजघराणें यांतील पुरुष जसे कोणाच्या तरी हातांतील बाहुल्याप्रमाणें असत त्याचप्रमाणें वरील गृहस्थांची दुटप्पी वृत्ति असे. जिकडे बहुमत तिकडे ते जात.

### ४. योगभ्रष्ट होऊं नका

श्रीसमर्थांप्रमाणें ब्रम्हचर्य पाळून समर्थ विद्यालयांतील कांहीं विद्यार्थ्यांनीं लोककार्य करावें असें अण्णांना वाटत होतें. त्याच दृष्टीनें 'शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें। वशिष्ठापरि ज्ञान योगेश्वराचें ।। कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा। नमस्कार माझा तया रामदासा ।।' हा श्लोक वर्गांत अभ्यास सुरूं होण्यापूर्वीं म्हणण्याचा क्रम ठरलेला असे. तरी ' तुम्हीं विवाह करूं नका ' असा उपदेश त्यांनीं कधींही केला नाहीं. मात्र पहिली बायको वारल्यावर पुनः लग्न करणारांचा ते निषेध करीत. त्यांच्या एका मित्रानें अशा रीतीनें पुनः विवाह केला तेव्हां ते त्यांना म्हणाले 'छे ! हें बरें नाहीं ! तुम्ही आतां योगभ्रष्ट झालांत.'

### ५. नाक दाबलें कीं तोंड उघडतें

एकदां एका विद्यार्थ्यानें विद्यालयांतील आचारी मंडळींना उद्देशून अपशब्द उच्चारले व ते आचाऱ्यानें ऐकले. आचाऱ्यानें सदर विद्यार्थ्यास वाढण्याचें नाकारलें तेव्हां ही सर्व तक्रार अण्णांच्याकडे गेली तेव्हां त्यांनीं 'त्याची क्षमा माग व मग जेव ' असा एक रोखठोक जबाब दिला. आचाऱ्याची क्षमा मागणें हा आपला अत्यंत अपमान आहे असें सदर विद्यार्थ्यास वाटलें हें सांगणें नकोच ! परंतु अशा बेफाम वागणाऱ्या मुलास हीच शिक्षा पाहिजे असें म्हणून त्यांनीं विद्यार्थ्यांची रदबदली करणाऱ्या शिक्षकासही धुडकावून दिलें. पुढें विद्यार्थ्यानें क्षमा मागून भोजन केलें !

### ६. आतां नोटीस मिळाली

१९२६ च्या जुलै महिन्याच्या अखेरच्या आठवड्यांत अण्णांची प्रकृती जरा बिघडली होती. त्यांना फारच अशक्तता वाटूं लागली होती. त्यामुळें त्यांना बराच त्रास होई. तरी ते स्वतःचीं कामें स्वतःच करीत. दोन तीन दिवस तेंही जेव्हां जड जाऊं लागलें तेव्हां ते आपल्या नोकरास म्हणाले ' अरे आतां आम्हांस नोटीस मिळाली आहे. ' प्रकृती बरी नसल्यामुळें आतां आपण फार दिवस जगत नाहीं असें वाटूनच त्यांनीं वरील उद्गार काढले. प्रकृती जरी अशा प्रकारें बिघडली होती तरी त्यांचा विनोदी स्वभाव मात्र कायम होता.

### ७. कसें झालें तरी ते आमचे आहेत

कै. शाहु छत्रपति महाराजांच्या अमदानींत १९१० सालीं अण्णांच्यावर खटला झाला तरी शाहुछत्रपतींच्याबद्दल त्यांच्या मनांत फार आदर होता.

एका प्रसंगीं बोलतांना ते म्हणाले ' महाराजांनीं जरी मला तुरुंगांत टाकलें, तरी त्यांच्याबद्दल मला अभिमान वाटतो. त्यांनीं ९९९ चुक्या केल्या तरी एक वेळ तरी मला कोल्हापूरचा रहिवासी या नात्यानें ते आपलेपणानें वागवितील. परंतु इंग्रज मात्र नेहमीं आम्हांला परकी या नात्यानेंच वागवत राहतील. '

## ८. बारीक दृष्टि

इतक्या उतार वयांतहि अण्णांचा नित्य व्यवसाय, अध्ययन, वाचन, लेखन वगैरे चालू असे. त्यांच्या खोलींत केव्हांहि गेलें तरी ते ईझी चेअरवर पडून पुस्तक वाचीत बसलेले नजरेस पडावयाचेच. लेखनसाहित्यहि शेजारीं तयार असे. कोठेंहि वाचनांत चांगला उतारा आला कीं त्यांचें टाचण ते स्मरणवहींत करून ठेवीत. नित्यनेमानें रात्रीं रोजचा कार्यक्रम रोजनिशींत टिपून ठेवावयाचा असा त्यांचा नेम शेवटपर्यंत ठरलेला होता. रोजच्या करावयाच्या गोष्टी ते एका पाटीवर टिपून ठेवीत. रोजचें टपालही ते स्वत: पहात व स्वतःच्या सर्व पत्रांना स्वत: उत्तरें लिहीत. अगदीं बारीक सारिक गोष्टी सुद्धां त्यांच्या नजरेतून सुटत नसत. छापील पुस्तकांतील अनुस्वारांच्या चुकाहि ते दाखवीत. रा. स. खं. अळतेकर यांच्या ' समर्थ-रत्नमाला, भाग पहिला ' या पुस्तकांत पुढील खुणा त्यांनीं केल्या होत्या. " घन:शामबद्दल घनश्याम पाहिजे. पहिल्या भागानंतरचें हें पान कोरें पाहिजे." त्याचप्रमाणें वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकरांच्या 'धर्मशिक्षण' या पुस्तकांतील कांहीं प्रकरणांवर 'गाळलीं तरी चालतील' असें त्यांनीं लिहिलें होतें.

## ९. स्वजातीयांकडेच वळतील

एकदां सहज बोलतां बोलतां ॲनी बेझंट व रवींद्रनाथ टागोर यांच्या प्रसिद्धीसंबंधीं बोलतांना अण्णा म्हणाले, ' अशा व्यक्ती केवळ त्यांना प्रसिद्धीचीं साधनें जास्त मिळालीं म्हणूनच जगापुढें आल्या. त्यांच्याहून अधिक योग्यतेचीं माणसेंहि आहेत. पण त्यांना प्रसिद्ध होण्यास साधनें मिळालीं नाहींत. '

दुसऱ्या एका वेळीं डॉ. बेझंट व मि. सि. एफ्. अँड्र्यूज् यांसंबंधीं बोलतांना अण्णा म्हणाले, ' कांहीं झालें तरी हीं युरोपियन माणसें वेळ आली कीं स्वजातीयांकडेच वळावयाचीं. जोंपर्यंत वळतात तोंपर्यंत वळवून त्यांचा

एका प्रसंगीं बोलतांना ते म्हणाले 'महाराजांनीं जरी मला तुरुंगांत टाकलें, तरी त्यांच्याबद्दल मला अभिमान वाटतो. त्यांनीं ९९९ चुक्या केल्या तरी एक वेळ तरी मला कोल्हापूरचा रहिवासी या नात्यानें ते अपलेपणानें वागवितील. परंतु इंग्रज मात्र नेहमीं आम्हांला परकी या नात्यानेंच वागवत राहतील.'

## ८. बारीक दृष्टि

इतक्या उतार वयांतहि अण्णांचा नित्य व्यवसाय, अध्ययन, वाचन, लेखन वगैरे चालू असे. त्यांच्या खोलींत केव्हांहि गेलें तरी ते ईझी चेअरवर पडून पुस्तक वाचीत बसलेले नजरेस पडावयाचेच. लेखनसाहित्यहि शेजारीं तयार असे. कोठेंहि वाचनांत चांगला उतारा आला कीं त्यांचें टाचण ते स्मरणवहींत करून ठेवीत. नित्यनेमानें रात्रीं रोजचा कार्यक्रम रोजनिशींत टिपून ठेवावयाचा असा त्यांचा नेम शेवटपर्यंत ठरलेला होता. रोजच्या करावयाच्या गोष्टी ते एका पाटीवर टिपून ठेवीत. रोजचें टपालही ते स्वत: पहात व स्वत:च्या सर्व पत्रांचीं स्वत: उत्तरें लिहीत. अगदीं बारीक सारिक गोष्टी सुद्धां त्यांच्या नजरेंतून सुटत नसत. छापील पुस्तकांतील अनुस्वारांच्या चुकाहि ते दाखवीत. रा. स. खं. अळतेकर यांच्या 'समर्थ-रत्नमाला, भाग पहिला' या पुस्तकांत पुढील खुणा त्यांनीं केल्या होत्या. "घन:शामबद्दल घनश्याम पाहिजे. पहिल्या भागानंतरचें हें पान कोरें पाहिजे." त्याचप्रमाणें के. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकरांच्या 'धर्मशिक्षण' या पुस्तकांतील कांहीं प्रकरणांवर 'गाळलीं तरी चालतील' असें त्यांनीं लिहिलें होतें.

## ९. स्वजातीयांकडेच वळतील

एकदां सहज बोलतां बोलतां ॲनी बेझंट व रवींद्रनाथ टागोर यांच्या प्रसिद्धीसंबंधीं बोलतांना अण्णा म्हणाले, 'अशा व्यक्ती केवळ त्यांना प्रसिद्धीचीं साधनें जास्त मिळालीं म्हणूनच जगापुढें आल्या. त्यांच्याहून अधिक योग्यतेचीं माणसेंहि आहेत. पण त्यांना प्रसिद्ध होण्यास साधनें मिळालीं नाहींत.'

दुसऱ्या एका वेळीं डॉ. बेझंट व मि. सि. एफ्. ॲंड्र्यूज् यांसंबंधीं बोलतांना अण्णा म्हणाले, 'कांहीं झालें तरी हीं युरोपियन माणसें वेळ आली कीं स्वजातीयांकडेच वळावयाचीं. जोंपर्यंत वळतात तोंपर्यंत वळवून त्यांचा

उपयोग करून घ्यावा हाच उत्तम मार्ग!' येथें लो. टिळकांचें बेझंटबाई-संबंधीं असलेलें मत आठवल्यावाचून राहात नाहीं.

## १०. दुर्लभं दैवं यस्य सः दुर्दैवः।

कालेजमध्यें संस्कृत व्याकरणाबद्दल अण्णांची फार प्रसिद्धि होती. शिवाय ते प्रत्युत्पन्नमति होते. यामुळें वाटेल तशा चतुराईनें ते शब्दांचे अर्थ लावीत असत. एकदां विद्यालयांत एका गृहस्थांचें व्याख्यान झालें, त्यावेळीं अण्णा अध्यक्ष होते. व्याख्यात्यांची ओळख करवितांना चुकून 'दैव' या ऐवजीं दुर्दैव असा शब्द अण्णांच्या तोंडून निघाला. लागलीच अण्णा म्हणाले 'मी मुद्दाम दुर्दैव असें म्हणतों. दुर्दैव म्हणजे लाभण्यास कठीण असें दैव! या गृहस्थांचें व्याख्यान आपणांस लाभलें हें मोठें आपल्यास न लाभणारें असें दैवच आहे.' अण्णांच्या समयसूचकतेबद्दल व भाषाप्रभुत्वाबद्दल सर्वांना कौतुक वाटलें व चोहोंकडे हंशाचें पिकला.

## ११. संस्कृत भाषेचे महापंडित

डॉ० भांडारकरांच्या संस्कृत ज्ञानाबद्दल अण्णांना फार अभिमान वाटत असे. डॉ. भांडारकरांच्या मृत्युनिमित्त भरलेल्या सभेंत नवीन समर्थ विद्यालयांतील एका शिक्षकांचें व्याख्यान झालें. त्यावेळीं अण्णांनींहि गु० भांडारकरांच्या कांहीं आठवणी सांगितल्या. आपल्या गुरुबद्दल बोलतांना त्यांना गहिंवर आला. ते म्हणाले 'डॉ० भांडारकरांचा संस्कृतचा व्यासंग चांगला होता व वैदिक वाङ्मयाबद्दलचे त्यांचे शोध सर्वमान्य झाले होते. ते रॉयल एशियाटिक सोसायटीचे सन्मान्य सभासदहि झाले होते. त्या सुमारास प्राच्य-भाषा-कोविदांची परिषद युरोपांत भरणार होती. त्यासाठीं मुंबई सरकारकडून प्रतिनिधि निवडला जावयाचा होता. या बहुमानास वास्तविक डॉ० भांडारकरच सर्वथैव योग्य होते. परंतु ते अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें कमी महत्त्वाचे व प्राच्यभाषापारंगत नव्हते म्हणून सरकारनें प्रो० 'पिटरसन' (हे संस्कृतचे मोठे पंडित म्हणून प्रसिद्ध होते. 'ऋग्वेदांतील कांहीं ऋचा' नांवाचें त्यांचें पुस्तक प्रसिद्ध आहे.) यांची नेमणूक प्राच्यपरिषदेकरितां केली. आपल्यास मिळणारा हा मान केवळ प्रकृतिभेदामुळें सरकारनें आपल्या गोऱ्या बांधवास दिला हें पाहून भांडारकरांना अत्यंत वाईट वाटलें. पुढें इतर संस्थानिकांनीं डॉक्टर साहेबांना आपले प्रतिनिधी या नात्यानें सदर परिषदेला पाठविलें ही गोष्ट निराळी.'

वरील डॉ० पिटरसन यांच्या अगाध विद्वत्तेबद्दल बोलतांना अण्णा म्हणाले, "हे राजश्री महापंडित होते. 'आरुह्य कविताशाखां, वंदे वाल्मीकि-कोकिलम्' या सुप्रसिद्ध ओवीचा अर्थ 'वाल्मीकिकोकिलं आरुह्य कविताशाखां वंदे' ( वाल्मीकीरूपी कोकिल वृक्षावर आरूढ होऊन कविताशाखेचें वंदन करितों ) असा अर्थ केला, हें त्यांचें महापांडित्य !"

## १२. दुर्वास ऋषींचा कोप

अण्णासाहेबांचा व कै. विसुभाऊ राजवाडे यांचा फार ऋणानुबंध होता. विसुभाऊ नेहमीं अण्णांचेकडे येऊन थोडे दिवस राहात. दोघेहि डेक्कन कॉलेजांत एकत्र राहात असत. या प्रसंगींची एक हकीकत प्रसिद्ध आहे.

डेक्कन कॉलेजांत अण्णा व विसुभाऊ असतांना एके वेळीं राजवाडे दुपारीं भोजनाचे वेळीं झोपले होते. ते अत्यंत रागीट व एककल्ली असत. अण्णा विनोदानें त्यांना दुर्वास ऋषि असें म्हणत. यावेळीं विसुभाऊंना जेवण्याकरितां झोपेंतून कोणीं उठवावें असा प्रश्न पडला. कारण दुर्वास-ऋषींच्या कोपास कोण बळी पडेल त्याचा नेम नव्हता. पण अण्णांनीं त्यांना झोपेंतून उठविण्याचें धाडस केलें. लागलीच या दुर्वास महर्षींनीं रागाच्या सपाट्यांत अण्णांच्या श्रीमुखांत दिली असें म्हणतात. यावेळीं यत्किंचितहि न रागावतां पुढें होऊन अण्णा म्हणाले 'विसुभाऊ, आतां तरी जेवावयास चला.'

## १३. संस्था व मी वेगवेगळे नाहींत

प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें अण्णांनीं शेवटीं १॥-२ वर्षे मंडळाच्या चिटणिशीचें काम दुसऱ्याकडे सोंपविलें होतें. तरी नवीन समर्थ विद्यालय व अण्णा या दोन व्यक्ति अगदीं अभिन्नच होत्या व लोकहि तसेंच समजत. उतार वयामुळें अण्णा कांहीं काम करीत नसत इतकेंच. कांहीं किरकोळ प्रसंगावरून अण्णांचें काम पाहात असलेले चिटणीस यांची व अण्णांची थोडीशी बोलाचाली झाली. तेव्हां अण्णा स्पष्ट म्हणाले "तें कांहींहि असो. जोंपर्यंत मी जिवंत आहें तोंपर्यंत संस्थेच्या हिताहिताची जबाबदारी मजवर आहे. संस्था व मी कांहीं वेगवेगळे नाहींत." इतकी संस्थेबद्दल अण्णांच्या ठिकाणीं आत्मीयता होती !

## १४. मना सत्य तें सत्य वाचें वदावें

कोल्हापुरांत अण्णा राजाराम कॉलेजचे प्रोफेसर झाल्यानंतरची ही हकीगत आहे. बर्वे प्रकरणांत टिळक–आगरकरांना नुक्तीच शिक्षा झाली होती. त्या प्रसंगीं अण्णांना फार वाईट वाटलें. यावेळीं कॅंडीसाहेब कॉलेजचे प्रिन्सिपॉल होते. कॅंडीचें व अण्णांचें या वेळीं टिळकांसंबंधीं थोडेंसें बोलणें झालें. अण्णा ह्मणाले, " देशभक्तांचा छळ होतो व त्यांना तुरुंगवास भोगावा लागतो याबद्दल वाईट वाटतें. " पुढें अण्णांची सहाध्यायी मंडळी त्यांना म्हणाली, " तुम्ही प्रिन्सिपॉलच्या देखत टिळकांच्या विषयीं सहानुभूति कां दाखवितां ? उगीच वरिष्ठांची गैरमर्जी होईल. " यावर अण्णा म्हणाले " मर्जी किंवा गैरमर्जी मला कांहीं समजत नाहीं. ' मना सत्य तें सत्य वाचें वदावें ' हा माझा बाणा आहे. "

## १५. व्याख्यानें देण्याची हौस नाहीं

मुंबईस भरलेल्या महाराष्ट्रीय व्यापारी परिषदेच्या वेळीं अण्णा परिषदेस हजर राहिले होते. परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी होते. सदर सभेंत अण्णांनीं दोन शब्द बोलावेत अशी कांहींची इच्छा होती. परंतु स्वागताध्यक्ष के. बी. साठे यांनीं अण्णांना बोलूं न देण्याचा प्रयत्न केला. त्यावर अण्णा म्हणाले ' मला कांहीं व्याख्यानें देण्याची हौस नाहीं. ' पुढें अध्यक्ष श्री. बाळासाहेब हेच उलट म्हणाले ' आम्हांस वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, अण्णासाहेब विजापूरकर यांचे चार शब्द ऐकावयाचे आहेत. ' त्यावेळीं मात्र स्वागताध्यक्षांचें कांहींच चाललें नाहीं.

## १६. मुसलमान विद्यार्थीहि चालतील

नवीन समर्थ विद्यालयांत वर्णाश्रमधर्मानुसार अपापल्या धर्माचें योग्य प्रतिपालन करतील असे विद्यार्थी घेण्याचा क्रम होता. परंतु तुम्ही मुसलमान विद्यार्थी घ्याल काय ? असा प्रश्न एका गृहस्थांनीं अण्णांना केला. यावर अण्णा म्हणाले " या प्रश्नाची अगोदर वाच्यता कां ? असा कोणी मुसलमान विद्यार्थी आला तर त्याचा विचार करूं. आम्ही इतर वर्णांचे लोक जसे विद्यालयांत घेतों तसे मुसलमान विद्यार्थीहि घेण्यास आम्हांस अडचण पडणार नाहीं. "

### १७. साहित्यसंमेलनाची काळजी कां ?

मराठी वाङ्मयसंवर्धनाचे बाबतींत अण्णांची योग्यता फार मोठी आहे. त्यांनीं दीड तपपर्यंत ग्रंथमाला, विश्ववृत्त, व समर्थ वर्तमानपत्र हीं चालविलीं होतीं. मराठी भाषेसंबंधीं कोणताही महत्त्वाचा प्रश्न निघाला म्हणजे अण्णांचें पाऊल पुढें असे. साहित्यसंमेलनासंबंधीं अण्णांची पूर्ण सहानुभूति होती. इतकेंच नव्हे तर, अकोल्याच्या साहित्यसंमेलनाकरितां अण्णांनीं एक स्वतंत्र निबंध लिहून पाठविला होता. ते म्हणत कीं साहित्यसंमेलन कोठें भरवावें याबद्दल लोक केवळ निष्कारण चर्चा मात्र करितात. दरवर्षी साहित्यसंमेलन भरविण्यांत आलेंच पाहिजे. "सर्वारंभे तण्डुलाः प्रस्थमूलाः" हेंच खरें! साहित्यसंमेलन भरविणें ही गोष्ट आम्हांला फार सोपी आहे. दोन दिवस आमच्या तळेगांवच्या समर्थ विद्यालयांतच आम्ही साहित्य-संमेलन भरवूं. साहित्यसंमेलनानिमित्त ५५० पाहुण्यांची राहाण्याची व जेवण्याची सोय करणें कठीण नाहीं. आम्ही या सोयी अगदीं मोफत करूं. समर्थ विद्यालयांत रोज १२५ पानें उठतातच. तितकींच पानें दोन दिवस जास्त उठतील येवढेंच !

### १८. असंतुष्ट बंधूंचा संघ

कोल्हापुरांत शिकण्याची सोय होती म्हणून अण्णांनीं आपले बंधू बापू-नांना यांना मुंबईस शिकावयास धाडावयाचें नाकारलें. त्यामुळें ते अण्णांवर फार रुष्ट असत. कोणी आलें कीं अण्णा विनोदानें सांगत कीं येथें एक 'डिसकंटेंटेड् ब्रदर्स असोसिएशन' आहे. बापूनानांप्रमाणें श्री. न. चिं. केळकर यांचे बंधु नारायण चिंतामण केळकर व डॉ. लवणानंद यांचे बंधूही आपल्या भावांनीं आपणांस शिकण्यास मुंबईस पाठविलें नाहीं म्हणून रागा-वले होते. अशा या तिघांनीं मिळून वरील 'असोसिएशन' स्थापिली होती. या सभेचें वरील नांव अण्णांनीं दिलें होतें. •

### १९. श्रृंगारिक कथाभाग वगळा

एकदां मी उच्च वर्गांत रघुवंश घेत होतों. रघुवंशांतील अत्यंत हृदयस्पर्शी कथाभागांत 'अजविलास' हा भाग पडतो. उच्च वर्गांतील मुलांना कांहीं उत्तम काव्यमय उतारे दाखवावेत या हेतूनें अजविलासांतील कांहीं निवडक अशा तीन चार कवितांचे अर्थ मीं सांगितले. लगेच सायं-

काळीं गुरुवर्यांना ही गोष्ट एका मुलाकडूनच कळली. दुसरे दिवशीं मला हांका मारून अण्णा म्हणाले ' तुह्मी काल अजविलाप घेतला. त्यांत कांहीं भाग शृंगारिक आहे. त्यापेक्षां तुम्ही रघुदिग्विजय घ्या. ' यावर मी म्हणालों ' अजविलापांतील शृंगारिक भाग गाळून मी बाकीच्यांतून निवडक कविता घेतल्या. ' यावर गुरुवर्य म्हणाले ' तें खरें आहे. कविता गाळल्या त्या वाचण्याविषयीं मुलांची साहजिक प्रवृत्ति असते. याकरितां कविता गाळून वाचून घेऊं नयेत. ' तो भाग टाकून दुसरे दिवशीं वर्गांत मीं रघुदिग्विजय सुरू केला !

## २०. असा लपंडाव कां ?

असहकारितेनंतर टिळक महाराष्ट्र विद्यापीठ अस्तित्वांत आलें. या वेळीं महाराष्ट्रांत आणि इतरत्र सुरू झालेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत ' केसरी ' चें अर्धवट धोरण राष्ट्रीय शिक्षणास अनुकूल व अर्धवट प्रतिकूल असें होतें ही गोष्ट गुरुवर्यांना अगदीं आवडत नसे. १९२५ सालीं केसरींत एका अंकांत स्वतंत्र असें ' नॅशनल मेडिकल कॉलेज ' (या वेळीं सदर संस्था सरकारमान्य झाली नव्हती ) व सरकारमान्य असें गोखले एज्युकेशन सोसायटीचें परेळ हायस्कूल या परस्परविरोधी अशा संस्थांची तरफदारी केली होती. त्याबद्दल बोलतांना अण्णा ह्मणाले ' राष्ट्रीय कार्यास अगर दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या सार्वजनिक कार्यास **अव्यभिचारी भक्ति** पाहिजे तरच लोकांचा विश्वास बसेल. वेळ पडेल तसें व रुचेल तसें लिहिणें ही गोष्ट अत्यंत निंद्य आहे. एकदा आपलें मत ठाम झाल्यावर मग ब्रह्मदेवाचीहि पर्वा करूं नये. हा पत्रराज केसरीचा अधःपात आहे. '

केसरीचें धोरण खादीच्या चळवळीस प्रतिकूल आहे हें पाहून अण्णांना फार वाईट वाटे. "१९०६।०७ सालीं अशीच स्वदेशी कापडाची चळवळ निघाली तेव्हां केसरीचें स्वदेशी चळवळीविषयीं अनुकूल मत होतें. परंतु आज तीच चळवळ केवळ जरा निराळ्या नांवानें निघतांच ' केसरी ' त्या चळवळीची हेटाळणी करितो. स्वदेशी चळवळीवर ' केसरी ' ची श्रद्धा नाहीं" असें गुरुवर्य म्हणत.

स्वतः अण्णासाहेबांचा स्वदेशी चळवळीवर अत्यंत विश्वास होता. समर्थ विद्यालयांत जरी विद्यार्थ्यांनीं अहोरात्र चरखा फिरवत बसावें असा त्यांनीं उपदेश केला नाहीं, तरी खादीच्या चळवळीस विरोध असा कधींहि त्यांनीं चुकून

१७

सुद्धां केला नाहीं. ते नेहमीं जाडीभरडी खादी अखेरपर्यंत वापरीत होते. इतकी स्वदेशीवर त्यांची अढळ श्रद्धा होती.

## २१. संस्कृत मृत भाषा नाही

आधुनिक इंग्रजींत संस्कृत, अरेबिक, पर्शियन, लॅटिन, हिब्रु वगैरे बोलण्याच्या प्रचारांत नसलेल्या कांहीं जुन्या भाषांस मृतभाषा ( Dead Languages ) असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. परंतु संस्कृतसारख्या स्फूर्तिदायक आणि सुंदर अशा देवभाषेस मृतभाषा हें विशेषण लावणें गुरुवर्यांना अगदीं पसंत नसे. यासंबंधीं एकदां असें बोलणें निघालें असतां अण्णा म्हणाले ' संस्कृतला मृतभाषा कां म्हणतां ? आपल्या सध्याच्या सर्व हिंदी भाषांना ज्या संस्कृत वाणीनें जिवंतपणा आणला तिला मृत असें कां संबोधतां ? संस्कृत भाषा ही नेहमीं जिवंत अशी गीर्वाण देवभाषा आहे. ' अशा रीतीनें गु. अण्णासाहेब संस्कृतचे अभिमानी होते. मरणापूर्वी आधीं कांहीं दिवस त्यांनीं 'गीर्वाणवाणीसुलभप्रवेश' या नांवाचें एक लहानसें पत्रक तयार करून पत्रद्वारें संस्कृत शिक्षणाची योजना तयार केली होती, आणि खेडगांवांतील अगर इतर अनेक गृहस्थांचा या बाबतींत त्यांच्याशीं पत्रव्यवहारहि चाले. यासंबंधीं अण्णासाहेबांना आणखी कांहीं लहान लहान पुस्तकें तयार करावयाचीं होतीं परंतु तें काम अपुरेंच राहिलें !

लेखकः—अनंत यशवंत देशपांडे, वाङ्मयविशारद ( टि. म. वि.)
( लायब्ररीयन, औंध पुस्तकालय. )

## २२. विधवा स्त्रियांची समाजसेवा

मी एके दिवशीं गुरुवर्यांची भेट घेण्यासाठीं तळेगांवीं श्रीसमर्थ विद्यालयांत गेलों होतों. त्या वेळीं आमचें बोलणें झाल्यावर गुरुवर्य मला म्हणाले, ' तुमच्या घरीं कोण कोण मंडळी आहेत ? ' त्यावर मी म्हणालों ' कोणीहि नाहीं. मी व माझी धाकटी बहीण. तिचा नवरा वारल्यामुळें ती आमचेकडेच असते. ' ' मग फारच वाईट गोष्ट आहे ! बिचारीचा नवरा वारल्यामुळें तिला माहेरीं राहणें भाग पडलें आहे. ' अशा रीतीनें विधवा स्त्रियांच्या संबंधानें माझें व गुरुवर्यांचें बोलणें निघालें. मी बोललों ' विधवा स्त्रियांनाहि कांहीं तरी सामाजिक कार्य करितां येणें कठीण नाहीं. त्यांचाहि

१. हें संस्कृत पत्रक भाग दुसरा पा. १४६ वर समग्र दिलें आहे.

समाजास फार उपयोग आहे.' यावर गुरुवर्य म्हणाले 'होय! त्याहि समाजाच्या घटक आहेत. त्यांच्या हातूनहि पुष्कळसें कार्य होऊं शकेल. आमच्या समर्थ विद्यालयासारख्या संस्थांत आजन्मसेविका बनून लहान मुलांना आपल्या स्वत:च्या अपत्याप्रमाणें ममतेनें पाळणाऱ्या स्त्रिया जर लाभल्या तर त्यांच्या हस्तूनहि समाजाचें पुष्कळ कल्याण होईल.'

विधवा स्त्रियांच्या असहाय स्थितीबद्दल गुरुवर्यांना नेहमीं अनुकंपा वाटत असे व प्रसंगीं ते मनमोकळेपणानें बोलतहि.

लेखक—वा. दा. मुंडले, सं० 'ब्राम्हणपत्रिका', (इसलामपूर)

## २३. निबंधमालाकारांवरील आक्षेप

कै० विजापूरकर यांचा व माझा परिचय इ० सन १९०० चे सुमारास पुढील प्रसंगानें झाला. त्या वेळीं ते कोल्हापुरास ग्रंथमाला मासिक काढीत असत. त्या मासिकाच्या एका अंकांत (७४ वा) इंदूरचे रा० बा. ना. देव यांचा कै० विष्णुशास्त्री यांच्या चरित्रावर टीकापर लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखांत विष्णुशास्त्र्यांसंबंधीं प्रतिपक्षांचें ह्मणून जें जें ह्मणणें प्रचलित होतें तें सर्व आवेशपूर्ण रीतीनें व्यक्त करण्यांत आलें होतें. विष्णुशास्त्री हे महाराष्ट्रांतील राष्ट्रीय विचारक्रान्तीचे जनक असल्यामुळें तरुण पिढींत व एकंदर जनसमूहांत त्यांच्याविषयीं फार मोठा आदर असे. अशा लोकांच्या भावना देवांच्या टीकापर लेखानें दुखविल्या गेल्यामुळें तत्संबंधीं त्या वेळीं लोकांत फार खळबळ उडून गेली होती. सदर लेखांतलीं कांहीं विधानें व्यक्तिविषयक व खोडसाळ असल्यामुळें त्यांबद्दल वर्तमानपत्रांतून फार गवगवा झाला. असला लेख छापल्याबद्दल खुद्द ग्रंथमालाकारांकडेहि अनेक निषेधपर पत्रें गेलीं. मी त्या वेळीं मुंबईचा रहिवाशी असून तारुण्याच्या ऐन उमेदींत आणि कै० विष्णुशास्त्र्यांच्या ध्येयाशीं व विचारसरणीशीं तादात्म्य पावणारांपैकीं एक होतों. अर्थात् रा० देवांच्या टीकेला उत्तर देऊन कै० विष्णुशास्त्र्यांसंबंधीं त्यांनीं केलेला गैरसमज दूर करावा असें वाटून मीं त्यांस उत्तर देण्याचा निश्चय केला व तें जशाच्या तसें छापाल कीं नाहीं असें कै० विजापुरकरांस विचारलें. त्यांनीं होकारार्थी उत्तर पाठवून आपल्या निषेधकांचें समाधान करण्याकरितां तसें त्यांनीं तत्कालीन 'काळ' वर्तमानपत्रांतून जाहीर केलें. पण मी त्या वेळीं नवशिका लेखक

असल्यामुळें व महत्त्वाचा असा माझा हा पहिलाच लेख असल्यामुळें माझा लेख वेळेवर तयार झाला नाहीं. शास्त्रीबुवांचे ग्रंथ व मतें आणि त्यांचा लोकांवर झालेला व होणारा परिणाम यासंबंधीं मीं यथास्थित विवेचन करण्यास समर्थ होतों. परंतु त्यांचें वैयक्तिक चरित्र व अंतरंग यांची मला फारशी माहिती नव्हती व रा० देव हे त्यांच्याच पिढींतले असल्यानें त्यांना ती चांगली अवगत होती. अत्यंत अश्लाघ्य व मर्मभेदक अशी टीका याच बाबतींत असल्यामुळें तत्संबंधीं माहिती मिळविण्यास मला बराच उशीर लागला. इतकेंच नव्हे, तर माहिती मिळण्यास पडत असलेल्या अडचणीमुळें हा लेख लिहून होतो कीं नाहीं, याचीहि शंका वाटूं लागली. इकडे विजापुरकरांकडून तगाद्याचीं पत्रें येऊं लागलीं; तेव्हां मी त्यांस वरील वस्तुस्थिति भीत भीतच कळविली. त्या पत्रावरून आरंभींचा माझा उत्साह कमी झालासें पाहून त्यांनीं, मिळेल त्या माहितीवर जमेल तसें लिहून पाठविण्याची सूचना ऊर्फ सवलत दिली. पुढें हा लेख मीं दोन हप्त्यांनीं त्यांचेकडे पाठविला. माझा पहिला हप्ता छापल्यानंतर मध्यंतरीं मला सवड देण्याकरितां त्यांनीं याच विषयावरील कै० दामले यांचा एक लेख छापला. नंतर माझा दुसरा हप्ता छापला. ही हकीकत येथें विस्तारानें देण्याचें कारण असें कीं, त्यांत कै० अण्णासाहेबांच्या नियतकर्तव्यांपैकीं एकाचें दिग्दर्शन होत आहे.

## २४. ग्रंथमाला

ग्रंथमालेवर जें ब्रीदवाक्य कै० अण्णासाहेबांनीं घातलें होतें त्यांत 'स्वदेश, स्वधर्म, स्वभाषादिकांचा। जगीं मान व्हावा असा हेतु साचा॥' असा उल्लेख होता. यांतील स्वभाषेच्या अभिवृद्धिकरितां त्यांनीं ग्रंथमाला चालविली असून आधुनिक सुशिक्षित व पदवीधर लोकांनीं मराठी भाषेचा अभिमान बाळगून तींत ग्रंथरचना करावी अशी त्यांची उत्कट इच्छा होती. पण दुर्दैवानें त्या वेळीं आधुनिक पदवीधर मराठी भाषेचा व्यासंग नीट करीत नसल्यामुळें व त्यांचें लिहिणें, बोलणें व विचार करणें हें प्रायः इंग्रजींतच चालू असल्यामुळें, या लोकांच्या हातून मराठींत स्वतंत्र, ओजस्वी अशी ग्रंथरचना क्वचितच होत असे. त्यांची अशी स्थिति असल्यामुळें त्यांनीं केलेलीं इंग्रजी ग्रंथांचीं ग्रंथमालेंतून प्रसिद्ध होणारीं भाषांतरें नीरस व रूक्ष असत व त्याबद्दल विजापुरकरांस टीकाही सहन करावी लागे. मुंबईस प्रसिद्ध होणाऱ्या तत्कालीन 'सरस्वतीमंदिरा'तून यासंबंधीं त्यांचेवर टीका

करण्याचा प्रसंग प्रस्तुत लेखकासहि आलेला आहे. परंतु या सर्व टीका ते सहन करून पदवीधर लोकांची मराठी लिहिण्याकडे प्रवृत्ति व्हावी म्हणून त्यांस सतत उत्तेजन देत असत. यासंबंधानें मजबरोबर झालेल्या खासगी संभाषणांत ते ह्मणत कीं, "तुमच्यासारख्या कांहीं बिनपदवीधरांनीं मराठी भाषेची चांगली सेवा केली व चालविली आहे हें मी जाणतों व आधुनिक सुशिक्षितांस नीट मराठी लिहितां येत नाहीं हेंही मला समजतें; पण उत्तरोत्तर आपल्या समाजांत आधुनिक सुशिक्षितांची वाढ होऊन सर्व बाबतींत पुढारीपणा त्यांचेकडेच येण्याचा संभव असल्यामुळें या लोकांमध्यें मराठी भाषेचा व स्वदेशी वाङ्मयाचा अभिमान उत्पन्न करणें व त्याचें प्रदर्शन करण्यास योग्य क्षेत्र तयार करणें जरूर आहे आणि ग्रंथमालेचा जन्म त्याकरितांच आहे. हे लोक चांगलें मराठी लिहूं शकत नाहींत, म्हणून जर त्यांची उपेक्षा केली तर मराठीकडे ते मुळींच लक्ष देणार नाहींत. सध्यांच पहाना; बहुतेक ठळक पदवीधरांस लेख लिहिण्याविषयीं मी विनंति करितों व कांहीं चटकन् कबूलही करितात; पण प्रत्यक्ष लिहून पाठविणारे फार थोडे निघतात. एकदां या लोकांची वृत्ति इकडे वळली म्हणजे पुष्कळ लोक या व्यवसायांत मन घालतील आणि मग स्वतंत्र, ओजस्वी व तेजस्वी ग्रंथ किंवा लेखही आपोआप त्यांच्यापैकीं कांहींजण लिहूं लागतील." सारांश प्रारंभीं कित्येक वर्षें त्यांनीं लोकापवाद व टीका सहन करून आधुनिक सुशिक्षित लोकांस मराठी भाषेंत तरबेज होण्याचें साधन म्हणूनच 'ग्रंथमाला' मासिक चालविलें. पुढें रा. **विसूभाऊ राजवाडे** यांच्या ऐतिहासिक खंडांच्या प्रस्तावना जेव्हां **ग्रंथमालेंत** प्रसिद्ध होऊं लागल्या तेव्हां मात्र त्या मासिकाचें महत्त्व व चित्ताकर्षकताहि वाढूं लागली. राजवाड्यांच्या प्रस्तावनांनीं ऐतिहासिक, राजकीय व सामाजिक विचारांचे बाबतींत विलक्षण प्रकारची लोकजागृति केली. त्यांच्या ऐतिहासिक पत्रांकडे त्या वेळीं फारसें कोणी पाहात नसे. बहुधा हीं पत्रें छापलेलीं ग्रंथमालेचीं पानें कोणीं वाचीतही नसे (फार्म फोडीत नसे); परंतु त्यांची प्रस्तावना आली कीं, वाचकांच्या त्यावर उड्या पडत. मी स्वतः **ग्रंथमाला** घेत होतों व मुंबईस आंग्र्यांच्या वाडींत मी रहात असतांना कॉलेजांतील वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांच्या व इतर मार्मिक वाचकांच्या हाताळण्यानें प्रस्तावना असलेले ग्रंथमालेचे अंक किती खराब होत असत याची मला अद्यापि चांगली आठवण आहे. महाराष्ट्रांत हल्लीं

सुप्रसिद्ध असलेले जोशीबंधु ( नारायण मल्हार व वामन मल्हार ) हे त्या वेळीं माझ्या शेजारीं राहात असून राजवाड्यांच्या प्रस्तावनेचे ते मार्मिक वाचक होते. पुढें हळूहळू ग्रंथमालेंत कांहीं स्वतंत्र लेखही येऊं लागले व विजापुरकरांचा मूळ हेतु सफळ होण्याच्या मार्गास लागला. इतक्यांत कोल्हापुरास वेदोक्तप्रकरण उद्भवून व राजकीय वातावरण क्षुब्ध होऊन विजापुरकरांवर व ग्रंथमालेवर महाराजांची अवकृपा झाली व ग्रंथमालेला महाराजांकडून मिळणारी वार्षिक ५०० रुपयांची देणगी बंद झाली. तरी देखील अण्णासाहेबांनीं ग्रंथमाला कांहीं काल स्वतःच्या हिंमतीवर चालविली. इतकेंच नव्हे, तर श्री०वामन मल्हार जोशी यांच्या साह्यानें 'विश्ववृत्त' नामक स्वतंत्र विचार प्रदर्शित करणारें दुसरें एक मासिक काढलें. ग्रंथमाला हें मुख्यतः वाङ्मयात्मक मासिक होतें.

## २५. आधुनिक तुकाराम

इ० सन १९०५ सालच्या अखेरीस मीं मुंबई सोडून सातार्‍यास वर्तमानपत्राचें काम करण्यासाठीं गेलें; तत्पूर्वी कोल्हापुरास जाणें घडलें तेव्हां अण्णांचें साक्षात् दर्शन घडलें; तोंपर्यंत त्यांचा माझा परिचय अथवा स्नेह पत्रोपत्रींच होता. त्यांची तीं साधी, प्रशांत मुद्रा व अस्खलित मृदु वाणी पाहून मी त्यांना मनांतल्या मनांत आधुनिक '**तुकारामा**'ची उपमा दिली व ती सार्थ होती असें पुढें त्यांचा दृढ परिचय झाल्यावर स्वतःच्या व इतरांच्याही अनुभवानें सिद्ध झालें. या भेटीपूर्वी त्यांचेविषयीं माझा थोडासा प्रतिकूल ग्रह झाला होता. तो असाः—देवांच्या टीकेला मी दिलेलें उत्तर त्यांनीं छापल्यावर पुनः राजश्री देवांचें प्रत्युत्तर त्यांनीं छापलें. या प्रत्युत्तरांत नवीन मुद्दा कांहीं नव्हता; पण शब्दावडंबर फार माजविलेलें असून आणखी कांहीं लागट व कुत्सिक व्यक्तिविषयक मजकूर होता. म्हणून त्यास प्रत्युत्तर देण्याच्या तयारीनें मीं अण्णांना पत्र पाठविलें; पण त्याचें उत्तर असें आलें कीं, ' मूळ टीकाकारास प्रत्युत्तराचा हक्क आहे तो बजावण्याचा त्याचा आग्रह दिसल्यामुळें त्याचें प्रत्युत्तर छापलें. त्यांत खोडण्यासारखा नवीन कांहीं मुद्दा नाहीं; तरी आपल्यासारख्या मित्रांनीं जास्त आग्रह धरून व्यक्तिविषयक वाद न वाढवावा हें बरें. अण्णांचें हें उत्तर जरी सौम्य भाषेंत होतें तरी तें मला लपंडावाचें व मवाळपक्षाच्या मनोवृत्तीचें द्योतक आहे असें वाटल्यामुळें मीं त्यांजवर पक्षपाताचा आरोप करून फार कडक पत्र

सुप्रसिद्ध असलेले जोशीबंधु ( नारायण मल्हार व वामन मल्हार ) हे त्या वेळीं माझ्या शेजारीं राहात असून राजवाड्यांच्या प्रस्तावनेचे ते मार्मिक वाचक होते. पुढें हळुहळू ग्रंथमालेंत कांहीं स्वतंत्र लेखही येऊं लागले व विजापुरकरांचा मूळ हेतु सफळ होण्याच्या मार्गास लागला. इतक्यांत कोल्हापुरास वेदोक्तप्रकरण उद्भवून व राजकीय वातावरण क्षुब्ध होऊन विजापुरकरांवर व ग्रंथमालेवर महाराजांची अवकृपा झाली व ग्रंथमालेला महाराजांकडून मिळणारी वार्षिक ५०० रुपयांची देणगी बंद झाली. तरी देखील अण्णासाहेबांनीं ग्रंथमाला कांहीं काल स्वतःच्या हिंमतीवर चालविली. इतकेंच नव्हे, तर श्री० वामन मल्हार जोशी यांच्या साह्यानें **'विश्ववृत्त'** नामक स्वतंत्र विचार प्रदर्शित करणारें दुसरें एक मासिक काढलें. ग्रंथमाला हें मुख्यतः वाङ्मयात्मक मासिक होतें.

## २५. आधुनिक तुकाराम

इ० सन १९०५ सालच्या अखेरीस मीं मुंबई सोडून साताऱ्यास वर्तमानपत्राचें काम करण्यासाठीं गेलों; तत्पूर्वी कोल्हापुरास जाणें घडलें तेव्हां अण्णांचें साक्षात् दर्शन घडलें. तोंपर्यंत त्यांचा माझा परिचय अथवा स्नेह पत्रोपत्रींच होता. त्यांची तेजस्वी, प्रशांत मुद्रा व अस्खलित मृदु वाणी पाहून मी त्यांना मनांतल्या मनांत आधुनिक **'तुकारामा'** ची उपमा दिली व ती सार्थ होती असें पुढें त्यांचा दृढ परिचय झाल्यावर स्वतःच्या व इतरांच्याही अनुभवानें सिद्ध झालें. या भेटीपूर्वी त्यांचेविषयीं माझा थोडासा प्रतिकूल ग्रह झाला होता. तो असाः—देवांच्या टीकेला मी दिलेलें उत्तर त्यांनीं छापल्यावर पुनः राजश्री देवांचें प्रत्युत्तर त्यांनीं छापलें. या प्रत्युत्तरांत नवीन मुद्दा कांहीं नव्हता; पण शब्दावडंबर फार माजविलेलें असून आणखी कांहीं लागट व कुत्सिक व्यक्तिविषयक मजकूर होता. म्हणून त्यास प्रत्युत्तर देण्याच्या तयारीनें मीं अण्णांना पत्र पाठविलें; पण त्यांचें उत्तर असें आलें कीं, 'मूळ टीकाकारास प्रत्युत्तराचा हक्क आहे तो बजावण्याचा त्याचा आग्रह दिसल्यामुळें त्याचें प्रत्युत्तर छापलें. त्यांत खोडण्यासारखा नवीन कांहीं मुद्दा नाहीं; तरी आपल्यासारख्या मित्रांनीं जास्त आग्रह धरून व्यक्तिविषयक वाद न वाढवावा हें बरें. अण्णांचें हें उत्तर जरी सौम्य भाषेंत होतें तरी तें मला लपंडावाचें व मवाळपक्षाच्या मनोवृत्तीचें द्योतक आहे असें वाटल्यामुळें मीं त्यांजवर पक्षपाताचा आरोप करून फार कडक पत्र

लिहिलें; पण त्याचेंही उत्तर त्यांनीं अतीशय सौम्य व समजूत घालण्याच्या भाषेंत दिलें! त्या उत्तरामुळें पक्षपाताच्या आरोपांतून मीं त्यांची सुटका केली; पण ते मूळचेच मवाळ व गोखलेपंथीय असल्यामुळें त्यांच्यामध्यें लढाऊ धर्माची आवडच कमी म्हणून त्यांनीं वाद वाढविण्याचें नाकारलें असें मी समजून होतों. पण माझा हा ग्रह वरील भेटीच्या वेळीं दूर झाला. परिस्थितीमुळें त्यांच्या वृत्तींत फरक पडला म्हणा किंवा मूलतःच त्यांची वृत्ति मला त्या वेळीं दिसली व जी पुढेंही नेहमीं अनुभवास आली, तीच त्यांची मूळ वृत्ति होती म्हणा, मी जो त्यांना मवाळाप्रमाणें भित्रा समजत असें ती माझी समजूत पालटली व त्यांचें सौम्यपण हें भित्रेपणाचें द्योतक नसून समतोलपणाचें व गंभीर आणि शांतवृत्तीचें द्योतक आहे असें आढळून आलें. त्या दिवशीं त्यांना मी एका मित्राबरोबर सहज भेटावयास गेलों व बोलण्याच्या भरांत कालाचें भान न राहिल्यामुळें आमची गाडी चुकली. तेव्हां फिरून आम्हीं त्यांच्या घरीं ( शाहुपुरींत ) आलों व तेथें जेवणखाण करून मग साताऱ्यास निघून गेलों. गाडी चुकल्यामुळें जो वेळ सांपडला त्यांत त्यांच्याबरोबर अनेक विषयांवर व विशेषतः तत्कालीन राष्ट्रीय चळवळींवर आणि त्यांत पडलेल्या मोठमोठ्या व्यक्तींच्या गुणदोषांसंबंधानें मोठी मार्मिक व उद्बोधक अशी चर्चा आह्मीं केली आणि त्या योगानें त्यांच्या ज्ञानाची, धीरगंभीर व निग्रही स्वभावाची आणि साधुवृत्तीची मला चांगली ओळख पटली व तेथपासून आम्हां उभयतांमध्यें जें स्नेहाचें नातें उत्पन्न झालें तें अखेरपर्यंत कायम टिकलें. गु० विसूभाऊ राजवाडे यांचा व माझा स्नेहसंबंध यापूर्वीं जडलेला होता, ही गोष्ट अण्णांना ठाऊक असल्यामुळें रा० राजवाड्यांच्या कार्याविषयीं व स्वभावाविषयींहि पुष्कळ मनोरंजक संभाषण झालें.

श्री० राजवाड्यांना विनोदानें ते ‘ दुर्वासऋषि ’ म्हणत. आम्ही भेटावयास गेलों त्याच वर्षीं शाहुपुरींतील त्यांचें नवें दुमजली घर तयार होऊन त्यांत ते नुकतेच राहावयास गेले होते. हें घर त्यांनीं आम्हांस बरोबर घेऊन दाखविलें. माडीवरच्या एका निवांत दालनांत आह्मी येतांच ‘ ही जागा दुर्वासऋषींकरितां मुद्दाम राखून ठेविली आहे, त्यांची गांठ पडल्यावर त्यांना इकडे लवकर येण्यास सांगा ’ असें ते म्हणाले. हें घर पुढें त्यांनीं आपला एकुलता एक मुलगा वारल्यावर विकून टाकलें.

सुप्रसिद्ध असलेले जोशीबंधु ( नारायण मल्हार व वामन मल्हार ) हे त्या वेळीं माझ्या शेजारीं राहात असून राजवाड्यांच्या प्रस्तावनेचे ते मार्मिक वाचक होते. पुढें हळुहळू ग्रंथमालेंत कांहीं स्वतंत्र लेखही येऊं लागले व विजापुरकरांचा मूळ हेतु सफळ होण्याच्या मार्गास लागला. इतक्यांत कोल्हापुरास वेदोक्तप्रकरण उद्भवून व राजकीय वातावरण क्षुब्ध होऊन विजापुरकरांवर व ग्रंथमालेवर महाराजांची अवकृपा झाली व ग्रंथमालेला महाराजांकडून मिळणारी वार्षिक ५०० रुपयांची देणगी बंद झाली. तरी देखील अण्णासाहेबांनीं ग्रंथमाला कांहीं काल स्वतःच्या हिंमतीवर चालविली. इतकेंच नव्हे, तर श्री०वामन मल्हार जोशी यांच्या साह्यानें 'विश्ववृत्त' नामक स्वतंत्र विचार प्रदर्शित करणारें दुसरें एक मासिक काढलें. ग्रंथमाला हें मुख्यतः वाङ्मयात्मक मासिक होतें.

## २५. आधुनिक तुकाराम

इ० सन १९०५ सालच्या अखेरीस मीं मुंबई सोडून साताऱ्यास वर्तमानपत्राचें काम करण्यासाठीं गेलों; तत्पूर्वी कोल्हापुरास जाणें घडलें तेव्हां अण्णांचें साक्षात् दर्शन घडलें. तोंपर्यंत त्यांचा माझा परिचय अथवा स्नेह पत्रोपत्रींच होता. त्यांची ती साधी, प्रशांत मुद्रा व अस्खलित मृदु वाणी पाहून मी त्यांना मनांतल्या मनांत आधुनिक '**तुकारामा**'ची उपमा दिली व ती सार्थ होती असें पुढें त्यांचा दृढ परिचय झाल्यावर स्वतःच्या व इतरांच्याही अनुभवानें सिद्ध झालें. या भेटीपूर्वी त्यांचेविषयीं माझा थोडासा प्रतिकूल ग्रह झाला होता. तो असा:—देवांच्या टीकेला मी दिलेलें उत्तर त्यांनीं छापल्यावर पुन: राजश्री देवांचें प्रत्युत्तर त्यांनीं छापलें. या प्रत्युत्तरांत नवीन मुद्दा कांहीं नव्हता; पण शब्दावडंबर फार माजविलेलें असून आणखी कांहीं लागट व कुत्सिक व्यक्तिविषयक मजकूर होता. म्हणून त्यास प्रत्युत्तर देण्याच्या तयारीनें मीं अण्णांना पत्र पाठविलें; पण त्याचें उत्तर असें आलें कीं, ' मूळ टीकाकारास प्रत्युत्तराचा हक्क आहे तो बजावण्याचा त्याचा आग्रह दिसल्यामुळें त्याचें प्रत्युत्तर छापलें. त्यांत खोडण्यासारखा नवीन कांहीं मुद्दा नाहीं; तरी आपल्यासारख्या मित्रांनीं जास्त आग्रह धरून व्यक्तिविषयक वाद न वाढवावा हें बरें. अण्णांचें हें उत्तर जरी सौम्य भाषेंत होतें तरी तें मला लपंडावाचें व मवाळपक्षाच्या मनोवृत्तीचें द्योतक आहे असें वाटल्यामुळें मीं त्यांजवर पक्षपाताचा आरोप करून फार कडक पत्र

लिहिलें; पण त्याचेंही उत्तर त्यांनीं अतीशय सौम्य व समजूत घालण्याच्या भाषेंत दिलें! त्या उत्तरामुळें पक्षपाताच्या आरोपांतून मीं त्यांची सुटका केली; पण ते मूळचेच मवाळ व गोखलेपंथीय असल्यामुळें त्यांच्यामध्यें लढाऊ धर्माची आवडच कमी म्हणून त्यांनीं वाद वाढविण्याचें नाकारलें असें मी समजून होतों. पण माझा हा ग्रह वरील भेटीच्या वेळीं दूर झाला. परिस्थितीमुळें त्यांच्या वृत्तींत फरक पडला म्हणा किंवा मूलतःच त्यांची वृत्ति मला त्या वेळीं दिसली व जी पुढेंही नेहमीं अनुभवास आली, तीच त्यांची मूळ वृत्ति होती म्हणा, मी जो त्यांना मवाळाप्रमाणें भित्रा समजत असें ती माझी समजूत पालटली व त्यांचें सौम्यपण हें भित्रेपणाचें द्योतक नसून समतोलपणाचें व गंभीर आणि शांतवृत्तीचें द्योतक आहे असें आढळून आलें. त्या दिवशीं त्यांना मी एका मित्राबरोबर सहज भेटावयास गेलों व बोलण्याच्या भरांत कालाचें भान न राहिल्यामुळें आमची गाडी चुकली. तेव्हां फिरून आम्हीं त्यांच्या घरीं ( शाहुपुरींत ) आलों व तेथें जेवणखाण करून मग सातार्‍यास निघून गेलों. गाडी चुकल्यामुळें जो वेळ सांपडला त्यांत त्यांच्याबरोबर अनेक विषयांवर व विशेषतः तत्कालीन राष्ट्रीय चळवळींवर आणि त्यांत पडलेल्या मोठमोठ्या लोकांच्या गुणदोषांसंबंधानें मोठी मार्मिक व उद्बोधक अशी चर्चा आम्हीं केली आणि त्या योगानें त्यांच्या ज्ञानाची, धीरगंभीर व निग्रही स्वभावाची आणि साधुवृत्तीची मला चांगली ओळख पटली व तेथपासून आम्हां उभयतांमध्यें जें स्नेहाचें नातें उत्पन्न झालें तें अखेरपर्यंत कायम टिकलें. गु० विसूभाऊ राजवाडे यांचा व माझा स्नेहसंबंध यापूर्वीं जडलेला होता, ही गोष्ट अण्णांना ठाऊक असल्यामुळें रा० राजवाड्यांच्या कार्याविषयीं व स्वभावाविषयींहि पुष्कळ मनोरंजक संभाषण झालें.

श्री० राजवाड्यांना विनोदानें ते ‘ दुर्वासऋषि ’ म्हणत. आम्ही भेटावयास गेलों त्याच वर्षीं शाहुपुरींतील त्यांचें नवें दुमजली घर तयार होऊन त्यांत ते नुकतेच राहावयास गेले होते. हें घर त्यांनीं आम्हांस बरोबर घेऊन दाखविलें. माडीवरच्या एका निवांत दालनांत आम्ही येतांच ‘ ही जागा दुर्वासऋषींकरितां मुद्दाम राखून ठेविली आहे, त्यांची गांठ पडल्यावर त्यांना इकडे लवकर येण्यास सांगा ’ असें ते म्हणाले. हें घर पुढें त्यांनीं आपला एकुलता एक मुलगा वारल्यावर विकून टाकलें.

## २६. अण्णांचा रामदासी बाणा

कोल्हापुरास कांहीं स्नेह्यांच्या मदतीनें या वेळीं त्यांनीं ' सदर्न मराठा बँक ' नांवाची एक देशी बँक ऊर्फ पेढी चालविली होती; तिजसंबंधानेंहि त्यांनीं मला व मजबरोबरच्या माझ्या सोबत्यास बरीच माहिती सांगितली. त्यांच्या त्या वेळच्या संभाषणावरून माझी खात्री झाली कीं, कोल्हापुरांतील सर्व प्रकारच्या राष्ट्रीय चळवळींचे ते एक सूत्रधार व आधारस्तंभ असून मितभाषी पण संघटनाकुशल असे पुढारी आहेत. त्या वेळच्या जहाल व मवाळ या दोन्ही पक्षांतील पुढाऱ्यांच्या मनांत त्यांचेविषयीं आदर असे. त्यांची वृत्ति व स्वभाव सौम्य साधुपुरुषाप्रमाणें असल्यानें ते मवाळपक्षाचे असावेत असा सकृद्दर्शनीं भास होत असे; पण निकट परिचय झाल्यानंतर त्यांचें बाह्यरूप मवाळ पण अंतःकरण चिवट राष्ट्रीय बाण्याचें असल्याबद्दल खात्री होत असे. फुकाची वाचाळता न करितां सावधपणें कार्य करीत असावें हा खरा रामदासी बाणा त्यांचे अंगीं मुरला होता. रामदासांच्या कार्याचें व तत्त्वज्ञानाचें उद्घाटन मीमांसक पद्धतीनें रा० राजवाडे यांनींच ग्रंथमालेंतून प्रथम केलें व त्यामुळेंच धुळ्याचे रा० शंकरराव देव यांना रामदासी वाङ्मय शोधून काढण्याची स्फूर्ति झाली. पण मला वाटतें रामदासांचें हृद्गत राजवाडयांचा निबंध प्रसिद्ध होण्यापूर्वीच विजापुरकरांनीं जाणलें असावें. त्यांच्या इतका दासबोधाचा सूक्ष्म अभ्यास जाणिवेनें व चिकित्सक बुद्धीनें केलेला माणूस त्यांच्या काळीं क्वचित्च असेल. अध्यात्मिक दृष्टीनें दासबोधाचा अभ्यास करणारे त्यांच्याहूनही श्रेष्ठ पुरुष अनेक असतील; पण निष्काम कर्मयोगाच्या व अध्यात्माच्या दृष्टीनें दासबोध जाणणारे त्यांच्यासारखे लोक फारच क्वचित् सांपडतील. ह्या दोन्ही दृष्टींचा मिलाफ त्यांचे ठायीं झाल्यामुळें ते केवळ जडवादी चिकित्सक न होतां श्रद्धावान् चिकित्सक झाले. त्यामुळें नास्तिकाची भूमिका त्यांच्या बुद्धीला आकलन करितां येई; पण ते स्वतः मात्र कधीं नास्तिक बनले नाहींत. परमेश्वरावर व खऱ्या संतांच्या अध्यात्मिक बळावर त्यांचा अखंड विश्वास होता. दासांच्या संघटनाचातुर्याचा व तज्जन्य कर्तबगारीचा त्यांचे मनावर इतका परिणाम झाला होता कीं, त्यांचें अनुकरण करण्याची सहज प्रवृत्ति त्यांचे अंगीं मुरून गेली होती. त्यांनीं काढलेलें समर्थविद्यालय हें याच सहज प्रवृत्तीचें फळ होतें. आपल्या देशाच्या सद्यःस्थितींत चरित्र्यवान्, शीलसंपन्न, बुद्धिवान्, धीट, सुविद्य अशा ब्रह्मचाऱ्यांचा समूह उत्पन्न

झाल्यावांचून देशोद्धाराचें कार्य व्हावयाचें नाहीं अशी त्यांची दृढ समजूत होती. व ती पुष्कळ अंशीं योग्य होती. समर्थ विद्यालयांतून असे लोक निपजावेत व निपजतील अशी त्यांची आकांक्षा होती. यासाठीं सदर विद्यालयांत येणारे विद्यार्थी व शिक्षक हे ब्रह्मचारी असावेत असा त्यांचा कटाक्ष असे. परिस्थितीच्या कठोरपणामुळें नवीन समर्थ विद्यालयांत त्यांचा कटाक्ष चालूं शकेना याबद्दल त्यांना वाईट वाटत असे, असें मरण्यापूर्वी एक वर्ष अगोदर प्रस्तुत लेखकाशीं त्यांची मुलाखत झाली तेव्हां त्यास कळून आलें. तथापि प्राप्त स्थितींत मूळ ध्येयाची जाणीव न बुजूं देण्याची ते शक्य तितकी पराकाष्ठा करीत.

## २७. वेदोक्त–प्रकरण

वेदोक्त-प्रकरणासंबंधीं व कोल्हापुरांतील राष्ट्रीय चळवळीसंबंधीं त्यांचें व माझें पुष्कळ बोलणें झालेलें आहे. तसेंच शाहूमहाराजांच्या अनेक कारस्थानांसंबंधींही त्यांच्याकडून मला भरपूर माहिती मिळालेली आहे; परंतु त्यासंबंधींची साग्र हकीकत प्रसिद्ध करण्याचा योग्य काल अद्याप आलेला नसल्यामुळें त्याविषयीं विशेष कांहीं न लिहितां एवढेंच सांगतों कीं, शाहूमहाराज विजापुरकरांची योग्यता पूर्णपणें जाणत होते व विजापूरकरही त्यांच्या कांहीं गुणांचें कौतुक करीत असत. शाहू हे फार महत्त्वाकांक्षी व अहंकारी असल्यामुळें त्यांना जेथें तेथें स्वतःचें महत्त्व स्थापन करण्याची हांव असे; त्यामुळें त्यांच्या अंगच्या कित्येक चांगल्या गुणांवर विरजण पडून ते सभोंवतालच्या मंडळींच्या कह्यांत गेले व बेताल बनले. त्यांच्या महत्त्वाकांक्षेला चेतवून स्वतःचा स्वार्थ साधणारे अनेक हुषार व मतलबी पण दुःशीलाचे लोक त्यांच्या भोंवतीं जमले होते व त्यांच्याशीं अनेक बाबतींत समरस झाल्यामुळें त्यांना आपल्या मर्जीविरुद्धही कित्येक गोष्टी उपरोक्त प्रभावळीची गट्टी कायम ठेवण्याकरितां कराव्या लागत असत. वेदोक्ताचें प्रकरण चिघळविण्यास ही भोंवतालची मंडळीच विशेषेंकरून कारणीभूत झाली. त्यांच्या राजवटीच्या प्रारंभीं ब्राह्मण मंडळींचें कोल्हापूरच्या राजकारणांत वर्चस्व व महत्त्व होतें आणि तें त्यांनीं आपल्या अंगच्या बौद्धिक गुणांवर संपादिलें होतें. शाहूमहाराज गादीवर येण्यापूर्वी कोल्हापुरगादीवरचे दोन महाराज दुर्दैवी निघाल्यानें राजघराण्याची इभ्रत पुष्कळ कमी झालेली होती. ती वाढविण्याची महत्त्वाकांक्षा शाहूसारख्या हुषार व तेजस्वी पुरुषाला उत्पन्न

व्हावी हें साहजिक आहे. परंतु या महत्त्वाकांक्षेच्या आड ब्राह्मण येतात अशी त्यांच्या सभोंवतालच्या कांहीं हीन संस्कृतीच्या व हीन कुलांतल्या खुषामती व स्वार्थी माणसांनीं त्यांची समजूत करून दिली व त्यांच्या बद-सल्ल्यास ते बळी पडल्यामुळें पुढें त्यांच्या हातून पुष्कळ चुका झाल्या. वेदोक्ताचा प्रश्न हा केवळ निमित्तमात्र झाला व तेंच जर त्यांचें खरें ध्येय असतें तर तो वाद मिटलाही असता; कारण विजापूरकरांनीं मला स्पष्ट सांगितलें आहे कीं त्यावेळच्या सुशिक्षित ब्राह्मण पुढाऱ्यांनीं महाराजांच्या घराण्याचा वेदोक्तपरंपरेचा हक्क मान्य केला होता. व महाराजांच्या इच्छे-नुसार संस्कारलोपामुळें त्यांच्या घराण्यांतील पुरुषांनींच गमावलेला तो हक्क महाराजांस देण्यास ते तयार होते; पण संस्कारलोपाबद्दल शास्त्रोक्त प्रायश्चित्त-विधि करणें व त्यास काशी आदिकरून प्रमुख ठिकाणच्या विद्वान् ब्राम्हणांची संमति मिळवणें जरूर असल्यामुळें तें घडवून आणीतोंपर्यंत थोडा काल सबुर करण्याबद्दल महाराजांस त्यांनीं विनंति केली; परंतु त्यांच्या उपरोक्त प्रभा-वळींतील बदसल्लागारांच्या चिथावणीमुळें ती त्यांनीं मानली नाहीं; त्यामुळें दुफळी होऊन कोल्हापुरांत दोन तट माजले व तज्जन्य अभिमानामुळें महाराज इरेस पेटून सर्वस्वीं वरील प्रभावळीच्या हातीं गेले. अर्थात् त्या-नंतरचीं त्यांचीं बहुतेक कृत्यें ह्या प्रभावळींतील मंडळींच्या इच्छेनें व प्रेरणेनें घडून आलेलीं आहेत. ह्या कृत्यांना व महाराजांच्या हेतूला उदात्तपणाचा व उदारपणाचा आणि मागासलेल्या वर्गाविषयींच्या दयार्द्रभावनेचा उठावदार रंग प्रो०लठ्ठे यांनीं शक्य तितका दिलेला आहे. परंतु त्या भपकेदार गुण-वर्णनांतूनही सूक्ष्म दृष्टीला शंकास्पद स्थानें आढळून येतातच. महाराज जर याप्रमाणें सर्वस्वीं इरेला पडून वरील प्रकारच्या लोकांच्या हातीं गेले नसते तर त्यांच्या अंगच्या कित्येक चांगल्या गुणांचा भरपूर विकास होऊन राष्ट्रो-न्नतीच्या दृष्टीनें त्यांची कारकीर्द अधिक यशस्वी व कर्तृत्वसंपन्न झाली असती असा विजापुरकरांचा अभिप्राय होता. महाराजांच्या हातून कित्येक चांगलीं कृत्यें झालीं असल्याचें त्यांना मान्य होतें. पण हीं कृत्यें त्यांतील चांगुलपणाच्या हव्यासामुळें झालेलीं आहेत कीं वाईट कृत्यांवर पांघरूण घाल-ण्याकरितां झालेलीं आहेत हें ठरविणें कठीण आहे असें त्यांचें मत होतें.

**२८. ' आधीं राजकीय सुधारणा कीं सामाजिक सुधारणा ? '**

हा वाद विजापुरकरांच्या पूर्ववयांत चालू होता. त्यांत त्यांच्या मनाचा ओढा

टिळकपक्षीय लोकांच्या मताकडेच होता. पण ते त्या पक्षांतील लोकांप्रमाणें सामाजिक सुधारणेला विरोध करणारे किंवा समाजसुधारकांवर तुटून पडणारे नव्हते. त्यांचा स्वभाव मूळचा मृदु असल्यामुळें व वृत्ति समतोल असल्यामुळें उभय पक्षांशीं मिळून मिसळून वागण्याचें धोरण अखेरपर्यंत त्यांना साधलें. व्यक्तिविषयक वाद व तज्जन्य तट हे राष्ट्रोन्नतीस अपकारक होत असल्याचें पाहून त्यांना फार वाईट वाटत असे व म्हणून असल्या वादांत ते स्वतः तर पडत नसतच, पण दुसऱ्यासही त्यांपासून परावृत्त करीत व शक्य तर दोन्ही पक्षांतील लोकांत मिसळून वादाची तीव्रता कमी करण्याचा प्रयत्न करीत असत. राष्ट्रकार्यांत संघटनाकौशल्य व मुत्सद्दीपणा या दोन गुणांवर त्यांचा विशेष कटाक्ष असे. तथापि तरुणांचा उत्साह व भावनावशता किंबहुना उच्छृंखलपणा यांचा इतर मवाळ लोकांप्रमाणें उच्छेद करण्यास किंवा तेजोभंग करण्यास ते कधींहि प्रवृत्त होत नसत. बोलणें नेमस्त असावें, पण कृति जोमाची असावी—मिळमिळीत असूं नये—असा त्यांचा दंडक होता. पुढाऱ्यांनीं तरुणांच्या उत्साहाचा व स्वार्थत्यागाच्या भावनेचा आपल्या चळवळीच्या कामीं नुसता फायदा घेण्याचेंच धोरण न ठेवतां त्या चळवळीस पोषक होईल अशा रीतीनें त्यांच्या उत्साहास व स्वार्थत्यागास इष्ट तें वळण लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें त्यांचें मत होतें. त्यांची स्वतःची वर्तणूक अशाच प्रकारची असे. त्यांच्या संघटनाचातुर्याबद्दल व मुत्सद्दीपणाच्या धोरणासंबंधीं गुरुवर्य वि. का. राजवाडे (इतिहाससंशोधक) यांनीं मजजवळ अनेकदां प्रशंसोद्गार काढलेले आहेत. पहिल्या प्रतीच्या बुद्धिवानांत त्यांची गणना होत नसे. पण चिकाटीनें कार्य करणारे (Man of perseverence and tenacity), धोरणी, व उत्कट देशाभिमानी अशी त्यांची ख्याति असे.

लेखक—त्र्यं. भ. खेडगीकर, वाङ्मयविशारद, (मुंबई)

## २९. खादीभक्त विजापूरकर

समर्थ विद्यालय व प्रो० अण्णासाहेब विजापूरकर यांचें नांव बऱ्याच वर्षांपासून ऐकत आलों होतों. त्यांतच १९२१ सालीं असहकारितेच्या वावटळींत सांपडून राष्ट्रीय शिक्षणाशीं यत्किंचित् संबंध आल्याकारणानें, त्यांच्या नांवाचा दृढपरिचय होऊन, एकवार तरी त्यांचें दर्शन घडावें अशी

प्रबळ इच्छा मनांत उत्पन्न झाली. प्रो० विजापूरकर यांना प्रथम पाहण्याचा सुयोग १९२१ सालच्या नोव्हेंबर-डिसेंबरच्या सुमारास अमळनेर येथें आला. खानदेश शिक्षण मंडळाच्या अमळनेर येथील राष्ट्रीय महाविद्यालयांत अध्ययन करीत असतां, शिक्षण-विषयक कांहीं बाबींचा उहापोह करण्याकरितां प्रो० विजापूरकर महाविद्यालयांत सकाळीं येणार अशी बातमी येऊन थडकली. जळगांवाहून अमळनेरास येणारी गाडी सकाळीं दहाचे सुमारास येते. मी व माझे कांहीं सहाध्यायी स्टेशनवर हजर झालों होतों. इच्छा ही कीं, प्रोफेसरसाहेबांचें शक्य तितक्या लवकर दर्शन व्हावें. आमची कल्पना अशी कीं, प्रो० विजापूरकर ही असामान्य व्यक्ति म्हणून प्रसिद्ध, तेव्हां त्यांच्या पेहेरावांत निदान चेहऱ्यावर तरी कांहीं असामान्यत्व दृग्गोचर व्हावें कीं, ज्यामुळें बहुजनसमाजांतून त्यांना अचुक हुडकून काढतां येईल. परंतु प्लॅटफॉर्मच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत तीन चार येरझारा केल्या; डब्यांतून उतरणाऱ्या प्रत्येक प्रवाशाकडे निरखून, न्याहाळून पाहिलें. पण प्रो. विजापुरकरांचा ठावठिकाणा लागेना. शेवटीं ते आलेच नाहींत ह्या समजुतीनें आम्ही महाविद्यालयांत परत आलों. दुपारीं बाराचे सुमारास प्रो. विजापूरकर ह्यांची स्वारी महाविद्यालयांत प्रविष्ट झालेली पाहून आम्ही सर्व चकित झालों. चौकशीअंतीं आम्हांस पुढील माहिती मिळाली. प्रो. अण्णासाहेब गाडींतून जे उतरले ते थेट प्लॅटफॉर्मवरील नळावर गेले, शौच्यादि विधि, उरकून स्नानसंध्यादि नित्यकर्मे आटोपलीं, प्लॅटफॉर्मवरच धोतराचें एक टोंक झाडाच्या फांदीला बांधून, दुसरें टोंक आपल्या हातांत धरून, त्यास झोंके देत देत, तें वाळविण्याचा उपक्रम चालू आहे, मुखानें मंत्रजप चाललाच आहे, अशा स्थितींत जीर्णकाय असे गृहस्थ आमच्या ओळखीच्या इसमास दिसले. ते भर थंडीचे दिवस होते, व अमळनेर येथील थंडी तर विशेषच त्रासदायक. अशा स्थितींत थंड पाण्यानें मोकळ्या जागीं स्नान करून, उघड्या अंगानें तासभर धोतर-व तेंही जाडया भरडया खादीचें वाळविणाऱ्या प्राण्याची त्यास कींव आली व त्यानें सहानुभूतीच्या स्वरानें आपण कोण, काय, वगैरे औपचारिक प्रश्न केले. तेव्हां 'प्रो. विजापूरकर हे आपणच, व आपणांस महाविद्यालयांत जावयाचें आहे, कृपा करून त्याचा पत्ता सांगा' वगैरे भाषण त्यांनीं केलें. आमच्या सहाध्यायानें त्यांस महाविद्यालयांत आणलें हें सांगणें नकोच. वरील एकाच हकीकतीवरून प्रो. विजा-

प्रबळ इच्छा मनांत उत्पन्न झाली. प्रो० विजापूरकर यांना प्रथम पाहण्याचा सुयोग १९२१ सालच्या नोव्हेंबर-डिसेंबरच्या सुमारास अमळनेर येथें आला. खानदेश शिक्षण मंडळाच्या अमळनेर येथील राष्ट्रीय महाविद्यालयांत अध्ययन करीत असतां, शिक्षण-विषयक कांहीं बाबींचा उहापोह करण्याकरितां प्रो० विजापूरकर महाविद्यालयांत सकाळीं येणार अशी बातमी येऊन थडकली. जळगांवाहून अमळनेरास येणारी गाडी सकाळीं दहाचे सुमारास येते. मी व माझे कांहीं सहाध्यायी स्टेशनवर हजर झालों होतों. इच्छा ही कीं, प्रोफेसरसाहेबांचें शक्य तितक्या लवकर दर्शन व्हावें. आमची कल्पना अशी कीं, प्रो० विजापूरकर ही असामान्य व्यक्ति म्हणून प्रसिद्ध, तेव्हां त्यांच्या पेहेरावांत निदान चेहऱ्यावर तरी कांहीं असामान्यत्व दृग्गोचर व्हावें कीं, ज्यामुळें बहुजनसमाजांतून त्यांना अचुक हुडकून काढतां येईल. परंतु प्लॅटफॉर्मच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत तीन चार येरझारा केल्या; डब्यांतून उतरणाऱ्या प्रत्येक प्रवाशाकडे निरखून, न्याहाळून पाहिलें. पण प्रो. विजापुरकरांचा ठावठिकाणा लागेना. शेवटीं ते आलेच नाहींत ह्या समजुतीनें आम्ही महाविद्यालयांत परत आलों. दुपारीं बाराचे सुमारास प्रो. विजापूरकर ह्यांची स्वारी महाविद्यालयांत प्रविष्ट झालेली पाहून आम्ही सर्व चकित झालों. चौकशीअंतीं आम्हांस पुढील माहिती मिळाली. प्रो. अण्णासाहेब गाडींतून जे उतरले ते थेट प्लॅटफॉर्मवरील नळावर गेले, शौच्यादि विधि, उरकून स्नानसंध्यादि नित्यकर्में आटोपलीं, प्लॅटफॉर्मवरच धोतराचें एक टोंक झाडाच्या फांदीला बांधून, दुसरें टोंक आपल्या हातांत धरून, त्यास झोके देत देत, तें वाळविण्याचा उपक्रम चालू आहे, मुखानें मंत्रजप चाललाच आहे, अशा स्थितींत जीर्णकाय असे गृहस्थ आमच्या ओळखीच्या इसमास दिसले. ते भर थंडीचे दिवस होते, व अमळनेर येथील थंडी तर विशेषच त्रासदायक. अशा स्थितींत थंड पाण्यानें मोकळ्या जागीं स्नान करून, उघड्या अंगानें तासभर धोतर-व तेंही जाड्या भरड्या खादीचें वाळविणाऱ्या प्राण्याची त्यास कींव आली व त्यानें सहानुभूतीच्या स्वरानें आपण कोण, काय, वगैरे औपचारिक प्रश्न केले. तेव्हां ' प्रो. विजापूरकर हे आपणच, व आपणांस महाविद्यालयांत जावयाचें आहे, कृपा करून त्याचा पत्ता सांगा ' वगैरे भाषण त्यांनीं केलें. आमच्या सहाध्यायानें त्यांस महाविद्यालयांत आणलें हें सांगणें नकोच. वरील एकाच हकीकतीवरून प्रो. विजा-

प्रबळ इच्छा मनांत उत्पन्न झाली. प्रो० विजापूरकर यांना प्रथम पाहण्याचा सुयोग १९२१ सालच्या नोव्हेंबर-डिसेंबरच्या सुमारास अमळनेर येथें आला. खानदेश शिक्षण मंडळाच्या अमळनेर येथील राष्ट्रीय महाविद्यालयांत अध्ययन करीत असतां, शिक्षण–विषयक कांहीं बाबींचा उहापोह करण्याकरितां प्रो० विजापूरकर महाविद्यालयांत सकाळीं येणार अशी बातमी येऊन थडकली. जळगांवाहून अमळनेरास येणारी गाडी सकाळीं दहाचे सुमारास येते. मी व माझे कांहीं सहाध्यायी स्टेशनवर हजर झालों होतों. इच्छा ही कीं, प्रोफेसरसाहेबांचें शक्य तितक्या लवकर दर्शन व्हावें. आमची कल्पना अशी कीं, प्रो० विजापूरकर ही असामान्य व्यक्ति म्हणून प्रसिद्ध, तेव्हां त्यांच्या पेहेरावांत निदान चेहऱ्यावर तरी कांहीं असामान्यत्व दृग्गोचर व्हावें कीं, ज्यामुळें बहुजनसमाजांतून त्यांना अचुक हुडकून काढतां येईल. परंतु प्लॅटफॉर्मच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत तीन चार येरझारा केल्या; डब्यांतून उतरणाऱ्या प्रत्येक प्रवाशाकडे निरखून, न्याहाळून पाहिलें. पण प्रो. विजापुरकरांचा ठावठिकाणा लागेना. शेवटीं ते आलेच नाहींत ह्या समजुतीनें आम्ही महाविद्यालयांत परत आलों. दुपारीं बाराचे सुमारास प्रो. विजापूरकर ह्यांची स्वारी महाविद्यालयांत प्रविष्ट झालेली पाहून आम्ही सर्व चकित झालों. चौकशीअंतीं आम्हांस पुढील माहिती मिळाली. प्रो. अण्णासाहेब गाडींतून जे उतरले ते थेट प्लॅटफॉर्मवरील नळावर गेले, शौच्यादि विधि, उरकून स्नानसंध्यादि नित्यकर्में आटोपलीं, प्लॅटफॉर्मवरच धोतराचें एक टोंक झाडाच्या फांदीला बांधून, दुसरें टोंक आपल्या हातांत धरून, त्यास झोके देत देत, तें वाळविण्याचा उपक्रम चालू आहे, मुखानें मंत्रजप चाललाच आहे, अशा स्थितींत जीर्णकाय असे गृहस्थ आमच्या ओळखीच्या इसमास दिसले. ते भर थंडीचे दिवस होते, व अमळनेर येथील थंडी तर विशेषच त्रासदायक. अशा स्थितींत थंड पाण्यानें मोकळ्या जागीं स्नान करून, उघड्या अंगानें तासभर धोतर–व तेंही जाड्या भरड्या खादीचें वाळविणाऱ्या प्राण्याची त्यास कींव आली व त्यानें सहानुभूतीच्या स्वरानें आपण कोण, काय, वगैरे औपचारिक प्रश्न केले. तेव्हां ' प्रो. विजापूरकर हे आपणच, व आपणांस महाविद्यालयांत जावयाचें आहे, कृपा करून त्याचा पत्ता सांगा ' वगैरे भाषण त्यांनीं केलें. आमच्या सहाध्यायानें त्यांस महाविद्यालयांत आणलें हें सांगणें नकोच. वरील एकाच हकीकतीवरून प्रो. विजा-

पूरकर ह्यांच्या रोमरोमीं भिनलेली खडतर तपस्यावृत्ति स्पष्टपणें निदर्शनास येते. असामान्य सामान्यत्व हेंच त्यांच्या विभूतिमत्वाचें गमक होय इतकें लक्षांत येण्यासारख्या पक्कदशेला आमची बुद्धि पोंचली नव्हती.

लेखकः—**नीळकंठ शंकर नवरे,** बी. ए., बी. टी., ( सोलापूर )

## ३०, जेलर माझा विद्यार्थींच होता

गु० प्रो. विजापूरकर हे १९१२ सालीं तीन वर्षें सजा भोगून सुटून आल्यावर मी त्यांना तुरुंगांतील अनुभव विचारतां ते ह्मणाले, " मला तुरुंगांत मुळींच त्रास झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. बाकी मला साधीच कैद होती म्हणा ! कोल्हापुरीं तुरुंगांत असतां तेथील जेलर माझा विद्यार्थींच होता. शाळेंत असतांना मीं त्याला नादारी देवविली होती. तो मला अत्यंत प्रेमानें, आदरानें व कृतज्ञताबुद्धीनें वागवी. केळीं, संत्रीं वगैरे फळफळावळ तो मला आणून देत असे व फळांच्या साली तो खिशांत घालून नेत असे. दुसऱ्या एका ठिकाणीं जरासा कटु अनुभव आला. माझें अन्न घेऊन येणारा गृहस्थ ब्राह्मण नाहीं असें मला कळल्यावर मीं Protest केलें. मला वाल्मीकिरामायण वाचण्याची परवानगी मिळाली होती व मीं त्याचीं पारायणें केलीं. "

## ३१. आधीं फाशी मग चौकशी

परम गहन अशा संस्थानी सेवाधर्मांतून मुक्त झाल्यावर १९०६ सालीं अण्णांनीं ' विश्ववृत्त ' मासिक काढलें. तत्संबंधीं प्रश्न करतां ते म्हणाले, "विगत+श्ववृत्त–श्ववृत्ति, 'सेवा श्ववृत्तिराख्याता,' सेवावृत्ति गेल्याचें सूचक असें अन्वर्थक या मासिकाचें नामकरण केलें होतें. १९०८ सालीं या मासिकाचें संपादकत्व वामनरावांच्या ( प्रो० वामन मल्हार जोशी, रागिणीकर्ते) हवालीं करून मी समर्थ विद्यालयाचा प्रचार करण्यास जाण्याचा विचार करतों तोंच एक आकस्मिक संकट उद्भवलें व प्रचार करण्याऐवजीं मलाच तुरुंगाचा मार्ग सुधारावा लागला ! ज्या लेखामुळें हें संकट मजवर ओढवलें तो सातवळेकरांचा लेख काळा का गोरा मीं पाहिलाही नव्हता. ज्या अंकांत तो लेख प्रसिद्ध झाला, त्याच अंकांत मी वामनराव जोश्यांकडे संपादकत्व दिल्याचें जाहीरही केलें होतें. पण जजानें आधीं जजमेंट लिहिलें **व मग चौकशी केली ! म्हणतात ना, आधीं फाशी व मग चौकशी. "**

## ३२. अगदीं खाजगी डायरी

१९१५-१९१६ सालीं ' अण्णांची डायरी ' या मथळ्यानें सौ० वत्सलाबहिनींचें पत्र संदेशमध्यें आलें होतें. त्यांत पुढील मजकूर होता. ( १ ) ' नागपुरला XXXX यांच्या घरची स्वयंपाकीणबाई आमटींत तिखट फार घालते. ' ( २ ) ' परटानें उशिरां कपडे आणल्यामुळें वक्तशीरपणाबद्दल एका इंग्रजी पुस्तकांतील पॅरा त्याला वाचून दाखवून त्याचा मराठींत अर्थ सांगितला. ' या मजेदार विधानांच्या सत्यासत्यतेबद्दल त्यांना पृच्छा केल्यावर ते उद्गारले, ' हें खरें असलें म्हणून त्यांनीं असें प्रसिद्ध कां करावें ? '

## ३३. तपस्व्याची मूर्ती

अण्णांच्याबद्दल सर्व पक्षांच्या लोकांत आदर वसत होता, पण तो भीतियुक्त नव्हता. यामुळें लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांस त्यांच्यापाशीं निःशंकपणें व मनमोकळेपणानें बोलावयास मिळे, व आपण उच्च व सात्त्विक वातावरणांत वावरत आहोंत असेंच त्यांच्या पृच्छकास वाटे.

## ३४. महाराष्ट्राचा गांधी

अण्णांचें स्मरण झालें म्हणजे त्यांची निगर्वी, प्रेमळ, निःस्वार्थ, निरभिमान अशी साधीभोळी तपस्व्याची मूर्ति आपल्या मनश्चक्षूंसमोर उभी राहाते, व हा महाराष्ट्राचा महात्मा गांधीच होऊन गेला असें वाटतें ! Plain living and high thinking ' साधी राहाणी व उच्च विचारसरणी या तत्त्वाचे अण्णा हे आदर्शच होते ! विद्यार्थी भेटला कीं मग तो रस्त्यांत असो अगर आगगाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत असो, यांनीं आपण होऊनच त्याच्याशीं बोलणें सुरू करावें, तेव्हां या व्यक्तींचें कल्याण व्हावें अशा सदिच्छेनें व जिव्हाळ्यानेंच ते बोलत आहेत असें वाटे.

## ३५. बना शिक्षणानें स्वदेशी मनानें

बी. ए. च्या वर्गातील विद्यार्थ्यांना ते एकदां म्हणाले, ' LL. B. होऊन वकील व्हावयाचें असेल तर Honours Course कशाला घेतां ? Pass Course घेऊन आपला शक्तिपात तितकाच कमी होईल. एम्. ए. व्हावयाचें असेल तर गोष्ट निराळी ! हल्लींच्या शिक्षणक्रमानें पदवीविभूषित केवळ चिपाडें बनतात. युनिव्हर्सिटी सुरू झाल्यापासून मॅट्रिकमध्यें पहिला नंबर पटकावलेले विद्यार्थी भावी आयुष्यांत कितीसे पुढें आलेले आहेत ?

तरुण पिढीच्या आयुष्याचा बराचसा भाग निरुपयोगी शिक्षणांत फुकट जाऊन श्रमांच्या मानानें कांहींच चीज होत नाहीं. Science शिका; Milton नें Paradise Lost वाचून कांहीं पोट भरणार नाहीं. 'बना शिक्षणानें स्वदेशी मनानें' असा त्यांचा तरुण पिढीस उपदेश असे. सुट्टीच्या दिवसांत शाळा व कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं जवळपासच्या खेडेगांवीं जाऊन अशिक्षित बांधवांस लिहिणेंवाचणें शिकवून वर्तमानपत्रें वाचून दाखवावींत असें ते सांगत. अशा तऱ्हेची एक योजना १९१८ सालीं त्यांनीं प्रसिद्ध केली होती.

## ३६. नियम पाळलेच पाहिजेत

स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म या त्रयींचे ते यद्यपि कट्टे अभिमानी होते तरी ते मिशनऱ्यांच्या शाळेंतील व कालेजांतील विद्यार्थ्यांस त्या संस्थेंतील नियम दक्षतेनें पाळण्याचा कळकळीनें उपदेश करीत. 'तुम्ही Wilson कॉलेजांत असाल तर बायबलाचा तास चुकवूं नका व त्याकडे दुर्लक्ष्यही करूं नका. तुम्हांस आवडत नसेल तर त्या कॉलेजांत जातां कशाला?' असे उद्गार त्यांनीं विद्यार्थ्यांपाशीं काढलेले आहेत.

अण्णा संस्कृत व मराठी पद्यरचना करीत. मनाचे श्लोक त्यांचे आवडते असल्यामुळें 'भुजंगप्रयात' वृत्तांत जेवतां जेवतां ते तसेच नवीन श्लोक रचून म्हणत.

मात्र कांहीं कांहीं गोष्टींत त्यांचा दुराग्रह पाहून चमत्कारिक वाटे. साबुदाणा निषिद्ध आहे असें समजून समर्थविद्यालयांतील मुलांस एकादशीस साबुदाणा खाण्यास परवानगी नसे.

फर्ग्युसन कॉलेजच्या एका सेवानिवृत्त ( पेन्शनर ) प्रोफेसरांकडे अण्णा एकदां कांहीं कामानिमित्त गेले होते. 'प्रोफेसरसाहेब घरांत आहेत का' असा अण्णांनीं दारांत पाऊल ठेवून प्रश्न करतांच, प्रोफेसरसाहेबांच्या पत्नी 'हा कोणीतरी वृद्ध भटभिक्षुक आहे' असें समजून त्यांस वाटेस लावण्याच्या विचारांत होत्या, इतक्यांत माडीवरून प्रोफेसरसाहेबांनीं अण्णांचा आवाज ओळखला व ते खालीं येऊन आदरपूर्वक अण्णांना हातीं धरून माडीवर घेऊन गेले. मग एकच हंशा पिकला! ठेंगू मूर्ति, पाठीस पोंक आलेलें, चेहरा खंगलेला, हातांत पाढरी घोंगडी, अंगांत बंडी, हातांत साधी काठी इत्यादि

बाह्य वेषावरून अपरिचित माणसाच्या मनांत हा कोणीतरी अशिक्षित खेडवळ आहे' अशी भावना उत्पन्न होई.

### ३७. क्षयानें मेले तरी बेहत्तर !

' लोकशिक्षण ' मासिकाचे संपादक कै. ज. वि. ओक यांनीं उतार-वयांत प्रकृति अशक्त असतां १९१६ सालीं तृतीय विवाह केल्याचें वृत्त जेव्हां अण्णांच्या कानीं गेलें, तेव्हां त्याबद्दल आपली नापसंति व्यक्त करून ते मला म्हणाले, " काय म्हणतां ? डॉक्टरांच्या सल्ल्यावरून त्यांनीं लग्न केलें ? त्यापेक्षां क्षय होऊन मेले तरी बेहत्तर....." इतके अण्णा खवळले. एरवीं नाना ओकांबद्दल त्यांचे ठायीं अत्यंत आदर वसत होता. १९०० सालीं अण्णांचें कुटुंब निवर्तल्यावर तारुण्याच्या भर जवानींत असतांहि द्वितीय विवाहाचा विचार सुद्धां त्यांच्या मनास शिवला नाहीं. व कौटुंबिक आपत्तीचा असा परिणाम झाला कीं, त्यांचा सार्वजनिक कार्याचा व्याप वाढूं लागला.

### ३८. केसरीकारांची संभावना

ना. गोखल्यांशीं अण्णांचा बाळपणापासून स्नेह होता. १९१५ सालीं गोखल्यांच्या निधनापूर्वी थोडे दिवस त्यांच्या ( गोखल्यांच्या ) पत्राबद्दल वर्तमानपत्रांत वाद चालला होता. अण्णांनीं सद्भावनेनें एका वर्तमानपत्रांत गोखल्यांची बाजू उचलून धरून त्यांची वकिली करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां ' बीचमे मेरा चांदभाई ' अशा वेचक व बोचक शब्दांनीं केसरीकारांनीं त्यांची संभावना केली, हें अद्याप पुष्कळांच्या स्मरणांत असेलच.

### ३९. महात्मा गांधींचा निषेध !

स्वावलंबनाचें तत्त्व अण्णांच्या हाडीं मासीं पूर्ण भिनलें होतें. तथापि त्याचा अतिरेक झालेला त्यांना रुचत नसे. महात्मा गांधी अहमदाबादेस आपल्या आश्रमांत scavenger( हलालखोर )चें काम करतात, असें जेव्हां त्यांनीं ऐकलें, तेव्हां लागलीच या आमच्या महाराष्ट्रांतील गांधींनीं त्या गोष्टीचा निषेध केला.

### ४०. कामापुरतें इंग्रजी पुरे

सामान्य लोकांस कामापुरतें इंग्रजी आलें ह्मणजे बस्स, असें त्यांचें मत होतें. इंग्रजी शिकतांना स्पेलिंग ध्यानांत ठेवण्याची विद्यार्थ्यांना मोठी अडचण

पडते, म्हणून प्राथमिक अवस्थेंत विद्यार्थ्यांनीं इंग्रजी शब्द व वाक्यें मराठी मुळाक्षरांत लिहावींत असा त्यांनीं समर्थ विद्यालयांत प्रघात पाडला होता. ते असें म्हणत कीं, साहेब लोक नाहीं कां मराठी व संस्कृत वाक्यें इंग्रजी मुळाक्षरांत लिहीत, मग आमच्यावरच हा जुलूम कां ? मात्र डायरेक्ट मेथडवर त्यांचा पूर्ण विश्वास होता व विद्यालयांत ते स्वत: पहिली इयत्ता शिकवीत असत.

## ४१. शहरांत मुक्काम नको

पुण्यामुंबईस वस्तीस राहणें अण्णांस मुळींच आवडत नसे. कामानिमित्त पुण्यास अगर मुंबईस जाणें झाल्यास शक्य तर ते रात्रीच्या गाडीनें मुक्कामास तळेगांवीं परत येत. पुण्यास ते Servants of India Society मध्यें उतरत असत.

## ४२. नवीन काय तें पहा

तळेगांवीं दर मंगळवारीं रात्रीं विद्यार्थ्यांकडून केसरी समग्र वाचून घेत. एकदां नजर टाकल्यावर विद्यार्थ्यास नवीन जाहिरातहि चटकन् शोधून काढतां आली पाहिजे असें ते म्हणत.

## ४३. गीर्वाणवाणी शिका

मराठी जाणणारास संस्कृत भाषेंत प्रवेश करून घेण्यास फारच थोड्या व्याकरणज्ञानाची जरूर आहे, असें ते स्वानुभवानें सिद्ध करून दाखवीत. निधनापूर्वी कांहीं महिने त्यांनीं ' गीर्वाण-वाणी-सुलभ-प्रवेश ' नांवाचें एक लहानसें २ आणे किंमतीचें पुस्तक लिहिलें, व खेड्यापाड्यांतील लोकांस पत्रद्वारें संस्कृत शिकविण्याचा त्यांनीं उपक्रम केला होता. पत्रव्यवहाराच्या बाबतींत अण्णा अत्यंत दक्ष व वक्तशीर असत.

लेखक—के. ना. वाटवे, एम्. ए., ( पुणें. )

## ४४. भांडारकर माझे गुरुजी

एकदां आमच्याबरोबरचें कोणसें कै० डॉ० भाण्डारकरांबद्दल उणें अधिक बोललें. तें अण्णांच्या कानीं पडतांच ते म्हणाले, " कांहीं असो. भाण्डारकर माझे गुरुजी. त्यांच्याबद्दल माझ्या मनांत पूज्यभावावांचून विचारच

येत नाहीं. " असें म्हणून त्यांनीं त्यांच्या कसोशीनें शिकवण्याच्या व विद्यार्थ्यांशीं वागण्याच्या गोष्टी सांगितल्या. त्यांत एक गंमत अशी. प्रो० विजापूरकर यांचा व्याकरणविषय चांगला. त्यामुळें त्यांना कौमुदीचे पेपरांत सर्वांत अधिक गुण मिळाले. डॉ० भाण्डारकरांस कोल्हापुरकडील मंडळी विशेष आवडत. व या ' कोल्हापुऱ्या'ला अधिक मार्क मिळाल्याबद्दल तर त्यांना विशेष आनंद होऊन, पेपर हातांत घेऊन दुसऱ्या टर्मच्या पहिल्याच तासाला ते आले आणि म्हणाले, "Where is that Kolhapurian ? I want to pat him on the back." पण त्या दिवशीं हा चलाख " कोल्हापुऱ्या " हजर नव्हता ! ही हकीकत सांगून मोठ्या तजविजीनें त्यांनीं एक टिपणवही खिशांतून बाहेर काढली, व तींत लिहून ठेवलेला स्वकृत डॉ० भाण्डारकरांवरचा संस्कृत श्लोक मला मोठया भक्तीनें म्हणून दाखविला.

## ४५. ही धर्मग्रंथांची अशी थट्टा कां करितां ?

आपल्या जुन्या रूढींचें व विधिनिषेधांचें शक्य तों आधुनिक पद्धतीनें समर्थन करणें ही त्यांची प्रवृत्ति सहज कोणासही दिसून येण्यासारखी असे. एकदां मनुस्मृतीबद्दल बोलणें चाललें असतां मीं म्हटलें, " आमच्या कॉलेजांतील संस्कृतच्या प्रोफेसरांनीं तर एक मजाच केली. मनुस्मृतींत एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं ' ज्याला आयुष्य पाहिजे त्यानें अमुक दिशेस, ज्याला पुत्र पाहिजे त्यानें अमुक दिशेस, अशा निरनिराळया माणसांनीं निरनिराळया दिशांस तोंडें करून भोजनास बसावें'. या श्लोकावर एका विद्यार्थ्यानें शंका काढली 'सर, जर वरील सर्वच गोष्टी एकाच माणसास एकाच वेळीं पाहिजे असल्यास त्यानें काय करावें ?' पृच्छकाचा झोंक लक्षांत घेऊन आमचे थट्टेखोर प्रोफेसर ह्मणाले, ' अहो, त्यांत काय अवघड आहे ? कुंभाराच्या चाकासारखें फिरतें चाक करून त्यावर गिरक्या घेत जेवलें म्हणजे झालें ! ' पण माझ्या या गमतीच्या हकीगतीनें अण्णासाहेबांची करमणूक न होतां जरा त्रासानेंच ते ह्मणाले, " वाटवे, ही काय धार्मिक पुस्तकें शिकण्याची व शिकविण्याची रीत झाली ? या गोष्टींचें प्रत्यंतर कोणीं घेतलें तरी आहे ? त्यांत खास कांहीं अर्थ आहे. नुसती थट्टा करून काय कळणार ? " मग त्यांनीं तत्सदृश कांहीं विधींची उपपत्ति मला सांगितली.

## ४६. परवानगी आली

त्या वेळीं नवीन समर्थ विद्यालय निघण्याचें घाटत होतें. व त्यास परवाना मिळण्याची मोठ्या आतुरतेनें ते वाट पहात होते. एक दिवस मी त्यांचेकडे नित्याप्रमाणें जात असतां वाटेंतच ते व त्यांचे बंधु मला भेटले. मला पाहिल्याबरोबर लांबूनच ते ह्मणाले "वाटवे, परवानगी आली!" यावर त्यांचे बंधु त्यांस म्हणतात "अहो अण्णा, तुम्हांला आतां वेड लागणार, कितीदां तरी सांगतां? खालची उंचसखल जमीन तरी दिसते आहे ना?" या थट्टेनें त्यांच्या सरळ साध्या चेहऱ्यावर थोड्या सानंदहास्याची व थोड्या लज्जेची पुसट चमक मला दिसली. तें दृश्य विसरणें शक्य नाहीं.

## ४७. प्रदक्षिणा घालण्याची चाल

अण्णा वडगांवच्या मारुतीच्या देवळांत आले कीं मोठ्या भक्तिभावानें मूर्तीस अकरा (न चुकतां) प्रदक्षणा घालीत, मग तीन साष्टांग नमस्कार घालून डोळे मिटून कांहीं ध्यान करीत. 'प्रदक्षिणा घालण्याची चाल कां पडली असावी' असें विचारतां सांगत कीं 'कोणीकडून तरी भक्ताचें मन इतकें देवापाशीं रमतें कीं तेथून त्याला हालवत नाहीं, तो इकडेतिकडे जवळून हिंडत राहील, दारांत बसेल, शरण जाईल, पुन्हा मूर्ति लक्षांत आणील; त्यावरून थोड्या शिस्तीनें या गोष्टी प्रचारांत आल्या असाव्या!'

## ४८. लोकविलक्षण वागूं नका

कांहीं तरुण उगीच आपण अविवाहित राहणार असा संकल्प करून विरक्तीचा आव घालीत असतात. त्याबद्दल त्यांचें ह्मणणें पडे, "तें कांहीं वाईट नाहीं. पण सामान्य माणसांनीं लोकांतच राहावयाचें व लोकविलक्षण वागावयाचें हें कोणालाच बरें नाहीं. अविवाहित राहणारा तशाच कोटींतला व तशाच ध्येयाचा लागतो."

लेखक—प्रो० वा. म. जोशी, एम्. ए.

## ४९. खुनास मदत? कोणाचा खून?

माझ्यावर व विनायकराव जोशीराव यांचेवर 'खुनाला मदत' करण्याचा आरोप होता. आम्हांला या आरोपाची बातमी प्रथम तळेगांवासच वर्तमानपत्रांच्या द्वारें लागली. 'खुनाला मदत? कोणाचा खून? कोणीं

केव्हां कशी मदत दिली?' आम्हांला कोणाला कांहीं अर्थच कळेना. कांहीं तरी कोणीं कुभांड रचलें असावें असें मला वाटलें व थोडासा मी घाबरून गेलों, पण क्षणभरानें माझें मलाच हसूं आलें. कोणाचा खून करण्याचें स्वप्नांत देखील नाहीं, आणि हा असला आरोप तर ठेवलेला; तेव्हां आतां जगाच्या मूर्खत्वाकडे व दैवाच्या विचित्र लीलांकडे पाहून हंसावयाचें नाहीं तर काय करावयाचें? अस्तु, आम्ही कोल्हापुरास गेलों, तेथें रीतसर खटला सुरू झाला. त्या वेळेस मॅजिस्ट्रेट भास्करराव जाधव यांच्यापुढें 'कमिट' होण्याकरितां साक्षीपुरावा चालला असतां आमच्या वकिलांनीं (आपट्यांनीं) कोल्हापूरसरकारतर्फेचे वकील रा. कदम यांस आरोप काय आहे तो निश्चित स्वरूपांत सांगण्यास विनंति केली. ते अर्धवट अडखळत व अस्पष्ट स्वरांत म्हणाले, "कोल्हापूरसरकारच्या खुनास......मदत......"

"काय?" आमचे वकील म्हणाले, "कोल्हापूरसरकारच्या? गव्हर्नमेंटचा खून? 'सरकार' चा कसा खून करणार? बरें असो. मला शब्द लिहून घेऊं द्या. काय म्हणालेत—" कोल्हापूरसरकारचा खून......"

"हें पहा. हे वकील आम्हांला मध्येंच अडवितात." अशा आशयाचें कांहीं म्हणून कदम यांनीं आपलीं वाक्यें सुधारून घेऊन बोलण्यास सुरवात केली.

हाच मुद्दा स्पेशल सेशन्स जज्ज मिस्टर किंकेड यांनीं आपण होऊनच पुढें काढला. त्यांनीं कोल्हापूरसरकारतर्फेच्या बॅरिस्टरांना—ब्रॅन्सन् यांना—असें विचारलें कीं, तुमचें म्हणणें घटकाभर सगळें खरें धरलें, तरी कोणाचा खून झालेला नाहीं, इतकेंच नव्हे तर खून करण्याचा प्रयत्नही झालेला नाहीं, तेव्हां 'खुनाला मदत' देण्याचा आरोप कसा लागू पडणार? खून न होतां, किंवा प्रयत्नही नसतां, खुनाच्या उत्तेजनाचें कलम कसें लावावयाचें? यावर बॅरिस्टर ब्रॅन्सन् यांनीं अशी कोटी लढाविली, "समजा कीं एखादा मनुष्य एखाद्या जनसमूहावर गोळीबार करण्याची इच्छा करतो आहे. तो अर्थात् समूहांतील कोणाला तरी गोळी लागावी अशी इच्छा करणार. अमक्या मनुष्यालाच लागावी असा त्याचा हेतु असेलच असें नाहीं. कोणाचें नांवगांवहि त्याला ठाऊक नसेल. पोलिसांनाही कदाचित् नांवगांव मिळणार नाहीं. त्या मनुष्याची गोळी कोणास लागणार नाहीं,

किंवा गोळी उडालीच नाहीं किंवा त्यानें बंदुक झाडलीच नाहीं. तथापि खुनाची इच्छा सिद्ध झाल्यास तो गुन्हेगार होईल. तसेंच त्या मनुष्याला मदत करणाराहि गुन्हेगार होईल,—मग खून होवो किंवा न होवो, कोणाचा खून करावयाचा हें ठाऊक असो वा नसो.—"

किंकेड साहेबांना हा बॅरिस्टरी दाखला पटला किंवा नाहीं हें समजण्यास मार्ग नाहीं. एवढें मात्र मला म्हणतां येईल कीं तेहि चांगले डोकेबाज आहेत. कारण मूळ लेख वैदिक प्रार्थनांविषयींचा असून त्याचाच तेवढा विचार केला तर तो सोंवळा आहे हें त्यांनीं जरी आपल्या निकाल्यांत कबूल केलें तथापि " हा असा लेख विशिष्ट परिस्थितींत छापला हा दोषच समजला पाहिजे. " अशा आशयाचा शेरा त्यांनीं मारलाच !

## ५०. पन्हाळ्याचा पाहुणचार

झालें. शिक्षा झाली. अण्णांना तीन वर्षें साधी, मला तीन वर्षें सक्त मजुरी, विनायकरावांना दीड वर्षें सक्त मजुरी. प्रथम आम्ही दोन एक महिने कोल्हापूर जेलमध्यें होतों, नंतर आम्हांस पन्हाळ्यास पाठविण्यांत आलें. तेथें कांहीं दिवस पुस्तकें वगैरे वाचावयास मिळालीं, व इतरही कांहीं सवलती मिळाल्या, पण पोलिटिकल एजंटाच्या सांगीवरून ह्मणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणास्तव आमच्या सगळ्या सवलती एके दिवशीं काढून घेण्यांत आल्या व आह्मांला मिलिटरी ( फौजी ) पहाऱ्यांत ठेवण्यांत येऊन अत्यंत कडक शिस्तींत ठेवण्यांत आलें. अण्णा एका खोलींत व आम्ही दोघे एका खोलींत अशी व्यवस्था होती. अण्णांची खोली आमच्या खोलीला लागून होती. पहारेकरी आम्हांला अण्णांशीं बोलूं देत नसत. तेव्हां आम्हांला अशी भीति पडली कीं हें काय प्रकरण आहे आणि कोठल्या थरास जात आहे कोणास ठाऊक ? आम्ही दोघेजण एका खोलींत होतों तेव्हां आमचा वेळ कसा तरी जात असे. पण अण्णांना फारच त्रास झाला असला पाहिजे. विनायकरावांच्या का माझ्या डोक्यांत विचार आला कीं अगदीं शेजारीं असून एकमेकांशीं विचारविनिमय करतां येऊं नये हें कांहीं बरें नव्हे. कांहींतरी युक्ति शोधून काढलीच पाहिजे. भिंतीवर टिचक्या मारून अण्णांच्या खोलींत तारऑफिसांतल्या यंत्राप्रमाणें आवाज उत्पन्न करून त्यांच्याशीं बोलतां येईल अशी आमच्या दोघांत शक्कल निघाली. पण आमच्या खोलींतल्या

भिंतीवर हळू टिचकी मारून अण्णांच्या खोलींत आवाज उत्पन्न होईल किंवा नाहीं ही शंका डोकावूं लागली. तेव्हां प्रयोग लागलाच-रात्रीं ९ चे सुमारास-झाला. अण्णांच्या कानांवर टिचक्यांचा आवाज गेला, पण हा आवाज अर्थात् आपले सोबती करताहेत हें ओळखून त्यांनीं स्वस्थ बसावयाचें तें न करतां ते मोठ्यानें ह्मणाले, "कोण टिचक्या वाजवतंय् तें ? पहारेकरीबुवा, भिंतीवर कोण काय वाजवतंय् पहा !" या प्रकारामुळें आम्ही दोघे भांबावून गेलों. डोकीवरून घोंगडी घेऊन व झोंपेचें सोंग घेऊन आम्ही ती वेळ कशी तरी निभावून नेली. आमचा मूर्खपणाच होता सगळा, कारण अण्णांना आम्हांला गुप्त रीतीनें असें काय सांगावयाचें होतें कीं याकरितां आम्हीं अशी युक्ति योजून ठेवावी ! रिकामा न्हावी कुठें तरी तुंबड्या लावतो त्यांतलाच खुळा प्रकार होता तो. पण अण्णांचा भोळेपणा किती तो पहा. भिंतीवर टिचक्या मारणारे आमच्याहून इतर कोणी असणें शक्य नाहीं हें त्यांच्या ध्यानांत आलेंच नाहीं ! असल्या त्या भोळ्या ब्राह्मणास 'खुनास उत्तेजन' ह्या आरोपावरून तीन वर्षांची शिक्षा होते, तेव्हां सरकारच्या लीला अगाध म्हणाव्यात का दैवाच्या लीला विचित्र म्हणाव्यात ?

## ५१. इयं सा जातिः परित्यक्ता।

पन्हाळ्याहून आम्हांला पुन्हां कोल्हापुरास आणिलें, तेव्हां अण्णांना कांहीं दिवस अशा खोलींत रहावें लागत होतें कीं, तेथें जिकडे तिकडे ओलच ओल होऊन गेली होती, निजण्यापुरती देखील पुरतीशी कोरडी जागा नव्हती ! मानसिक त्रासहि कमी नव्हता. शिक्षेच्या न्याय्यान्याय्यतेचा विचार सोडून दिला तरी दुसऱ्या किती तरी जाचक गोष्टी त्यांच्या मनाला शीण आणीत होत्या. उदाहरणार्थ, एके दिवशीं आमची तिघांची झडती झाल्यावर "तीं जानवीं काढून ठेवा" असें शिपाई आम्हांला सांगू लागले. आह्मी पुष्कळ हुज्जत घातली, पण ते शिपाई ऐकेनात. अखेर कंटाळून व वैतागून विनायकरावांनीं व मीं विचार केला कीं, पुढें काय प्रायश्चित्त घ्यावयाचें तें घेऊं, आतां या मूर्खांच्या अंगावर जानवें फेंकून द्यावें झालें. असा विचार करून आम्हीं दोघांनीं तर वेणीसंहारांतील अश्वत्थाम्यानें "इयं सा जातिः परित्यक्ता" असें म्हणून जसें जानवें फेंकून दिलें तशाच प्रकारें केवळ नाहीं, तरीपण तशाच थोड्याबहुत आविर्भावानें जानवीं काढून टाकलीं. पण

अण्णांनीं दोनचार घटकाच नव्हे तर दोनचार तास त्या अडाण्यांशीं वाद घातला. 'जेल-मॅन्युअलमध्यें अमुक नियम आहे, तुम्हीं आपल्या वरिष्ठांना विचारून या, ते तुम्हांवर रागावणार नाहींत' इत्यादि प्रकारचा वेदान्त ते त्या मूर्खांना हरतऱ्हेनें सांगूं लागले. पण त्यांचें एकच सडेतोड व उद्धटपणाचें उत्तर होतें. "हम ए कुच जानता नहि." गाढवांपुढें गीता वाचण्याचा हा प्रकार इतका वेळ चालला कीं शेवटीं अण्णांना आम्हीं दोघांनीं सांगितलें कीं, "अण्णा, यांच्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं. आपण मागाहून प्रायश्चित्त घेऊं, उगाच हे अडाणी लोक अंगाला हात लावतील व आपली भलतीच शोभा करतील," वगैरे वगैरे. अखेर अण्णांनीं जानवें काढून दिलें, पण देतांना त्यांना जें वाईट वाटलें तें वर्णन करून सांगतां येणार नाहीं. हल्लींच्या माझ्या दृष्टीनें जानव्याबद्दल इतका आग्रह मला आवश्यक वाटत नाहीं. पण मी कितीहि 'सुधारक' झालों, तरी अण्णासारख्यांच्या प्रामाणिक श्रद्धेंतील व आग्रहांतील दिव्यत्व मला केव्हांही आदरणीयच वाटणार. अस्तु, अशा या सात्त्विक ब्राह्मणावर 'खुनाचा' आरोप ठेवणारानें ठेविला कसा व जजानें तो आरोप सिद्ध मानला कसा हें गूढच आहे, अथवा गूढ तरी कसलें ? जगांत असले विपरीत प्रकार काय थोडे होत आहेत ? साक्रेटिस, येशू ख्रिस्त, महात्मा गांधी इत्यादिकांवर नाहीं नाहीं ते आरोप जर येतात व ते 'सिद्ध' होतात, तर प्रो० विजापूरकरांना तरी अपवाद-कोटींत कोण कां घालणार ? जगांत भौतिक वादळानें किती तरी झाडें फळांफुलांसुद्धां उन्मळून खालीं पडतात, त्यांतलाच हा मानवी जगांतला प्रकार मानावा झालें.

## ५२. वेश असावा बावळा

अण्णांचा साधेपणा हा त्यांच्या वर्तनांतला दुसरा विशेष होय. पोषाख तर अगदींच साधा असे. साधा कोट, आंत बंडी, बिनजरीचा रुमाल, साधें धोतर आणि उपर्णे असा त्यांचा थाट होता. बंडी, धोतर, उपर्णें वगैरे ते बहुधा म्हातारपणीं देखील हातांनीं धुवावयाचे. सुपारीचें देखील व्यसन नाहीं. बोलणें चालणें देखील साधेपणाचेंच. बाकी बोलणें अगदीं साधें नव्हतें हें येथें नमूद केलें पाहिजे. संस्कृतचे ते प्रोफेसर होते म्हणून त्यांची भाषा संस्कृतप्रचुर होती असें येथें सांगावयाचें नाहीं, तर त्यांचें बाह्यतः साधें दिसणारें बोलणें तसें नसे, तर त्यांत खोंचा असत हें सुचवावयाचें

आहे. बोलणें गोड; प्रतिपक्ष्याचें मन न दुखेल असा प्रयत्न; साक्षात् कटु लागेल असें बोलावयाचें नाहीं असा निर्धार; पण आपलें म्हणणें त्यांनीं कधीं सोडलें आहे असें व्हावयाचें नाहीं. दुसऱ्याचें म्हणणें ते शांतपणें ऐकून घेत, त्याच्यांतला ग्राह्यांश घेत, परंतु शेवटीं आपलें तें खरें अशी त्यांची बोलण्याची पद्धत होती. प्रतिपक्ष्याचें म्हणणें झाल्यावर "तेंच कीं" असें म्हणून त्याचें म्हणणें सगळें आपण कबूल करीत आहों असें ते दाखवीत, पण अखेर 'तें असें नाहीं' असा त्यांच्या बोलण्याच्या निष्कर्ष निघे ! "तेंच कीं" यापासून प्रारंभ झालेल्या भाषणाचा "तें तसें अगदीं नाहीं" असा शेवट झालेला पाहून प्रस्तुत लेखकाला कितीदां तरी हंसू आलें आहे. पण या हास्यविषयक विरोधाच्या मुळाशीं दुसऱ्याचें मन सहसा दुखवावयाचें नाहीं, त्याच्याशीं मिळतें घेऊन त्याला आपल्या बाजूला वळवावयाचा, अशा प्रकारची वृत्ति असल्यामुळें त्यांचा राग येत नसे.

## ५३. स्वधर्म–स्वदेश–स्वभाषाभिमान

त्यांचा 'स्वधर्म–स्वदेश–स्वभाषाभिमान' हा तर लोकविश्रुतच आहे. भाषेच्या बाबतींत संस्कृतचा त्यांना अभिमान होताच व संस्कृताला 'मृत' भाषा कोणीं म्हटलें तर त्यांना तें अगदीं खपत नसे. त्यांच्या मराठी लेखांत व भाषणांत क्वचित् बोजड संस्कृत शब्द आढळतात हें कोणालाहि कबूल करावें लागेल. Co-operation बद्दल "संभूय–समुत्थान," किंवा 'परिस्थिति' बद्दल 'उपाधि' अशा प्रकारचे शब्द त्यांनीं योजिले कीं कुचेष्टेला तो एक विषयच होई. पण असले कांहीं थोडे शब्द सोडले तर त्यांची भाषा चांगली प्रौढ व सुसंस्कृत वाटे. बोलण्यांतल्याप्रमाणानें लेखनांत त्यांच्या खोंचा विशेष नसत. चटकदारपणाकडे लक्ष अगदींच बेताचें. पुढें पुढें त्यांचा व्यासंग संस्कृत ग्रंथांपेक्षां दासबोधादि 'समर्थ' ग्रंथांचा विशेष होऊं लागला व त्यांच्या भाषेंत एक प्रकारचें निराळें 'सामर्थ्य' येऊं लागलें. अगदीं प्रथमपासूनच त्यांना संस्कृतप्रमाणेंच मराठीचा अभिमान होता, पण पुढेंपुढें मराठीचा अभिमान विशेष दृग्गोचर होऊं लागला इतकेंच. अशी एक गोष्ट त्यांच्यासंबंधानें ऐकण्यांत येते कीं, कोल्हापुरास त्यांनीं प्रथम जें व्याख्यान दिलें त्याचा विषय 'कष्ट' असा होता. उद्यो-गशीलता, वगैरे संस्कृत शब्द सोडून मुद्दाम 'कष्ट' शब्द निवडल्यावरून

त्यांचा पहिल्यापासूनचा प्राकृताभिमान स्पष्ट दिसून येतो; पण त्या वेळेच्या कोल्हापुरच्या विनोदप्रवीण लोकांनीं ‘ कष्ट ’ हा विषय ऐकून ‘ कष्ट, कष्ट ’ असे उद्गार काढले असा या गोष्टीचा उत्तरार्ध ऐकला, म्हणजे त्यांच्या भाषेंत प्रथम प्रथम बोजड संस्कृत शब्द जसे क्वचित् येत असत तसे क्वचित् रसभंग करणारे प्राकृत शब्दहि येत असत असें कबूल करणें प्राप्त होतें. कालान्तरानें हा अल्पसा दोष नष्टप्राय झाला हें त्यांच्या शेवटच्या शेवटच्या लेखांवरून, पत्रांवरून वगैरे स्पष्टच दिसतें, तेव्हां त्याचा विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं. मराठीचा त्यांना इतका अभिमान होता कीं, ते खासगी पत्रव्यवहारांत इंग्रजीचा सहसा उपयोग करीत नसत असें म्हणण्यास हरकत नाहीं. ‘ इंग्रजालाच पत्र लिहावयाचें झालें तर गोष्ट वेगळी, पण मराठी जाणणाऱ्याला इंग्रजींत कां पत्र लिहावयाचें ? ’ असें त्यांचें म्हणणें असे. संभाषणांत वगैरे इंग्रजी शब्द ते वापरीत नसत असें नाहीं—कालाच्या ओघाबाहेर ते तरी किती जाणार ?–पण होतां होई तों मराठीच शब्द वापरावयाचे अशी त्यांची प्रवृत्ति होती. कोठलाहि इंग्रजी शब्द आला, त्याचा अर्थ कमी अधिक शब्दांच्या द्वारें मराठींत चांगल्या तऱ्हेनें व्यक्त करतां येईल यांत तर शंका नाहींच पण पर्यायवाचक ठसठशीत, सुटसुटीत शब्दहि पुष्कळ वेळां सांपडेल किंवा बनवितां येईल अशी त्यांची ठाम समजूत होती. या संबंधांत त्यांचें आव्हान असें कीं, ज्याचा अर्थ मराठींत कमी अधिक शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं असा इंग्रजी शब्द दाखवा.

## ५४. शास्त्र आड येत नाहीं

स्वभाषेप्रमाणें स्वधर्माच्या बाबतींत देखील त्यांचें असें आव्हान असे कीं “ लोकाभ्युदयकारक किंवा मोक्षसाधनीभूत अशी कोणतीहि गोष्ट तुम्ही सांगा, शास्त्र कांहीं त्याच्या आड येत नाहीं असें मी दाखवून देतों.” लोकांच्या मोक्षाच्या किंवा अभ्युदयाच्या आड शास्त्र येईल कसें, असें ते म्हणत. शास्त्राची प्रवृत्तीच जर जनहित साधण्याकरितां आहे, तर जनहिताला शास्त्र कसें विरोध करील ? आतां एवढी मात्र गोष्ट खरी, कीं चैनबाजीच्या आड शास्त्र येईल, केवळ शरीरपूजाच ज्यांना करावयाची आहे त्यांना शास्त्र जाचक होईल, लोकव्यवस्थेकरितां देखील ज्यांना कांहीं देखील निर्बंध नको अशांना शास्त्र जुलमी वाटेल, पण खरोखर लोकहित ज्यामध्यें आहे,

अशी सुधारणा केव्हांहि शास्त्रसंमतच असणार. एखाद्या ग्रंथांत अशा एखाद्या सुधारणेबद्दल विरुद्ध वचन असलें तरी तें वचन एखाद्या विशेष परिस्थितील अनुलक्षून असतें व त्याच ग्रंथांत "देशकालवर्तमान पाहून शिष्ट परिषदेनें त्या त्या परिस्थितीला अनुरूप असे इष्ट ते आचार ठरवावेत" अशा आशयाचीं वचनें असतात, असें ते नेहमीं सांगत.

## ५५. आर्यावर्त मार्गदर्शक होवो

स्वदेशाभिमान तर त्यांचा इतका होता कीं आपला देश, पूर्वी जसा सर्व विश्वाला वंद्य व आदर्शभूत होता तसा तो अजूनहि होईल असें त्यांना वाटे. बोलावें कसें, चालावें कसें, वागावें कसें, अशा प्रकारचा प्रश्न जगांत कोठेंहि कोणालाहि पडला तर त्यानें आपल्या या आर्यावर्ताकडे दृष्टि वळवावी व येथें शिष्ट गणलेले लोक जसे बोलतात, चालतात, वागतात, त्याप्रमाणें त्यानें वागावें अशी आर्यावर्ताची पूर्वी महती होती असें सांगून मनुस्मृतींतील

> अस्मद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
> स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥

हा श्लोक ते स्वमतसमर्थनार्थ म्हणून दाखवीत. अशा प्रकारची महनीय स्थिति आपल्या देशाला प्राप्त व्हावी अशी त्यांची दूरविसर्पी आकांक्षा होती आणि ती सफल व्हावी म्हणून त्यांची अहर्निश खटपट होती. ध्येय-सृष्टींत दिसून येणारें स्वदेशाचें रम्य चित्र सत्यसृष्टींत जिवंत स्वरूपांत पाहावयास मिळावें एतदर्थ 'स्वदेशी', 'राष्ट्रीय शिक्षण', 'स्वराज्य' या साधनांची त्यांना आवश्यकता भासूं लागली. 'स्वदेशी' व्रत पटल्यावर तें त्यांनीं स्वतःच्या वर्तनांत आणिलें. कापड तर स्वदेशी असावयाचेंच, पण छत्री देखील स्वदेशीच पाहिजे असा त्यांचा आग्रह. स्वदेशी छत्री चांगली मिळत नव्हती तेव्हां कांहीं वर्षें छत्रीच वापरण्याचें त्यांनीं सोडलें व पावसांत पर्जन्यनिवारणार्थ घोंगडीचाच ते उपयोग करीत! स्वदेशी साखर, स्वदेशी कागद, जो जो पदार्थ स्वदेशांत मिळेल तो तो वापरावयाचा मग तो कितीका ओबडधोबड असेना, अशी त्यांची, वृत्ति होती. 'आधीं केलें मग सांगितलें'

अशा त्यांच्या वर्तनक्रमामुळें त्यांचा 'स्वदेशीबद्दलचा' उपदेश व आग्रह केव्हांहि आदरणीयच वाटे, हें सांगायला नकोच.

## ५६. राष्ट्रीय शिक्षणाची व्याख्या

'राष्ट्रीय शिक्षण' म्हणजे राष्ट्रांतील लोकांच्या ताब्यांत असलेलें व राष्ट्राला उपकारक असें शिक्षण अशा प्रकारची त्यांची व्याख्या होती. राष्ट्राच्या सध्याच्या परिस्थितीला व्यापारी व औद्योगिक शिक्षणाची विशेष आवश्यकता आहे असें त्यांचें मत होतें आणि तें बरोबर नाहीं का? वाङ्मयविषयक शिक्षण नको असें नाहीं, अण्णांसारखे संस्कृताभिमानी लोक असें मत कधीं प्रतिपादितील हें शक्यच नाहीं—पण सर्वच मुलांनीं बौद्धिक शिक्षण घ्यावें आणि व्यापार व उद्योगधंदे परकीयांवर सोंपवावेत् हें इष्ट नाहीं अशी त्यांची बालंबाल खात्री झाली होती. आणि म्हणूनच त्यांच्या हातून राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य एवढ्या चिकाटीनें झालें. जनार्दन सखाराम करंदीकर व राजाराम दामोदर देसाई आरंभापासूनच समर्थ विद्यालयाला लाभले. नंतर वामन मल्हार जोशी, नंतर जनार्दन विनायक ओक, पेणचे करंदीकर, परांडेकर, मोडक, कोतवाल ही अशी मंडळी त्यांच्या समर्थ विद्यालयाला मिळाली असतां 'समर्थ-विद्यालय' चालूं नये व एका कार्यसूत्रानें निबद्ध झालेला हा मणिगण सरकारच्या रोषानें दहा दिशांना पांगला जावा, हें दैवदुर्विलसित नव्हे तर काय? तात्या करंदीकरांसारखा निरलस, निरभिमानी तत्त्वनिष्ठ तपस्वी, बापू देसाईसारखा उत्साही, स्वार्थत्यागी कर्मवीर, नाना ओकांसारखा अत्यन्त विद्वान् राष्ट्रभक्त, 'रागिणी' व 'नीतिशास्त्रप्रवेश' कर्ते वामनराव जोशी, पेणच्या करंदीकरांसारखा ध्येयवादी पण व्यवहारकुशल, स्वार्थत्यागी, उत्साही, निराभिमान, कर्मयोगी, 'मुलांचा महाराष्ट्र' लिहिणारे मोडक, इत्यादि मंडळी अध्यापकवर्गांत, महादेवशास्त्री दिवेकर व दिनकरशास्त्री कानडे यांच्यासारखे उत्साही तरुण त्या वेळीं "प्रौढ–विद्यार्थी वर्गांत," असा तो देखावा कल्पनाचक्षूंसमोर आला म्हणजे अजूनदेखील ही मंडळी विस्खळित करून आशय जगच्चालक शक्तीनें कोणतें जगाचें कल्याण साधलें हें गूढ पडतें व ही जगच्चालक शक्ति रसिक नसावी असें वाटूं लागतें. अण्णा विजापूरकरांचा व त्यांच्या सहकारी मित्रांचा कांहींच दोष नाहीं काय, असा प्रश्न येथें उत्पन्न होणारच. तेव्हां त्याचा आतां विचार करूं या.

## ५७. समर्थ विद्यालय बंद कां केलें ?

" समर्थ विद्यालय " सरकारनें बंद केलें ही वस्तुस्थिति कोणीहि नाकबूल करणार नाहीं. सरकारचें करणें योग्य होतें किंवा नाहीं एवढाच काय तो प्रश्न. कांहीं अधिकाऱ्यांची त्या वेळीं १९०६–७–८ सालीं राजकारणांत किती संशयी वृत्ति होती, राजकीय 'सर्पसत्र' त्या वेळीं कसें चाललें होतें, हें सर्वविश्रुतच आहे. पण समर्थविद्यालयासंबंधानें एक लहानच गोष्ट सांगितली म्हणजे कांहीं अधिकाऱ्यांचें संशयी धोरण कसें चुकीचें होतें हें समजेल. १९०८ मध्यें समर्थ विद्यालयांतील बापू देसाई यांच्यावर जो एक खटला भरण्यांत आला, त्याचा निकाल देतांना मॅजिस्ट्रेट आपल्या निकालांत तळेगांवच्या समर्थ विद्यालयाच्या व कांचशाळेच्या चालकांच्या सद्धेतूबद्दल पुढील आशयाच्या वाक्यानें संशय व्यक्त करतात. "Strangely enough this activity takes the form of glass-factories and match-factories." ( यांच्या देशाभिमानाला व्यक्त स्वरूप आगकाड्या व कांच यांचे कारखाने काढण्यांत मिळतें हें आश्चर्य होय. ) यांतील ध्वनी असा होता काय कीं आगकाड्यांचे कारखाने आग लावण्याकरितां असावेत आणि कांचकारखाने बॉंबसारखे कांहीं तरी पदार्थ तयार करण्याकरितां असावेत ! असा ध्वनि असल्यास तो किती प्रमादजन्य होता पहा. आधीं तळेगांवांत आगकाड्यांचा कारखानाच नाहीं व केव्हांहि नव्हता. आसपासहि त्यावेळीं कोठें नव्हता, किंवा इतरहि कोठें तळेगांवांतील समर्थविद्यालयांतील मंडळींशीं किंवा त्यांतील कोणत्याहि एका व्यक्तीशीं दूरान्वित संबंध असलेलाहि आगकाड्यांचा कारखाना नव्हता ! दुसरें असें कीं, ज्याला आगच लावायची आहे त्याला काय बाजारांत थोड्या आगपेट्या मिळत होत्या ? बरें, काचकारखान्यांसंबंधानें पाहिलें तर तळेगांवास कांचकारखाने नव्हते, तर एकच लहानसा कारखाना होता. तो सोंवळा होता व आहे, हें सरकारी अधिकाऱ्यांनीं–गव्हर्नरापर्यंतच्या अधिकाऱ्यांनीं या कारखान्याबद्दल जें धोरण स्वीकारलें आहे त्यावरून दिसतें. अर्थात् स्वतःच्या कल्पनासृष्टींतच असलेल्या आगकाड्यांच्या कारखान्यांसंबंधानें व या कांचकारखान्यासंबंधानें मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं जें आपलें मत करून घेतलें होतें आणि बापू देसाई यांचा या काल्पनिक व खऱ्या कारखान्यांशीं त्यांनीं जो बादरायणसंबंध लावला होता तो वृथासंशयजन्य व पूर्वग्रहदूषित होता असें म्हटलें तर तें अतिश-

योक्तीचें होईल ? समर्थ विद्यालयांतील मुलें ड्रिल शिकत, डोंगरावर चढत व धिंगामस्तीचे खेळ खेळत, देहूसारख्या ठिकाणीं स्वयंसेवकाचें काम करून व्यवस्था ठेवण्याचें काम यात्रादिक प्रसंगीं करीत, हीं तरी संशय घेण्याला व या संशयावरून शाळेचा चालकवर्ग ' बेकायदेशीर मंडळी ' म्हणून ठरविण्याला पुरेशीं कारणें आहेत ? आतां समर्थविद्यालयांतल्या एखाद्याचा एखाद्या बॉबशीं दूरान्वित कां होईना पण जो संबंध नाशिक केस-मध्यें जोडला गेला त्यासंबंधानें एवढेंच म्हणतां येईल कीं सरकारी हायस्कु-लांतील व बिनसरकारी हायस्कुलांतील मुलांशीं दूरान्वितच नव्हे तर साक्षात् संबंध सिद्ध झालेला आहे; मग हीं हायस्कुलें चालविणारी मंडळी बेकायदेशीर कां ठरविली गेली नाहींत ? तात्पर्य काय, तर संशयपिशाच्चिकेचा नाच त्या वेळीं चालला होता आणि समर्थविद्यालय त्या नाचांत पायाखालीं तुड-विलें गेलें, झालें; त्याबद्दल आतां सरकारला, सरकारी अधिकाऱ्यांना किंवा दुसऱ्या कोणालाहि दोष देण्यांत अर्थ नाहीं.

## ५८. विश्ववृत्तासंबंधीं खटला

आपण आतां 'विश्ववृत्ता'संबंधीं जो खटला झाला व ज्यांत त्यांना तीन वर्षांची सजा झाली त्यांत किती न्याय होता हें पाहूं. आधीं मुख्य आक्षेप-विषय लेख श्रीपाद दामोदर सातवळेकरांनीं लिहिलेला. ते कधीं राजकार-णांत पडले नव्हते. विषय " वैदिक प्रार्थनांची तेजस्विता." वेदाचा प्रचलित राजकारणाशीं संबंध काय ? बरें, प्रतिपादनांत तरी राजकारण भरलें होतें काय ? फक्त एक वाक्य प्रचलित राजकारणाशीं साक्षात् रीतीनें संबद्ध असें खुद्द फिर्यादीपक्षाचें म्हणणें. न्यायाधीश आपल्या जजमेंटमध्येंच कबूल करतात कीं हा लेख या काळीं या विशिष्ट परिस्थितींत, या राजकीय चळवळीच्या प्रसंगीं लिहिला गेला म्हणून दूषणीय; इतर परिस्थितींत लिहिला गेला असता तर त्यांत दूषणीय कांहीं नाहीं. म्हणजे राजकीय वातावरण खवळलेलें अस-ल्यामुळें अनाक्षेपणीय लेख आक्षेपार्ह झाला ! राजकीय वातावरण खवळ-विण्याचें पाप लेखकानें किंवा विश्ववृत्ताच्या संपादकांनीं केलें होतें काय ? नाहीं. सौम्य शुद्ध लेख कां असेना. तो भलत्या वेळीं प्रसिद्ध केला हा एवढा फार तर गुन्हा. बरें, अशा परिस्थितींतच लेख मुद्दाम प्रसिद्ध करावा असा लेख-काचा किंवा संपादकाचा हेतु होता काय ? दुष्टबुद्धीनें ही गोष्ट झाली होती काय ?

नाहीं, फिर्यादीतर्फे पुरावा याबाबत मुळींच नाहीं. उलट अण्णा विजापूरकरांनीं हा लेख पाहिलाही नव्हता हें वामनराव जोशी यांच्या कबुलीजबाबावरून स्पष्ट झालेलें. मग अमक्या वेळींच, अमक्या दुष्टबुद्धीनें तो प्रसिद्ध करावा अशी अण्णांची इच्छा होती या म्हणण्यांत अर्थ काय ? आतां, कायदेशीर रीतीनें ते जबाबदार होते व चुकून कां होईना, न कळतां का होईना, शुद्ध स्वरूपाचा लेख भलत्या वेळीं त्यांच्या मासिकांत प्रसिद्ध झाला, याबद्दल ते कायदेशीर रीत्या जबाबदार धरिले पाहिजेत. 'कायदा' असा आहे हें कबूल. पण "The law is an ass" असें जें म्हणण्यांत येतें तेंच येथें म्हणावेंसें वाटतें. आणि "भलत्या काळीं प्रसिद्ध झालें" याविषयीं सुद्धां असें म्हणावेंसें वाटतें कीं, बाबांनो, 'भलत्या काळीं' प्रसिद्ध झाला हें तुमचें म्हणणें अक्षरशः खरें आहे, कारण त्या तशाच काळीं अशा शुद्ध स्वरूपाच्या "वैदिक" लेखाबद्दल तीन वर्षांची सजा मिळणें शक्य होतें !

## ५९. पुनःश्च हरिः ॐम्

विजापुरकरांचा खटला केव्हांच निकालांत निघाला, सजा भोगून झाली, विजापूरकरहि वारले. तेव्हां आतां हा काळा कोळसा न उगाळतां त्यांच्या चरित्रापासून बोध काय घ्यावयाचा इकडे आपण पुनः वळूंया. त्यांची ध्येयनिष्ठा ही जगप्रसिद्धच आहे. सुटून आल्यानंतर मानापमान वगैरे गुंडाळून नामदार चौबळ वगैरे वजनदार गृहस्थांचे उंबरठे झिजवून, त्यांची सहानुभूति संपादन करून त्यांच्या सहाय्यानें त्यांनीं 'नवीन समर्थ विद्यालय' "पुनश्च हरिः ओम्" या न्यायानें काढलें, यांत त्यांच्या चिकाटीबरोबर निरभिमानताहि चांगलीच दिसून येते.

हें आवर्तन करतांना त्यांना कोणत्याहि पक्षाची किंवा पुढाऱ्याची विशेष उत्साहाची व कळकळीची सहानुभूति नव्हती ही गोष्ट ध्यानांत धरली पाहिजे. प्रागतिक पक्ष समर्थ विद्यालयाबद्दल प्रथमपासूनच उदासीन आणि 'राष्ट्रीय' पक्ष अण्णांनीं नामदार गोखल्यांच्या मरणाचे आधीं टिळकांचा व त्यांचा ( गोखल्यांचा ) जो वाद सुरू होता त्यांत गोखल्यांच्या बाजूनें एक पत्र प्रसिद्ध केलें म्हणून त्यांच्यावर रुष्ट झालेला, निदान रुसलेला, निदान अनुत्साही तरी खास झालेला. अशा परिस्थितींहि अण्णांनीं धीर खचूं दिला नाहीं.

सुधां विना न प्रययुर्विरामं

या त्यांच्या आवडत्या वचनाला अनुसरून राष्ट्रीय शिक्षणात्मक सुधे-प्रीत्यर्थ अहर्निश अविश्रान्त श्रम चालू ठेवले यांतच त्यांचें 'अण्णात्व व 'समर्थ'शिष्यत्व आहे !

## ६०. टिळक-गोखले प्रकरण

हें वर उल्लेखिलेलें टिळक-गोखले प्रकरण काय होतें व त्यांत विजापूरकरांचा संबंध कसा आला हें नवीन पिढीला ठाऊक नसेल म्हणून येथें थोडक्यांत देतों. कांग्रेसचें धोरण कसें असावें, 'राष्ट्रीय पक्षाला आंत घ्यावें किंवा नाहीं, घ्यावयाचें असल्यास कोणत्या अटींवर याबद्दल १९१५ सालीं मोठा वाद चालला होता. पुढारी लोकांचा खाजगी पत्रव्यवहार चालला होता व खलबतें होत होतीं, अशा वेळीं मिसेस ॲनी बेझंटबाई मध्यस्थी करण्याचें योजून नामदार गोखले यांच्याशीं विचारविनिमय करण्याकरितां सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीमध्यें उतरल्या होत्या. गोखले त्या वेळीं अत्यवस्थ आजारी—आसन्नमरणावस्थेंतच—होते. टिळक हेहि ॲनीबेझंटबाईंना भेटण्याकरितां ह्मणून सर्व्हंट्स् ऑफ इंडियामध्यें गेले. व तेथें गेल्यावर अत्यवस्थ स्थितींत असलेल्या गोखल्यांच्या अर्थात् समाचाराकरितां गेलें. तेथें त्यांचें, गोखल्यांचें व ॲनीबेझंटबाईंचें केव्हां काय बोलणें झालें हें प्रस्तुत लेखकाला माहीत नाहीं. पण या बोलण्याचालण्याचे प्रकरणांत व गोखल्यांनीं आपल्या एका पुढारी मित्राला लिहिलेल्या पत्राचे प्रकरणांत एक लहानसा वाद निघून त्या बाबतींत विजापुरकरांनीं सर्व्हंट्स् ऑफ् इंडियांत त्याच सुमारास आपण होतों व आपली माहिती अशा अशा प्रकारची आहे, अशा प्रकारचें पत्र प्रसिद्ध करून गोखल्यांची बाजू सांवरून धरली होती. टिळकांना हें न खपल्यामुळें त्यांच्या 'केसरी' त अण्णा विजापूरकरांनीं गोखले व टिळक यांच्या प्रकरणांत 'बीचमें मेरा चांदभाई' प्रमाणें वागून आपल्याला हास्यास्पद करून घेउं नये असें सुचविलें होतें. आतां खरोखर पाहिलें असतां गोखले व विजापूरकर यांचा अनेक वर्षांचा स्नेहसंबंध, गोखल्यांच्या सर्व्हंट्स ऑफ इंडियामध्यें विजापूरकर त्या वेळीं गेलेले व त्यांना तेथें कांहीं गोष्टी कळलेल्या, गोखले मृत्युशय्येवर पडलेले, अशा स्थितींत गोखल्यांवर एखाद्या गोष्टीबाबत नाहक हल्ला होत आहे असें वाटून त्यांनीं आपल्याला प्रामाणिकपणानें जी

गोष्ट खरी माहीत होती ती पत्रद्वारें जगाला कळविली व इहलोक सोड-ण्याच्या मार्गाला लागलेल्या– " ओंकारेश्वरावर गोंवऱ्या ज्याच्या गेल्या आहेत " अशा–अनेक वर्षांचा ऋणानुबंध असलेल्या आपल्या मित्राला, जो थोर सत्पुरुष आहे असें त्यांना मनापासून वाटत होतें त्याला, आपल्या परीनें साहाय्य करण्यास तें धांवले तर हास्यास्पद तें काय आहे ? यांत चांदभाई बीचमें आला ह्मणावें कां स्नेह कर्तव्यकर्माला जागला ह्मणावें ? बरें टिळकांना तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ? लढाईला जो उभा राहिला त्यानें आडवा येईल त्याला कापलेंच पाहिजे असें त्यांच्या बाजूनें ह्मणतां नाहीं कां येणार ? या प्रकरणांत दोषाची कमीअधिक वांटणी कर-ण्यांत व्यर्थ वेळ न दवडतां एवढें ह्मटलें ह्मणजे पुरे आहे कीं राजकारण हें असें धकाधकीचें आहे–तें असें असावें कां नाहीं हा प्रश्न सोडविणें कठीण आहे, निदान तो सध्यां तरी अप्रस्तुत व अनवश्यक आहे.

## ६१. प्रथम स्तुतिपाठ मग दोष

इतका वेळ अण्णांचा स्तुतिपाठ आपण गाइला, पण ते म्हणजे अगदीं निर्दोष होते, त्यांच्या हातून कांहीं चुका झाल्या नाहींत, असें समजण्याचें कारण नाहीं. दोष कोणांत नाहींत ? चंद्रावरच नव्हे तर सूर्यावर देखील डाग आहेत. अण्णांचा दोष म्हणजे गुणातिरेक ! माझ्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं कांहीं गुणांचा अतिरेक झाला म्हणजे ते दोषस्वरूप होऊं लागतात. उदाहरणार्थ, समर्थविद्यालयांत केंस ठेवणें वगैरे सुधारकी प्रकार चालूं न देणें चांगलें असेल व होतां होईतों आपल्या चालीरीतींना धरून शिक्षण द्यावयाचें हा एक हेतु धरून काढलेल्या संस्थेंत अशा प्रकारचें धोरण असलें तर त्यांत कांहीं वाईट नाहीं. परंतु एखाद्या केंस ठेवलेल्या मुलाला बळजबरीनें केंस काढावयास लावणें हें कसेंसेंच वाटतें. विदेशी माल तुम्ही घेऊं नका, पण एखाद्या पालकाला आपल्या आजारी मुलाला कॉडलिव्हर ऑइल द्यावेंसें वाटलें तर त्याबद्दल विशेष आग्रहाची हरकत घेणें हा तरी दुराग्रहच. आपल्या बंधूवर प्रेम असणें चांगलें, त्यांच्यावर विशेष विश्वास असणें चांगलें, पण या बंधुप्रेमांत इतरांनीं भागीदार व्हावें, झालेंच पाहिजे अशा आग्रहपूर्वक इच्छेला 'दुराग्रह' असें सुटसुटीत नांव दिलें तर काय चूक ? वरील दोष सत्यकथनाच्या दृष्टीनें सांगितले खरे; पण सत्य-

कथनाची दृष्टीच लेखणीला पुढें जाऊं न देतां लेखकाला सांगते कीं, " आपल्या प्रामाणिक मताप्रमाणें वागणें याला दोष म्हणणारे तुम्ही कोण? ज्यानें त्यानें आपल्या मताप्रमाणें वागावें, आपल्या शक्तीप्रमाणें कार्य करावें, असाच जर धर्माचा सिद्धान्त आहे, तर स्वमतानुसार वागणाऱ्याला व स्वशक्तीची पराकाष्ठा करून ध्येयसिद्ध्यर्थ सोत्साह व साग्रह परिश्रम करणाऱ्याला तुम्ही दोष कां देतां ? "

लेखक—श्री. महादेवशास्त्री दिवेकर, (वांई)

## ६२. मध्यम स्थितींतल्या मुलांवरच भर आहे

प्रो० विजापूरकर हे राष्ट्रीय शिक्षणाचे आद्यपुरस्कर्ते होते. त्या क्षेत्रांत ते स्वयंभू व स्वतंत्र विचाराचे होते. सरकारी शिक्षण-पद्धतींतील दोष ते अचुक दाखवीत. स्वभाषेंतून शिक्षण, शीलवर्धन, शरीरबल आणि उद्योग-धंदे अशी त्यांची राष्ट्रीय शिक्षणाची चतुःसूत्री होती. राष्ट्रीय शिक्षण शक्य व व्यवहार्य आहे असें त्यांना वाटे. कोणी भेटीस गेल्यास ते त्याची खात्री करून वाटेस लावीत. मी स्वतः नेहमीं त्यांचा विचार घेत असें. मी प्राज्ञमठाची प्राज्ञपाठशाळा केल्यावर तेथें दोनचार वर्षांत निरनिराळे अनुभव येऊं लागले. " गरीब मुलें पोटाकरितां येतात व मध्यम स्थितींतील मुलें हायस्कूलकरितां येतात. अर्थात् तुमच्या राष्ट्रीय शिक्षणाकरितां कोणीहि येत नाहीं, " असें मी त्यांना वरचेवर म्हणत असें. त्यांचें मत गरीब, अपंग, निराश्रित अशा मुलांकडून राष्ट्रसेवेची अपेक्षा करणें चुकीचें आहे असें होतें. म्हणूनच मध्यम स्थितींतील संपन्न मुलांवर त्यांची दृष्टि असे.

## ६३. राष्ट्रीय शिक्षणाची खरी तळमळ

प्रोफेसरांची राष्ट्रीय-शिक्षण तळमळ सक्रिय होती व ती चढाईची होती. आपले विचार लोकांना सांगावेत, त्यांची मनें वळवावींत, पैसे जमवावेत, महत्कार्य करून दाखवावें असेंच त्यांना वाटे. उगाच एका जागीं वर्षानुवर्षें पढवून डबक्यांतील स्तब्ध पाण्याप्रमाणें त्यांची बुद्धि निस्तब्ध झालेली नव्हती. म्हणूनच अत्यंत वृद्धावस्थेंत सारा महाराष्ट्रभर त्यांनीं साहाय्यक जमविण्याकरितां संचार केला तो अगदीं एकाकी केला. कित्येक वेळां १०–१२ मैल पायीं प्रवास केला. खांद्यावर पडशी टाकून एकाद्या भटजीप्रमाणें प्रवास करीत. त्यामुळें विजापूरकर कोणते हें पुष्कळ गांवच्या लोकांना समजत नसे.

## ६४. सुलभसंस्कृतप्रवेश

राष्ट्रीय शिक्षणाच्या क्षेत्रांत त्यांचीं मतें अगदीं ठाम होतीं. कोणता विषय, कोणत्या पद्धतीनें, किती शिकविला म्हणजे पुरे आहे हेंही ते निश्चित सांगत. अलीकडे त्यांनीं सुलभसंस्कृतप्रवेशाची योजना छापिली होती व त्याप्रमाणें विद्यार्थी शिकवीतहि असत. पुष्कळ प्रोफेसर किंवा गुरुजी असे आढळतात कीं, जन्मभर व्युत्पत्ति शिकविली असली तरी ईयत्तावार निश्चित अभ्यासक्रम त्यांना सांगतां येत नाहीं किंवा आंखतांहि येत नाहीं. पण अण्णासाहेब प्रज्ञाहत किंवा अनुवाकहत नसल्यामुळें त्यांचा प्रत्येक विषयाच्या बाबतींत अगदीं हातखंडा असे.

## ६५. अपत्यप्रेमाहून संस्थाप्रेम जास्त

राष्ट्रीय शिक्षणावर त्यांचें आत्यंतिक प्रेम होतें. ते तुरुंगांतून सुटून आल्यावर लवकरच त्यांचा मुलगा चि० माधव हा विषमानें मृत्युमुखीं पडला. डॉ. पटवर्धन व पळसुले यांचे घरीं एकदां योग असा आला कीं, चि० माधवचे कपडे व समर्थ विद्यालयाचीं हस्तपत्रकें यांचें गांठोडें कुणीतरी त्यांच्या समोर उघडलें. त्या वेळीं माधवचे कपडे पाहून मुद्रा उद्विग्न झाली; पण तीं समर्थ विद्यालयाचीं हस्तपत्रकें पाहून त्यांना रडें कोसळलें. दोन्हीही त्यांचींच अपत्यें! पण एकापेक्षां दुसऱ्यावर अत्यंत प्रेम; त्याकरितां त्यांनीं सर्वस्वाचा त्याग केलेला होता.

## ६६. याच शाळेंत मुलगा ठेवणार

कै. विजापूरकरांचें विद्यालयांतील सर्व मुलांवर सारखें प्रेम होतें. त्यांचा मुलगा माधव तोही विद्यालयांत होता. परंतु त्यावर आपला मुलगा म्हणून अधिक लक्ष नव्हतें किंवा मुद्दाम दुर्लक्ष्य नव्हतें. मिरजेच्या घाटावर विद्यालयांत एकदां श्री० गंगाधरराव आपल्या मित्रासह आले होते. त्यांनीं आपल्या मित्राला श्री. विजापूरकरांच्या वागणुकींत बोलण्यासारखें कांहीं तरी दाखीव असें आव्हान केलें होतें. परंतु चमत्कार हा कीं, तें त्या पुरुषाचें समत्व पाहून तो गृहस्थ आश्चर्यचकित झाला व म्हणाला "गंगाधरराव, मी माझा मुलगा याच शाळेंत ठेवणार."

## ६७. सामान्यं भोजनं सर्वैः ॥

कै० विजापूरकर हे विद्यार्थीगृहांत जेवीत तेव्हां त्यांचा नियम "सामान्यं भोजनं सर्वैः।" असा असे. ताटांतील निवलेली भाताची मूद काढलेलीही त्यांना खपत नसे. ते नोकरांना सांगत "जसें मुलांना वाढतां व जें वाढतां तेंच मला वाढत चला. माझ्याकरितां स्वतंत्र व्यवस्था कांहींही नको.' कित्येक विद्यार्थीगृहांत याच्या उलट प्रकार दिसतो. व्यवस्थापक आणि मुख्याध्यापक मागच्या पंक्तीला भोजनास बसतात. त्यावेळीं घरचें साजूक तूप, आंबेमोहोर तांदळाचा भात, एकदोन भाज्या, लोण्याचे गोळे, दह्याच्या वाट्या असा त्यांचा रोजचा स्पेशल बेत असतो. पण मुलांना मात्र वासाळ तूप, नुसती आमटी, आंबट ताक इत्यादि पदार्थ असतात. ही प्रतारणा विद्यार्थ्यांच्या देखत केव्हांहि करूं नये असें ते म्हणत. विद्यार्थ्यांना वळण लावणाऱ्यांनीं त्यांच्याबरोबर जें असेल तें खाऊनच रहावयास नको काय?

## ६८. हेच पहा माझे विद्यार्थी

७. गुरुवर्यांचें त्यांच्या विद्यार्थ्यांवर फार प्रेम असे. जुन्या समर्थ विद्यालयांतील विद्यार्थ्यांबद्दल ते फारच अभिमानानें बोलत. आपल्या विद्यार्थ्यांच्या कुठें कुठें काय काय हालचाली आहेत याचें सूक्ष्म निरीक्षण ते करीत असत. कोणी राष्ट्रीय विद्यार्थ्यांबद्दल अनादरानें बोलला तर ते म्हणत, "पहा माझे भुस्कुटे, कानडे, दिवेकर विद्यार्थी. दिवेकरांनींच मठाची संस्था केली, व दरसाल आठदहा हजार रुपये मिळवून व्यवस्थितपणें चालवून दाखविली." प्राज्ञमठाची सार्वजनिक संस्था श्री. कानडे व दिवेकर यांनीं केली हें कळतांच त्यांनीं अगदीं गुप्तपणें पहिल्या वर्षी सहाशें रुपये पोचविले. त्यावेळीं एवढी मोठी रक्कम देण्यासारखी त्यांची स्थिती नव्हती. परंतु आपल्या विद्यार्थ्यांना उत्तेजन म्हणूनच त्यांनीं ती दिली.

## ६९. कुंतीचा उपदेश "विपदः सन्तु नः शश्वत्।"

गुरुवर्यांच्या जवळ मी एकदां भागवत वाचीत होतों. वाचतां वाचतां कुंतीच्या तोंडचा "विपदः सन्तु नः शाश्वत्" हा श्लोक आला त्या ठिकाणीं ते अगदीं गहिंवरून गेले. आणि तुरुंगांत त्यांना या श्लोकाचा किती

उपयोग झाला हें अनेक गोष्टी सांगून त्यांनीं विशद केलें. त्या वेळची त्यांची मुद्रा ईश्वरप्रेमानें भरल्यामुळें विलक्षण दिसत होती. त्या स्थितींत श्री० अण्णांना मीं पुन: कधींच पाहिलें नाहीं.

विद्यार्थ्यांना शिक्षा करण्याच्या ते अगदीं विरुद्ध होते. तुरंगांत जातांना शिक्षकानें हातांत छडी घेऊं नये असें त्यांनीं सांगितलें.

असहकारितेचा पूर ओसरल्यावर राष्ट्रीय विद्यालयें मरूं लागलीं. त्या वेळीं ते म्हणत कीं शिक्षकांनीं धीर सोडूं नये. ईश्वरभक्तीला जसा 'बहूनां जन्मनां अन्ते' हा सिद्धान्त लागू पडतो तसाच राष्ट्रीय शिक्षणालाही तो लागू आहे.

लेखक–श्री० एस्. आर. काकिर्डे, ( मुंबई )

## ७०. सर्व गोष्टी नियमित पाहिजेत

अण्णांचा व माझा परिचय फारच अलीकडील म्हणजे गेल्या ८।९ वर्षांतीलच आहे. सुमारें १९१८ सालीं ज्या वेळीं अण्णांनीं नवीन समर्थ विद्यालयाचें पुनरुज्जीवन करण्यास सुरवात केली त्यावेळीं त्यांचा मुंबई येथें बराच वेळ मुक्काम होत असे. त्या वेळीं ते येथील भारत–सेवक समाजाच्या शाखेच्या इमारतींत आमला मुक्काम करीत असत. मीही येथेंच राहात असल्यामुळें त्यांचा माझा परिचय बराच झाला होता. अण्णांचा स्वभाव फारच मनमिळाऊ होता. दुसऱ्याकडून आपलें काम कसें करून घ्यावें ही कला त्यांना फार उत्तम रीतीनें अवगत होती. अण्णांचें काम करणें म्हणजे तो एक प्रकारचा बोजा आहे असें न वाटतां उलट उल्हासच वाटत असे. त्यांची वाणी फार प्रेमळ होती. अण्णांचे अंगीं असलेल्या गुणांचें अनुकरण करणें चालू पिढीला फारच कठीण जाईल. रोज नियमानें उठणें, आपले प्रातर्विधि वेळच्यावेळीं आटपून ठरलेल्या कामाला सुरवात करून रात्रीं नियमितपणें झोपणें, खाणेंपिणें व्यवस्थित असणें वगैरेंकडे अण्णांचें फार लक्ष असे. कितीही महत्वाचें काम असो, ठराविक क्षेत्राच्या बाहेर जाणें अण्णांना केव्हांही पसंत नसे. अण्णा रोज नियमितपणें सायंकाळीं सुमारें २ ते ३ मैलपर्यंत, इतक्या उतार वयांतसुद्धां, फिरावयास जात असत. त्यावेळीं कितीही महत्वाचें काम असलें अगर दुसऱ्या कितीही अडचणी आल्या तरी त्यांना न जुमानतां ते आपलें कार्य करीत असत.

## ७१. साधेपणा पाहिजे

अण्णांची राहणी इतक्या साधेपणाची असे कीं, त्यांच्या पोषाखावरून त्यांना ओळखणें फारच कठीण असे. मुंबईसारख्या रम्य व ( पोकळ ) डामडौली शहरांत राहत असतांना अण्णांनीं पावसाळ्याकरितां छत्रीचा केव्हांही उपयोग केला नाहीं. प्रथम ते इरलें घेऊन फिरत असत. परंतु एकदा त्यांना येथें एका ट्राम-कंडक्टरनें इरलें घेऊन ट्राममध्यें चढण्याची मनाई केली. त्या वेळेपासून त्यांनीं इरल्याच्याऐवजीं घोंगडी उपयोगांत आणण्यास सुरवात केली. प्रवासांत अण्णांबरोबर सामान ह्मणजे एक घोंगडी, सदरे, कोट, धोतरें, पंचा, काठी व जरूरीचे कागदपत्र एवढेंच असे. घोंगडीचा उपयोग ते दोन तऱ्हांनीं करीत असत. एक तर पावसाळ्याकरितां व एक रात्रीं झोंपण्याकरितां. रुमालाऐवजीं अण्णा डोकीला सफेत चादर बांधीत असत. म्हणजे त्याचाही उपयोग त्यांना दुहेरी करतां येत असे. जवळ जें सामान बाळगावयाचें तें अगदीं जरूरीचें असेंच बाळगावयाचें असा त्यांचा क्रम असे.

## ७२. स्वभाषेवरील प्रेम

त्यांचें स्वभाषेवरील प्रेम तर अवर्णनीयच होतें. संभाषणाला अगर लेखनाला ज्या भाषेंत सुरवात होईल त्याच भाषेंत इतर अन्य कोणच्याही भाषेंतील शब्दांचें मिश्रण न करतां ती पुरी करण्याकडे त्यांचें फार लक्ष असे. नाहीं तर हल्लीं त्यांच्या बरोबरीचे पुष्कळ विद्वान् लोक सुद्धां व्याख्यानांत अगर लेखनांत अगर रोजच्या खासगी संभाषणांत बऱ्याच भाषांतील शब्दांचें मिश्रण करीत असल्याचें आढळून येतें. मराठी भाषा जाणणाऱ्या लोकांशीं पत्रव्यवहार अण्णा मोडींत करीत असत. अशा पत्रांवर तारीख, महिना, सन्न वगैरे न लिहितां, महिना शुद्ध अगर वद्य, मिती व शक असें लिहून पत्राला आरंभ करीत असत. पत्रावरील पत्तासुद्धां मोडींतच असे. या एकाच गोष्टीवरून त्यांचें स्वभाषेवर किती प्रेम होतें हें स्पष्ट होतें.

## ७३. लोकांचा पैसा नीट खर्चा

अण्णांचे अंगीं असलेल्या स्वार्थत्यागाचें अनुकरण हल्लींच्या सार्वजनिक संस्थांच्या चालकांनीं करण्यासारखें आहे. लोकांनीं मदत म्हणून दिलेला पैसा, स्वतःच्या ऐषआरामाकडे त्यांतील एक पै खर्च न करितां, त्याचा

योग्य विनिमय करण्याबद्दल अण्णा फारच खबरदारी घेत असत. कामाकरितां बाहेर जाणें झाल्यास फार तर ते ट्रामचा उपयोग करीत असत. गाडी, घोडा, मोटार, अगर पहिल्या व दुसऱ्या वर्गाचा रेलवेचा प्रवास यांत त्यांनीं आपला पैसा बिलकुल खर्च केला नाहीं. आपल्या सामानसुमनाचा बोजा ते आपल्या स्वतःच्या हातांतून नेत असत. यावरून लोकांकडून मदत म्हणून मिळविलेला पैसा योग्य तऱ्हेनें कसा खर्च करावा हा त्यांनीं घालून दिलेला, व स्वतः त्याचें अनुकरण करून दाखविलेला कित्ता इतर सार्वजनिक संस्थांच्या चालकांनीं घेण्याजोगा आहे. अण्णांनीं आपलें सर्व आयुष्य, आपलें अंतिम ध्येय जें राष्ट्रीय शिक्षण तें पूर्ण यशस्वी करण्याकरितां अनेक हाल-अपेष्टा व नाना प्रकारचे कष्ट सोसून खर्च केलें. व त्यांचा शेवट अशा कष्टमय स्थितींतच झाला. त्यांच्या पश्चात् त्यांची संस्था जास्त जोमानें चालल्यास अण्णांना आपल्या आयुष्याचें सार्थक झालें असें वाटेल व त्यांच्या आत्म्यास शांति मिळेल.

लेखक—श्री० हरी रघुनाथ कोटबागे, ( कोल्हापूर )

## ७४. मारामारी हाच खेळ

प्रोफेसर विष्णु गोविंद विजापूरकर हे माझे बाळपणापासूनचे स्नेही होते. त्यांचें व माझें राहणें त्या वेळीं शेजारींच असे. लहानपणीं अण्णा अतिशय हूड असत. आपल्या बरोबरीच्या स्नेह्यांशीं कारणाशिवाय मारामारी करावी, त्यांस अभ्यास करूं देऊं नये, कधीं कधीं सोबती बुद्धिबळानें अगर गंजीफांनीं खेळत असतां त्यांचा खेळ उधळून द्यावा असा त्यांचा क्रम असे. स्वतः त्यांना मारामारीशिवाय दुसरा कोणताच खेळ येत नव्हता. स्वतः अभ्यास तर करावयाचा नाहीं पण शेजाऱ्यास मात्र कांहीं तरी प्रश्न वरचेवर विचारून भेंडावून सोडीत. त्यांचीं हूडपणाचीं तीन चार कृत्यें जीं मला माहीत आहेत तीं खालीं लिहिल्याप्रमाणें:—

## ७५. गुन्हा कबूल

त्या वेळच्या एका मोठ्या अंमलदाराच्या मुलास त्यांनीं येथील अंबाबाईच्या देवळांत गांठून खूप मारिलें. तेव्हां त्या अंमलदारानें अण्णांच्या वडिलांस बोलावून सदर हकीकत सांगितली व ते म्हणाले कीं, जर तुमच्या

मुलाची या मारामारींत चूक असेल तर त्याचा बंदोबस्त तुम्ही करा व माझ्या मुलाची चूक असेल तर मीहि त्याला योग्य ती शिक्षा करितों. हें ऐकून घेऊन त्यांचे वडील घरीं आले व आपल्या चिरंजीवास या बाबतींत खडसून विचारतां अण्णांनीं आपला अपराध कबूल केला; त्याबरोबर रागाचे सपाट्यांत त्यांनीं आपल्या हातांत धरण्याचे काठीनें इतकें मारिलें कीं त्यांस पुढें कित्येक दिवस सरळ चालतां येत नव्हतें.

## ७६. द्वाडपणाचा मासला

एकदां त्यांचे एका जिवलग मित्रानें एक नवीन नेसण्याचा धोतरजोडा विकत घेतला होता. तेव्हां त्यानें त्यापैकीं एक धोतराचें पान मळविण्याकरितां म्हणून अण्णांस दिलें. तें त्यांनीं सुमारें अर्ध्या तासाचे आंतच इतकें घाण करून आणिलें कीं, लागलेंच तें परटाकडे धुण्यास देणें मालकाला भाग पडलें.

## ७७. वा:, तुमच्या नोट्स् चांगल्या आहेत !!

स्वत: अभ्यास करावयाचा नाहीं व दुसऱ्यास करूं द्यावयाचा नाहीं यामुळें त्यांचे स्नेही वर्गांतील नोट्स् ( त्यांनीं लिहिलेल्या ) त्यांना दाखविण्यास नाखुष असत. पूर्वी आमच्या वेळीं राजाराम हायस्कुलांतील विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्यास सदर्न डिव्हिजनचे ए. इन्स्पेक्टर दरसाल येत असत. त्या वेळीं विद्यार्थ्यांस क्लास–मास्तर यांनीं इंग्लिश टेक्स्टवर ज्या नोट्स् सांगितल्या असतील त्या त्यांनीं फेअर नोटबुकांत लिहून, तीं बुकें इन्स्पेक्टर यांना दाखवावीं लागत. अण्णा हे वडिलांच्या धाकानें शाळेला नियमित जात; पण शाळेंतील अभ्यासाकडे मात्र दुर्लक्ष करीत; अर्थात् वर्गांत मास्तरांनीं सांगितलेल्या नोट्स् तें कधींहि लिहून घेत नसत. याचा परिणाम असा होई कीं ज्या ज्या इसमाजवळ त्यांनीं नोटबुक मागावें त्या त्या इसमानें त्यांस तें देऊं नये. असें जेव्हां एकदा इंग्रजी सहावे इयत्तेंत असतांना झालें तेव्हां त्यांनीं आपले मनानेंच टेक्स्ट बुकांतील कांहीं वाक्यें काढून त्यांवर नोट्स् आपले मनानेंच फाटकेतुटके भाषेंत लिहून काढून तें नोटबुक त्या वेळचे इंग्लिश शिकविणारे मास्तर श्री० दामोदरपंत धुळेकर यांना दाखविलें. ते मास्तर थट्टेखोर असत. त्यांनीं त्या नोट्स् वाचून म्हटलें कीं “ अहो विजापूरकर, ह्या विजापूरकरांच्या नोट्स् इतक्या उत्तम

साधल्या आहेत कीं, त्या आपणांसही ग्राह्य झाल्याच पाहिजेत अशी तुम-च्याबद्दल शिफारस मी परीक्षेचे वेळीं इन्स्पेक्टरसाहेबांस करीन. ”

### ७८. हा साधु होईल

एकदां एक कुडबुड्या जोशी दारावर भीक मागण्याकरितां आला होता. त्या वेळीं अण्णांची सहाध्यायी मंडळी एकाच ठिकाणीं अभ्यास करीत होती. अशा जोशांजवळ चित्रांची एक वही असते व त्यांत सुटीं पानें असतात. त्या पानांतील चित्रांवरूनच ते भविष्य सांगत असतात. त्या जोशानें ही इतकी मंडळी पाहून तुमचें प्रत्येकाचें भविष्य मी सांगतों असें म्हणून त्यानें आपली पोथी काढिली व प्रत्येक इसमाकडून त्या बुकांत काडी घालवून जें चित्र निघेल त्यावरून त्या इसमाचें भविष्य वर्तवी. उदा-हरणार्थ, धान्याच्या राशीचें चित्र निघाल्यास ‘ तुम्हांस धान्याचा तोटा पडणार नाहीं ’ असें तो म्हणे. नंतर तो प्रत्येकाकडे एक एक पैसा मागूं लागला. तो सर्वांनीं दिला. शेवटीं पाळी आली अण्णांची. त्यांना त्यानें काडी घालण्यास सांगितलें, त्यांनीं ती घातल्यावर एका साधूचें चित्र आलें. त्यावरून त्यानें सांगितलें कीं, हा मुलगा पुढें साधू होईल. हें ऐकतांच त्या वेळच्या त्यांच्या उच्छृंखलपणास अनुसरून अण्णांनीं त्यास पैसा न देतां धक्के मारून त्या जोश्यास घराबाहेर घालविलें. परंतु त्यांच्या अलीकडील वर्तनावरून त्या जोशाचेंच भविष्य खरें ठरलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### ७९. उनाड मुलगा प्रोफेसर झाला

अण्णांचा स्वभाव इंग्रजी सहावे इयत्तेपर्यंत तसाच होता. मॅट्रिक्युलेशन क्लासांत गेल्यावर त्यांची वृत्ति पालटली. त्यांना घरचीं गरीबी जाणवूं लागली. यामुळें ते येथून नेटानें अभ्यास करूं लागले. शिवाय त्या वेळचे हेडमास्तर रावसाहेब वाखारकर हे अगदीं कडक असल्यानें त्यांचाहि धाक त्यांचेवर बसून अण्णांचें अभ्यासाकडे चांगलें लक्ष लागलें; तें इतकें कीं ते पुढें बी. ए. होऊन अहमदाबाद कॉलेजमध्यें दोन वर्षें फेलो झाले. त्या ठिकाणीं तेथील संस्कृतचे प्रोफेसर आबाजी विष्णु काथवटे यांची अण्णांच्या विनयशील वागणुकीवरून त्यांचेवर बहालमर्जी बसली. तेथून पुढें एम्. ए. झाल्यावर राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल कँडीसाहेब यांनीं कोल्हापुरास प्रो. परांजपे रिटायर झाल्यावर त्यांचे जागीं अणांची नेमणूक केली. त्याच मुदतींत ते सरदार

क्लासचे सुपरिंटेंडंट होते. या वेळीं त्यांनीं ग्रंथमाला, विश्ववृत्त हीं मासिकेंहि चालविलीं होतीं. त्या वेळीं त्यांचें वर्तन आपल्या विद्यार्थ्यांशीं, हाताखालील व इतर मंडळींशीं फारच विनयशील असे. वागणूक अगदीं साधी. त्या वेळचें त्यांचें 'लंचन' म्हणजे केवळ 'दशमी व पिठलें' हें असे. अशी जरी साधी वागणूक होती तरी विद्यार्थी वगैरेंस त्यांची चांगली मदत असे. त्यांचे घरीं जेवून अभ्यास करणारे विद्यार्थी बरेच असत; त्यांस ते पुस्तकरूपानें व पैशानेंहि मदत करीत.

लेखक—प्रो० रा. वि. ओतूरकर

## ८०. राजनिष्ठेचें कलम लिहून द्यावयास नको

काँग्रेसच्या क्रीडवर शेवटपर्यंत सही न करणारांपैकीं ते एक होते व त्यामुळें इ. सन १९१५ च्या समेटानंतरहि ते कधींहि काँग्रेसला प्रतिनिधी म्हणून गेले नाहींत. राजनिष्ठेच्या क्रीडवर मी सही करणार नाहीं, असें गु० अण्णा म्हणत. 'कां' असें विचारलें तर ते दोन प्रकारचीं उत्तरें हंसून देत असत. ते म्हणत ' मी बादशहाशीं राजनिष्ठ आहें हें लिहून कशाला द्यावयाला पाहिजे ? तें गृहीतच आहे. मी माझ्या वडिलांचा मुलगा आहे हें जसें लिहून द्यावयास नको, तसेंच राजनिष्ठेचें हेंहि कलम लिहून द्यावयास नको. पुन्हा असें कीं, इंग्लंड हें अटलांटिक महासागरांतलें एवढेंसें बेट. उद्यां उल्कापात होऊन तें समुद्राच्या पोटांत गडप झालें तर काय तुम्ही हिंदुस्थानांतील लोक त्यांच्यामागें समुद्रांत उड्या घेणार ? ' या दुसऱ्या वाक्याच्या वेळीं गु. अण्णा अगदीं मनापासून हंसावयाचे.

## ८१. धक्काधक्कीचा मामला

विद्यार्थ्यांना शिकविण्याची त्यांची पद्धत अत्यंत प्रेमळपणाची होती. त्याविषयीं एक आठवण सांगतों. शंकर व राजा असे नवीन समर्थविद्यालयांत दोन विद्यार्थी होते. शंकर श्रीमंत व अशक्त असे. राजा गरीब पण सशक्त असे. शंकर आपलें रेशीमकाठी धोतर नुकतेंच चापून चोपून नेसून उभा होता; इतक्यांत राजा गडबडीनें आल्यामुळें त्याचा धक्का लागून शंकर पडला. व त्याचें धोतर चिखलानें भरलें. अर्थात्‌च तक्रार गुरुवर्य अण्णांच्याकडे गेली. गुरुवर्य अण्णांनीं प्रथमच राजास समजावून सांगितलें कीं तुज-

कडून न कळत कां होईना शंकराचें नुकसान झालें व म्हणून भांडण उद्भवलें. तूं जर त्याच्या धोतराचा चिखलानें भरलेला भाग धुवून त्याचें धोतर वाळत टाकलेंस तर शंकरचें तुझ्यावरील प्रेम दुणावेल व तुम्ही दोघे मोठे मित्र व्हाल; राजास हें पटलें व त्यानें तत्काळ त्याप्रमाणें केलें. पुढें शाळा सुरू झाल्यावर शुद्धलेखनाचा तास आला तेव्हां गुरुवर्य अण्णांनीं योजूनच पुढील ओळी सांगितल्या. 'हा धकाधकीचा मामला। कैसा घडे अशक्ताला.........' इ. व पुढें शुद्धलेखन झाल्यावर त्या ओळीचें मर्म सांगतांना शंकरला त्याची चूक समजावून सांगितली. बिचारा शंकर लाजला. दोघांसही आपली चूक कळली व दोघेहि मित्र झाले.

## ८२. सरकारनें माझीं शंभर मुलें दूर केलीं

समर्थ विद्यालयांतील मुलांवर त्यांचें अपत्यनिर्विशेष प्रेम होतें. यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. जुनें समर्थविद्यालय बंद झाल्यावर कांहीं दिवसांनीं त्यांचा एकुलता एक मुलगा 'बंडू' मरण पावला. पुढें सुमारें एक वर्षानंतर सायंकाळच्या वेळीं ते इकडून तिकडे ओरींतून हिंडत होते. त्यांच्या मुलाची आठवण काढली तेव्हां ते म्हणाले "जाऊंदे रे, माझीं शंभर मुलें सरकारनें दूर केलीं तेव्हां मी काय केलें, तर आतां या पुत्राच्या मृत्यूबद्दल मीं हळहळत बसावें ?"

## ८३. What is this 'madar'?

ना० चौबळ व गु० अण्णा हे एके ठिकाणीं आल्यापासून वारंवार कांहीं गमतीचे प्रसंग घडून यावयाचे. एके वेळीं गु० अण्णा त्यांच्या कांहीं गोष्टींचा मसुदा तयार करून घेऊन गेले, त्यावर '×××× बद्दल करारमदार' असें नांव होतें. चौबळ तो कागद घेऊन हंसून म्हणाले 'अण्णा, I can understand this करार, but what is this मदार ?' दोघेहि हंसले.

## ८४. बारीक पाहणी

अत्यंत बारीक गोष्टी देखील अण्णांच्या अवलोकनांतून सुटत नसत. मीं स्वतःचें 'Britain Since Waterloo नांवाचें एक लहानसें पुस्तक त्यांना भेटीदाखल पाठविलें; त्यावर नांवापुढें M. A. S. T. C. असें लिहिलेलें होतें. त्यानंतर गु० अण्णांचें पत्र आलें तेव्हां त्यांत पुढील मजकूर होता.

नांवापुढें दोन पदव्या आहेत त्यांत ‘ A. ’ या अक्षरापुढें पूर्णविरामानंतर स्वल्पविराम पाहिजे. ’

### ८५. पोस्टास पैसे कमी द्या

एके प्रसंगीं मला लिहावयाकरितां एक कार्ड हवें होतें. त्या वेळीं माझा व अण्णांचा दृढ परिचय झालेला नव्हता. तेव्हां एकच कार्ड घेऊन एक पैसा त्यांना दिल्यास वाईट दिसेल म्हणून मी त्यांच्या टेबलांतील कार्डांपैकीं चार कार्डें घेऊन त्यांत एक आणा टाकूं लागलों, तों ते म्हणाले ‘ तुला लागेल तेवढीं कार्डें लिही, परंतु पैसे टाकूं नकोस. ’ मीं विचारलें ‘ काय म्हणून ? तुम्ही तरी काय तीं फुकट आणलींत ? ’ तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं ‘ मीं फुकट आणलीं नसलीं म्हणून काय झालें ? मी उद्यां बाजारचे आंबे आणून मी तुला खावयास दिले तर काय तूं मला त्याबद्दल पैसे देणार ? ’ शक्य तितकीं कार्डें कमी पाठवावयाचीं; पोस्टास पैसे कमी द्यावयाचे. तळेगांवाहून कोण पुण्यास जाणार असेल तर पुण्याचीं पत्रें बहुधा त्यांच्या हातीं धाडावयाचीं, अशी त्यांची पद्धत असे. पत्रांना उत्तरें मात्र ते ताबडतोब देत. ते म्हणत पत्र म्हणजे एकमेकांचें बोलणें. प्रत्यक्ष भाषणांत एकानें प्रश्न विचारला व दुसरा गप्प राहिला तर आपण काय म्हणूं ? तीच स्थिती पत्रोत्तराची समजावी.

लेखक--श्री० शंकर दत्तात्रेय रबडे

### ८६. स्वतःची स्तुति ऐकूं नये

एकदां गुरुवर्यांचा एकसष्ठावा वाढदिवस असतांना मी तळेगावीं गेलों होतों. व पुण्याहून कांहीं प्रमुख लोकहि गेले होते. त्या वेळीं सर्व लोकांची गुरुवर्यांच्या आयुरारोग्यवृद्धीबद्दल प्रार्थना करण्यासाठीं अभिनंदनपर सभा भरली होती. त्या वेळीं आपली स्तुती होणार हें जाणून अत्यंत आग्रह केला असतांनाही ते आले नाहींत. स्तुतिपर व्याख्यानें झाल्यावर मग गुरुवर्य आले. तेव्हां माहात्म्य काय असतें तें मला समजलें.

### ८७. वेळेचें महत्त्व

गुरुवर्यांना आपल्या खोलीबाहेरील पडवींत फिरण्याची संवय असे व त्या वेळीं ते इतरांशीं फिरत असतांना गप्पा मारीत असत. सहज गोष्टी निघतांना ते म्हणाले कीं, “ एका इंग्लिश ग्रंथकारानें एके ठिकाणीं असें

म्हटलें आहे कीं, ' To take a man's time for more than ten minutes is nothing but brutality.' त्यांना वेळेचें फार महत्त्व वाटे.

लेखक—श्री० रघुनाथ दुर्गाराम जोशी, ( खानापूर. )

## ८८. स्वदेशीवरील प्रेम

अण्णांचें स्वदेशीवरील प्रेम अपूर्व होतें व त्यांचा तो नियमही एखाद्या व्रतासारखा कडकडीतपणें, पवित्रपणें व निष्ठेनें पाळला जात होता. ते शामदानाकरितां देशी मेणबत्त्या वापरत. त्यांचें मेण गळून तें काढून नवीन मेणबत्ती बसविणें हा बराच खटाटोप पडे; पण ते रंगूनी अर्धस्वदेशी किंवा परदेशी मेणबत्तींना कधीं स्पर्शही करीत नसत. तसेंच पूर्वीच्या कऱ्हाडच्या कारखान्यांतील स्वदेशी काड्यांच्या पेट्या त्यांच्याकडे होत्या व ते त्याच वापरीत. त्यांतील काड्या कोणीं खर्च करूं लागल्यास किंवा एकादी काड्यांची पेटी घेतल्यास ते सांगत कीं, " माझ्या शेवटपर्यंत त्या मला पुरल्या पाहिजेत, तेव्हां ती काड्यांची पेटी घेऊं नका ! तुम्हांला दुसऱ्या चालतात तेव्हां मी दुसरी तुम्हांला मागवून देतों. " कारण त्या वेळीं बेळगांवचा किंवा कऱ्हाडचा कारखाना आतांप्रमाणें सुरू झालेला नव्हता !

## ८९. समर्थांचा दासबोध

त्यांचा अतिशय आवडता ग्रंथ म्हणजे श्रीसमर्थांचा दासबोध होय. त्यांचीं त्यावर शेंकडों पारायणें झालीं असतील व मनन तर नेहमींच चालू असे. विद्यालयांत जेवायला बसल्यावेळीं दोन प्रहरीं प्रत्येकानें-विद्यार्थी व शिक्षकानें-रोज एक नवा श्लोक म्हणण्याचा प्रघात काव्याचें पाठांतर व्हावें या दृष्टीनें पाडलेला होता व शेवटची पाळी गुरुवर्य अण्णांच्यावर यावयाची. अशा प्रकारें म्हणण्यास सुरुवात होत असे. ते बहुधा दासबोधांतील एकदोन ओव्या म्हणत असत. पण त्या अशा सूचक व वेचक असत कीं, त्यांच्या सूक्ष्मदर्शकत्वाचें आश्चर्य वाटावें. सकाळपासून जी गोष्ट महत्त्वाची विद्यार्थ्यांमार्फत घडली असेल–विशेषत: तो अपराध असेल तर–त्याच्या मुळाशीं असलेल्या अवगुणत्यागाविषयीं दासबोधांतील एकदोन ओव्या म्हणत असत किंवा एखादा विद्यार्थी श्लोक, आर्या म्हणतांना चुकला तर त्या अर्थाच्या म्हणत. एवंच दासबोधाचा त्यांचा व्यासंग इतका दृढ होता कीं वाटेल ती ओवी वाटेल त्यावेळीं त्यांना स्फुरत असे.

## ९०. राष्ट्रीय शिक्षणाचा ध्यास

आमच्या घरीं माझ्या धाकट्या भावाची मुंज ज्येष्ठ व. ५ रविवार शके १८४५, ता. २५ मे १९२३ रोजीं झाली. मुंजीची आर्याबद्ध–पद्यमय पत्रिका सभ्याचाराप्रमाणें मी गु० अण्णासाहेबांकडे पाठविली. त्या पद्यमय पत्रिकेचें आशीर्वादात्मक उत्तर खालील पद्यात्मक श्लोकांनीं त्यांनीं पाठविलें. व त्यांत मंगलकार्ये हल्लींची कालपरिस्थिति पाहून कशीं करावीं, उदारपणा कोठें कसा दाखवावा, ह्याविषयीं केलेला उपदेश सर्वत्रांनाच घेण्यासारखा आहे व ही अण्णांची आठवण मीं त्यांच्या अक्षरासह फोटोंत घालून ठेवली आहे.

विद्याविनयसंपन्नो दीर्घायुः सर्वसौख्यभाक् ।
गणेशश्च बटुर्भूयान्निजवंशधुरंधरः ॥१॥
अवश्यमेव कर्तव्ये धर्मकार्ये सुमंगले ।
समर्यादव्ययैर्भाव्यं विवेकगृहमेधिभिः ॥ २ ॥
राष्ट्रस्थितिज्ञैर्भाव्यं न मिष्टान्नभोजनादिषु ।
महोत्सवेषु गानेषु वादनेष्वमितव्ययैः ॥ ३ ॥
समुदारमनस्कैस्तैः करणीया सहायता ।
संस्थानां राष्ट्रियाणां याः शिक्षणार्थविनिर्मिताः ॥ ४ ॥

—मिति ज्येष्ठ वद्य ३।४५

## ९१. विद्यार्थ्यांची ग्राहकशक्ति पहा !

मी विद्यालयांत प्रौढ विद्यार्थी म्हणून होतों. तरी तेथील तिसऱ्या व चवथ्या म्हणजे अभ्यासाच्या दृष्टीनें इंग्रजी ५।६ व्या इयत्तेला मराठी गद्य-पद्य शिकवीत असें. माझा मराठी विषय चांगला असल्यानें हें काम मी करीत असें. एकदां मी केकावली शिकवीत असतांना " कळी करि सुनि-र्मळीं परम उग्र दावा नळीं " ही अन्वयार्थाला थोडी कठीण कविता आली. त्याच वेळीं वर्गाबाहेरील व्हरांड्यांत उभे राहून ती केका विद्यार्थ्यांना योग्य प्रकारें समजली नाहीं हें अण्णांनीं ओळखलें व एका चिठीवरून " ही केका आज शिकवूं नका " असा एका विद्यार्थ्यामार्फत निरोप पाठविला.

त्याप्रमाणें मीं केलें हें सांगणें नकोच. नंतर संध्याकाळीं आपल्या खोलींत बोलावून "तुम्ही खरोखर ती केका चांगली शिकविली; पण विद्यार्थ्यांची ग्राहकशक्ति ती घेण्याइतकी अद्याप वाढली नाहीं. तेव्हां त्यांच्या आवांक्याबाहेरचा विषय शिकविण्यांत फायदा नाहीं. तेव्हां क्रमानें कविता न शिकवितां सोप्या निवडून शिकवा" असें सांगितलें. ह्यावरून विद्यार्थ्यांसमोर शिक्षकांशीं वरिष्ठांनीं कसें वर्तन ठेवावें हा बोध घेण्यासारखा आहे.

लेखकः—श्री० ज. स. करंदीकर

## ९२. गुरुवर्यांची जबर तत्त्वनिष्ठा •

प्रो० विजापूरकर यांची तत्त्वनिष्ठा जबर होती. एखादें तत्त्व त्यांच्या बुद्धीला पटून त्याचा त्यांनीं एकदां अंगिकार केला म्हणजे कोणत्याही प्रसंगानें ते तत्त्वच्युत होत नसत. स्वदेशीचें तत्त्व त्यांनीं आमरणांत कडक रीतीनें पाळलें. अंगावर वापरण्याच्या कपड्यांना लागणाऱ्या स्वदेशी कापडाची सुदैवानें अलीकडे अडचण भासेनाशी झाली आहे. त्यामुळें तेवढ्या पुरतें स्वदेशीचें व्रत पाळणारे स्वदेशीवाले अनेक आढळतील. परंतु छत्रीचा कपडा स्वदेशी मिळत नसल्यानें तेवढ्यापुरता बहुतेकांकडून स्वदेशीव्रताचा भंग होतो. पण अण्णा विजापूरकर यांनीं परदेशी छत्रीही वापरण्याचें सोडून दिलें असून उन्हांत, वाऱ्यांत अगर भरपावसांतहि केवळ स्वदेशी घोंगडीवरच निर्वाह करीत. आपल्या हातून होणाऱ्या खर्चाची जी जी रक्कम परदेशी कंपन्या किंवा सरकार यांच्या तिजोरींत जाणार आहे असें उघड दिसे तेथें तसला खर्च अगदीं अपरिहार्य असेल तरच करावयाचा व तोहि शक्य तितका कमी करावयाचा असा त्यांच्या वागणुकीचा नियम ठरलेला असे; यामुळें ते केव्हांही आगगाडींतून 'सेकंड-क्लासां'तून प्रवास करीत नसत; एवढेंच नव्हे, तर जेव्हां तळेगांवाहून मुंबईला 'वीक-एंड' तिकिटें सवलतीच्या दरानें मिळत त्या वेळीं ते मुंबईला जावयाचें झाल्यास शुक्रवारीं जाऊन मंगळवारच्या आंत परत येत. 'वीक-एंड' तिकिटाचा हा फायदा त्यांनीं एकाही वेळेस चुकूं दिला नाहीं.

## ९३. नियम तो नियम

त्यांच्या खऱ्या तत्त्वनिष्ठेची परीक्षा एका निराळ्याच प्रसंगानें झाली. समर्थ-विद्यालयांत घ्यावयाचा विद्यार्थी अविवाहित असला पाहिजे असा त्यांचा

सक्त नियम असे आणि या नियमाला कसलाही अपवाद ते मान्य करीत नसत. एकदां मुंबईचे एक धनाढ्य भाटे गृहस्थ समर्थविद्यालय पहावयास आले. तेथील साधी राहाणी, टापटीप आणि विद्यार्थ्यांस लागणारी शिस्त इत्यादि गोष्टी पाहून त्यांना आपला मुलगा विद्यालयांत ठेवण्याची इच्छा झाली. त्यांच्या चिरंजीवाचें वय १२ वर्षांच्या आंतच होतें. पण गुजराथेंतील रूढीप्रमाणें त्याचा विवाह झालेला होता. तथापि मुलाचें वयोमान १२ च्या आंतच असल्यानें तो ब्रह्मचारीच आहे आणि त्यास विद्यालयांत प्रवेश मिळाल्यास येथील अभ्यासक्रम संपेपर्यंत त्यास आपण घरीं नेणार नाहीं, सुट्टींत देखील त्यास येथेंच ठेवूं, म्हणजे त्याच्या व्रतभंगाची आपणांस शंका राहणार नाहीं असें त्या गृहस्थानें बोलणें सुरू केलें. त्या मुलाचा प्रवेश विद्यालयांत झाल्यास सदर गृहस्थाकडून बरीच मोठी रक्कम मिळण्याचा संभव होता व आपल्या मध्यस्थीनें मुंबईतील भाटे जातींतील इतर व्यापाऱ्यांकडूनही आपण मदत मिळवून देऊं असेंही त्या गृहस्थानें सुचविलें. पण अण्णांचें उत्तर कायम होतें. विवाहित मुलाला कोणत्याही अटीवर व कोणत्याही आमिषाला भुलून मी घेणार नाहीं असें त्यांनीं साफ सांगितलें. 'तुमची ही शाळा स्थापन होण्याच्या पूर्वीच ज्यांचा विवाह झाला अशा सर्व मुलांना हा नियम, त्यांचा अपराध नसतां, जाचक होतो याकरितां हा नियम कळल्यानंतर ज्यांचा विवाह होईल त्यांना ही अट लागू करा,' अशीही एक वकिली शक्कल त्या गृहस्थानें लढवून पाहिली. परंतु या कामांत मी कोणाचीही भीड ऐकणार नाहीं व कसल्याही लोभाला वश होणार नाहीं असें त्यांनीं निश्चयपूर्वक सांगितलें.

## ९४. अतिथिसत्कार केलाच पाहिजे

प्रो० विजापूरकर यांना राजाराम कॉलेजांतून कायमची रजा मिळाली आणि ते समर्थविद्यालय काढण्याच्या विचारांत आहेत इत्यादि वृत्त वृत्तपत्रांतून ऐकलें होतें, परंतु त्यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग आलेला नव्हता. अशा संधीस मीं लिहिलेल्या 'जगांतील क्रांतिकारक लढाया' या पुस्तकाची हस्तलिखित प्रत त्यांच्या ग्रंथमालेंत छापण्याकरितां द्यावी, त्यांचा प्रत्यक्ष परिचय करून घ्यावा आणि भावी समर्थविद्यालयाची रूपरेषाही त्यांच्यापासून समजून घ्यावी अशा उद्देशानें मी १९०६ च्या मार्च महिन्यांत

कोल्हापुरास गेलों. पूर्वपरिचय नसल्यानें त्यांच्या घरीं उतरावयास जाण्याचा संकोच वाटून स्टेशनानजीकच्या खाणावळींत बिऱ्हाड ठेवून स्नान आटोपून पुस्तकाची हस्तलिखित प्रत घेऊन त्यांच्या घरीं जाऊन त्यांस भेटलों. कोण, काय वगैरे औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर तुमचें सामान कोठें आहे असा प्रश्न त्यांनीं केला. त्यावर 'खाणावळींत' असें उत्तर देतांच 'आपल्या समाजावर पाश्चात्य चालीरीतींचा मोठा पगडा बसत चालला आहे व त्यामुळें आपल्या आर्यधर्मास आपण मुकत आहों; गृहस्थाश्रमधर्म हा तर हिंदुधर्माचा आधारस्तंभ आहे. याकरितां तो आपण सर्वांनीं अवश्य पाळला पाहिजे. एकमेकांच्या घरीं जाण्यायेण्याविषयीं संकोच धरून जर आपण खाणावळींत उतरूं लागलों तर अतिथिसत्कार कसा करावयाचा ? आमचा मनुष्य बरोबर घेऊन जा आणि खाणावळींतून सामान घेऊन या.' अशा रीतीनें पहिल्याच भेटींत आग्रह करून त्यांनीं खाणावळींतून सामान आणविलें व त्यामुळें सबंध दिवसभर त्यांच्याशीं बोलण्याचालण्यास वेळ मिळून त्यांच्या साध्या राहाणीची व उच्च विचारसरणीची मला प्रत्यक्ष माहिती मिळाली. प्रो० विजापूरकर यांच्याशीं प्रथम प्रत्यक्ष परिचय झाला तो अशा रीतीनें माझ्या स्मरणांत कायमचा राहिला.

रा० ब० कृ. ना. पंडितराव, (माजी सर न्यायाधीश, कोल्हापूर )

## ९५. वैकुंठवासी कीं कैलासवासी

वै. अण्णासाहेब विजापूरकर (ते माध्वसंप्रदायी असल्यानें त्यांस कैलासवासी न म्हणतां वैकुंठवासी म्हणणें बरें) हे माझे लहानपणापासूनचे स्नेही असून ते व मी कॉलेजांत एकाच वेळीं होतों; परंतु नोकरीचा संबंध सुटेपर्यंत त्यांच्या सार्वजनिक आयुःक्रमास खरा आरंभ झाला नसल्यानें त्यांच्या चरित्रांत प्रसिद्ध होण्यासारख्या बहुतेक गोष्टी त्यानंतर घडल्या आहेत. प्रो० विजापूरकर यांचा निष्कपट स्वभाव, परोपकारबुद्धि, दीर्घोद्योग, निर्भय वृत्ति, कार्यनिष्ठा वगैरे सद्गुण प्रसिद्ध आहेत. तारुण्यांत त्यांच्या स्वभावांत थोडा हटवादीपणा असे; परंतु तो दिवसेंदिवस बराच कमी होत चालला होता. लहानपणीं तरी धार्मिक आचारांविषयीं त्यांची अनास्था दिसे; परंतु ते नास्तिक नव्हते. पुढें पुढें तर त्यांच्या वर्तनांत धार्मिकता जास्त दिसूं लागली. स्वदेश, स्वभाषा व आर्यसंस्कृति यांविषयीं त्यांना लहानपणापासून

मोठा अभिमान असे. तसेंच स्पष्ट वक्तृत्वही त्यांच्या स्वभावांत प्रथमपासूनच प्रामुख्यानें दिसत असे.

## ९६. जो व्यसनाधीन झाला तो मेला

असत्प्रवृत्तीची त्यांना मोठी चीड असे. त्यासंबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट एकदां घडली ती अशी:—त्यांचा व माझा एक पदवीधर स्नेही दुर्दैवानें बाहेरख्याली व्यसनांत सांपडला. अण्णांस असल्या गोष्टी प्रायः कळत नसत व कळल्याच तर फार उशीरां कळत. त्यांच्या कानांवर ही गोष्ट गेल्यावर ते एकदां सहज माझ्या घरीं आले तेव्हां मी घरीं नव्हतों. ते माझ्या आईजवळ येऊन बोलत बसले व...गेले असें म्हणून लागलींच निघून गेले. घरीं आल्यावर आईनें मला विचारिलें, "अरे, त्याला ( आमच्या स्नेह्याचें नांव घेऊन ) काय झालें ? परवां तो आला होता तेव्हां चांगला दिसला." मलाही आश्चर्य वाटलें. मीं आईस म्हटलें, 'काल माझी व त्याची भेट झाली होती. अण्णानें तुला असें कां सांगितलें कळत नाहीं." मीं अण्णांस मुद्दाम भेटून विचारिलें तेव्हां त्यांनीं तो ( आमचा स्नेही ) मेला हें खरें असें म्हटलें. तेव्हां मला वाईट वाटलें; परंतु लगेच ते म्हणाले, "जो मनुष्य व्यसनाधीन झाला तो मेला." असें ते म्हणाल्यावर मला उलगडा झाला. ते वरील आमच्या स्नेह्याशीं कांहीं दिवस बोलतही नव्हते. अण्णा आपल्याशीं बोलत नाहींत हें पाहून त्यास वाईट वाटलें. अण्णांच्या अंतःकरणांत त्या स्नेह्याविषयींचें प्रेम कमी झालें नव्हतें; पण त्यांना त्याची तशी स्थिति शोचनीय वाटली. त्यांची राहणी अगदीं साधी असे. त्यांना कोणीं विडी ओढली किंवा तंबाखू खाल्ली तरी आवडत नसे.

### लेखक—श्री० गंगाधर विश्वनाथ गोखले ( पुणें )

माझ्या स्मृतिपटलावरून पुसटत चाललेल्या गुरुवर्य विजापूरकरांच्या आठवणींची स्वतःच्या मनाशीं उजळणी करून त्यांचे उज्ज्वल धडे तरुण पिढीला देण्याचें भाग्य माझ्या वांट्यास आलें याबद्दल मला धन्यता वाटते. ती० विजापूरकरांच्या उज्ज्वल आठवणी माझ्या लेखणींतून उतरल्यामुळें त्यांचा गुणगौरव आपोआप होत असला तरी त्यांत माझ्या मनाचें समाधान होणारें आहे म्हणूनच मी ती० अण्णांच्या आठवणी—ज्या मला संपूर्ण आठवतात त्या लिहिण्यास अनुमति दिली. या आठवणी लिहिण्यांत

स्वतःची प्रौढी मिरविण्याचा हेतु नाहीं, आपलें पूर्वचरित्र हल्लींच्या तरुण पिढीस समजावें अशी इच्छा नाहीं अथवा गु० अण्णांशीं किंचित्काल निकट-वर्तित्व लाभल्याचा गर्व-ताठाही मला आलेला नाहीं. त्यांच्या साहचर्यांत असतांना त्यांची साधी रहाणी, निर्लोभ व निरहंकार वृत्ति, उदात्त विचार वगैरे गोष्टींचा उमटलेला ठसा 'माझ्या शब्दांत' लोकांपुढें ठेवण्याचा माझा मानस आहे. त्यांत अतिशयोक्ति आहेशी भासल्यास ती तेवढी माझी व मुख्य प्रसंग व त्या वेळचे शब्द गुरुवर्य विजापूरकरांचे आहेत येवढें सांगि-तलें म्हणजे सुज्ञ वाचक हंसक्षीरन्यायानें योग्य ती निवड स्वतःच्या मनाशीं करूनच आठवणी वाचतील अशी आशा आहे.

## ९७. सरकारी पाहुणचार

१९०९ सालीं अण्णांना व मला कारागृहांत एकत्र राहण्याचा योग आला. आम्ही ७–८ जण समवयस्क अल्लड तरुण व अण्णा, कै० विनायकराव जोशीराव व रागिणीकर्ते वामनराव जोशी अशी थोर मंडळी या सर्वांना एकाच ठिकाणीं जेवावें रहावें लागत असे. स्वयंपाकाचें काम ती० अण्णांचे देखरेखीखालीं विनायकराव करीत असत. पण या कामांत ही थोर मंडळी अनभिज्ञ असल्यानें कधीं भाजी खारट, तिखट, आंबट होत असे व भाकऱ्या नेहमीं कच्चा रहात असत; मी व माझ्या स्नेही मंडळींनीं या कच्च्या भाकरी ४।५ दिवस कशा तरी खाल्ल्या. स्वयंपाकाची व्यवस्था या मंडळीकडून आपल्याकडे घेण्याचें सर्वांच्या मनांत आलें. पण ही योजना अण्णांना सांगावी कोणीं, याचीच विवंचना सर्वांना पडली. गु० अण्णांचे पश्चात् आम्ही तरुण मंडळींनीं खूप विचार करावा व जोराचीं भाषणें करून कच्च्या भाकरी यापुढें न खाण्याचा हट्ट प्रदर्शित करावा. असा क्रम दोनतीन दिवस चालला. तुरुंगांतील अगदीं एकीकडचा भाग म्हणजे शौच-कूपांची जागा. ती जागा आम्ही मंडळींनीं आमच्या 'भाकरीबंडा'च्या विचारासाठीं मुक्रर केली व सारे कटवाले कोणत्या ना कोणत्या तरी सब-बीनें तेथें जमले आणि भवति न भवति होऊन मंडळींनीं वडिलांकडे शेवटचें 'अल्टिमेटम' देण्याचें काम मजवर सोपविलें. आमची सभा बर-खास्त होण्याचे वेळींच गुरुवर्य अण्णा एकदम तेथें प्रकट झाले. आम्ही सर्व आश्चर्यानें थक्क झालों व थोडीशी ओशाळगतही वाटली. गुरुवर्य अण्णा

म्हणाले ' तुह्मी मंडळींनीं कट करून बॉंबगोळे केले व उडविले यावर आतां माझा विश्वास बसूं लागला आहे. पण त्या मोठ्या कटांची हकीगत जशी पोलीसला समजली तसेंच तुमच्या ह्या भाकरीबंडाचा कटही उघडकीस आला. तुह्मांला एकदां अनुभव आला असतांही तुम्ही बेसावध राहिलां म्हणून मला इत्थंभूत हकीकत ऐकायला मिळाली. तुमचीं भाषणें व अधिकार हिसकावून घेण्याची तयारी पाहून मला कौतुक वाटलें; पण या साऱ्या गोष्टीला गुप्त खलबतें कशाला ? मला सांगितलें असतें तर मी तुम्हांला आचारी बनविलें असतें. कच्च्या भाकरी तुमच्याबरोबर मीही खातों. त्या तसल्या भाकिरींत अद्वैतवृत्ति परस्परांत उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे ( कारण त्या भाकरीचा पापोद्रा कधींही सुटलेला नसावयाचाच ). असले हिरवें कच्चें अन्न सुखानें खाण्याची वृत्ति बाणावी व कारागृहांतील पुढील दिवस सहजपणें तुम्ही कंठावे म्हणून मीं तुह्माला कसोटीला लावलें. आजपासून स्वयंपाकाची व्यवस्था तुह्मी आपल्या हातीं घ्या. पण क्षुल्लक गोष्टीकरितां कट, कारस्थानें किंवा बंडें करूं नका.' क्षुल्लक गोष्टींतून सुद्धा मोठीं तत्त्वें काढून तीं तरुणांच्या मनावर बिंबविण्याची हातोटी अण्णांना साधली होती व तिचा उपयोग ते वेळोवेळीं करून आम्हांस जागृति देत असत.

### ९८. गुरुवर्यांचें शीघ्रकवित्व

आह्मां दोघांचाही कारागृहवास संपून मी १९१४ सालीं पुण्यास आल्यावर तळेगांवास समर्थविद्यालयांत ती० अण्णांना भेटावयास गेलों. अण्णा तेथें एकटेच रहात असत. तेव्हां ४–८ दिवसांनीं मी तळेगांवास येत जाईन असें सांगून मी परत पुण्यास आलों. डॉ० पळसुले यांचे घरीं ती० अण्णांची व माझी गांठ वरचेवर पडे. त्यांना येण्यास सवड नसली म्हणजे ते मला पत्र लिहून कामकाज कळवीत. मजकूर अगदीं बारीक अक्षरांनीं पोस्टकार्डावर लिहिलेला असे. पण मौज ही कीं समग्र मजकूर पद्यमय असे. त्यांतील कांहीं कविता ज्या मला अद्यापि आठवतात त्या खालीं दिल्या आहेत.

'उपवास चित्तशुद्धीनें पूजिणें रघुसत्तम ।
गूळ आणी शेंगदाणे खोबरें अति उत्तम ।।
खर्जूर खारिका पेरू सोनकेळीं यथामती ।
मूल्य देऊनि आणावें वाट पहात संप्रति ।।

गोपाळरावा प्रणिपात सांगा ।
लागेल तें द्रव्य तिथेंच मागा ॥
विलंब आलस्य न होई ठावें ।
म्हणोनियां मीं लिहिलें स्वभावें ॥

गु० अण्णांचें शीघ्रकवित्व व समर्थांनीं योजिलेल्या वृत्तांत कविता करण्याची आवड यावरून दिसून येते.

## ९९. सर्व सुखांत आहांत, आतां मी जातों!

ती० अण्णांची प्रकृति अगदीं क्षीण झाली असून ते अगदीं थोड्या दिवसांचे सोबती आहेत अशी बातमी कोल्हापुरास राहणारे माझे आतेबंधु ती० भाऊराव भावे यांना समजतांच ते पुण्यास आले व मला सांगातीं घेऊन तळेगांवास गेले. आम्ही त्यांचे खोलींत गेलों. आवाजावरून त्यांनीं आह्मांस ओळखलें. अण्णांची आसन्नमरणावस्था पाहून आम्ही सद्गदित झालों. अण्णा म्हणाले 'माझी स्थिती दुःखाऐवजीं आनंद मानण्याजोगीच आहे. समर्थविद्यालयाचें पुनरुज्जीवन झालें आहे, तुम्ही सर्व मुलें सुखांत आहांत, आप्तेष्टांचें सुख व माझ्या आयुष्यांतील कर्तव्य अशा दोन्ही गोष्टींचा आनंद मीं उपभोगला आहे, तेव्हां तुम्हीं दुःखी व्हावें असें काय उणें उरलें?' हें ऐकून आम्हीं स्तब्ध बसलों. इतक्या वेंचक शब्दांखेरीज अण्णा कांहींच बोलले नाहींत व आम्हीही त्यांना विशेष त्रास न देतां मुकाट्यानें उठून आलों.

लेखक—श्री० र. आ. रायरीकर आणि रं. वि. रबडे

## १००. स्वावलंबन

गु० अण्णांची वागणूक फारच साधेपणाची असे. त्यांच्या बाह्य वेषावरून महाराष्ट्रांत गाजलेले प्रो० विजापूरकर ते हेच असें नवीन माणसाला खरें सुद्धां वाटत नसे! स्वावलंबन हा तर त्यांचा बाणा होता. १९२०–२१ सालीं ते आमच्याकडे बरेच वेळां येत. त्या वेळेस साठीचें वयोमान असतांनाही थंड पाण्याचें स्नान ते करीत असत; स्वतःचें धोतर आणि इतर कपडेही स्वतःच ते धूत असत. स्टेशनला जातांना बरोबर फारच सामान असल्यास ते गाडी करावयाचे; नाहीं तर सामानाचें गाठोडें पाठीला आडकावून ते पायींच स्टेशनवर जात.

## १०१. मीच पुण्यास येतों

गुरुवर्य अण्णांना नसत्या मोठेपणाच्या कल्पना माहीत नव्हत्या. १९२१ मध्यें फर्ग्युसन कॉलेजांतील कांहीं विद्यार्थी त्यांना भेटण्याकरितां तळेगांवीं जाणार होते. अण्णांना हें समजतांच त्यांनीं उलट निरोप पाठविला कीं, " तुह्मी इतक्या मंडळींनीं पुण्याहून उठून तळेगांवला येण्यापेक्षां मीच पुण्याला येतों. पुष्कळांच्या कार्यक्रमांत फेरबदल करावयास लागण्यापेक्षां एकट्याच्या कार्यक्रमांत फेरकार करावयास लागला तरी हरकत नाहीं."

## १०२. कडक नियमपालन

गुरुवर्य अण्णांच्या नित्यनियमांखेरीज नैमित्तिक नियमही ते वारंवार पाळीत असत. १९१८ सालीं नवीन समर्थ विद्यालयाची स्थापना केल्यावर ५० हजार रुपये सहा महिन्यांत गोळा करण्याचें त्यांनीं व सर महादेव चौबळ यांनीं ठरविलें. सहा महिनेपर्यंत गुरुवर्य अण्णांनीं गोड खाण्याचें सोडलें आणि पायांत जोडा घालण्याचेंहि सोडलें होतें. सहा महिन्यांत वरील रकमेपैकीं बरीचशी रक्कम रोख जमा झाली आणि बाकीच्या रकमेचीं आश्वासनें मिळालीं.

## १०३. दांडगी श्रद्धा

त्यांची ईश्वरावर श्रद्धा फार दांडगी होती. समर्थ विद्यालयांत दर पौर्णिमेस सत्यनारायणाची पूजा करण्याचा प्रघात आहे. एका पोर्णिमेस एक विद्यार्थी बराच आजारी होता. डॉक्टरांनींही त्याच्या प्रकृतीबद्दल चिंता व्यक्त केली होती. गुरुवर्य अण्णांनीं सत्यनारायणाच्या पूजेनंतर सर्व विद्यार्थी आणि शिक्षक यांसह मुलाला आराम पडण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना केली. त्यांनीं भक्तियुक्त अंत:करणानें केलेली प्रार्थना परमेश्वरानें ताबडतोब ऐकली, असें त्या मुलास लागलीच उतार पडूं लागला यावरून ह्मणण्यास हरकत नाहीं.

## १०४. योगक्षेमं वहाम्यहम्

संस्था चालवीत असतांना रोजच्या गरजा परमेश्वर कशा भागवितो, याबद्दलचा स्वानुभव ते कित्येकदां सांगत. जुन्या समर्थ विद्यालयांत विद्यार्थ्यांकरितां बाकांची जरूरी होती; आणि त्याकरितां ५०।६० रु. खर्च

येईल असा अंदाज झाला. ज्या दिवशीं या गोष्टीचा विचार झाला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं ६० रु. ची देणगी कोंकणांतील एका गृहस्थांकडून आली. यांतून विद्यार्थ्यांकरितां बांक तयार करावेत असें देणगीदारांनीं लिहून कळविलें होतें.

### १०५. स्वतःचा स्वतःवर विश्वास धरा

परमेश्वरावरील श्रद्धेमुळें स्वत:च्या कार्यावर आणि त्यामुळें स्वत:वरहि त्यांचा अत्यंत विश्वास असे. " सर्व जगाचा आपणांवरील विश्वास उडाला तरी जोंपर्यंत आपला आपणांवरील विश्वास उडाला नाहीं तोंपर्यंत यशाबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं " असें ते वारंवार म्हणत.

### १०६. राष्ट्रीय शिक्षण म्हणजे औद्योगिक शिक्षण

विद्यार्थ्यांचा वाङ्मयात्मक शिक्षणाकडील कल बदलून तो धंदेशिक्षणाकडे वळला पाहिजे ही गोष्ट आपल्या सहवासांत येणाऱ्या मंडळींच्या मनावर बिंबविण्याचा ते कोणताही प्रसंग वायां घालवीत नसत. आमच्या घरांतील सर्व मंडळींच्या प्रकृतीबद्दल एकदां बोलणें चाललें असतां रंगनानाथ उद्देशून त्यांनीं येवढेंच सांगितलें कीं, " तुमचें यांत्रिक शिक्षणाकडे लक्ष नाहीं हें बरें नाहीं." राष्ट्रीय शिक्षण म्हणजे औद्योगिक शिक्षण असेंही ठोकळ समीकरण ते पुष्कळदां मांडीत.

### १०७. विजापूरकर खालीं राहिले

आपलीं नित्यकर्में वेळच्या वेळीं करण्याबद्दल गुरुवर्य अण्णांचा कटाक्ष असे. १९१९ सालीं अमृतसरच्या राष्ट्रीय सभेला " होमरूल स्पेशल " मधून जात असतांना पंजाबांतील एका मोठ्या स्टेशनावर गाडी थांबली, सकाळची वेळ होती आणि गाडी जरा अधिक वेळ थांबणारही होती. अण्णा ताबडतोब गाडींतून उतरले आणि आपली स्नानसंध्या त्यांनीं उरकून घेतली. अण्णांचें आन्हिक आटपणार इतक्यांत गाडी सुटली. " विजापूरकर खालीं राहिले " अशी एकच ओरड होऊन सुटलेली गाडी थांबविण्यांत आली; आणि अण्णांना घेतल्यानंतर गाडी पुढें चालू झाली.

### १०८. कारागृहवासाचा फायदा

गुरुवर्य अण्णांना झालेल्या कारागृहवासाचा प्रकृतीवर झालेला एक फायदा ते सांगत असत. मोकळे असतांना नेहमीं समर्थविद्यालयाची

चिंता. " आजचा दिवस गेला, उद्यां काय करावयाचें " या विचारांत रात्रीं झोंपही यावयाची नाहीं. परंतु कारागृहवास घडल्यानंतर ही चिंता प्रत्यक्ष फलाच्या दृष्टीनें फुकट असें आढळून आलें; तेव्हां रात्रीं १२ ते पहांटे ४ पर्यंत झोंप तेथें येऊं लागली. तेव्हांपासून पुढेंही या वेळांत त्यांना निवांत झोंप येत असे.

## १०९. माझी पॉलिसी प्रथम घ्या

नवीन समर्थ विद्यालयाकरितां ५० हजार रुपये गोळा करण्याचें गुरुवर्य अण्णा, व सर महादेवराव चौबळ यांनीं ठरविलें. ' पैसे तर गोळा करण्याचें ठरलें; पण आणावयाचे कसे आणि कुठून ? ' असें चौबळ सहज ह्मणाले. अण्णांनीं ताबडतोब उत्तर दिलें कीं, ' पैशाची काय काळजी ? माझी स्वतःची चार हजार रुपयांची विम्याची पॉलिसी आहे ही प्रथम घ्या आणि सुरुवात करा. ' अण्णांचे हे उद्गार ऐकून चौबळांच्या डोळ्यांतून अश्रु आले ! चौबळांना म्हटल्याप्रमाणें अण्णांनीं आपली पॉलिसी संस्थेच्या नांवें केली हें सांगणें नकोच.

## ११०. सर्व कारणीं लावा

बारीकसारीक गोष्टींचाही आपणांला शक्य तो उपयोग गुरुवर्य अण्णा करून घेत असत. अण्णांना भेटण्याकरितां एक गृहस्थ संध्याकाळीं आले असतांना त्यांनीं मेणबत्तीच्या शेडवर एका बारक्या भांड्यांत पाणी तापत ठेवलेलें पाहिलें. ' त्याचा हेतु काय ' असें त्यांनीं विचारतांच गुरुवर्य अण्णांनीं सांगितलें कीं, ' अहो, मेणबत्तीच्या दिव्याचा प्रकाश तर मिळतोच; परंतु त्याची उष्णताही फुकट कां जाऊं द्यावी ? मलाही साधारण कोमटच पाणी हवें आहे; तेव्हां या उष्णतेचा उपयोग करून घेत आहें. '

## १११. रात्रीं कोण चोर आला होता ?

गुरुवर्य अण्णा हे संभाषणांत फार मार्मिक विधानें करीत. १९२४ सालीं रंगनाथ हा उन्हाळ्याच्या सुट्टींत वाचनाकरितां म्हणून तळेगांवीं राहिला होता. एक दिवस सकाळीं अण्णांनीं त्यास विचारलें कीं, ' कालरात्रीं तुमच्याकडे चोर कोण आला होता ? ' रात्रीं चोर वगैरे को-

णीच आला नसल्यामुळें त्याचा उलगडा रंगनाथास होईना. तेव्हां अण्णांनीं सांगितलें कीं, ' काल रात्रीं तुम्ही कोणाशीं बोलत उभे होतां ? अभ्यासी माणसाला वेळेबद्दल फार जपलें पाहिजे. स्नेही म्हणजे फार वेळ चोरतात. फ्रेंडस् आर थीव्ह्ज् ऑफ टाइम्. रात्रींच तुम्ही बोलत असतांना कोण चोर उभा आहे म्हणून विचारणार होतों; परंतु एकट्यालाच हें सांगितलेलें बरें असें वाटून रात्रीं बोललों नाहीं.'

लेखक-श्रीमंत बाबासाहेब घोरपडे ( इचलकरंजी )

## ११२. केवळ ग्रंथमालेची काळजी वाटली!

आमचा आणि अण्णासाहेबांचा परिचय नव्हता. तरी त्यांच्या उज्वल चारित्र्याबद्दल आणि एकनिष्ठ कार्याबद्दल कौतुक वाटे. २५ वर्षांपूर्वी ते कोल्हापुरांत राजाराम कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर होते. पुढें कांहीं दिवस ' सरदार क्लास'चे सुपरिंटेंडेंटहि होते इतकेंच आतां स्मरतें. त्यांच्या आठवणी आमच्याजवळ नाहींत तरी त्यांची ग्रंथमालेसंबंधीं किती उत्कट कार्यनिष्ठा होती हें आम्हांस माहीत आहे.

एकदां आम्ही श्रीगंगेवर गेलों होतों. तेथें प्रो. विजापूरकर आणि त्यांची इतर स्नेही मंडळी पोहत होती. अण्णासाहेब बराच वेळ पोहत असल्यामुळें फार दमले तरी पुन: एका मित्राच्या आग्रहानें त्यांनीं पाण्यांत उडी टाकली. पाण्यांत मध्यभागीं गेल्यावर त्यांना दम लागला व हातहि पुढें टाकतां येईना. यावेळीं एकदोन वेळ त्यांनीं पाण्यांत गटंगळ्याहि खाल्ल्या. तेव्हां लागलीच इतर मंडळींनीं त्यांना बाहेर काढलें. जरा ते हुषारींत आल्यावर थट्टेनें त्यांपैकीं एका गृहस्थानें अण्णांना विचारलें, 'अण्णा, तुम्ही बुडत होतां तेव्हां तुम्हांला काय वाटलें ? ' यावर ते म्हणाले ' मला कांहींच वाटलें नाहीं. परंतु ग्रंथमालेचें कसें होणार ? हा एकच विचार त्यावेळीं माझ्या मनांत आला. ' ते त्यांचे शब्द अद्यापि आमच्या कानांत गुणगुणत आहेत.

या एकाच गोष्टीवरून प्रो. विजापूरकरांची वाङ्मयसेवा किती कळकळीची होती ही गोष्ट सिद्ध होते.

लेखक—प्रो. दत्तो वामन पोतदार

## ११३. मला खाऊ दिला

अण्णांना भेटण्यास माझे वडिलांचे सतीर्थ आम्ही कोल्हापुरास यात्रेसाठीं १९०५ किंवा १९०४ सालीं गेलों. तेवेळीं अण्णांस प्रथम पाहिलें. त्यांचा साधेपणा व उत्साहवृत्ति मनावर ठसली. स्टेशनवर जातेवेळीं पोंचवावयास ते आले होते. व मजला खाऊ दिला वगैरे प्रकारावरून सौजन्य व वात्सल्य दिसून आलें. यावेळीं माझें वय १५ सुमारें असेल.

## ११४. ग्रंथमालेवरील अलौकिक प्रेम

पुढें वडिलांस ग्रंथमालेंत लेख लिहिण्यासाठीं त्यांनीं एक पत्र लिहिलें होतें. त्यांतील एक वाक्य आठवतें. "जागृतीकरितां पडघम वाजवावा लागतो" वगैरे. ग्रंथमाला आमचेकडे १९०२।०३ सालापासून येते असावी. मीहि ती चांगली वाचीत असें व त्या मासिकाचीं बांधीव पुस्तकें मी हौसेनें लावून ठेविलीं होतीं. मला तेव्हां प्रथम अण्णांविषयीं व ग्रंथमालेविषयीं अभिमान वाटे व तो आजहि वाटतो. पुढें तळेगांवीं गांठ पडे तेव्हां अण्णा ग्रंथमालेचे १२ खंड किती जिवापलीकडे जपून ठेवीत व त्याबद्दल किती प्रेमानें बोलत हें पाहिलें तेव्हां मला फार कौतुक वाटलें.

## ११५. गोखल्यांच्याबद्दल असाधारण प्रेम

पुढील आठवण अण्णा तुरुंगांतून आल्यावर पळसुले यांचे घरीं किंवा स्वतंत्र असेल परंतु नारायण पेठेंत मातीचे गणपतीसमोरचे एका घरांत तेथल्या भेटीची. गोपाळराव गोखले यांनीं त्यांस फार साह्य केलें. परंतु उघडपणें गोपाळरावांचा व आपला संबंध जिव्हाळ्याचा उगीच उठावानें न दिसावा म्हणून अण्णा किती जपत तें त्यांचे तोंडूनच ऐकलें आहे. गोपाळरावांनीं यावेळीं अण्णांस एक हजार पावेतों साह्य दिलें असावें असें वाटतें.

## ११६. प्रौढ विद्यार्थीविद्यालयाचा उपक्रम

मी (व आल्यास माझे दोन ग्रॅज्युएट व विद्वान् हुषार मित्र त्यांचे साह्यानें) पुढें होऊन एक प्रौढ विद्यार्थीविद्यालय (अण्णांनीं त्यास दिलेलें नांव आठवत नाहीं) काढावें असा त्यांचा हेतू फार होता. आमचे तेव्हां बहुत वाद होत ते सर्व येथें देत नाहीं. परंतु माझा मुख्य आग्रह हा होता

कीं संस्था नवीन काढणें आणि ती चालू शाळांपेक्षां वरच्या दर्जाची म्हणून अभिमानानें काढणें तर अधिक अनुभवी व विद्वान् चालक पाहिजेत. आम्ही तरुण व ताजे ग्रॅज्युएट ! आम्ही तशी भाषा बोलणें गैर आहे. मात्र आम्ही काम करूं, पुढाकार तुम्ही किंवा इतर कोणी पक्वप्रज्ञानें घ्यावा आणि या उपक्रमास सरकारी बाधा होऊं नये अशी खबिरी राहण्याची तर टिळक व गोखले या दोघांच्या सह्या घालून म्हणजे नेमस्त व राष्ट्रीय पक्षांच्या पुढाऱ्यांचे छत्राखालीं काम करितां येईल अशी व्यवस्था घडवून आणवावी. हें कां करितां आलें नाहीं याचें समाधान अण्णांस करितां आलें नाहीं. सबब "पुढें काय" या नांवानें लेख लिहून हनुमज्जयंतीच्या सुमुहूर्तावर हा नवीन उपक्रम व्हावयाचा होता ( सन १९१३ ). तो माझें नांव घालून करण्याचा अण्णांचा आग्रह पुरवतां आला नाहीं. मी नरसोपंत केळकर यांस भेटून केसरीचे लेखांतील प्रुफांतून रात्रौ ९॥ वाजतां जाऊन आपलें नांव टाकवून मोघम उल्लेख ठेवण्यास सांगितलें ! राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य नवीन पद्धतीनें सुरू करण्याचा अण्णांचा निश्चय व कळकळ हीं मात्र केवळ अलोट दिसून आलीं ! सरकारी बंधन नसतें तर अण्णांनीं खास पुढाकार घेतला असता, परंतु १९०९ सालची पुनरावृत्ति होऊं नये यासाठीं आमची अट जी होती ती याप्रमाणें अण्णांस पुरवतां आली नाहीं.

### ११७. गोखल्यांचा पाठिंबा अण्णांना—त्यांच्या चळवळींना नव्हता

गोपाळराव गोखले यांचा अण्णांस पाठिंबा होता, अण्णांचे चळवळीस नव्हता असें स्वच्छ अनुमान यावरून निघतें असें अण्णांस मीं कळविलें. त्यांनी तें कबूल केलें नाहीं. पण मी अनेक प्रश्नांनीं त्यांस अडवी. त्यांस उत्तर देतां येत नसे. एकदां मात्र त्यांनीं सांगितलें कीं, 'आम्ही चातुर्वर्ण्यपरंपरा पाळतों ती गोपाळरावांना पटत नाहीं.' यावर मी म्हटलें, 'पुण्यांत न्यू इंग्लिश स्कुलांत तरी चातुर्वर्ण्यपालनच होतें म्हणजे तेथें मुलांचे सहवसांत तें आलें तर मोडलें जात नाहीं, मग मोकळ्या हवेंत आणि मातृभाषेंतून शिक्षण एवढ्या दोन सुधारणा करून जर तळेगांवीं उपक्रम तुम्ही करीत आहांत तर तो न्यू इंग्लिश स्कूलपेक्षां अधिक स्पृहणीय वाटून, घटकाभर चातुर्वर्ण्याचा आपला आग्रह सोडून त्यांनीं स्पष्टपणें पसंत कां करूं नये ?' याला जबाब अण्णांनीं दिला नाहीं. वाईट वाटतें कीं उद्योग असा फसला ! पुढील आठवण जरा कटु आहे.

### ११८. शब्दावरून दोन हात झाले

माझे कित्येक शिष्यमित्र व इतर कित्येक उत्साही तरुण मंडळी यांचे साहाय्यानें महादेवराव चौबळांचे वजनानें नवीन समर्थ विद्यालयाची स्थापना झाली. त्यांचे पहिले अहवालांतील विधानावरून एक वाद उपस्थित होऊन अण्णांचे व आमचे दोन हात झाले. हेंहि सर्वांस माहीतच आहे. कदाचित् माझें 'तथास्तु' म्हणून अखेरीस लिहिलेलें उत्तर अण्णांनीं कंपोज झालेलें भीड खर्चून काढून घेऊन प्रसिद्ध होऊं दिलें नाहीं! तो प्रुफाचा तुकडाहि जपून ठेवलेला आहे. कोठेंतरी सांपडेल! आज हाताशीं नाहीं. रा. पराडकर यांस सर्व प्रकार माहीत आहे. या दिवसापासून पूर्वसंबंधांतला उष्मा जरा कमी झाला आहे असें वाटलें. अनुभवासहि आलें.

### ११९. अंत:करणानें मी तुमच्या संस्थेंतच आहें

यानंतर तळेगांवीं एक दोन वेळां जाणें झालें. त्या वेळीं भेटी झाल्या ते प्रसंग. पण त्यांत सांगण्यासारखा प्रसंग म्हणजे भा. इ. सं. मंडळावरील निष्ठा! रा. गोविंदराव सरदेसाई रियासतकार यांस कारभारी मंडळांत निवडून येण्याचा आग्रह केला. परंतु त्यांनीं आपला नकार बदलला नाहीं. त्यांचे खालीं अण्णांना मतें होतीं. त्यांस पण लिहिलें, त्यांनीं स्वीकारलें. परंतु उत्तर जें दिलें तें विशेष संस्मरणीय आहे! खोलीबाहेर पडत नसलों तरी अंत:करणानें मी तुमच्या संस्थेंतच आहें असे प्रेमळ उद्गार अण्णांनीं काढले!

### १२०. आदर्श पुरुष

अण्णा स्वभावानें प्रेमळ, उदार, कष्टाळू, तळमळीचे, शुद्धशील, नियमित, दृढनिश्चयी असे एक आदर्श पुरुष होते.

### १२१. विद्वत्तेपेक्षां शील श्रेष्ठ

विद्वत्तेपेक्षां शीलाला ते फार महत्त्व देत. आणि त्यांचें वर्तन तसेंच होतें. त्यांत विद्वत्तेची चमक कमीच आढळते. परंतु शीलाचा प्रखरपणा विशेष आढळून येई.

लेखक:—**श्री. वा. मो. पोतदार**, बी. ए., एल्एल्. बी. (पुणें)

### १२२. औद्योगिक शिक्षण स्वप्नवत् ठरलें

अण्णांचा आणि माझा परिचय फारच जुना आहे. कॉलेजमध्यें असल्यापासून आम्हा दोघांची एकमेकांस चांगली माहिती होती. मी कोल्हा-

पूरला जात असें तेव्हां त्यांचे घरींच उतरत असें. पुढें 'ग्रंथमाले' संबंधीं त्यांचीं माझेकडे पत्रें येत असत. ग्रंथमालेकरितां कांहीं तरी लेख लिहा असें त्यांनीं मला बरेच वेळां लिहिलें; परंतु मी वकिलीच्या धंद्यांत पडल्यामुळें मला लिहिण्यास वेळच सापडला नाहीं. पुढें अण्णांनीं तळेगांवीं 'समर्थ विद्यालय' काढल्यावर आमचा पूर्वींचा परिचयही वाढला. नंतर 'नवीन समर्थ विद्यालय' सर महादेव चौबळांचे हस्तें उघडण्यापूर्वीं जी जी खटपट अण्णांनीं केली त्यांत मीही त्यांना मदत करीत होतों. ना. चौबळांचे तर्फे जीं जीं कामें होत तीं सर्व माझे मार्फतच होत असत. या कामीं नव्या समर्थ विद्यालयाची औद्योगिक शिक्षणाची योजना चौबळांना फारच पटली होती. त्यांनींही ह्या कामीं किती तरी श्रम घेतले हें सर्वांना माहीतच आहे. मुंबईच्या सर्व गिरणीवाल्या सधन लोकांकडून त्यांनीं विद्यालयाच्या कार्याबद्दल सहानुभूति आणि आर्थिक साहाय्यहि मिळविलें. 'आमच्या गिरण्यांतून काम करण्यास लायक असे मेकॅनिकल अगर इतर कामांत वाकब असे लोक जर तुम्ही या संस्थेंतून शिकवून तयार केले तर त्यांना १००।२०० पर्यंत आम्ही पगार देऊं' अशीं अभिवचनें ना. चौबळांनीं अनेक गिरणीवाल्यांकडून घेतलीं. सर्वांच्या विचारें विद्यालयासन्निध, व नदीचे पाण्याचा 'वर्कशॉप'साठीं योग्य उपयोग करून घेतां येईल अशा बेतानें एक 'वर्कशॉप' तयार करावें असें ठरलें. 'वर्कशॉप' उभारण्यासाठीं लागणारी २।३ लाखांची रक्कमहि सदर मुंबईच्या गिरणीवाल्यांनीं देण्याचें कबूल केलें होतें. इतकेंच नव्हे तर वार्षिक चालू खर्चासाठीं प्रत्येक गिरणीचे चालक ५०० रु. देण्यासहि तयार होते. सर्व योजना झाल्या. मी आणि चौबळ वर्कशॉपसाठीं जागा पाहण्याचे कामीं लोणावळा, खडकाळें, चिंचवड वगैरे भागांत नदीकाठीं सोईस्कर अशी जागा पाहात पुष्कळ फिरत होतों. काळे व वाड यांच्यासारखी मंडळी आपल्या सरकारी नोकऱ्या सोडून विद्यालयांत काम करूं लागली, पण पुढें दुर्दैवानें एक विचित्र आणि अदृश्य अशी दुर्घट विधिघटना मार्गांत आडवी आल्यामुळें कार्याचा नाश झाला आणि अगदीं हातातोंडापर्यंत आलेला राष्ट्रीय शिक्षणाच्या यशाचा घास एकदम मातींत पडून कवडीमोल झाला. जर सर्व गोष्टी व्यवस्थितपणें जुळून आल्या असत्या तर राष्ट्रीय शिक्षणाचें भवितव्य अगदीं निराळें झालें असतें. पण आतां झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. अण्णांची औद्योगिक शिक्षणाची कल्पना स्वप्नवत्

ठरली याबद्दल मात्र वाईट वाटतें. या बाबतींत चूक कोणाची असें जर मात्र मला विचारलें तर अण्णांचा हट्टी स्वभाव व माणसाची योग्य पारख नसणें या गोष्टी मात्र मला नाकबूल करितां यावयाची नाहींत.

### १२३. संस्थेचें काम आहे, पत्र घाला

नवीन समर्थ विद्यालयाचें काम नीट रीतीनें सुरु झालें आणि औद्योगिक शिक्षणाची योजनाहि बाळासाहेब चौबळ यांच्या सहकार्यानें आह्मी अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत असतां कार्यांत एक नवीनच संकट आडवें आलें. एका फाजील महत्त्वाकांक्षी व्यक्तीच्या अतिप्रसंगामुळें संस्थेच्या कार्याचा नाश झाला आणि त्या प्रसंगानें सर महादेव चौबळ यांच्या सारख्या वजनदार मनुष्याचें साह्य मिळावयाचें तें बाजूस राहून उलट त्यांनाच संस्थेचा संबंध सोडावा लागला. ह्यासंबंधीं पुढें अण्णांनाहि पश्चात्ताप झाल्यावांचून राहिला नाहीं. या ओढाताणींतच पुढील एक प्रकार घडून आला.

आम्ही विद्यालयाची औद्योगिक योजना तयार करीत होतों. ह्या वेळीं (१९१९) प. वा. शापुरजी भरुचा शेट महाबळेश्वरीं अत्यवस्थ आजारी होते. त्यांनीं आपल्या व्यवस्थापत्रकांत १५००० रु. संस्थेस मिळावेत असें लिहून त्याबद्दल 'हो'कारार्थी पत्र पाठवा असें त्यांचें चौबळांना पत्र आलें. यावेळीं अण्णांचा आणि चौबळांचा बराच मतभेद झाला होता, तरीहि मी त्यांचेकडे गेलों आणि त्यांना सांगितलें ' आपण पत्र लिहा. आपल्या चार ओळींनीं संस्थेस एवढी रक्कम मिळत आहे तरी तेवढा उपकार संस्थेवर करावा. आपलें पटत नसेल तर आपण पुढें संस्थेच्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीस उभें राहूं नये.' सरतेशेवटीं माझ्या सांगण्याप्रमाणें त्यांनीं पत्र लिहिलें व त्याप्रमाणें सर शापुरजी भरुचा वारल्यावर त्यांच्या मृत्युपत्राप्रमाणें संस्थेकडे रक्कम जमा झाली. पण चौबळांच्या स्नेहांत जें एकदम अंतर पडलें तें मात्र कायमचें पडलें.

लेखक—रा. शंकरराव वाळिंबे ( कुमठें, सातारा )

### १२४. इतकाच योगायोग

१९१० सालीं अण्णासाहेब कोल्हापुरांत ' अंडर–ट्रायल ' कैदी होते. यावेळीं त्यांना पुढें कांहीं दिवसांनीं घरीं राहण्याची परवानगी देण्यांत आली होती. मात्र गांव सोडून बाहेर कोठेंहि जाण्याची त्यांना बंदी होती.

परवानगी मिळून ते घरीं राहण्यास आल्यावर दोन तीन दिवसांतच त्यांची बहीण प्रसूत होऊन मुलगा झाला. पण योगायोग असा कीं पुढें ४।५ दिवसांतच पुनः अण्णांना घरीं राहण्याची मिळालेली परवानगी काढून घेण्यांत आली व त्यांची पुनः कैदखान्यांत रवानगी झाली. तेव्हां अण्णा विनोदानें मला ह्मणाले ' अहो ! तितकाच आमचा ऋणानुबंध होता. ................कुशल माहिती विचारण्यासाठींच परमेश्वरानें आम्हांस घरीं पाठविलें. झालें,......... खुशाल आहे, आतां आह्मी जातों.' सद्गदित मनानें आम्ही उभयतांनीं अण्णांना निरोप दिला.

## १२५. मोरोपंत, पुनः प्रश्न विचारा

अण्णांच्यावर १९१० मध्यें कोल्हापूर वेदोक्त प्रकरणांत जेव्हां खटला झाला तेव्हां मी वऱ्हाडांत एका निमसरकारी शाळेंत शिक्षक होतों. मी अण्णांचा नातेवाईक, तेव्हां मुंबई सरकारकडून वऱ्हाड–मध्यप्रांत सरकारकडे लिहून गेलें कीं अमूक एका निमसरकारी शाळेंत अमूक मनुष्याचा नातलग आहे त्यास नोकरीवरून काढून टाकावें. पुढें योग्य मार्गानें शाळाधिकाऱ्यांकडून सरकारी हुकूम वरील शाळेच्या चालकांकडे आला. तुह्मी स्वतः होऊन राजिनामा द्या असें मला चालकांनीं विचारलें. परंतु मी राजीनामा खुषीनें देत नाहीं, मला तुह्मी बडतर्फ करा असें मी म्हटलें. पुढें चालकांनीं मला शाळेंतून काढलें. नंतर या बाबतींत मी अण्णांना कळविलें कीं ' तुमच्या खटल्यामुळें माझी नोकरी गेली. ' यांना कां काढलें, त्यांनीं राजिनामा दिला कीं त्यांचेकडून सक्तीनें राजिनामा घेतला, वगैरे अनेक प्रश्न अण्णांनीं सर मोरोपंत जोशी यांचेकडून कौन्सिलांत विचारविले. मुंबई सरकारचा हुकूम आल्यामुळें रा. वाळिंबे यांचा राजिनामा त्यांच्याकडून घेवविण्यांत आला; त्यांत त्यांच्या चारित्र्यासंबंधीं कांहींहि आक्षेपार्ह मजकूर नाहीं असा कांहींतरी खुलासा कौन्सिलांत सरकारी सभासदांना करावा लागला. समाधानकारक उत्तर मिळे-पर्यंत अण्णांनीं मोरोपंत जोशी यांच्याकडून सारखे प्रश्न विचारून माझ्या राजिनाम्याचा प्रश्न धसास लावला. इतकी त्यांची विलक्षण चिकाटी असे.

## १२६. बाकी चुकती करा

विश्ववृत्तांतील लेखावरून अण्णांना शिक्षा झाल्यावर कोर्टकचेऱ्यांचें काम सुरू झालें. कदाचित् समर्थ प्रसाद छापखाना जप्त होईल अशा भीतीनें मी सर्वांच्या विचारें छापखाना पुण्यास आणला. ग्रंथमालेच्या योगक्षेमासाठीं

अण्णांनीं पुष्कळांचें ४।५ हजार रुपयांचें कर्ज पुस्तकें छापविण्यांत घातलें होतें. तुरुंगांत जाण्यापूर्वी त्यांनीं मला बोलावून स्पष्ट सांगितलें कीं, ' वाटेल तें करा. पुस्तकें विका व लागल्यास छापखानाहि विका. पण अगोदर लोकांची बाकी चुकती करा.' अण्णांनीं सांगितल्याप्रमाणें आम्ही त्यांचीं पुस्तकें विकलीं. तेव्हां अल्पावकाशांतच रक्कम उभी राहून अण्णांचें ग्रंथमालेसंबंधीचें कर्ज लवकरच नाहींसें झालें.

लेखक–श्री. पां. स. साने, एम्. ए. (अंमळनेर)

## १२७. श्रीमंत मनुष्यास मोक्ष मिळणार नाहीं !

गु. अण्णासाहेब स्पष्टवक्ते व निर्भीड असत. कोठें गेले तरी संस्थेस मदत मिळवितांना त्यांचा निर्भीडपणा स्पष्ट दिसत असे. त्यांच्या शुद्ध आचरणामुळें त्यांचें बोलणें सर्वांस पटत असे. अशी उदात्त सात्त्विक वृत्ति त्यांचे ठायीं होती. तत्त्वज्ञानमंदिरांत एकदां आले असतां त्यांचें दासबोधावर प्रवचन सुरू होतें. श्रीमंत प्रतापशेट हेहि आले होते. प्रवचन चाललें असतां अण्णासाहेब म्हणाले, "श्रीमंत माणसास मोक्ष मिळणें हें फार कठीण ! बायबलमध्यें एक वाक्य आहे कीं, सुईच्या वेळ्यांतून एक वेळ हत्ती पलीकडे जाईल,–परंतु श्रीमंत स्वर्गास जाणार नाहीं. याचें कारण श्रीमंत श्रीमंतीच्या गर्वांत राहतो. नम्रपणा व भूतदया हीं त्याचेपासून दूर जातात. नाहींतर संपत्ति हें धर्माचें साधन आहे. पण उपयोग नीट केला तर ! !" शेटजी समोरच बसले होते; शेटजी जवळ समर्थ विद्यालयास मदत मागण्यासाठींच ते आले होते. परंतु आपले विचार स्पष्टपणें सांगण्यास ते कधींहि भ्याले नाहींत.

अण्णासाहेबांचा स्वभाव गोड होता. तरीपण ते करारी व प्रसंगविशेषीं स्पष्ट बोलत. निस्पृहपणा हा त्यांच्या अंगीं स्वभावतः दिसत असे.

## १२८. माझ्या स्वदेशी व्रतास खंड कां पाडता ?

देशांतील तरुण, विद्वान् धंद्यांत पडणारे, निःस्वार्थ व्हावेत म्हणून ते तळमळत. स्वदेशांत सर्व माल केव्हां तयार होऊं लागेल हें त्यांच्या ध्यानीं मनीं असे. स्वदेशांतील तरुण देशसेवक कसे होतील, याचाच ते अहर्निश विचार करीत. ते खरे स्वदेशीव्रताचे उपासक होते. परदेशी वस्तु त्यांनीं वापरली नाहीं. ते छत्री वापरीत नसत तर पावसाळ्यांत घोंगडी वापरीत.

खादीचा जाडा भरडा कपडा अंगावर असे. स्वदेशी काड्यांच्या पेट्या ते वापरीत. त्यांच्याजवळ जुन्या कऱ्हाड येथील काड्यांच्या पेट्यांच्या कारखान्यांतील कांहीं पेट्या होत्या. या पेटयांचा ते इतरांस उपयोग करूं देत नसत. कारण ते म्हणत तुम्हांला सर्व देशी विदेशी चालतें. मग माझ्या व्रतास पेटया संपवून खंड कां पाडता ? स्वदेशीचें इतकें उज्ज्वल उदाहरण अन्यत्र दिसून येणार नाहीं.

अण्णासाहेब हे खरे देशभक्त होते. कारण देशासाठीं ते रात्रंदिवस तळमळत. केवळ तळमळतच राहत नसत तर कष्ट करीत; परंतु हें सर्व करीत असतां ते कधीं निराश होत नसत; त्यांची आशा अमर व अचल होती. मी तळेगांव येथें एकदां त्यांच्याकडे गेलों होतों, तेव्हां ते सहज बोलतां बोलतां म्हणाले " निराश होऊन काय करावयाचें ? इंग्रज का एकदम घालवून देतां येईल ? इंग्रजास राज्य मिळवावयास १०० वर्षें लागलीं तर त्यांना घालविण्यास तेवढीं तरी नकोत ? " त्यांचा आशावाद पाहून माझ्या डोळ्यांत अश्रु आले. भावी पिढी सुखांत राहो म्हणून निरपेक्षपणें हा महात्मा श्रमत होता. त्यांना स्वतःला काय मिळवावयाचें होतें ?

## १२९. पदरास तोशीस लावून स्वदेशीच माल वापरा

विद्यार्थी ओगलेवाडीच्या कांचा घेत नाहींत हें गुरुवर्य अण्णा यांना समजलें तेव्हां त्यांना अण्णा म्हणाले ' ओगले कांचेला ५।६ आणे पडतात असेंच तुझें म्हणणें ना ? मी म्हणतों, रुपया पडला असेल तरीं तीच कांच घे. पदराला तोशीस लावून स्वदेशी वस्तु वापरल्या तरच त्यांत तुमची स्वदेशनिष्ठा दिसून येईल. स्वस्त वस्तु झाल्यावर वाटेल तो मनुष्य ती घेईल. त्यांत मोठेपणा नाहीं. परंतु कारखाना भरभराटीस येईपर्यंत महाग वस्तूही स्वदेशी म्हणून घेणारे पाहिजेत. स्वदेशी वापरण्याच्या वेळीं दैन्य व गरिबी कां आठवते ? सांगली मिरजेस असणारे प्रसिद्ध शस्त्रवैद्य वान्लेस साहेब हे अमेरिकेंतून स्वतःस लागणाऱ्या वस्तु मागवीत. त्यांना हिंदुस्थानांत त्या मिळत नव्हत्या का ? परंतु स्वदेशांतील कारखान्याचा माल घ्यावयाचा हा त्यांचा निश्चय. त्यांची अमेरिका तर धनागर आहे तरी त्या लोकांची ही वृत्ति. हिंदुस्थान हीनदीन झाला तरी आम्ही परदेशीं पैसा पाठवीतच आहोंत. शरमच नाहीं आपणांस, दुसरें काय ? असो.'

———

# परिशिष्ट पहिलें

# प्रो. विजापूरकर यांचा मृत्यु

## वर्तमानपत्रांचीं मतें

[ गु० अण्णसाहेब विजापूरकर ता. १ आगस्ट १९२६ रोजीं आपल्या वयाच्या ६४व्या वर्षीं तळेगांवीं नवीन समर्थ विद्यालयांत आपल्या कर्मभूमींतच कैलासवासी झाले. त्यानंतर महाराष्ट्रांतील आणि महाराष्ट्राबाहेरील अनेक वर्तमानपत्रांनीं त्यांच्या मृत्युनिमित्त लेख लिहिले. त्यांतून कांहीं उतारे खालीं दिले आहेत. — लेखक. ]

### केसरी, ( पुणें )

मराठी भाषेचे निःसीम भक्त, स्वदेशी व्रताचे कट्टे पुरस्कर्ते, राष्ट्रीय शिक्षणाचे महाराष्ट्रांतील आद्य प्रवर्तक व समर्थ विद्यालयाचे संस्थापक गुरुवर्य प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांना तळेगांव मुक्कामीं ता. १ ऑगष्ट १९२६ रोजीं देवाज्ञा झाली हें ऐकून अखिल महाराष्ट्रजनतेस हळहळ वाटल्यावाचून रहाणार नाहीं. प्रो. विजापूरकर यांची प्रकृति अलीकडे बरीच क्षीण झाली होती, परंतु इतक्या लवकर त्यांचा अंत होईल अशी कल्पना दूरच्याच नव्हे तर त्यांच्या निकट सहवासांतील मंडळींनाहि मृत्यूपूर्वी दोन दिवस नव्हती. समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनानंतर संस्थेला सहानुभूति आणि द्रव्यसाहाय्य मिळविण्याकरितां १९१८ ते १९२२ पर्यंत आपल्या उतारवयांत महाराष्ट्र, कर्नाटक वऱ्हाड, नागपूर या चार प्रांतांत ते स्वतः हिंडत होते. या प्रवासांत १९२२ च्या फेब्रुवारींत अकोल्याची थंडी बाधून त्यांचें एक फुप्फुस कायमचें बिघडलें. परंतु आपल्या नियमित वर्तनानें गेल्या चार वर्षांत त्यांनीं आपली प्रकृती सांभाळली. गेल्या शुक्रवारीं त्यांना ताप आला आणि अशक्तता वाढून रविवारीं दुपारीं १ वाजतां त्यांनीं परलोकास गमन केलें. प्रकृतीकरितां इतर कोणत्या तरी ठिकाणीं निदान पावसाळ्यांत तरी जाऊन रहावें असा ऋणानुबंधी मित्रांचा व वैद्यांचा सल्ला ऐकिला म्हणजे " श्रीज्ञानेश्वर, तुकाराम, मोरया गोसावी इत्यादि साधुसंतांच्या निवासस्थानामुळें पवित्र झालेल्या पंचक्रोशींत तळेगांव हें

पुण्य स्थान आहे, तळेगांव हीच आमची कार्यभूमि आहे आणि अंगीकृत कार्य यथाशक्ती करीत असतांना येथेंच देह पडण्यांत सार्थक आहे" असें तें नेहमीं ह्मणत. आणि या इच्छेप्रमाणें ज्या मूळच्याच पवित्र स्थानाला त्यांना आपल्या सात्त्विक, धर्मनिष्ठ व निःस्वार्थी आचरणानें खरोखरच "विष्णुपुरी" ची महती आणून दिली होती, त्या समर्थ विद्यालयाच्या आवारांत राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत चंदनाप्रमाणें झिजविलेला आपला देह ठेऊन त्यांनीं आपलें निष्काम कर्मयोगाचें व्रत पुरें केलें!

प्रो. अण्णासाहेब विजापूरकर यांचा जन्म कोल्हापुरास श्रावण शु. १२ शके १७८५ (२६ आगस्ट १८६३) रोजीं झाला. बालपणचा अभ्यास त्यांनीं कोल्हापुरासच केला. राजाराम हायस्कूलमधून मॅट्रिकची परिक्षा दिल्यानंतर डेक्कन कॉलेजमध्यें ते प्रविष्ट झाले. १८८७ त बी. ए. झाल्यानंतर २ वर्षें डेक्कन कॉलेजमध्यें व त्यानंतर एक वर्ष अहमदाबादेस गुजरात कॉलेजमध्यें ते उपगुरु (फेलो) होते. १८९० त राजाराम कॉलेजमध्यें त्यांची 'लेक्चरर' म्हणून नेमणूक झाली आणि प्रो. शिवराम बापूजी परांजपे यांच्या मागून त्यांना संस्कृत इंग्रजी या भाषांचे अध्यापक नेमण्यांत आलें. तेव्हांपासून तों १९०५ च्या आक्टोबरांत कोल्हापूरच्या महाराजांनीं बडतर्फ करीपर्यंत आपलें अध्यापकाचें काम संभाळून त्यांनीं ग्रंथमालेच्या द्वारें मातृभाषेची सेवा चालू ठेविली होती. कोल्हापूरच्या वाचनालयांत लक्ष घालून वाचनाची गोडी लोकांत वाढेल असें त्यांनीं प्रयत्न केले; 'राजारामीयन क्लबाचे' तर ते पुष्कळ दिवस चिटणीस होते. स्वदेशी व्रताच्या प्रसाराकरितां तेथें चाललेल्या प्रयत्नांत त्यांचें अंग असे, आणि आपल्या 'समर्थ साप्ताहिकां'तून कोल्हापूर सरकारच्या राज्यकारभारच्या चुकीच्या धोरणाचें ते आविष्करण करीत असत.

राजाराम कॉलेजमधून सुटल्यानंतर १९०६ च्या जूनमध्यें कोल्हापुरासच त्यांनीं 'समर्थ विद्यालय' सुरू केलें. एक वर्षानंतर प्लेगमुळें तें मिरजेस चार महिने न्यावें लागलें आणि त्यानंतर तें तळेगांवास सध्यांच्या ठिकाणीं आलें. 'विश्ववृत्ता' वरील खटला १९०८ सालीं आक्टोबरांत झाला त्यांत प्रो. विजापूरकर, प्रो. वामनराव जोशी व मुद्रक विनायकराव जोशीराव यांना अनुक्रमें ३ वर्षें साधी, ३ वर्षें सक्त मजुरी व १॥ वर्ष सक्त मजुरी अशा शिक्षा झाल्या. समर्थ विद्यालयाला श्री. रा. दा. देसाई, श्री. नाना ओक, श्री. ज.

स. करंदीकर वगैरे निष्ठावंत सेवक मिळाले असल्यामुळें आपल्या गैरहजेरींत तें आपलें कार्य नेटानें करीत रहातील असा त्यांचा दृढ विश्वास होता; परंतु विधिघटना वेगळी असल्यामुळें १९१० च्या जूनमध्यें संस्था बंद झाली. कारागृहांतून सुटून आल्यानंतर आपलें आवडतें बालक सरकारच्या पूर्वग्रहदूषित दडपशाहीच्या धोरणाला बळी पडलें आणि त्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाविषयीं सर्वत्र नैराश्य पसरलेलें आहे असें त्यांस आढळून आलें. त्याकरितां त्यांनीं आपलें स्वत्व व राष्ट्रीय शिक्षणाचीं तत्त्वें तिळमात्रहि न सोडतां सर महादेव चौबळ-सारख्यांचें साहाय्य आपल्या चारित्र्याबलावर मिळविलें आणि ८ वर्षें खंड पड-लेल्या ज्ञानसत्राला त्यांनीं पुनः नव्या उभारीनें सुरवात केली.

१९१८ तें १९२२ पर्यंत त्यांनीं सर्वत्र हिंदु राष्ट्रीय शिक्षणाचीं तत्वें लोकांना पटवून दिलीं आणि समर्थ विद्यालयाबद्दल जागृती उत्पन्न केली. पैकीं तरुण, उत्साही व स्वार्थत्यागी शिक्षकांचें त्यांनीं 'तहाहयात सभासद मंडळ' बनविलें आणि आपल्या देखरेखीखालीं त्यांना आपल्या कार्याची दीक्षा ते देत होते. १९२० मध्यें टिळक महाविद्यालयाची स्थापना झाली, तेव्हांपासून टिळक महाविद्यालय व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांवर त्यांचें आपलेपणाचें लक्ष होतें. राष्ट्रीय शिक्षण हा स्वराज्याचा पाया आहे. ही त्यांची दृढ श्रद्धा असल्यामुळें त्यांनीं अखेरपर्यंत समर्थ विद्यालयाशिवाय दुसऱ्या गोष्टींचा ध्यास घेतला नाहीं. ग्रंथमाला आणि विश्ववृत्त यांच्या द्वारें मराठी भाषेची त्यांनीं केलेली सेवा श्रेष्ठ दर्जाची तर आहेच; परंतु त्यांचें खरें जीवित-कार्य म्हणजे समर्थ विद्यालय हें होय. त्यांचा नश्वर देह गेला असला तरी त्यांचा आत्मा समर्थ विद्यालयाच्या वातावरणांतच घिरट्या घालीत असला पाहिजे. त्यांचें खरें स्मारक म्हणजे त्यांनीं अडचणींतून वाढविलेलें विद्यालय अखंड चालू ठेवणें हें होय. आणि अखिल महाराष्ट्रांत पसरलेला त्यांचा शिष्यवृंद आणि स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांचा अभिमानी जनता यांनीं पुढें होऊन आपलें कर्तव्य पार पाडलें पाहिजे आणि आपणांवरील ऋण फेडलें पाहिजे एवढेंच आज सूत्ररूपानें सुच-वावयाचें आहे.

इंद्रायणीच्या तीरावर सायंकाळीं ७ वाजतां अग्नि-संस्कार झाल्यानंतर प्रो. वामन मल्हार जोशी व श्री. रायरीकर यांची "गुरुवर्यांचा पार्थिव देह जरी नष्ट झाला तरी त्यांना प्राणाहून प्रिय असलेलें समर्थ विद्यालयाचें कार्य पुढें

चालविल्यानें त्यांच्या आत्म्यास समाधान होण्यासारखें असल्यामुळें तें चालविण्याची पराकाष्ठा सर्वांनीं केली पाहिजे. ” अशा आशयाचीं भाषणें झालीं. प्रो. कालेलकर यांनींहि आपले प्रणाम पत्रद्वारें पाठविले होते. ( ३ आगस्ट २६ )

**टिळक महाविद्यालय, ( पुणें )**

प्रो. विजापूरकरांच्या मृत्यूनें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यास सर्वस्वत्याग करून आमरणान्त आपणांस वाहून घेणारा समर्थ आधिकारी पुरुष नाहींसा झाला व महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणसंस्था पोरक्या झाल्या यांत संशय नाहीं. समर्थ विद्यालय हें विजापूरकरांचें जिवंत स्मारक खरें ! परंतु एका समर्थ विद्यालयानें समाधान पावण्याची त्यांची वृत्ति नव्हती. सर्व राष्ट्रीय शिक्षणसंस्थांकडे ते पितृवात्सल्यानें पहात व या संस्थांच्या द्वारें पुढेंमागें आपल्या देशाचा उद्धार खचित होईल अशी आशा व्यक्त करीत. कै० विजापूरकरांच्या मागें महाराष्ट्रानें या सर्व संस्थांचा योग्य परामर्ष घेऊन त्यांनीं आमरणान्त केलेल्या राष्ट्रसेवेबद्दल त्यांचीं हीं चालतींबोलतीं स्मारकें प्रभावशालीं, कर्तृत्वसंपन्न व चिरकालीक स्वरूपाचीं करण्यास मदत करून महाराष्ट्रानें त्यांचें अनृण्य जोडिलें पाहिजे.

( त्रैमासिक व० ४ अं. २ रा. )

**नवाकाळ, ( मुंबई )**

.........जुने ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध करून ऐतिहासिक आणि धार्मिक लेखाच्या द्वारें संस्थानच्या नोकरींत असतांना प्रो० विजापूरकरांनीं वाङ्मयसेवा चालविली स्वदेशी बहिष्कार ही चळवळ महाराष्ट्रांत सुरू झाल्यावर स्वदेशीच्या बाजूनें प्रो. विजापूरकर झाल्यानें संस्थानच्या नोकरीस मुकावें लागलें.........प्रो० विजापूरकरांना पुढें रा. करंदीकर, रा. देसाई वगैरे स्वार्थत्यागी लाइफ–मेंबरांची चांगली मदत मिळाल्यामुळें समर्थ विद्यालयाची भरभराट झाली. ही भरभराट डोळ्यांत खुपल्यामुळेंच कीं काय, कोल्हापुरांत निघत असलेल्या प्रो० विजापूरकर यांच्या ‘ विश्ववृत्त ’ मासिक पुस्तकाच्या एका लेखावरून कोल्हापूरच्या दरबारनें राजद्रोहाचा खटला भरला आणि प्रो० विजापूरकर आपण होऊन कोल्हापुरांत गेल्यामुळें कोल्हापूर दरबारनें मागितलेल्या किंकेड साहेबांनीं प्रो० विजापूरकर यांस भरपूर शिक्षा ठोठावली...... इकडे मुंबई सरकारनें विद्यालय बंद केलें व......सर्व उद्योग मातींत मिसळून टाकला......तळेगांव येथें ते संन्यस्त वृत्तीनें राहून लहान मुलांना प्राथ-

ठेवीपर्यंत अनेक प्रकारच्या संकटांस न जुमानतां कायम ठेविला. प्रो. विजापूरकरासारख्या ऋषितुल्य ब्राह्मणांची परंपरा परमेश्वरी कृपेनें भरतखंडांत कायम रहावी अशी आशा प्रगट करून हा दुःखद लेख संपवितों.

**भाला, ( पुणें )**

प्रो. अण्णासाहेब विजापूरकर हे आगस्टच्या पहिल्या तारखेस परलोकवासी झाले हें लिहिण्यास आम्हांस अत्यंत दुःख होत आहे. सहा वर्षांपूर्वी नेमक्या याच तारखेला लोकमान्य दिवंगत झाले ही गोष्ट जरी केवळ काकतालीय न्यायानें घडून आली तरी तिचें एका अर्थानें महत्त्व आहे......... प्रो. अण्णासाहेब यांची साधी राहणी, लोकशिक्षणाबद्दल अखंड हौस व त्यांनीं आमरण केलेला स्वार्थत्याग या गुणत्रयीनें ते आपल्या हयातींत सर्वांना सारखे प्रिय झाले होते. त्यांच्या अंगीं वसत असलेल्या वरील तीन गुणांचें चीज व्हावें तसें मात्र झालें नाहीं ही दुःखाची गोष्ट होय. (ता. ८ आगस्ट १९२६)

**महाराष्ट्र, ( नागपूर )**

प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर एम्. ए. यांच्या मृत्यूनें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेचा एक अद्वितीय पुरस्कर्ता व कळकळीचा देशभक्त नाहींसा झाला आहे. .........प्रतिकूल परिस्थिति असतांहि त्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचा पिच्छा सोडला नाहीं. अलीकडे दोन वर्षें ते थकले होते...
..... तरीसुद्धां नवीन समर्थ विद्यालयाची ते चिंता वाहात असत.........
त्यांची चिकाटी दांडगी होती. त्यांची राहणीहि अगदीं साधी, महात्मा गांधींच्या तोडीची व विचारसरणी उच्च व उदात्त होती. त्यांनीं देशसेवेस आपलें सर्व आयुष्य वाहिलें व ती सेवा करतांनाच त्यांचा अंत झाला. त्यांच्या मागें तरी आमच्या देशांतील सर्व विद्यालयें राष्ट्रीय भावना उत्पन्न करणारीं राष्ट्रीय व समर्थ विद्यालयें होवोत असें आम्हीं चिंतितों.

**महाराष्ट्रधर्म, ( वर्धा )**

ता. १ आगस्ट रोजीं प्रो. विजापूरकर ह्यांनीं आपली मुशाफिरी संपविली. राष्ट्रीय शिक्षण हा त्यांचा धर्म आणि त्यासाठीं काढलेलें तळेगांवचें समर्थ विद्यालय हें त्यांचें धर्मक्षेत्र होय. या धर्मक्षेत्रांत काम करीत करीत त्यांनीं देह ठेविला......त्यांना राष्ट्रीय शिक्षणाचें वेड लागलें होतें. अशीं वेडपीं माणसें आपल्यांत फार थोडीं......त्यांची राहणी साधी होती......समर्थांविषयीं

त्यांची श्रद्धा होती ...... "अनुद्वेगकरं वाक्यं " हा भगवद्गीतेचा आदर्श त्यांच्या आचरणांत होता......त्यांची राष्ट्रीय शिक्षणाविषयींची तळमळ तरुण पिढींत उतरली तर त्यांच्या आत्म्याला समाधान वाटेल. हें समाधान त्यांच्या आत्म्याला लाभणार हें तर आतां देवच बोलून चुकला आहे. (१३-८-२६)

**विविधवृत्त,** ( मुंबई )

तळेगांवच्या समर्थ विद्यालयाचे संस्थापक प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर हे ता. १ आगस्ट रोजीं मृत्यू पावले......... महाराष्ट्रांतील जुन्या पिढीचा एक कर्तृत्ववान पुरुष, राष्ट्रीय शिक्षणाचा खंदा पुरस्कर्ता, आणि कै. ना. गोखल्यांचा निस्सीम स्नेही महाराष्ट्रांतून ओढून गेला हे कळविण्यास आम्हास अत्यंत खेद वाटतो.......आगरकरांनीं ' सुधारक ' काढल्यावर गोखल्यांना त्याचें इंग्रजी रकाने भरण्याला वेळ नसल्यास विजापूरकर मजकूर लिहून देत. विजापुरकरांना न्या० मू० रानडे यांच्या मताविषयीं आदर असल्यामुळें कॉंग्रेसच्या मंडपांत सामाजिक परिषद भरवावी कीं भरवूं नये या १८९५ सालच्या वादाच्या वेळीं ' भरवूं नये ' या पक्षाचीं कारस्थानें खरमरीत टीकेसह इंदुप्रकाशमधून उजेडांत आणण्याचें काम " **रामराजा** " या टोपण नांवाखालीं त्यांनीं केलेलें होतें......ग्रंथमालेच्या द्वारें त्यांनीं केलेल्या वाङ्मयसेवेबद्दल अर्वाचीन महाराष्ट्र सारस्वताच्या इतिहासकाराला स्वतंत्र प्रकरण लिहावें लागेल इतकी ती मोठी आहे......कै. विजापूरकरांनीं राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रश्नांचा किती खोल, मार्मिक, आणि व्यापक विचार केला होता याची कल्पना, त्यांनीं आपल्या व दुसऱ्याच्या नियतकालिकांतून वेळोवेळीं जे लहानमोठे लेख लिहिले आहेत त्यावरून कोणालाहि करून घेतां येईल.......या लेखांचा संग्रह प्रसिद्ध व्हावा......तो प्रकाशांत आल्यास राष्ट्रीय शिक्षणाचा सांगोपांग विचारांचा एक अमोलिक ठेवाच महाराष्ट्राच्या हातीं पडेल अशी आमची खात्री आहे...........( ८ आगस्ट १९२६ )

**स्वराज्य,** ( पुणें )

प्रो. विजापूरकरांनीं आपलें समर्थ विद्यालय हर प्रयत्नांनीं जिवंत केलें व तें आमरण चालू ठेविलें......समर्थ विद्यालय जोमास लागून त्यांतून तेजस्वी समर्थ सांप्रदाय निर्माण व्हावा आणि शिवाजीच्या कालाप्रमाणें त्या सांप्रदायानें पुनः स्वराज्यप्राप्ति करून द्यावी असा त्यांचा दृढ विश्वास होता. राष्ट्रीय शिक्षण

जगेल किंवा नाहीं अशी नुसती शंकासुद्धां त्यांचे मनाला स्पर्श करीत नसे. राष्ट्रीय शिक्षणाचा वृक्ष असाच फोफावणार अशी त्यांना खात्री वाटत होती. आपल्या समर्थ विद्यालयांतून स्वतंत्र महाराष्ट्र-विद्यापीठ निर्माण होईल असें ते प्रथमपासून म्हणत असत.........त्यांच्या इतका राष्ट्रीय शिक्षणाचा अभिमानी, आजन्मसेवक, व साध्या राहणीचा भोक्ता मिळणें फारच कठीण! ......महात्मा गांधीचें ग्रामसंघटनेचें तत्त्व त्यांना फारच पसंत होतें. हेंच कार्य पूर्वी समर्थशिष्यांनीं केलें व आध्यात्मिक राजकारण यावरच रचिलें पाहिजे असें ते म्हणत. राष्ट्रीय शिक्षणाच्या पितृस्थानीं असलेला हा कैवारी नाहींसा झाला हा दैवदुर्विलास नव्हे काय ?......( ता. ५ आगस्ट १९२६ )

**ज्ञानप्रकाश, ( पुणें )**

.........राष्ट्रीय शिक्षणाची लाट आल्यापासून तों तहत आज मित्तीपर्यंत म्हणजे सुमारें वीस वर्षांच्या कालांत शिक्षणासंबंधांत लोकमताचीं अनेक स्थित्यंतरें झालीं तरी त्या शिक्षणांत वीस वर्षेपर्यंत अढळ श्रद्धेनें चिटकून राहिलेले विजापूरकरांच्या सारखे महाराष्ट्रांत दुसरे गृहस्थ क्वचितच सांपडतील ...... ...... एकदा एक काम हातीं घेतलें कीं सत्यसंकल्पानें व एकनिष्ठेनें पार पाडण्याचा आटोकाट प्रयत्न करणें हा प्रो. विजापूरकर यांच्या अंगांतील गुण विशेषतः तरुण पिढीला अनुकरणीय असा होता. त्यांच्यामुळेंच त्यांना टिळक व गोखले यांच्या सारख्या परस्परविरुद्ध पक्षाच्या पुढाऱ्यांकडून सहानुभूति व सहाय्य मिळत असे ..................... "देह जरी निघून गेला तरी माझा आत्मा मात्र या विद्यालयांत निरंतर राहील" असें ते म्हणत. इतकी त्यांची संस्थेबद्दल व तिच्या कार्याबद्दल अनन्य निष्ठा होती. त्यांच्या मृत्यूनें राष्ट्रीय शिक्षणाबद्दल अचल श्रद्धा बाळगिण्यांत अनन्यसाधारणता संपादन केलेला असा एक गृहस्थ नाहींसा झालें आहे...(आषाढ कृ० १० श. १८४८ )

## A great worker.

**Liberater,** ( *Delhi* )

To-day is the twelfth day from demise of the pioneer worker in the cause of National Education in Maharastra, Prof. Vishnu Govind Bijapurkar......He started Samarth Vidyalaya at Talegaon Dabhade, some twenty miles west

of Poona. This institution was disolved by an order of the Government of India, as it did not send unemloyables to the market of clerks or other parasites. It did not turn out to undersell the graduates of the Bombay University and was declared an illegal institution.

Through the perseverence of Prof. Bijapurkar and the sympathy of the Servants of India Society, the institution was revived under the name "New Samartha Vidyalaya." The Institution is working very well and is still not engaged in producing imitation graduates. It is still an institution of "National Education" and we hope and pray will remain so and proper. *(12 August 1926.)*

---

**Maratha,** ( *Poona* )

It gives us great pain to record the demise of Prof. V. G. Bijapurkar......he was the pioneer of Natioual Education in Maharashtra...He started the Samarth Vidyalaya and brought it to the perfection of Model Institution of National Education before he was sent to jail. The School after his imprisonment continued with as much vigour, so much so that it became an eyesore to Government which ordered its shutting up in 1910......Again New Samarth Vidyalaya was launched into existance.

Since then, his life had become the life of almost a *Rishi* and his residence had been turned into a place of worshipful visit for a large number of his pupils, friends and co-workers who were often seen going to Talegaon to pay their respect to their *Guru* from whom they had derieved much of their love of National Education, Marathi Language, learning and character. In the Samarth Vidyalaya and outside, his was a figure of purity and milky good nature. He possessed such amiable qualities that to the students of the old Samarth Vidyalaya

as to those of the new, Anna Bijapurkar was a living father. His disappearence from the field of National Education will leave a void which is sure to remain unfilled for a long time to come. (*8th August 1926*)

ना. सर चौबळ, ( पुणें )

Prof. Bijapurkar—He is a living specimen of what is called "Plain living and High thinking." (१३-१-१९१९)

रा. जगन्नाथपंत ढवण, मुख्याध्यापक, वैश्यविद्याश्रम ( सासवनें )

गुरुवर्य अण्णासाहेब विजापूरकर हे फारच मोठी कामगिरी करून गेले आहेत. हिंदुस्थानच्या तीन टोकांस राष्ट्रीय शिक्षणाचे तीन प्रयत्न स्वतंत्र रीत्या करण्यांत आले. पूर्वेस बंगालमध्यें ' दि कौन्सिल ऑफ नॅशनल एज्युकेशन ' या संस्थेनें शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला. उत्तरेस गुरुकुलानें हें कार्य केलें आणि महाराष्ट्रांत प्रो. विजापूरकर यांनीं समर्थ विद्यालय स्थापून राष्ट्रीय शिक्षणाचे जे प्रयत्न चालले आहेत त्यांना खरी स्फूर्ति अण्णासाहेबांच्या समर्थ विद्यालयापासून मिळाली आहे. राष्ट्रीय शिक्षणाचे बाबतींत त्यांचीं मतें पूर्ण ठाम अशीं बनलेलीं होतीं. राष्ट्रीय शिक्षणाच्या कक्षेंत ते ध्रुवताऱ्याप्रमाणें अचल होते........अण्णांच्या शद्बांत सांगावयाचें ह्मणजे राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे ' कार्याणामुत्तमं कार्यम् ' ' साधनानां च साधनम्, ' आणि ' आधारः सर्व चेष्टानाम्, ' असें आहे....राष्ट्रीय शिक्षणास मदत करा व राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य अखंड चालवा हाच अण्णासाहेबांचा सर्वांना दिव्य संदेश आहे.

श्री. पांडुरंग केशव शिराळकर, ( कऱ्हाड )

आपण संस्था चांगल्या नांवारूपास आणण्याची जितकी खटपट कराल तितकी थोडी आहे. हें अण्णांचें स्मारक आहे तें कायम टिकवून त्याची सुधारणा झाली पाहिजे. आपल्या प्रयत्नास परमेश्वरकृपेनें महाराष्ट्राचें साहाय्य मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. यत्न पाहिजे, सहाय्य सर्वांचें मिळेल ह्यांत संशय वाटत नाहीं. ( १९-८-२६ )

ना. भास्करराव जाधव, ( शिक्षणमंत्री )

अण्णांचें कार्य त्यांचे मागें राहिलेलें आहे तें पुढें चालविणें हेंच आपणां सर्वांचें कर्तव्य आहे. प्रत्येक देशसेवक या कामीं जरूर सहाय्य करील. या

भागांत आल्यावर संस्थेस भेट दिल्याशिवाय राहणार नाहीं. संस्थेची भरभराट व्हावी असें मी इच्छितों. ( १६-८-२६. )

**महात्मा गांधी**, अहमदाबाद ( ५-३-१९२७ )

महर्षी प्रो. विजापूरकर यांची ओळख मला प्रथम कै. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं करून दिली. त्या वेळीं कै. गोखले हे म्हणाले होते कीं 'पदवीधर गृहस्थांमध्यें प्रो. विजापुरकरांसारखे सत्यनिष्ठ सज्जन फारच थोडे आढळतील.'

**प्रो. वामन मल्हार जोशी** ( हिंगणें बुद्रुक–पुणें )

अण्णांच्या सारख्यांचे गुण हे कित्येक वेळां दोषस्वरूप होत हें ह्मणणें व्यर्थ आहे. जगांत ज्यानें त्यानें आपलें ध्येय निश्चित करून तन्निष्ठ रहावें व यथामति तत्सिद्धयर्थ कार्य करीत रहावें, हाच धर्मशास्त्राचा अंतिम सिद्धांत. अण्णासारख्यांचें स्मरण आपणांस पुनीत करतें, त्यांचीं चरित्रें आपणांस " दुःखांना भितां काय ? दुःखें येतील आणि जातील; प्राण देखील जावयाचे आहेत. मग सुखदुःखांचें काय ? जगांत कोठें चिरंतनत्व असेल तर तें सद्बुद्धींत व सत्कार्यांत आहे " असें सांगतात व आपलें अंगीकृत कार्य उत्साहानें, नेटानें, चिकाटीनें, संकटांना धैर्यानें तोंड देऊन, नैराश्याला कधीं बळी न पडतां, शांतपणें, धिम्मेपणानें, निरभिमानपूर्वक, चंद्रसूर्यांप्रमाणें, ( Without haste, without rest ) करीत रहावें असें बजावतात, तेव्हां हा उपदेश वंद्य समजून स्वीकृत उचित कार्यास लागावें हें बरें. ( मनोरंजन अंक ३७६, आक्टोबर १९२६ )

**श्री. श्रीनिवासराव कौजलगी**, बेळगांव ( १९-८-२६ )

कार्याच्या महत्त्वावर विश्वास ठेऊन निःसीम निःस्वार्थीनें आपल्यासारखी मंडळी झटत राहिल्यास अण्णासाहेबांचें उद्दिष्ट सफल झाल्याशिवाय राहणार नाहीं, आणि लोकांची सक्रिय सहानुभूति पण मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

**स्वामी श्रद्धानंद**, दिल्ली ( २१-८-२६ )

" स्वर्गवासी श्री. प्रोफेसर विष्णु गोविंद विजापूरकरके महत्वपूर्ण कार्यको आप लोक ठीक प्रकार चला सके ऐसी ईश्वरसे मेरी प्रार्थना है "

**श्री. वा. दा. मुंडले**, संपादक ' **ब्राह्मणपत्रिका** '

कै. विजापूरकरांइतका कार्यनिष्ठ, कार्यासाठीं स्वतःचें व्यक्तित्व बाजूस सारणारा, साधा, निरलस, व प्रपंचांत राहून विरागपूर्ण अशा साधुवृत्तीनें राह-

णारा, विम्या वृत्तीचा, सच्छील, उत्कट देशभक्त, व परम स्वार्थत्यागी पुरुष क्वचितच सांपडेल असें म्हणावें लागतें. लो० टिळक व म० गांधी या दोन व्यक्ती सोडून दिल्या तर महाराष्ट्रांत त्यांच्या तोडीचा ( वरील सर्व गुणांनीं युक्त असा ) दुसरा माणूस सांपडणार नाहीं असें वाटतें. त्यांच्यापेक्षां अधिक बुद्धिमान्, कर्तबगार, व लौकिकास चढलेले अनेक पुरुष दाखवितां येतील; पण बुद्धी, कर्तबगारी व लौकिक एवढ्याच गुणांवर कांहीं मनुष्याचें थोरपण अवलंबून नाहीं. त्याखेरीज आणखी कित्येक उच्च गुणांची अपेक्षा असते आणि ते विजापूरकरांच्या अंगीं होते म्हणूनच त्यांचें चरित्र व चारित्र्य आदर्शभूत झालेलें आहे. ( टि. म. वि. त्रैमासिक व. ४, अं. २ ).

**आर्योन्नति मंडळ, ( मुंबई )**

प्रो० विजापूरकरांच्या निधनानें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचा एक पुरस्कर्ता, नेकीनें, नेटानें आणि चिकाटीनें काम करणारा आणि प्रतिकूल परिस्थितीशीं झगडणारा खंदा वीर नाहींसा झाला याबद्दल दुःख वाटतें. त्यांच्या या संस्थेशीं २३ वर्षें संबंध होता. ( १०–८–२६ )

**ब्राह्मण सभा ( मुंबई )**

समर्थ विद्यालय हें त्यांचे मागें असलेलें स्मारक नीट रीतीनें चालविणें हेंच महाराष्ट्रीयांचें कर्तव्य आहे. ( १५-८-२६ )

**मराठी ग्रंथ-संग्रहालय ( मुंबई )**

कै. प्रो. विजापूरकर ह्यांनीं " ग्रंथमाला " व " विश्ववृत्त " यांच्या द्वारें मराठी वाङ्मयाची पुष्कळ वर्षें निरपेक्ष बुद्धीनें श्रेष्ठ दर्जाची सेवा केली आहे. त्यांचें आचरण एखाद्या प्राचीन ऋषीसारखें होतें. अशा प्रकारच्या विद्वान्, राष्ट्रप्रेमी, चिकाटीनें काम करणाऱ्या, आदर्शभूत चरित्र असलेल्या सद्‌गृहस्थांच्या निधनानें महाराष्ट्राचें अपरिमित नुकसान झालें आहे.

## परिशिष्ट दुसरें

## महत्त्वाचा पत्रव्यवहार

जुन्या समर्थविद्यालयासंबंधीं (१) 'एज्युकेशनल इन्स्पेक्टर,' मध्यभाग (पुणें) व (२) समर्थविद्यालय 'समिति ॲक्टा'अन्वयें बेकायदेशीर ठरवून बंद करण्यासंबंधींचा पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकरवीं विद्यालयाच्या चालकांकडे पाठविलेला हुकूमः—

(Copy)

No. C. B. 8262 of 1909–10.
*Poona, Office of the*
EDUCATIONAL INSPECTOR, C. D.,
*29-30 November 1909.*

To,

The Manager,
Samartha Vidyalaya
TALEGAON. ( POONA ).

Sir,

Under orders from the Director of Public Instruction conveyed in his No. 8740 dated 18th November 1909, I have the honour to inform you that Government consider the teaching in your School to be pernicious and that therefore no boy from your School will be admitted to any aided or recognized school in this Division after January 1st 1910.

I have the honour to be
Sir
Your most obedient servant
(Sd.) Illegible
Ag. Educational Inspector, C. D.,

*Judicial Dept.*
BOMBAY CASTLE.
*14th June 1910.*

No. 3333—The following notification by the Government of India in the Home Department is published for general information:—

**Political.**

(Copy) No. 644 of SIMLA,
*10th June 1910.*

Whereas the Governor General-in-Council is of opinion that the Association styled the 'Samarth Vidyalaya' situated at Talegaon in the Poona District of the Bombay Presidency has for its object interference with the maintenace of law and order and constitues a danger to the public peace:

In exercise of the power conferred by section 16 of the Indian Criminal Law Amendment Act 1908, the Governor General-in-Council hereby declares the said association to be unlawful.

(Sd.) Illegible
*Offg. Secretary to the Government of India*
True copy
District Magistrate, Poona.

---

## नामदार गव्हर्नरसाहेब यांचेकडे पाठविलेला गु० अण्णासाहेबांचा विनंति-अर्ज

ता. २६ फेब्रुवारी १९१६ रोजीं खालील अर्ज गु० अण्णासाहेबांनीं त्या वेळचे मुंबई इलाख्याचे नामदार गव्हर्नर लॉर्ड वुइलिंगडन यांना पाठविला होता. या अर्जाचें उत्तर सुमारें एक वर्षानंतर ता. ४ जानेवारी १९१७ रोजीं नकारात्मक आलें. सदर पत्रांतील तिरप्या अक्षरांतील मजकूर मुद्दाम लक्ष वेधण्यासाठीं तसा तिरपा दाखविला आहे.

To,

His Excellency, The Right Honourable,
Freeman Freeman–Thomas Baron
**Willingdon of Ratton,**
G. C. I. E.,
Governor and President in Council,
BOMBAY.

The humble petition of
Vishnu Govind Bijapurkar, M. A.,
residing at *Talegaon Dadhade*
in the Poona District.

MOST RESPECTFULLY SHOWETH,

I. That Your Excellency's petitioner is an M. A. of the University of Bombay having obtained his degree in the year 1893. Passing the B. A Examination in 1886 from the Deccan College, your petitioner was appointed a 'Dakshina Fellow' for two years *viz.* 1887 and 1888 in the Deccan College, Poona, and for an additional year 1889 in the Gujrat College, Ahmedabad. In the year 1890 your petitioner was appointed 'Ghorpade Lecturer' in the Rajaram College at Kolhapur ; and after your petitioner obtained the degree of Master of Arts from the University of Bombay in the year 1893, he was made Professor of Sanskrit in the same College. While at Kolhapur your petitioner had also been appointed and was working as Superintendent, Sardars' Class.

II. That Your Excellency's petitioner had a close connection with Educational Institutions, and was working as a teacher from 1886 to 1905 *i. e.* for a continuous period of twenty years.

III. That while working as a Professor in the Rajaram College at Kolhapur, Your Excellency's petitioner spent his leisure hours in writing or editing works in the Marathi Language either as translations or adaptations.

from other languages, as also works containing original thought and research, during the course of which Your Excellency's petitioner had come to realise the fact that Marathi which is the common mother-tongue of the people of all grades and persuasions in Maharashtra could alone be successfully resorted to as the medium of instruction, and that this medium alone could lessen the heavy and taxing studies which over-burdened the student in the Secondary Schools and Colleges.

IV. That therefore Your Excellency's petitioner thought that the condition of the student could not be ameliorated unless an institution was started which— (*a*) Would make Marathi the medium of instruction; (*b*) Would enforce residence by students in the institution situated in open air at a distance from any town or village as a special condition, thus establishing a closer and more personal relation between the pupil and the teacher; (*c*) Would enforce celibacy as a condition to any student belonging to it; (*d*) Would simplify the course of studies and diminish the stiffness and frequency of examinations; (*e*) Would impart manual instruction hand in hand with intellectual training; (*f*) Would give religious education according to the best traditions of the Hindus *i. e.* with toleration for all sects.

V. That synchronously with these events in the life of Your Excellency's petitioner, the first outward signs of the now inaugurated Hindu University had begun to be seen, and while Your Excellency's petitioner was considering the question of resigning his post as a Professor at Kolhapur, His Highness the Maharajah Saheb dispensed with his services in the College in the year 1905, and Your Excellency's petitioner announced his intention of starting an institution from the 1st of June 1906 to be named "The

Samartha Vidyalaya," and accordingly the Vidyalaya was started at Kolhapur in the month of June 1906.

VI. That just after about a year of its starting, however, it had to be removed to Miraj, on account of plague at Kolhapur and finally to Talegoan Dabhada, at which last place Your Excellency's petitioner was enabled to purchase lands for the institution as the result of liberal contributions from individuals and the public in general.

VII. That thus at Talegaon Dabhada was established on its own grounds, the Samartha Vidyalaya as a Secondary school with a class of advanced students to give these latter higher education, and fit them to be teachers well grounded in the theory and practice of education.

VIII. That the institution started under circumstances stated above was making fair progress which may be characterised as satisfactory, considering the very short period which had elapsed since its inauguration. A detailed Curriculum of studies and an abstract of the daily routine of work of the students will be found appended herewith. Classes used to meet and students lived in Bamboo huts for some time till gradually buildings were erected for the residential school. There was wide-spread sympathy and readiness to give pecuniary support among the people as was evidenced by small gifts by people of ordinary means and large donations from various gentlemen in different places. A good staff of teachers was there, and the institution was gradually thriving.

IX. That while the Vidyalaya was quietly progressing onwards on the lines laid down as above, Your Excellency's Petitioner learnt that Warrants were issued by the Kolhapur Darbar on account of proceedings having been launched in the Court at Kolhapur against Your Excellancy's petitioner and Mr. V. M. Joshi, M. A. under Section

121 A of the Indian Penal Code and other cognate offences for an article appearing in Vishvavritta, a monthly magazine printed and published at Kolhapur. Whereupon Your Excellency's Petitioner considering it inadvisable to wait till the Warrants actually reached him, voluntarily appeared before the authorities and had the process served on him under which he was arrested and was subsequently, after two months of police custody, released on bail.

X. That after he was released on bail and having failed to find any offensive matter in the article after a careful consideration Your Excellency's petitioner suspected that the prosecution was probably due to some evil reports about the Samartha Vidyalaya and with an anxiety to guard against any remote danger to the institution applied for an interview with His Excellency Sir George Clarke ( now Lord Sydenham ) the then Governor of Bombay but he was asked to apply again for the interview after the case pending against him was decided.

XI. That after the case against Your Excellancy's petitioner was decided with the result that a conviction and sentence was passed against him, His Excellency Lord Sydenham was pleased to grant to Mr. J. V. Oka M. A., who officiated for Your Excellency's Petitioner in his absence, an interview at the end of which His Excellency was reported to have expressed satisfaction and to have observed that the Government had no wish to come in the way of the school so long as it stuck to pure educational work and did not teach objectionable things.

XII. That towards the end of that year, however, while Your Excellency's petitioner was undergoing his sentence, Government declared that students from the Samartha Vidyalaya, among a number of others, would not be admitted to any Government aided or recognized institutions.

XIII. That owing to Your Excellency's petitioner's incarceration at the time no steps were taken for the removal of such misunderstanding about the Vidyalaya on the part of Government as may have contributed to the inclusion of the Samartha Vidyalaya among the proscribed institutions—a step which would certainly have been useful in warding off the catastrophe that befell the institution soon afer *i. e.* in the month of June 1910; when by resolution No. 644 of the Government of India dated 10th of June 1910 from Simla the Samartha Vidyalaya was declared to be an unlawful association under Sec. 16 of the India Criminal Amendment Act of 1908 whereby the Vidyalaya was stopped.

XIV. That after the period of his sentence had run out and after his discharge from prison Your Excellency's petitioner approached His Excellency the Viceroy direct as the authority from whose Government had emanated the resolution regarding the Vidyalaya but that as the matter must, in due course, be referred back to the Government of Bombay and through it to its several subordinates concerned, Your Excellency's petitioner severally asked for and secured interviews with Mr. Mountford the Collector of Poona, and the Director of Public instruction with the result that both these officers came to the conclusion that there would be no objection to the work being taken up again under proper safe-guards as to superintendence and inspection.

XV. That being wholly and solely devoted to education and problems appurenant thereto Your Excellency's petitioner was in touch with the progress and development of education in other countries especially in England and America and accordingly up to-date methods of instruction were introduced into the School, which not being restrained by Departmental rules could admit of changes which appeared to be worth adopting.

XVI. That during the time that the institution worked, its results were satisfactory. The boys were healthy, enjoyed open air, river baths, fine hilly walks and sports of all sorts. All cramming was discouraged. There was no undermining of the health of students as a result of overwork physical or intellectual. English came to them easily by the direct or conversational method and they never felt the strain so common in other schools, as they had never to learn by heart any words. In fact they learnt nothing unassociated with things actually seen or touched or heard or smelt or tasted. All of them learnt Sanskrit with the help of easy prose or poetry without the complicated grammatical rules and forms and stored with joy each day a new moral lesson committed to memory after duly understanding one stanza from the sacred language. They gladly learnt a new verse by heart Sanskrit or Marathi to be repeated at dinner time one by one. Geography was most intelligently taught as associated with history, commerce and enterprise. A spirit of adventure was being bred up on the presentation of lives of adventurous travellers, heroes of research and trade and benefactors of the human race. The students liked manual work of all sorts, carpentry, weaving, smithy and gardening, so that in course of time it was hoped that some would be captains of industry.

XVII. That it was an institution which was trying an experiment with such immense possibilities that has suffered on account of the resolution of the Government of India referred to above. But perhaps the times were peculiar; nor it is unlikely that the managers of the School by certain features of their conduct, may have given room to Government for suspicion and displeasure. It would serve no useful purpose to go into the details or examine the propriety of the action then taken by Government;—

still your Excellency's petitioner submits that *the punishment of extinction was singularly hard. The teachers perhaps deserved greater confidence, being themselves products of the education given to them by Government Colleges and doing everything in broad day-light.* Your Excellency's petitioner frankly admits that if the managers had made efforts at the proper time to remove all doubt about the institution and free it from suspicion and distrust with which it was surrounded, Your Excellency's petitioner believes that so many valuable years of its life would not have been wasted.

XVIII. That circumstanes are now changed, and a period of five years an a half cannot but have passed without its chastening effect. Your Excellency's petitioner trusts and hopes that it is the desire of none that an institution like the Samartha Vidyalaya with all its possibilities and the selfless workers devoting their lives to its cause should remain under a permanent ban, and that Government will graciously pardon everything that they may have seen wrong in the working of the institution. Your Excellency's petitioner fervently hopes that with greater sympathy from Your Excellency's Government Your Excellency's Petitioner will be enabled to start work again and have the Samartha Vidyalaya affiliated to the Hindu University which is now an accomplished fact, and also be able to provide for the education and training of such boys as would be unable to proceed to the University and desire a more practical course.

XIX. That Your Excellency's petitioner begs to state that if the ban is removed and he is permitted to revive the institution he will not only have no objeotion to the educational officers of Government or responsible officers of the University visiting and inspecting the school—but will welcome such inspection and give the most ade_

quate consideration to any suggestions for improvement that may be made by them. He will always be prepared to adopt such measures and take such steps as will leave absolutely no room for any doubt or suspicion being raised about the institution and will ensure a healthy exchange of ideas between the managers and the Government so that the regrettable experience of the past may not find any cause for its repetition. That with his pure educational aims, the first and foremost of which is instruction through the medium of the vernacular, Your Excellency's petitioner solemnly assures Government that the work of the institution will be conducted in the proper spirit, that he further unreservedly declares that so long as the essential principles and distinguishing features of the type of education he advocates are allowed to be kept in tact, he is willing to leave final judgment into tha hands of Government in any matter that they think important. He is also prepared to inform Government as to the different textbooks that may from time to time be adopted for the different standards and accept any suggesions that may be made in respect of them.

XX. That at present Your Excellency's Petitioner will be the sole organiser and head of the institution, and until the ban in removed and the notification cancelled, it will be difficult for him to get the right men to co-operate and work with him; but when he gets them he also engages to inform Government as to who and what they are,—their educational qualifications and academic distinctions. It will of course be his peculiar ambition to make the institution a success and naturally it will be his desire and attempt to get such men to co-operate with him as are animated with a selfless love for education and will devote their entire energies with religious zeal to turn out from the Institution, men of whom the Government and the country may be justly proud.

XXI. That Your Excellency's Petitioner, therefore now humbly approaches Your Excellency with a prayer that Your Excellency will be graciously pleased to take into Your Excellency's consideration the whole case of Your Excellency's Petitioner and recommend the removal of the ban which now exists against the institution.

And Your Excellency's Petitioner as in duty bound shall ever pray.

*23rd February 1916.*
Talegaon Dabhada,
POONA.

---

Reply to this petition from the Secretary to Government Educational Department Bombay under his no. 16 of 4th January 1917.

From,

G. A. Thomas, Esq. I. C. S.,

(Copy) Secretary to Government.

To,

Mr. Vishnu Govind Bijapurker.

Sir,

With reference to your letter dated 24th February 1916 forwarding for submission to His Excellency the Governor, a petition dated the 23rd idem requesting permission to re-open the Samartha Vidyalaya. I am directed to say that Government are unable to accede to your request.

I have the honour to be,
Sir,
Your most obedient Servant,
(sd.) **G. A. Thomas,**
Secretary to Government.

# Course of studies
IN
# Samartha Vidyalaya.

**(1) Marathi.**

*A critical and comprehensive knowledge of the Marathi Language and Literature*—Selections from various poets; Lives of great men; Choice writings and essays; Grammer Etymology, Elements of Rhetorics, and Letter-writing.

**(2) Mathematics.**

*Arithmetic*—the whole; *Algebra and Euclid*—all portion necessary for Industrial training and everyday work. *Practical Trigonometry*—Elements of Mechanics, Indian system of Book-keeping and a general knowledge of other systems.

**(3) History, Geography, Civics (Constitutional History.) and Economics.**

(*a*) *History*—History of Maharashtra and India. General History of the world. (*b*) *Geography*—of India in detail, physical, commercial, political, economical, religious, educational, etc. and of the whole world as much as is necessary for the understanding of History and Commerce. (*c*) *Citizenship*—the present system of Government in India ( a Village, a Tuluka, a District, a Presidency and the whole country ) Relation of India to England, Indian Social Polity, Different systems of Government in the world, Rights and duties of a citizen. (*d*) *Economics*—General principles of Economics, the elements of Industrial progress, Indian Trade and Manufactures.

**(4) English.**

Beginning with the Conversational method; then a series of Readers. From the fifth standard, stories, lives and Civic Readers. General knowledge of English language sufficient for a clear understanding of any book on

general literature, history or science. Letter-writing and composition. Grammer—only general rules bearing on the reading texts.

**(5) Drawing.**

Model, practical geometry, moulding, Freehand, designing, solid Geometry, Perspective Elements of light and shade. Colour-drawing, drawing from Busts etc., Painting from Life, Anatomy. Block letters, Plans and Elevations of the surveying buildings and scale-drawing.

**(6) Sanskrit.**

1. Practical Grammar. 2. Literature (Vedic, epic and classical). 3. Theological, philosphic and ritual treatises. 4. Recitation of the ritual literature compulsory to those wishing tó be priests.

**(7) Religious Education.**

Morning hymns; stories from Ramayana and Mahabharata; information regarding customs, daily duties and holidays with the principles underlying them. The higher standards will be taught general tenets of Aryan religion on the basis of Manusmriti, Gita and Upanishads etc., and will be encouraged to take up a comparative study of all the prominent religions in the world.

**(8) Hygiene.**

Rules of health; properties of air, water, food and their effects on the body of man; general anatomy and physiology.

**(9) Physics & Chemistry.**

(*a*) *Physics*—all portion necessary for the study of the physical sciences. (*b*) *Chemistry*—Analysis; general principles of Organic Chemistry; all information preparatory for the study of chemical industries. The boys to work for themselves in the laboratory under the supervision of professors.

**(10) Physical Education.**

(*a*) All sorts of athletic and manly games. (*b*) Gymnastic exercises. (*c*) Drill.

**(1) Optional Subjects.**

(*a*) *Carpentry*—Recognizing the different kinds of timber and their uses; handling implements; all sorts of Joints, practice of woodwork required for frames, boxes, tables, and sundry things for every day use. (*b*) *Weaving*—Complete knowledge of the art of weaving on all sorts of hand-looms. Manufacture of Looms. (*c*) Smithy.

**(2) Hindi, Gujrathi & other Indian Languages.**

General colloquial knowledge (optional.)

**(3) Music.**

Only for promising boys.

---

To

G. A. Thomas Esquire, I. C. S.
Secretary to Governmet,
(Copy) Educational Department,
POONA.

Sir,

It is proposed to found a new Education Society like the Deccan Education Society which will be called "The Nutan Maharastra Vidya Prasarak Mandala." Over 125 gentlemen have promised to contribute at least Rs. 60 a year for five years running towards the establishment and maintenance of a secondry school for Literary, Scientific and Industrial education and if the sympathy of Government and its approval of the education scheme mentioned in the accompaniments to this application are secured a much larger number of members and subscribers is likely to be secured.

